


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'तपशील' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (द्वैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'तपशील' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे प्रकाशक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी तसेच संपादकमंडळातील सदस्य ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी तसेच संपादक-मंडळ ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'तपशील' ह्या नियतकालिकाच्या (द्वैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि तपशील संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




# तपशील

अंक १७/१८ खंड ३ २००३

## अनुक्रमणिका



**संपादक**
श्री. नाना जोशी
डॉ. मंगला सरदेशपांडे

**रचना**
हर्मिष देव्हारे

**अक्षरजुळणी**
अभिजित पंडित

**मुखपृष्ठावरील चित्र**
प्रख्यात लेखक डोरिस लेसिंग

**मुद्रण**
संतोष राणे, शारदा ऑफसेट,
ठाणे. फोन ५४३०८३८

**मालक, मुद्रक, प्रकाशक आणि पत्रव्यवहार**

श्री. नाना जोशी
४ अ, सोमणनगर,
क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग,
मुंबई – ४०० ०१२.

**'तपशील'चा तपशील**

* सुट्या अंकाची किंमत रुपये १००/-
* (६ अकांची) वार्षिक वर्गणी रुपये २०१/-
* प्रत्येक अंकाची पृष्ठसंख्या सुमारे १२० ते १२५
* वर्गणी मधल्या अंकापासून स्वीकारली जाणार नाही. थोडक्यात पंधराव्या अंकापासून वर्गणी पाठवली तरी तेराव्या अंकापासूनच अंक देण्यात येतील.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

## संपादकीय

तपशीलच्या या अंकात प्रख्यात ब्रिटिश लेखक डोरिस लेसिंग यांचा परिचय सौ. सुमती जोशी यांनी करून दिला आहे. हा परिचय डोरिस लेसिंग यांच्या शब्दातच करून देण्यात आलेला आहे. हे ज्या ठिकाणी शक्य नव्हते त्या ठिकाणी त्यांच्या साहित्याचा आधार घेतलेला आहे. डोरिस लेसिंग यांच्या साहित्याचा अनुवाद अनेक भाषात झाला. अर्थात भारतीय भाषा त्याला सन्माननीय अपवाद. त्यांना देशोदेशीचे साहित्याशी संबंधित असे पुरस्कारही देण्यात आले आहेत. लेसिंग यांच्या पुस्तकांचा खप वाढावा म्हणून जर्मनी, फ्रान्स, इटाली, स्पेन-ब्राझिल अशा अनेक देशातून त्यांनी प्रकाशकांच्या विनंतीवरून दौरे काढले. अफगाण निर्वासित स्त्रियांच्या दु:खाना वाचा फोडण्यासाठी त्यांनी अफगाणिस्तान आणि पाकिस्तानात दौरे केले. डोरिस लेसिंग यांना Space fiction (Science fiction) पैस ललित साहित्य अथवा विज्ञान कथांसाठीही पुरस्कार प्राप्त झाले आहेत. अशा लेखकांच्या एका परिषदेचे अध्यक्षस्थान त्यांनी भूषविलेले आहे. या सगळ्यात महत्त्वाचा भाग म्हणजे या महान लेखकाचे पाय भारताला मात्र लागेल नाहीत– असे भारताला 'आत्मगौरवाने' म्हणता येईल. आपण या बाबत स्वदेशीच्या व्रताचा भंग होऊ दिलेला नाही. योगायोगाचा भाग असा आहे. की, डोरिस लेसिंग यांचा अत्यंत आवडता लेखक प्रूस्त. त्याच्याबद्दलची लेखमाला अखेरच्या चरणात असताना डोरिस लेसिंग यांचा परिचय 'तपशील' मध्ये प्रसिद्ध होत आहे. सौ. सुमती जोशी यांनी परिश्रम घेऊन अत्यंत वाचनीय असा प्रदीर्घ लेख डोरिस लेसिंग यांच्याबद्दल तयार केलेला आहे. तो तपशीलच्या सर्व वाचकांच्या पंसतीस उतरेल याबद्दल मला अजिबात शंका नाही.

याशिवाय प्रूस्तच्या लेखमालेतील प्रकरण १३ ते १८ वाचावयास मिळेल. प्रूस्त ज्या महान कादंबरीसाठी अजरामर झाला, त्यासाठी या सदैव आजारी असणाऱ्या लेखकाने किती अपार कष्ट घेतले होते, याची कल्पना वाचकाला येईल. पण माहिती जमा करणे एवढ्याच साठी ते उन्मेखून लक्षात घ्यावे असे नाही. डोरिस लेसिंग यानी म्हटल्याप्रमाणे प्रूस्त कालीन फ्रेंच समाजाचे तपशीलवार वर्णन लेखकाने अत्यंत लालित्यपूर्ण भाषेत केलेल आहे. वाचक या लेखमालेतील पुढचा लेख वाचावयास उत्सुक असणारच.

या दोन लेखांची पृष्ठसंख्या २४० झाल्या कारणाने हा जोड अंक काढणे भाग पडले. **तपशीलचा हा १७ व १८ वा अंक.** या अंकाबरोबर 'तपशील'च्या तिसऱ्या खंडाची वर्गणी संपलेली आहे याची नोंद कृपा करून घेतली जावी. डॉ. मीना वैशंपायन यांचा 'क्लिओपात्रा' हा लेख व सौ. प्रतिभा टिल्लू यांचा 'एका महान कोशकाराचा निर्माता' हे दोन लेख हाती असूनही ते मागे ठेवावे लागते याची खंत संपादकाला आहे.

सौ. सुमती जोशी, डॉ. मीना वैशंपायन, सौ. प्रतिभा टिल्लू, सौ. जयश्री जुन्नरकर, श्री. विष्णू सदाशिव ब्रम्हे, श्री. अ. ना. महाशब्दे या सर्व लेखकांनी आवर्जून लिहिले.

सौ. सुमती जोशी, श्री. सांगलीकर, श्री. ए. एस. ठाकूर, श्री. रायकर यांनी वर्गणीदार नोंदवून तपशीलला आर्थिक सहाय्य केले.

Moores Town, New Jersey येथील (Eleanor Keleman) एलनॉर केलमेन यांनी तपशीलसाठी अनेक पुस्तके पाठविली. या सर्वांचे मनस्वी आभार.

– **नाना जोशी**

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

# लेखक आणि त्याची साहित्य निर्मिती

## डोरिस लेसिंग

## यांच्या शब्दात 'डोरिस लेसिंग' (DORIS LESSING)

- सौ. सुमती जोशी

बोस्टन विद्यापीठातर्फे प्रकाशित होणारा पार्टिझन रिव्ह्यूचा २००१ सालचा विंटर इश्यू (अमेरिकेतील शिशिर ऋतुचा अंक) मी चाळत होते. डोरिस लेसिंग यांच्याबद्दलचे माझे लेखन याच सुमारास चालू असल्यामुळे या अंकातील पहिल्या पानावरील संपादकांच्या नोंदीने माझे लक्ष वेधून घेतले. "**डोरिस लेसिंग**" यांना साहित्याचे नोबेल मिळालेले नाही. साहित्याचा दर्जा आणि विपुलता या दोन्ही बाबतीत त्या बाल्झॅक, ट्रोलॉप यांची आठवण करून देतात. त्यांनी चाळीसहून अधिक पुस्तके लिहिली आहेत. कथा, कादंबऱ्या, नाटक, आत्मचरित्र, संगीतिका, कविता असे अनेक साहित्यप्रकार उत्तम तऱ्हेने हाताळले आहेत. **डोरिस लेसिंग** यांची योग्यता जाणण्याचे नोबेल कमिटीचे अपयश हे वैयक्तिक किंवा राजकीय अथवा दोन्ही प्रकारचे असण्याचा संभव आहे. नोबेल कमिटी याची दखल घेऊन योग्य ती कारवाई करेल." अशी आशा पार्टीझन रिव्ह्यूचे संपादक विल्यम फिलीप्स यांनी प्रदर्शित केली आहे. लेखकाचा मोठेपणा हा काही फक्त नोबेल पारितोषिक मिळण्यावर अवलंबून असतो असे नाही. पण 'तपशीलने' या लेखिकेच्या लेखनाचे मूल्य जाणले आहे. म्हणूनच त्यांच्या साहित्याची ओळख करून देणारा प्रदीर्घ लेख मी लिहिला आहे.

**डोरिस लेसिंग** या एक बहुप्रसवा ब्रिटिश लेखिका. चाळीसाहून अधिक पुस्तके त्यांनी लिहिली. त्यात 'दि ग्रास इज सिंगिंग', 'दि गोल्डन नोटबुक', ' दि समर बिफोर दि डार्क', 'दि मेमॉयर्स ऑफ अ सर्व्हायव्हर', 'दि फिफ्थ चाइल्ड', 'बेन इन दि वर्ल्ड', यांसारख्या कादंबऱ्या आहेत. 'दि हॅबिट ऑफ लव्हिंग', 'ए मॅन अँड टू विमेन' यांसारखे कथासंग्रह आहेत. आफ्रिकन पार्श्वभूमीवरील कथा 'आफ्रिकन स्टोरीज' या कथासंग्रहात समाविष्ट केल्या आहेत. 'चिल्ड्रन ऑफ व्हायोलन्स' आणि 'कॅनॉपस इन अरगॉस' या दोन्ही मालिकांतर्गत प्रत्येकी पाच पुस्तके त्यांनी लिहिली आहेत. 'इन परस्युट ऑफ इंग्लिश', 'गोइंग होम', 'अ स्मॉल पर्सनल व्हॉइस', 'प्रिझन्स वी चूझ टू लिव्ह इन' यासारखी वैचारिक ग्रंथसंपदा त्यांनी निर्माण केली आहे. फोर्टीन पोअेम्स हा कवितांचा संग्रह आणि 'प्ले विथ अ टायगर' हे नाटक त्यांनी लिहिले आहे. थोडक्यात कथा-कादंबऱ्यांपासून कवितांपर्यंतचे साहित्याचे अनेक



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

प्रकार हाताळण्याची ताकद त्यांच्या लेखणीत आहे. वाचकांना खिळवून ठेवण्याचे सामर्थ्य असलेल्या या यशस्वी लेखिकेने पंचाऐंशीव्या वर्षात पदार्पण केले आहे.

कोणताही लेखक आपल्या लेखनमाध्यमातून वाचकांशी सुसंवाद साधत असतो. आपले विचार समाजापर्यंत पोचवण्याचा प्रयत्न करत असतो. परंतु तेवढ्याने साहित्यिक जाण असलेल्या व्यक्तींचे समाधान होत नाही. लेखकाची निर्मितीप्रक्रिया जाणून घेण्याची उत्सुकता वाचकांच्या मनात असते. तसेच लेखकाच्या साहित्यकृतीच्या संदर्भात अनेक शंका मनाच्या कप्प्यात कुठेतरी दडलेल्या असतात. अशा सुप्त इच्छाही डोके वर काढत असतात म्हणूनच अशा प्रथितयश लेखकांशी समाज प्रतिनिधी सुसंवाद साधतात. त्यांच्या मुलाखती घेतात. वाचकांच्या मनातली प्रश्नावली हसत खेळत लेखकापुढे उलगडतात. कधी कधी लेखकाला अडचणीत टाकणारे प्रश्न मोठया कौशल्याने लेखकापुढे उभे करतात आणि लेखकाच्या मनोगताला शब्दरूप द्यायला लावतात. अशा मुलाखतींमुळे लेखकाच्या अंतर्मनाचे दर्शन होण्याचा संभव असतो. वाचकांच्या मनातील रिकाम्या जागा भरल्या जातात. लेखकामधील 'माणूस' समजण्यास मदत होते. साहित्याची उत्तम जाण असलेल्या देशोदेशींच्या अनेक मान्यवर व्यक्तींनी डोरिस लेसिंग यांच्या शंभराहून अधिक मुलाखती घेतल्या आहेत. या मुलाखतींचा कालावधीही विस्तीर्ण आहे. १९६४ सालापासून आजपर्यंत प्रसिद्ध होत असलेल्या मुलाखतीत मुलाखतकारांनी लेखिकेचा संपूर्ण जीवनपट, लेखनपट, स्त्रीवादी भूमिका, मानसिक विश्लेषण, जातीयवाद, धर्म, राजकारण, समाजकारण, विज्ञानलेखन, सुफीझम यासारख्या अनेक विषयांना स्पर्श करणाऱ्या प्रश्नांचा भडिमार केला. डोरिस लेसिंग यांनीही या सर्व प्रश्नांना न कंटाळता, विचारपूर्वक उत्तरे दिली. त्या उत्तरातून त्यांनी केलेल्या सघन चिंतन मननाचे मनोज्ञ दर्शन वाचकांना घडते. बुद्धीच्या निकषावर तावून सुलाखून घेतलेल्या कितीतरी विचारांतून या समर्थ लेखिकेच्या वैचारिक वाटचालीचे दर्शन वाचकांना होते. त्यांच्या साहित्यनिर्मितीचे अनेक पदर उलगडतात. त्यांच्या बंडखोर व्यक्तिमत्त्वाचे दर्शन होते आणि साहित्याबद्दलची आणि जीवनाबद्दलची अंतर्दृष्टी प्राप्त होते.

मुलाखतकारांविषयी आपले सडेतोड विचार व्यक्त करताना डोरिस लेसिंग म्हणतात, "मुलाखतकार मुलाखत घ्यायला येतात तेव्हा त्यांनी मुलाखतीसाठी अगदी संकुचित चौकट तयार केलेली असते. मुलाखतकारांना जे प्रश्न विचारायचे असतात त्याची पूर्वसूचना मुलाखत देणाऱ्या व्यक्तीला नसते. काही गुंतागुंतीच्या विषयाबद्दल किंवा एखाद्या समस्येबद्दल जर विस्ताराने बोलायची मुलाखती देणाऱ्याची इच्छा असली तरी त्याला फारसा वाव मिळत नाही. मुलाखतकारांच्या प्रश्नांना तात्काळ उत्तरे द्यावी लागतात. साहजिकच "या विषयावर विचार करायला मला थोडा कालावधी द्या," किंवा 'मी आत्ता जे काही सांगितले त्याकडे दुर्लक्ष करा. कारण मी माझा मुद्दा नव्याने मांडत आहे.' "माझ्या विचारांची मी पुन्हा



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

एकवार सुसूत्र मांडणी करते आहे.'' अशा तऱ्हेची विधाने मुलाखत चालू असताना करता येत नाहीत. शिवाय मुलाखतकारांच्या प्रश्नांना उत्तरे देताना अतिसुलभीकरणाचाही धोका असतो. मी आजवर अनेक मुलाखती दिल्या. कित्येक वेळेस मुलाखतकार मला तेच तेच प्रश्न पुनःपुन्हा विचारतात. पण जणु काही हे प्रश्न मला प्रथमच विचारले जात आहेत असा आविर्भाव ठेवून त्या सर्व प्रश्नांची न कंटाळता मी उत्तरे देते. मुलाखत संपत आल्यावर 'माझं समाधान झालं नसावं' अशी भावना मुलाखतकाराच्या मनात निर्माण होते आणि ते मला विचारतात, "आम्ही उपस्थित न केलेल्या काही मुद्यांवर तुम्हाला चर्चा करायची आहे का?'' त्यावर मी जर होकार दिला तर त्यांचा त्यावर विश्वास बसत नाही आणि एक प्रकारची कंटाळल्याची भावना त्यांच्या चेहऱ्यावर दिसू लागते. कधी कधी तर मुलाखतकाराने कोणते प्रश्न विचारावेत ते मुलाखत देणाऱ्यालाच सांगावे लागते. अशा विपरीत गोष्टी घडल्या तर मात्र ती मुलाखत माझ्या दृष्टीने मृत होते. एकदा एका मुलाखत घेणाऱ्या जर्मन स्त्रीने मला सांगितले, "तू तुझ्या वैयक्तिक जीवनाबद्दल बोलणार नसशील तर .......' तिचे म्हणणे रास्त होते. तिला आणि तिच्या वाचकवर्गाला लेखकाच्या वैयक्तिक जीवनाबद्दलच अधिक माहिती हवी होती. लेखकाला जगातील अनेक देशात मुलाखती द्याव्या लागतात. पण त्यापैकी लेखकाच्या मनात रेंगाळत राहतील अशा दर्जेदार मुलाखती जेमतेम दोन तीन असतात. 'सत्य लोकांपुढे आणणे' हे मुलाखतींचे उद्दीष्ट केव्हाच विसरले गेले आहे.'

डोरिस लेसिंग यांनी आत्मचरित्राचे दोन भाग लिहिले. 'अंडर माय स्कीन' हा पहिला भाग १९९५ साली प्रकाशित झाला आणि 'वॉकिंग इन दि शेड' हा दुसरा भाग १९९८ साली प्रकाशित झाला. इतरांच्या दृष्टीने आपण कसे आहोत हे जाणून घेणे, त्याचा शोध घेणे हा आत्मचरित्र लिहिण्यामागचा एक उद्देश आहे असे डोरिस लेसिंग यांना वाटते. आत्मचरित्राच्या या दोन्ही भागात त्यांनी आपला चरित्रपट आणि लेखनपट वाचकांपुढे ठेवला आहे. चारचौघींप्रमाणे रुळलेला मार्ग त्यांनी अनुसरला नाही. स्वतंत्र बाण्याने आपला मार्ग त्यांनी शोधला आणि ताठपणाने वाटचाल केली. "उत्तमोत्तम कादंबऱ्यांची निर्मिती करणाऱ्या लेखकांचे जीवनही कित्येकदा चारचौघांसारखे सर्वसामान्य असते.'' या नियमाला अपवाद ठरेल असे लेसिंग यांचे जीवन आहे. ही दोन्ही आत्मचरित्रे वाचताना लेसिंग यांच्या चाणाक्षतेचे, सूक्ष्म निरीक्षणशक्तीचे, रोखठोक भाषेत लिहिलेल्या सडेतोड विचारांचे दर्शन घडते. आत्मचरित्र लिहिताना मागे वळून संपूर्ण जीवनपट नव्याने पहायचा असतो. डोंगरावर चढताना वळणावळणांच्या रस्त्यावरून खाली दृष्टी टाकली की मनोहारी दृष्य दिसते. पण प्रत्येक वळणावरून त्या दृष्यातील विविध अंगांनी रंगलेल्या सौंदर्यछटा वेगळ्या भासतात. त्याप्रमाणे जीवनाच्या भिन्नभिन्न टप्प्यांवरून मागे वळून पाहिले असता प्रत्येक टप्प्यावर आपले स्वतःचे आयुष्य आपल्याला वेगळे वाटते असे डोरिस लेसिंग यांचे मत आहे.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

म्हणूनच त्या म्हणतात, "मी जर तिसाव्या वर्षी आत्मचरित्र लिहिले असते तर तो झुंजार दस्तवेज झाला असता. चाळीसाव्या वर्षी जर या लेखनाचा मी विचार केला असता तर माझा सूर अपराधीपणाचा झाला असता. 'अरे देवा, मी हे सगळं कसं केलं असेल?' असं हताश होऊन मी म्हटलं असतं. पण आज पंचाहत्तराव्या वर्षी आत्मचरित्र लिहिताना, त्या बाळाकडे, त्या मुलीकडे, त्या तरुणीकडे त्रयस्थाच्या भूमिकेतून, कुतूहलमिश्रित आश्चर्याने मला पाहात येत आहे."

### तडफदार व्यक्तिमत्त्वाची आई : एमिली मॅकवेग Emly Mcveagh

डोरिसच्या आईने लहानपणापासून आपली हुशारी सिद्ध करण्यास सुरुवात केली. शालेय शिक्षणात तिची प्रगती लक्षणीय होती. हॉकी, टेनिस हे दोन्ही तिला उत्तम खेळता येत होते. नाट्याभिनय, संगीताच्या बैठकी यासारख्या कलाक्षेत्रातही डोरिसच्या आईला चांगलीच गती होती. आपल्या दुचाकीवर स्वार होऊन अभ्यासेतर अनेक उपक्रमात ती सहभागी होत असे. सर्व विषयावरच्या उत्तम पुस्तकांचे वाचन करण्यातही ती आघाडीवर असे. 'मॉंटेसारी' यांनी सांगितलेले बालमानसशास्त्राचे धडेसुद्धा तिने गिरवले होते. त्यामुळे लहान मुलांचे संगोपन कसे करावे, त्यांना सक्षम, स्वतंत्र करून सर्व अंगांनी त्यांचे व्यक्तिमत्त्व कसे घडवावे याचे पाठ्यपुस्तकी ज्ञान तिच्याजवळ होते. त्यानंतर पहिल्या महायुद्धाचा काळ आला. ब्रिटिश घरातील प्रत्येक पुरुष देशप्रेमापोटी युद्धात सामील झाला. दुखापत झालेले अनेक सैनिक रुग्णालयात दाखल होऊ लागले. डोरिसच्या आईसारख्या अनेक तरुणींनी अशा रुग्णांची सेवासुश्रुषा करण्यासाठी परिचारिकेचा पेशा स्वीकारला. कष्टमय जीवन, तुटपुंजा पगार, थंडीपासून संरक्षण करण्यासाठी पुरेसे ऊबदार कपडे घ्यायला, इतकंच नव्हे तर पोटभर जेवायलासुद्धा पैसे नसत. तरुण वय, तडफदार व्यक्तिमत्त्व, ती एका डॉक्टरच्या प्रेमात पडली. विवाहाच्या आणाभाका झाल्या. परंतु दुर्दैवाने टॉर्पिडोने एक बोट बुडवली आणि त्या बोटीबरोबरच त्या बोटीवरील तरुण डॉक्टरलाही जलसमाधी मिळाली. या धक्क्याने ती तरुण नर्स पुरती खचून गेली. त्या तरुणीवर जबरदस्त मानसिक आघात झाला.

### खेडवळ राहणीची ओढ असणारे वडील : अल्फ्रेड टेलर

डोरिसचे वडील खेड्यात राहणारे. कॉलचेस्टरमधील शेतकऱ्यांच्या मुलांबरोबर गावरान जीवन जगण्यात त्यांचं बालपण गेलं. शेतावर, आजूबाजूच्या रानावनात हिंडावं, दंगामस्ती करावी, उनाडक्या कराव्यात असा त्यांचा दिनक्रम असे. शालेय शिक्षणाची गोडी त्यांना अजिबात नव्हती. रविवारी चर्चमध्ये जाण्याचाही त्यांना मनस्वी तिरस्कार होता. शेतकरी व्हावं अशी त्यांची सुप्त इच्छा. पण आईवडिलांपासून दुरावल्यावर त्यांनी बँकेतली नोकरी स्वीकारली. बँकेच्या कामकाजाची फारशी आवड नसली तरी एकदा त्या कामाचा स्वीकार



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

केल्यावर मात्र त्यांनी कधीही अंगचुकारपणा केला नाही. बँकेच्या नोकरीत भरपूर कष्ट केले. आयुष्यातील हे दशक त्यांनी फार आनंदात घालवले. पहिलं महायुद्ध सुरू झालं तेव्हा ते अठ्ठावीस वर्षाचे होते. या युद्धात दोन वेळा त्यांना जीवदान मिळाले. एकदा ॲपेंडिसायटिसमुळे त्यांना परतावे लागले; तर दुसऱ्या वेळेस पायावर तोफेच्या गोळ्यांचा मारा झाल्यामुळे त्यांना एक पाय गमवावा लागला. आजारी पडल्यामुळे त्यांना रुग्णालयात दाखल करावे लागले. शारीरिक व्याधींबरोबरच त्यांना मानसिक अवसादानेही ग्रासले होते. "आपण एका थंडगार अंधाऱ्या खोलीत अडकून पडलो आहोत, बाहेर जायला रस्ता नाही आणि मदत करायलाही कोणी नाही" असे त्यांना वाटत असे. पूर्व लंडनमधल्या रॉयल फ्री हॉस्पिटलमध्ये जखमी अवस्थेत त्यांना दाखल करण्यात आले. डोरिसची आई तिथे नर्स म्हणून काम करीत होती. आईच्या कामातली शिस्त. वक्तशीरपणा, तडफ वाखाणण्यासारखी होती. म्हणूनच सेंट जॉर्ज या टीचिंग हॉस्पिटलमध्ये 'मेट्रन' म्हणून काम करण्यासाठी तिची निवड झाली. वास्तविक भरपूर अनुभव गाठीशी असणाऱ्या श्रेष्ठ परिचारिकेची निवड अशा पदासाठी केली जाते त्याऐवजी इतक्या लहान वयात डोरिसच्या आईची निवड होणे हा फार मोठा सन्मान होता. परंतु त्या उभयतांनी लग्न करण्याचा निर्णय घेतला होता. डोरिसच्या आईने डोरिसच्या वडिलांची वर्षभर जी सेवा केली त्याला तोड नव्हती. किंबहुना या अथक सेवेमुळेच त्यांची प्रकृति सुधारली. पत्नीचे हे ऋण कधीच विसरता येणार नाही अशी डोरिसच्या वडिलांची भावना होती. मेट्रन म्हणून आपल्याला अजोड कामगिरी करता येईल असा दुर्दम्य आत्मविश्वास आईजवळ होता. तरीसुद्धा विवाह आणि सुखी कौटुंबिक जीवनाची तिला ओढ होती. त्यामुळे तिनेही करीअर सोडून लग्न करण्याचा निर्णय घेतला. युद्धात गमावलेल्या असली पायाच्या जागी नकली लाकडी पाय असलेल्या अवस्थेतही डोरिसच्या आईने त्यांचा पती म्हणून स्वीकार केला.

### पर्शियात स्थलांतर

डोरिसच्या वडिलांना आता लंडनला रहायचा कंटाळा आला होता. त्यांनी आपली बदली 'इम्पीरिअल बँक ऑफ पर्शिया' (सध्याचे इराण) मधील कर्मनशाह येथे करून घेतली. हे दांपत्य बर्फाच्छादित डोंगरांनी वेढलेल्या कर्मनशाहमध्ये स्थायिक झाले. तिथे २३ ऑक्टोबर १९१९ साली डोरिसचा जन्म झाला. १९१९ साल हे जागतिक ऱ्हासाचे वर्ष होते. फ्लूच्या साथीने २ कोटी नव्वद लाख लोकांचा बळी घेतला होता. लाखो लोक युद्धात मारले गेले होते. आईवडिल दोघांचीही मनस्थिती ठीक नव्हती. लग्न की करिअर हा संघर्ष, प्रेमभंगाचा आघात, आर्थिक ओढाताण या साऱ्या परिस्थितीमुळे डोरिसच्या आईचे मानसिक संतुलन बिघडले होते. पहिल्या महायुद्धामुळे जागतिक स्थिती अगदी हालाखीची होती. याचे पडसाद



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

डोरिसच्या बालपणावर उमटले. 'विषारी वायुचा काळपट रंगाचा ढग माझं बालपण झाकोळून टाकत होता.' असं डोरिस लेसिंग आपल्या आत्मचरित्रात म्हणतात. २-२।। वर्षापर्यंतचे डोरिसचे बालपण कर्मनशाह येथे गेले. वडील घोड्यावर स्वार होऊन बँकेत जात असत. तेव्हा वडिलांच्या पुढ्यात घोड्यावर बसणे लहानग्या डोरिसला फार आवडत असे. डोरिसची आई विवाहापूर्वी व्यवसायाने परिचारिका असली तरी डोरिसचा जन्म झाल्यावर तिने पूर्णवेळ गृहिणीपद स्वीकारले. आईच्या कडक शिस्तीत डोरिस मोठी होत होती. स्वच्छता, नीटनेटकेपणा, सुसूत्रपणा, सुचकता, टापटीप या सर्व बाबतीत तिच्या आईचा कटाक्ष असे. पण असे संस्कार होऊनसुद्धा डोरिसचा स्वभाव वेगळा झाला. छोट्या डोरिसला या साऱ्याचा जाच होत असे. आईच्या नाटकी बोलण्याचा डोरिसला तिटकारा होता. बाल्यावस्थेत मुलभूत गरज असते प्रेमाची, वात्सल्याची. बालकाच्या निकोप वाढीसाठी मातेच्या दुधाबरोबरच मातृप्रेमाचे अमृतही आवश्यक असते. या प्रेमाचा अर्थ समजण्यासाठी त्या प्रेमाचा प्रत्यक्ष अनुभव घेतला पाहिजे. तो अनुभव आपल्याला मुळीच मिळाला नाही असे डोरिस लेसिंग यांचे प्रांजळ मत आहे. या मातृप्रेमाची महती आईला ठाऊक नव्हती असे नाही. तरीसुद्धा इतरांशी बोलताना, "मला मुलगी नको होती. मुलगा व्हायला हवा होता" हे वाक्य आई अनेकदा उच्चारित असे. 'मुलगा हा वंशाचा दिवा किंवा म्हातारपणातील आधार' अशी भावना तत्कालिन ब्रिटिश स्त्रियांच्या मनात असावी, पण त्यामुळे डोरिसचे कोवळे बालमन कलुषित न झाले तरच नवल ! "माझ्या आईला माझा धाकटा भाऊच अधिक आवडत असे. माझ्यावर तिचे फारसे प्रेम नव्हते." असा आरोप डोरिसने आपल्या आईवर केला आहे. तसेच त्या आरोपाला पुष्टी देणाऱ्या अनेक लहानमोठ्या घटना डोरिस यांनी 'अंडर माय स्कीन' या आत्मचरित्राच्या पहिल्या भागात लिहिल्या आहेत. बालपणातील या मानसिक आघातामुळे आलेल्या पांगळेपणाची भावना कितीतरी वर्षे टिकून राहिली असे डोरिस यांना वाटते. मनाने हळवी, सूक्ष्म निरीक्षणशक्ती असलेली, अन्यायाविरुद्ध लढा देणारी, न्यायनिवाडा करून स्वत:चे मत बनवणारी आणि प्रेमाची भुकेली डोरिस आईपेक्षा अगदी वेगळी होती आणि तेच त्यांच्यातील तणावाचे प्रमुख कारण होते.

भारतीय स्त्रीची वास्तवातील आणि विशेषत: वाङ्मयात चित्रित केलेली प्रतिमा पाश्चात्य स्त्रियांपेक्षा वेगळी आहे. भारतीय स्त्री स्वत:पेक्षा आपल्या कुटुंबाकरिता जगते. पतीच्या उन्नतीसाठी वेळ पडल्यास ती स्वत:च्या महत्त्वाकांक्षेला मुरड घालण्यास तयार असते. मुलांच्या उत्कर्षात स्वत:च्या आयुष्याची सार्थकता आहे असे तिला वाटते. अर्थात या भारतीय स्त्रीच्या रूपात आता बदल होत आहे. पाश्चात्य विचारांचे वारे येथे वाहू लागले आहेत. स्त्रीमुक्ती संघटना स्त्रियांना 'स्व'ची जाणीव करून देऊ लागल्या आहेत. पण विसाव्या शतकात मात्र भारतीय स्त्रियांचे रूप 'त्यागाचे मूर्तिमंत प्रतीक' असेच होते. डोरिस यांच्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

आईबद्दलच्या स्मृती या प्रतिमेच्या विरुद्ध आहेत. त्या म्हणतात, "मी आणि माझा भाऊ यांच्यादेखत माझी आई मुलांकरता आपल्याला किती कष्ट घ्यावे लागतात, मुले वाढवणे किती त्रासदायक आहे, स्वत:चा अंश मुलांकरता कसा खर्ची पडतो, आपले अभिजात गुण मुलांचे संगोपन करताना कसे फुकट जातात हे वारंवार सांगत असे. मुले तिथे हजर नाहीत, असलीच तर बहिरी आहेत किंवा त्यांना काही समजत नाही अशा थाटात आईच्या तोंडाचा पट्टा चालू असे. वास्तविक लहान मुलांच्या पंचज्ञानेंद्रियांची ग्रहणशीलता मोठ्यांच्या कितीतरी पटीने जास्त असते. मोठ्या माणसांचे कित्येक आवाजांकडे दुर्लक्ष होत असले तरी लहान मुले मात्र प्रत्येक बारीकसारीक आवाज लक्ष देऊन ऐकतात आणि स्मृतीत जतन करून ठेवतात. "आईच्या कठोर वक्तव्याचे व्रण मी आयुष्यभर उरी बाळगले. माझ्या मनातील आई विषयीचा तिरस्कार इतका वाढला की कदाचित मी आईला ठार मारले असते. माझ आत्मचरित्र प्रसिद्ध झालं तेव्हा माझी आई हयात नव्हती. पण ती हयात असती तरी मी माझं आत्मचरित्र नक्कीच प्रसिद्ध केलं असतं. माझ्या कोणत्याच गोष्टीला आई कधीच मान्यता देत नसे. ती हयात असली तरी आमच्यामधील विसंवाद उघड करून दाखविल्यामुळे फारसा फरक पडला नसता."

कर्मनशाह हे शहर मोठ्या बाजाराचे ठिकाण होते. शहरात सुंदर इमारती होत्या. त्यांचे राहण्याचे घर प्रशस्त खोल्यांचे आणि मोठे होते. पण त्यानंतर डोरिसच्या वडिलांची बदली तेहरानला झाली. तेहरान हे मात्र घाणेरडं शहर होतं. १९२४ साल उजाडलं आणि कंटाळून डोरिसच्या आईवडिलांनी लंडनला परतायचं ठरवलं. लंडनमध्ये 'ॲपायर प्रदर्शन' भरलं होतं. या प्रदर्शनाचा उल्लेख तत्कालिन साहित्यात अनेकदा येतो. या प्रदर्शनाचा विलक्षण प्रभाव होता. त्यातल्या दक्षिण ऱ्होडेशियाच्या विभागात मक्याच्या कणसांच्या राशी ठेवल्या होत्या आणि "फक्त पाच वर्षात श्रीमंत व्हा" अशा तऱ्हेच्या घोषणा तिथे ऐकू येत होत्या. डोरिसच्या वडिलांवर या साऱ्याची जबरदस्त मोहिनी पडली. त्यांच्या रोमँटिक प्रवृत्तीनुसार त्यांनी सर्व सामानाची बांधाबांध केली आणि अगदी अनोळखी प्रदेशात शेतकरी बनण्याच्या इराद्याने स्थलांतर केले. कॉलचेस्टरमध्ये खेडवळ वातावरणात बालपण घालवलेला हा शेतकऱ्याचा मुलगा, दक्षिण आफ्रिकेतल्या गवताळ प्रदेशात पोचला. ऱ्होडेशियात (आताचे झिंबाब्वे) त्यांनी पुन्हा आपल्या संसाराची मांडामांड केली. ही काही आगळी वेगळी घटना नव्हती. दुखापत झालेले, पूर्वी सैन्यात नोकरी केलेले कितीतरी इंग्लिश, जर्मन सैनिक तिथे येऊन राहिले होते. अन्य सहकाऱ्यांप्रमाणे युद्धात आपल्याला प्राण गमवावे लागले नाहीत, त्या दृष्टीने ते सर्वजण भाग्यवान होते. या सर्व घटनांचा उल्लेख डोरिस लेसिंग यांच्या 'शिकास्ता' या कादंबरीत वाचकांना आढळतो.

विसाव्या शतकाच्या पहिल्या अर्धशतकात विमानसेवा आजच्याइतकी प्रगत नव्हती म्हणूनच लंडन ते ऱ्होडेशिया हा प्रवास त्यांनी बोटीने केला. या प्रवासात डोरिसच्या आईची



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

बोटीच्या कॅप्टनशी मैत्री जमली. हास्यविनोद, थट्टामस्करी करण्यात आईचे दिवस मजेत जात असले तरी डोरिस अस्वस्थ होती. लहानग्या डोरिसची काहीशा क्रूर स्वरूपाची थट्टा करण्यात कॅप्टनचा पुढाकार होता आणि आईची त्याला साथ होती. अशा गोष्टी आई हसण्यावारी नेत असे. डोरिसच्या मनातील आईविषयीच्या रागाचा अंकुर फोफावण्यास अशा घटनांची मदत झाली. आई उत्तम पोषाख करून सायंकाळच्या मेजवान्यात सहभागी होई. त्या रम्य, धुंद वातावरणात आपणही आईबरोबर जाऊन आनंद लुटावा ही लहानग्या डोरिसची तीव्र इच्छा. पण 'या मेजवान्या फक्त मोठ्या मंडळींकरिता असतात. तिथे तुला कंटाळा येईल' अशी सबब सांगून आई डोरिसला आणि तिच्या धाकट्या भावाला केबिनमध्ये कोंडून निघून जात असे. धाकटा भाऊ कंटाळून झोपी जाई. पण डोरिसच्या रागाचा पारा मात्र चांगलाच वर जाई. अशाच एका संध्याकाळी डोरिसच्या मनात कोंडलेल्या ज्वालामुखीचा भडका उडाला. टेबलावर चढून डोरिसने नखं कापायची छोटीशी कात्री मिळवली आणि आईच्या संध्याकाळच्या पोषाखाला चक्क भोके पाडली. रागाची अभिव्यक्ती करण्याची लहानग्या डोरिसची ही पद्धत फारच विलक्षण होती !

**बालपण**

"आत्मचरित्र लिहिताना सत्याला प्राधान्य दिले पाहिजे. म्हणूनच आत्मचरित्र लिहिणे ही अवघड कामगिरी आहे. सत्याशी प्रतारणा न करता अनेक लहानमोठ्या प्रसंगांची कौशल्यपूर्ण गुंफण करून आपला भूतकाळ वाचकांपुढे जिवंत करावा लागतो." असे डोरिस यांचे मत आहे. आपल्या बालपणातील एक आठवण सांगताना त्या म्हणतात, "माझ्या बालपणातील अनेक क्षण आणि घटना स्मृतीकलशात साठवून ठेवण्यात मी बराच काळ घालवला आहे. मी अडीच तीन वर्षाची असताना आईवडिलांनी मला पोहण्यासाठी तलावात नेले. त्यावेळी काही मोठ्या माणसांनी मला शारीरिक त्रास दिला. खरोखरीच त्या घटना मला आठवतात. शारीरिक त्रासाची ती स्मृती उबग आणणारी आहे. तो छळ इतका तीव्र होता की त्याचा ओरखडा माझ्या मन:पटलावर कायमचा उमटला. आपल्या पुष्कळशा आठवणी धूसर असतात. आईवडिलांच्या किंवा आप्तेष्टांच्या सांगण्यावरून त्यातील गाळलेल्या जागा भरून आपण त्या साकार करतो. पण बालपणातील काही स्मृती आयुष्यभर जागृतावस्थेत असतात. कुत्र्याला विशिष्ट वासाची स्मृती असते त्याप्रमाणे बालपणातील या आठवणी अगदी जशा घडल्या तशा सांगता येतात. भाषेचे ज्ञान होण्यापूर्वीच्या बालपणातील घटना सुद्धा काहींना आठवतात. माझ्या एका मैत्रिणीला 'आपण बाबागाडीत बसलो आहोत आणि येणारे जाणारे अनेक लोक उत्सुकतेने डोकावून आपल्याकडे पहात आहेत' हे आठवते. अर्थात माझी ती मैत्रिणी हिस्टेरिकला नाही. माझा तिच्यावर विश्वास आहे. म्हणून ही गोष्ट खरी आहे असं मला वाटते. गर्भावस्थेतील काही गोष्टी लोकांना आठवतात असं म्हणतात. पण मी काही त्याबाबतीत भाग्यवान नाही."



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

ग्रँटा या मासिकात डोरिसनी आपल्या बालपणीच्या काही आठवणी प्रसिद्ध केल्या होत्या. शीर्षकावरून त्या स्मृती त्यांच्या आईबद्दलच्या असाव्यात असा समज होत असला तरी प्रत्यक्षात त्या आठवणीत वडिलांबद्दलचाच भाग अधिक होता. त्याविषयी स्पष्टीकरण देताना त्या म्हणतात, "माझ्या आईचं आयुष्य माझ्या वडिलांच्या आयुष्याशी निगडित होतं. त्यामुळे त्यांच्याविषयी वेगवेगळ्या आठवणी देणे शक्यच नव्हते. माझे वडिल अव्यवहारी होते. कदाचित तो युद्धाचा परिणाम असावा. आम्ही ऱ्होडेशियात (झिंबाब्वे) म्हणजे खरोखरच सोनं असलेल्या देशात रहात होते. आमच्या अवतीभवती छोट्या छोट्या सोन्याच्या खाणी होत्या. सर्व शेतकरी आपल्या गाडीत हातोडा आणि एखादं भांडं ठेवत असत. अनेकदा त्यांना सोन्याचे कण सापडत असत. आपल्याला अत्यंत प्रगत व शास्त्रीय पद्धतीने सोने मिळवता येईल अशी वडिलांची अटकळ होती. त्या दृष्टीने ते नेहमी प्रयोग करीत असत. माझी आई कुशल संघटक होती. तीच सर्व कुटुंबाचे व्यवस्थापन पहात असे. 'एल्डोरॅडो' या माझ्या कथेत मी सोने मिळवण्याच्या वडिलांच्या प्रयोगांचा वापर केला आहे."

शालेय जीवनातील आपल्या आठवणी सांगताना डोरिस म्हणतात, "मला वयाच्या अवघ्या सहाव्या वर्षी घर सोडून कॉन्व्हेंटमध्ये जाऊन रहावे लागले. अमेरिकेतील ज्यू मंडळी आपल्या मुलांना कॉन्व्हेंटमध्ये पाठवीत नसत. पण आफ्रिकेतील गोष्ट वेगळी होती. माणसे ज्यू असोत वा नसोत, तिथे वर्णाने गोऱ्या, सर्वच उच्च वर्गातील कुटुंबातील मुलांना कॉन्व्हेंटमध्ये पाठवण्याचा रिवाज होता. माझे कॉन्व्हेंटमधील पाच वर्षाचे वास्तव्य कधी एकदा संपते याची मी वाट बघत होते. लहान मुलांच्या मनात 'काळ' या संकल्पनेचा काय अर्थ अभिप्रेत असतो त्याची आपल्याला कल्पना येत नाही. "काळ हा कधीच संपणार नाही." असं त्यावेळी मला वाटत असे. ती पाच वर्षे मी निष्क्रीयतेत घालवली. लहान वय, हातात कोणतेही अधिकार नाहीत, इवल्याशा पंखात बंड करण्याची ताकद नाही. त्यामुळे कॉन्व्हेंटमधील या पाच वर्षाच्या काळात मला कसलाही आवाज उठवता आला नाही. निर्भिडपणे मतप्रदर्शन करता आले नाही."

'अंडर माय स्कीन' या आत्मचरित्राच्या पहिल्या भागात डोरिस यांच्या जन्मापासून (२२ ऑक्टोबर १९१९) १९४९ पर्यंतचा तीस वर्षाचा जीवनपट वाचकांपुढे उलगडत जातो. (झिंबाब्वे) ऱ्होडेशियातील जंगलात धाकट्या भावाला घेऊन फिरणारी खेळणारी अल्लड बालिका, कॉन्व्हेंटमधील जाचाला कंटाळलेली आणि चौदाव्या वर्षी शालेय शिक्षणाला रामराम ठोकणारी, पौगंडावस्थेतील शारीरिक आणि मानसिक बदलांचे दर्शन घडवणारी, मतभेद झाल्यावर आईवडिलांशी हुज्जत घालणारी, घराकडे पाठ फिरवून जगाच्या शाळेत अनौपचारिक शिक्षण घेणारी तरुणी अशा बहुरुपी डोरिसचे दर्शन वाचकांना होते. चार वर्षाच्या मुलाची दाई म्हणून काम करणारी आणि ते काम करताना चिंतनाच्या धुंदीत राहून,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मनात कविता लिहिणारी, भाषा प्रभुत्वाने एका कंपनीसाठी परिणामकारक जाहिराती शब्दबद्ध करणारी, टाइपरायटर मिळाल्यावर शॉर्टहँड टायपिंग शिकणारी, परिस्थितीच्या रेट्यामुळे मिळेल ते आणि पडेल ते काम करणारी हरहुन्नरी डोरिस लेसिंग वाचकाना आत्मविश्वासाने जगण्याची उर्मी देते.

बालपणीच्या आपल्या स्मृतींना उजाळा देताना डोरिस म्हणतात, "माझी आई खूपच कार्यक्षम होती. तशीच ती वैफल्यग्रस्त संगीतज्ज्ञ होती. तिची कार्यक्षमता तिने मी आणि माझा धाकटा भाऊ यांच्यावर खर्च केली. आम्ही काहीतरी विशेष करून दाखवावं अशी तिची इच्छा होती. मी संगीतात प्राविण्य मिळवावं असं तिला वाटत असे. खरं म्हणजे मला संगीतात फारशी गती नव्हती. तरीसुद्धा आमच्या इच्छेविरुद्ध आम्हा भावंडांना रोज संगीताची शिकवणी घ्यावी लागे. ती दामटवून आम्हाला संगीताचे धडे घेण्यास भाग पाडत असे. मुलांच्या पाठीस लागावं लागतं, त्या दृष्टीने आईचा हा गुण चांगला होता, पण ती जे काही असेल त्याचा ताबा घेत असे. त्यामुळे तिच्या या जाचातून मला सुटका करून घ्यावी लागली. प्रत्येक मुलाने आपल्यात कसली क्षमता आहे ते शोधून काढणं आवश्यक आहे असं मला वाटतं. मला उत्तम डॉक्टर होता आलं असतं किंवा मी उत्तम शेतकरी झाले असते. **पण मी लेखक झाले ती वैफल्यामुळे. मला वाटतं बहुतेक लेखक हताश झाल्यामुळेच लेखनाकडे वळतात.**"

"आपल्याला नावडतं असलेलं मूल वाढवणं ही पालकांच्या दृष्टीने फार अवघड गोष्ट असते. माझ्या आईला मी अजिबात आवडत नसे. कितीतरी लोकांचं आपल्या मुलांशी जमत नाही. माझ्या बाबतीत तीच स्थिती होती. पठडीतल्याप्रमाणे विचार न करणारी, सर्वसामान्य मुलांप्रमाणे न वागणारी माझ्यासारखी मुलगी वाढवणे हे माझ्या आईच्या नशिबी आले होते. मागे वळून पाहताना मला खरोखरच आईची दया येते. माझे वडिल मात्र चिकित्सक वृत्तीचे होते. त्यामुळे माझ्या जगावेगळ्या वृत्तींचा आणि बोलण्याचा त्यांना धक्का बसत नसे. आईप्रमाणे ते हबकून जात नसत."

**समृद्ध वाचन**

लेखन हेच आपल्या जीवनाचे ध्येय ठरवून डोरिस यांनी पेन हाती धरले. पण या लेखनास सुरुवात करण्यापूर्वी बालवयात डोरिसने वाचनाने आपल्या मनाची मशागत केली होती. तसेच इतरही अनेक घटक साह्यभूत झाले होते. त्यासंबंधी बोलताना डोरिस म्हणतात, "मी उत्तम शिक्षण घ्यावे, नावलौकिक मिळवावा अशी माझ्या आईवडिलांची इच्छा होती. पण मला आईवडिलांचे विचार पटत नसत. माझे मन बंड करून उठत असे. त्यामुळे मी चौदाव्या वर्षीच शाळा सोडली. साहजिकच माझ्या शिक्षणात बऱ्याच मोकळ्या जागा राहिल्या.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

पण शाळा सोडल्याचा एक फायदा मला निश्चितच झाला. दुय्यम दर्जाचे साहित्य वाचण्यात माझा वेळ फुकट गेला नाही. आमच्या घरच्या वाचनालयात भरपूर पुस्तकं होती. सुरुवातीला ती सगळीच्या सगळी पुस्तकं मी वाचून काढली. माझं बालपण खूपच एकाकी होतं, म्हणूनच मी जास्तीत जास्त वेळ वाचनात घालवला. खेळायला, गप्पागोष्टी करायला मला सवंगडी नव्हते, म्हणून मी थेट दर्जेदार लेखकांशीच संवाद साधला. "मी चार्ल्स डिकन्स, शेकसपिअर यांचे साहित्य वाचले. व्हर्जिनिया वुल्फ आणि ऑलिव्ह श्रेइनेर (Olive schreiner) यांचे साहित्य वाचल्यावर मला मार्गदर्शन करणाऱ्या दोन मोठ्या बहिणी लाभल्याचा आनंद मला झाला. टॉलस्टॉय, दोस्तोएव्हस्की, चेकॉव, टर्जिनेव्ह, ब्युनिन यासारख्या रशियन साहित्यिकांच्या कलाकृतींनी माझ्या मनात वैचारिक वादळ निर्माण केले." मालमुड, नॉर्मन मेलर, ॲलग्रेन, कार्सन मॅक्युलर्स यासारख्या अमेरिकन लेखकांच्या उत्तुंग कलाकृतींचा मी आस्वाद घेतला. युरोपियन बिनीच्या लेखकांची दर्जेदार पुस्तके मी शोधून शोधून वाचली. याच काळात मी **प्रूस्तच्या** कादंबऱ्या वाचल्या. प्रूस्तच्या कादंबऱ्यांचा मी इतका सखोल अभ्यास केला की प्रूस्तवर मला अधिकारवाणीने भाष्य करता येत असे. बुद्धीला झिणझिण्या आणणाऱ्या अशा कादंबऱ्या वाचताना मला विलक्षण आनंद होत असे. एक उत्तम पुस्तक वाचताना अचानक दुसऱ्या एखाद्या चांगल्या पुस्तकाच्या नावाचा उल्लेख सापडे. मग इंग्लंडमधल्या एव्हरीमन लायब्ररीतून मी ते मागवून घेत असे. मागवलेले पुस्तक पोस्टानं यायची मी आतुरतेने वाट बघत असे. कधी एखादे पुस्तक झटकन् मिळे तर कधी पाच सहा आठवड्यांच्या प्रदीर्घ प्रतिक्षेनंतरच पुस्तकाचे पार्सल हातात पडे. अर्थात तो क्षण माझ्या जीवनातील अत्युच्च आनंदाचा क्षण ठरत असे. त्या कोऱ्या पुस्तकाचा गंध घेत मी वाचनात दंग होऊन जाई. लहानपणी आणि युवावस्थेत अधाशासारखं केलेलं अभिजात आणि विविध विषयस्पर्शी वाचन हेच माझं खऱ्या अर्थानं बहि:शालेय शिक्षण ठरलं. माझी मनोभूमिका घडत गेली. विचारांना चालना मिळाली. कल्पनाशक्तीला धुमारे फुटले. हे स्वयंशिक्षणच मला लेखनाच्या दृष्टीने फलदायी ठरले. मध्य आफ्रिका, पहिल्या महायुद्धानंतरची परिस्थिती आणि साहित्य या तिन्हीचा माझ्या जडण घडणीत सिंहाचा वाटा आहे."

"आणखी एका गोष्टीचा उल्लेख मला करावासा वाटतो. माझी आई हुशार होती. ती आम्हा भावंडांना भरपूर गोष्टी सांगत असे. लहानपणातील त्या आठवणी माझ्या मनात आजही जागृत आहेत. 'मुलांना गोष्टी सांगणं' ही पालकांनी करावयाची सर्वोत्तम कृती आहे असं मला वाटतं."



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

## दोन विवाह

डोरिसच्या जीवनात दोनदा लग्न करण्याचे प्रसंग आले. दुर्दैवाने ते दोन्ही विवाह अयशस्वी झाले. ते दोन्ही निर्णय अविचाराने घेतले गेले. दुसरे महायुद्ध आणि तत्कालीन परिस्थिती त्याला कारणीभूत होती असं डोरिसना वाटतं. वैयक्तिक जीवनातील या कटु स्मृतींबद्दल त्या म्हणतात, "दुसरं महायुद्ध झालं नसतं तर मला वाटतं मी लग्नच केल नसतं. युद्ध चालू असताना लोकांची मानसिकता बदलते. तत्कालीन तरुण-तरुणी फारसा गंभीर विचार न करता लग्न करीत असत. युद्धकाळात प्रत्येक माणूस खूपच विक्षिप्त होतो. 'आपण काय करतो ते फारसे जमेस धरले जात नाही' असं त्यांना वाटतं. आपण एकमेकांना अनुरूप आहोत की नाही, आपल्या स्वभावाच्या तारा जुळतात की नाही याचा साधक बाधक विचार न करता तत्कालीन तरुण-तरुणी लग्नाचे निर्णय घेत असत असं मागे वळून पाहताना मला वाटतं. पहिल्या महायुद्धाच्या काळात मी मोठी झाले. या युद्धामुळे माझ्या आईवडिलांच्या आयुष्याचा विचका झाला. त्यानंतर दुसरं महायुद्ध झालं. माझ्या जीवनात ही दोन महायुद्धे फार प्रभावशाली ठरली. माझं वय जसजसं वाढत जातं तसतशी या महायुद्धांचा माझ्या जीवनावर किती प्रभाव पडला आहे याची मला जाणीव होते."

"माझा पहिला विवाह फ्रँक विस्डम यांच्याशी झाला." त्या विवाहापासून मला दोन अपत्ये झाली. फ्रँक दक्षिण ऱ्होडेशियात (आताचे झिंबाब्वे) राहात असत. पण तिथल्या वसाहती भयानक होत्या. तिथले जीवन चरकातून पिळून निघाल्यासारखे मृतवत होते. मुठभर मंडळी बहुतांश समाजावर जुलूम जबरदस्ती करीत असल्यामुळे अशा समाजात राहाणे क्लेशकारक होते. फ्रँक यांच्याशीही माझा विसंवाद होता. अशा वेळी मला गोएथेच्या वचनाची आठवण होते. गोएथे म्हणत असे, "जर तुम्ही पुरुषाला खड्ड्यातच राहू देणार असाल तर तुम्हालाही त्याच्याबरोबर खड्ड्यातच जावे लागेल." माझ्या बाबतीत तसे होऊ नये म्हणून मला तिथून निघून जाणे भाग होते. पहिला विवाह असफल झाल्यामुळे फ्रँक आणि आपल्या दोन मुलांना सोडण्याचा कठोर निर्णय डोरिसला घ्यावा लागला. वास्तविक आपल्या मुलांना सोडून जाताना डोरिसला अत्यंत कठोर व्हावे लागले असेल. हा अवघड निर्णय घेण्यापूर्वी त्यांच्या मनाची चलबिचल झाली असेल, प्रत्यक्ष पाऊल उचलताना जिवाची घालमेल झाली असेल असे वाचकांना वाटते. पण त्याबाबतीत डोरिसने आत्मचरित्रात काहीच लिहिले नाही. सत्याशी प्रतारणा न केलेल्या आत्मचरित्रात हा अनुल्लेख खटकतो. म्हणूनच समीक्षकांनी डोरिसवर टीकेची झोड उठवली. त्यावर भाष्य करताना डोरिस म्हणतात, "ती टीका वाचून मला आश्चर्याचा धक्काच बसला. अरेरे, असं क्रूर कृत्य माझ्या हातून कसं बरं घडलं?" असं म्हणत मी शोक करावा आणि त्या भावना आठदहा पानात व्यक्त कराव्यात अशी त्या समीक्षकांची माझ्याकडून अपेक्षा होती. पण मी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

तसं काहीही केलं नाही. आपण जेव्हा एखादा निर्णय घेतो तेव्हा त्याची अंमलबजावणी करून मोकळं व्हावं असं मला वाटतं. त्याच्यावर रडत बसणं मला आवडत नाही. खरोखरच मी तो कठोर निर्णय घेतला होता, पण तो माझ्या दृष्टीने चांगला ठरला. मागे वळून पाहताना 'हे मला केलंच पाहिजे' हे समजण्याइतकी बुद्धीमत्ता माझ्यासारख्या खेडवळ स्त्रीकडे होती याच्यावर माझा विश्वासच बसत नाही. माझी बाजू घ्यायला, माझ्या पाठीशी उभं रहायला कोणीही नव्हतं, तरीसुद्धा स्वतंत्रपणे मी तो निर्णय घेतला.''

''माझा दुसरा विवाह झाला १९४३ साली गॉटफ्रेड लेसिंग या कम्युनिस्ट बुद्धीवंताशी हा विवाह सुद्धा जमेत धरण्यासारखा नव्हता. गॉटफ्रेड लेसिंग जर्मन निर्वासित, हुशार. त्याचे आजोबा उपक्रमशील होते. ते झारच्या काळात रशियन लोकांना घोड्याचे नाल करून विकत असत. त्यांनी एकोणिसाव्या शतकात रशियात रेल्वेची उभारणी केली. स्वसामर्थ्याच्या जोरावर कोट्याधीश झाले. त्यांची मुले वडिलांचा तिरस्कार करीत आणि वडिलांनी कमावलेले पैसे उधळीत. गॉटफ्रेड हा त्यांचा नातू. गॉटफ्रेडचे वडील आपला सारा वेळ वाचनालयात घालवीत आणि वडिलांच्या पैशावर चरितार्थ चालवीत बर्लीनच्या उतरत्या काळात १९२० ते ३० या दशकात गॉटफ्रेड अत्यंत श्रीमंतीत लहानाचा मोठा झाला. राजकीय घडामोडींशी त्याचा काही संबंध नव्हता. परंतु तो प्रेमात पडला ती मुलगी होती स्वत:च्या हिमतीवर कोट्याधीश झालेल्या वेल्श माणसाची. ती मुलगी कम्युनिस्ट झाली आणि प्रेमाखातर तिने गॉटफ्रेडला कम्युनिस्ट होण्यास भाग पाडले. गॉटफ्रेड कट्टर कम्युनिस्ट झाला. आम्ही ऱ्होडेशियात (झिंबाब्वे) राहणारी साधी माणसं. या सुसभ्य. नागर संस्कृतीच्या झगमगाटाने त्यावेळी आमचे डोळेच दीपले. आता या झगमगाटाचे काहीही वाटत नसले तरी मी गॉटफ्रेडला भेटले तेव्हा चांगलीच प्रभावित झाले होते. या महाकाव्याची अनेक प्रकरणे मी गाळून टाकतेय. युद्धानंतर गॉटफ्रेड पूर्व बर्लिनला परतला. तो खूप हुशार तर होताच, पण त्याच्याजवळ विलक्षण संघटन कौशल्य होते. त्यामुळे कम्युनिस्ट पक्षातील महत्त्वाची शक्ती म्हणून जर्मनीमध्ये त्याचे स्थान निश्चित झाले. त्यावेळी आम्ही कम्युनिस्ट पक्षात एकत्र काम करत होतो. पुढील पाच वर्षांच्या काळात सारं जग कम्युनिस्ट पक्षाचा स्वीकार करेल, त्यामुळे सर्वजण कायम सुखी, आनंदी होतील, मग व्यक्तिगत आयुष्याचा फारसा विचार करण्याची गरजच नाही असा आम्हाला विश्वास वाटत होता. फक्त कम्युनिस्ट पक्षातच नव्हे, तर इतर सर्व राजकीय पक्षात अशा तऱ्हेचे वेडगळ विचारप्रवाह असतात. मी गॉटफ्रेडशी लग्न केलं, पण आमच्यात कोणताही समान धागा नव्हता. आम्ही एकमेकांना बिलकुल आवडत नसलो तरी आम्ही एकमेकांशी अत्यंत सौजन्याने वागत होतो. आमच्यात कधीही भांडणं झाली नाहीत. कारण भांडणं करण्याकरता त्या दोन व्यक्तींमध्ये काही गोष्टी तरी सामाईक असाव्या लागतात ना? या लग्नानंतर मला एक मुलगा झाला. पण या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मालिका माझ्या मनात एकदा सुरू झाली की त्या विचारांची गाडी मुलांपर्यंत येऊन पोचते. मुलांच्या सुरक्षिततेला प्राधान्य दिले पाहिजे. तरुणांच्या आणि मुलांच्या गरजा भिन्न-भिन्न असतात. आपण विवाहसंस्थेत असे बदल केले किंवा विवाहसंस्था त्याज्य ठरवली तरी मुलांना त्याची आत्यंतिक गरज असते. चांगले घर, सातत्याने लाभणारे नातेसंबंध, खऱ्या पारंपारिक पद्धतीने वागणारे आईवडिल, स्वास्थ्यपूर्ण दिनक्रम ही मुलांची मानसिक गरज असते. सुखरूप कौटुंबिक जीवनापासून मुलांना वंचित ठेवले तर मुले फार अस्वस्थ होतात. ''मुलांना कठीण गेलं तरी चालेल ....' असा दृष्टीकोन पालक घेतात. तर काही पालक 'मुलांना त्रास होणार असेल तर आम्ही त्या गोष्टी करणार नाही' असा विचार करतात मोठ्या माणसांनी याबाबतीत केलेल्या कोणत्याही प्रयोगाची किंमत मुलांना मोजावी लागणार हे निश्चित ! ज्या दांपत्याला मुलांच्या या जबाबदाऱ्या पेलता येत नाहीत त्यांनी मुलांना जन्म देऊ नये; कारण अशा दांपत्याने मुलांना या जगात आणले तर मानसिक अस्वास्थ्य आणि दु:खच त्यांच्या वाट्याला येईल.''

**दि ग्रास इज सिंगिंग**

वैयक्तिक जीवनात चढउतार होत असतानाही डोरिसची बौद्धिक वाटचाल चालू होती. निर्मितीची ऊर्मी त्यांना स्वस्थ बसू देईना. त्यांनी 'दि ग्रास इज सिंगिंग' ही पहिली कादंबरी लिहिली. याच कादंबरीचे हस्तलिखित घेऊन निष्कांचन अवस्थेत लेखिका होण्याच्या ईर्षेने १९४९ साली त्या लंडनमध्ये आल्या. इतर अनेक कादंबऱ्यांप्रमाणे सामाजिक वास्तववादी परंपरेतील ही कादंबरी असली तरी ती एक साधीसुधी कलाकृती म्हणता येणार नाही. ही कादंबरी लिहिण्यामागे विशिष्ट सामाजिक व राजकीय प्रयोजन आहे. वसाहतवादामुळे होणारे नुकसान आणि पितृसत्ताक समाजरचनेचे दुष्परिणाम या दोन मूलभूत प्रश्नांवर ही कादंबरी आधारित आहे. या कादंबरीची सुरुवात मोझेसने केलेल्या मेरी टर्नरच्या खुनाच्या वर्तमानपत्रातील बातमीने होते. मेरी टर्नरचे आयुष्य दु:खद आहे. सामाजिक अपेक्षा आणि परंपरांचा पगडा यांच्या दबावामुळे मेरीला डीक टर्नरशी लग्न करणे भाग पडते. डिक टर्नर हा खेडेगावातील शेतकरी. त्यामुळे शहरी जीवनाचा, आपल्या मैत्रिणींचा त्याग करून मेरी खेड्यात येते. जीवनाच्या प्रत्येक टप्प्यावर डिक अयशस्वी होतो. सामाजिक मानहानी, कष्टप्रद जीवन आणि आर्थिक चणचण यामुळे खेड्यातले जीवन मेरीला असह्य होते. घोर निराशेने घेरलेली मेरी घरातून पळून जाऊन पुन्हा शहरात येते. याच शहरात तिने विवाहापूर्वीचा काळ आनंदात घालवला होता. आपली पूर्वीची नोकरी मिळवण्याचा मेरीचा प्रयत्न अयशस्वी होतो. उपेक्षा पदरी पडते. त्याचवेळी डिक तिला घरी परत न्यायला येतो. असहाय्य मेरीला विनातक्रार नवऱ्याबरोबर घरी परतावे लागते- उरलेली शिक्षा भोगण्यासाठी ! मेरीचे



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मानसिक संतुलन बिघडते, तिला जीवन तिरस्करणीय वाटू लागते. त्याचा राग ती घरातल्या मोझेस नावाच्या निग्रो नोकरावर काढू लागते. मोझेस आणि मेरी यांच्यातील संबंध दुर्बोध होत जातात. जाती आणि वर्णद्वेषाचा डोंब तिच्या मनात असला तरी अनेक बाबतीत ती मोझेसवर अवलंबून असते. यामुळे त्यांच्यातील संबंध बिघडत जातात आणि त्याची परिणती मोझेसने केलेल्या तिच्या हत्येत होते. मेरीने आपल्या वर्तणुकीमुळे आपल्या हाताने हा अनर्थ ओढवून घेतला आहे अशी भावना वाचकांच्या मनात निर्माण होते. कथानक, शैली, भाषावैभव या सर्वात उजवी असणारी ही बोधप्रद कादंबरी १९५० साली ब्रिटन, अमेरिका आणि इतर दहा युरोपियन देशात प्रसिद्ध झाली. या पहिल्या कादंबरीचे उत्तम स्वागत झाले. उत्तम लेखिका म्हणून डोरिस लेसिंग यांचे नाव प्रस्थापित होण्याची ही पहिली पायरी होती.

कथाकादंबऱ्यांची निर्मितीप्रक्रिया खूप जटिल असली तरी बहुतेक वेळा एखाद्या सत्य घटनेचे, वास्तव प्रसंगाचे बीज त्यामध्ये दडलेले असते. लेखक आपल्या प्रतिभेचे या मूळ बीजाला काल्पनिक प्रसंग, संवाद आणि घटना यांचा साज चढवतो आणि मनोहारी कलाकृती निर्माण करतो. या कादंबरीच्या निर्मिती प्रक्रियेबद्दल विचारणा झाली तेव्हा गतस्मृतींना उजाळा देत डोरिस लेसिंग म्हणाल्या, "माझ्या लहानपणी वर्तमानपत्रात एक बातमी छापून आली होती. जवळच्या शेतावरील गोरी शेतकरी महिला आणि कृष्णवर्णीय स्वयंपाकी यांचे अनैतिक संबंध होते. आमच्या गोऱ्या लोकांच्या वसाहतीत या बातमीवर खमंग चर्चा झाली होती. तेव्हा माझ्या वडिलांनी एक ऐतिहासिक किस्सा ऐकवला होता. एक फ्रेंच राणी तिच्या नोकरांच्या देखतच कपडे बदलत असे. तिच्या लेखी नोकरांना माणूस म्हणून काहीच किंमत नव्हती. वर्तमानपत्रातील त्या बातमीबद्दल गौरवर्णीय आणि त्यांच्या बायका हळूहळू कुजबुजत. पण वर्णद्वेषाचा आगडोंब मनात असल्यामुळे 'एखादा काळा माणूस गोऱ्या स्त्रीशी संबंध ठेवतो' असे उघडपणे बोलण्याची कोणाची हिम्मत होत नसे. हा विषय नेहमीच संदिग्ध आणि गुलदस्त्यात ठेवला जाई. पौगंडावस्थेत असताना या सर्व गोष्टी मी ऐकल्या होत्या. त्या माझ्या मनात घर करून राहिल्या होत्या. मनात दडलेल्या या साऱ्या विचारांचं प्रकटीकरण म्हणजे ही कादंबरी. माझ्या पहिल्या लेखनात क्लिष्टता होती. परंतु अनुभवाने मी चांगली लेखनशैली आत्मसात केली."

### दि चिल्ड्रन ऑफ व्हायोलन्स

'दि चिल्ड्रन ऑफ व्हायोलन्स' या शीर्षकांतर्गत मार्था क्वेस्ट, अ प्रॉपर मॅरेज, अ रिपल फ्रॉम दि स्टॉर्म, लँडलॉकड्, दि फोर गेटेड सिटी या अनुक्रमाने पाच धारावाहित कादंबऱ्या डोरिस लेसिंग यांनी लिहिल्या. यापैकी मार्था क्वेस्ट ही कादंबरी १९५२ साली प्रकाशित झाली. या संपूर्ण मालिकेची मूळ संकल्पना स्पष्ट करताना डोरिस लेसिंग म्हणतात, "माझ्या



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

पिढीच्या युरोपियन माणसांनी दोन महायुद्धे पाहिली, युद्धाची भीषणता, कौटुंबिक घटकांची ताटातूट, युद्धामुळे आलेली शारीरिक व मानसिक विकलांगता, जीवनातील अशाश्वतता, अन्नधान्याची टंचाई, बेकारी या साऱ्याचा अनुभव घेतला. माणसेच माणसाशी शत्रुत्व कसे धरतात. एकमेकांचा तिरस्कार कसा करतात ते आम्ही पाहिले. मी मध्य आफ्रिकेत लहानाची मोठी झाले. मी एका गोऱ्या गरीब शेतकऱ्याची मुलगी होते. गोरे शेतकरी शेतावर राबायला कितीतरी काळे मजूर ठेवत असत. त्या काळ्या मजुरांना महिनाभर कष्ट करून फक्त १२ शिलिंग इतके अल्पवेतन मिळत असे. मका, एखादे कडधान्य आणि आठवड्याला पौंडभर मांस यावर त्यांना समाधान मानावे लागे. याउलट गोऱ्या शेतकऱ्याना मात्र हवे तेवढे कर्ज लँड बँकेकडून मिळत असे. विषमतेचा हा एक छोटासा नमुना होता. पण विशाल स्तरावर पाहाता समाजातील एक तृतियांश घटक अन्नवस्त्रनिवारा या प्राथमिक गरजांबाबत परिपूर्ण असला तरी जाणता किंवा अजाणता आपण उर्वरित समाजाला या साऱ्यापासून वंचित ठेवतो. समाजातील ही विषमता मांडण्याचा प्रयत्न मी या मालिकेत केला आहे.समाजातील हिंसाचार आणि जुलूम जबरदस्ती याचे चित्रण मी या मालिकेत केले आहे. १९५० सालापासून हा विषय माझ्या मनात घोळत होता. १९५० ते १९७० या दोन दशकात त्याची पूर्ती झाली. टी. व्हीचा जबरदस्त प्रभाव असलेल्या आणि हिंसाचाराचा नित्य अनुभव घेणाऱ्या युवा पिढीकरिताच मी ही मालिका लिहिली. माझे विचार मला त्यांच्यापर्यंत पोचवायचे होते.''

मार्था कवेस्ट ही या मालिकेची नायिका. स्वतःचे निर्णय स्वतः घेणारी, वयात आल्यावर आईवडिलांशी तर्कसुसंगत युक्तिवाद करीत वादविवाद करणारी, हट्टी, स्वातंत्र्यप्रेमी, निग्रही, धडपडत टक्के टोणपे खात स्वतःच्या पायावर उभी राहाणारी अशी ही नायिका. 'विशिष्ट परिस्थितीत आपण कसं वागावं याचं मार्गदर्शन व्हावं म्हणून लोक विविध विषयाच्या पुस्तकांकडे वळतात' असे भाष्य मार्था क्वेस्ट या पुस्तकात आले आहे.' लोकांनी डोरिस लेसिंग यांची पुस्तके खरोखरीच या हेतूने वाचली जातात का' असा प्रश्न उपस्थित होतो. त्याचे स्पष्टीकरण देताना डोरिस लेसिंग म्हणतात, "माझ्या काळ वेगळा होता. जीवन कसं जगावं? याची दृष्टी मिळवण्यासाठी मी स्वतः विशेषकरून कादंबरी या साहित्यप्रकाराकडे वळत असे. अर्थात् मागे वळून पाहाता तशी दृष्टी मला कादंबरीवाचनाने मिळाली असं वाटत नाही. पण आताची पिढी तशी जीवनदृष्टी मिळवण्यासाठी समाजशास्त्रीय पुस्तकांकडे वळताना दिसतात.'' या कादंबरीच्या संदर्भातील आणखी एक निर्माण होणारा प्रश्न अधिक जटिल आहे. मार्था क्वेस्ट पूर्णपणे स्वतंत्र आहे. अनियंत्रित जीवन ती आनंदाने जगते आहे. अशा वेळी अचानक ज्या माणसावर आपलं फारसं प्रेम नाही त्या माणसाबरोबर लग्न करण्याचा निर्णय ती जाणीवपूर्वक का घेते याचा उलगडा होत नाही. त्या संदर्भात डोरिस लेसिंग म्हणतात, "तो काळ (१९५० च्या सुमारास) वेगळा



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

होता. पहिल्या महायुद्धामुळे समाजाची अवनती झाली. समाजात नीतीभ्रष्टता आली. दुसऱ्या महायुद्धाने या दोन्हीची तीव्रता वाढली. याचा खरा दुष्परिणाम युवा पिढीवर झाला. दिवसेंदिवस आपण अधिकाधिक नीतीभ्रष्ट होत आहोत. आपली कृत्ये रानटीपणाकडे झुकत आहेत. आपण त्याकडे दुर्लक्ष करतो. या दोन महायुद्धांमुळे व्यवहारात एक प्रकारचा भ्रमिष्टपणा आला आणि त्या वेडाच्या ओघाच्या कित्येक तरुणींनी फार खोलवर विचार न करता जीवनसाथी निवडले. मार्थाचे त्या तरुणाशी विवाहबद्ध होणे हे त्या भ्रमिष्टापणाचे एक गौण लक्षण आहे. याचा अर्थ 'युद्धामुळे माणसांचा नातेसंबंधांवरील विश्वास उडाला की स्वत:कडे व जगाकडे बघण्याची दृष्टी बदलली" असा प्रश्न निर्माण होणे स्वाभाविक आहे. त्याला उत्तर देताना डोरिस लेसिंग म्हणतात, "आम्ही चार, साडेचार वर्षे चाललेलं दुसरं महायुद्ध पाहिलं. सतत चाललेली भीषणता अनुभवली. तरीसुद्धा आमची मनं बोथट झाली नव्हती. रशियन लोकांनी सर्वांसमक्ष भर चौकात नात्झी नेत्यांना फाशी दिलं हे ऐकून आम्हाला धक्का बसला, वाईट वाटलं. पण आता चार पाच दशकांचा काळ लोटल्यावर लोकांना त्या फोटोंकडे ढुंकूनही बघावसं वाटत नाही. वाईट गोष्टी आपल्या अंगवळणी पडल्या आहेत. गोष्टी कोणत्याही थराला जातात हे झटकन् मान्य करण्याची आपली मानसिक तयारी झाली आहे. कोणत्याही भीषण आणि क्रूर घटनेमुळे आपल्याला धक्का पोचत नाही हेच कठोर वास्तव आहे."

"'दि चिल्ड्रन ऑफ व्हायोलन्स' या मालिकेची सुरुवात करतानाच एकूण पाच पुस्तके लिहायचं माझ्या मनात होतं. त्या पुस्तकांची रूपरेषाही मी मनाशी ठरवली होती. फक्त या कथानकाचा शेवट काय करायचा हे मात्र मी ठरवलं नव्हतं. या मालिकेतला बराचसा भाग आत्मचरित्रात्मक होता, तर काही भाग काल्पनिक ! मला वाटतं बहुतेक लेखक-लेखिका वास्तवनिष्ठ लेखनाने सुरुवात करतात. कारण त्यांना स्वत:चे अस्तित्व प्रस्थापित करायचे असते. किंबहुना **स्त्रिया जेव्हा आपल्या लेखनाचा श्रीगणेशा करतात तेव्हा ते लेखन म्हणजे 'आपण कोण आहोत' त्याचा शोध घेणं असतं.** एकदा लेखिकेला या प्रश्नाचं उत्तर मिळालं की मग तिला काल्पनिक लेखनाकडे वळता येतं."

"समाज जर घातक मार्गाने जाऊन विनाशाकडे वाटचाल करत असेल तर समाजाला त्यापासून परावृत्त करण्याचे सामर्थ्य माझ्या लेखनात आहे असं काहीना वाटतं." या विषयी भाष्य करताना त्या म्हणतात, "जर अनेक लेखकांनी आपल्या लेखनातून हा धोक्याचा इशारा समाजाला दिला तर समाजपरिवर्तन होईल." असं पूर्वी मला वाटत असे. मार्था क्वेस्ट या कादंबरीतील एका प्रसंगात मार्था दरवाजात उभं राहून रस्त्यावरून चाललेले हातकड्या घातलेले कैदी पाहाते. गतकालातील साहित्यात अशा कैद्यांबद्दलची वर्णने अनेकदा येऊन गेली आहेत. परंतु परिस्थितीत मात्र काडीमात्र बदल झालेला नाही. असे कैदी पूर्वी होते आणि



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

आजही आहेत. लेखकाच्या मनात असा निराशाजनक विचार येणं हे फार वाईट आहे. माझ्या मनात हा गंड असतो. लेखक आपल्या लेखनाच्या फटकाऱ्याने समाजात फारसा बदल घडवून आणू शकत नाही असं आता मला वाटतं." "लेखकाला आपल्या लेखनकौशल्याने वास्तव बदलता आले नाही तरी वास्तवाचं ज्ञान मिळवण्याच्या समाजाच्या मार्गात बदल घडवून आणता येतो का?" या शंकेचे निरसन करताना डोरिस लेसिंग म्हणतात, "समाजाची स्वत:कडे बघण्याची दृष्टी बदलणे हे कलाकृतीचं कार्य आहे पण प्रत्यक्षात तसं घडत नाही. रशियाचंच उदाहरण आपण घेऊ या. रशियन साहित्यात चेकॉव्ह, टर्जिनेव्ह, टॉलस्टॉय यांच्यासारखे दर्जेदार साहित्यिक होऊन गेले. त्यांनी आपल्या कलाकृतीतून एकमुखाने आत्मपरिक्षण करण्याची दृष्टी समाजाला दिली. पण प्रत्यक्षात समाजात बदल झाला नाही आणि थोडाफार झाला असं वाटलं तरी तो बदल नगण्य होता. झारशाही असो वा कम्युनिस्ट राजवट, लोकांना मिळणारे स्वातंत्र्य फारच थोडे होते. त्यांच्या वैचारिकतेत फारसा बदल झाला नाही."

**'अ प्रॉपर मॅरेज'** हा या मालिकेतील **दुसरा भाग** १९५४ साली तर **'अ रिपल फ्रॉम दि स्टॉर्म' हा तिसरा भाग** १९५८ साली प्रकाशित झाला. त्याबद्दल डोरिस लेसिंग म्हणतात, "त्या काळात मी कम्युनिस्ट विचारसरणीच्या प्रभावाखाली होते. एका दशकांत सगळं जग कम्युनिस्ट होईल, जास्तीत जास्त पंधरा वर्षाच्या काळात आम्ही युटोपिया निर्माण करू अशा वेडगळपणाच्या विचारांनी आमचा ताबा घेतला होता. युद्धकाळात प्रत्येक व्यक्तिच विक्षिप्त विचारांच्या अमलाखाली होती. त्यामुळे या दोन्ही विभागात राजकीय उलथापालथीचे चित्रण मी केले आहे. ही पुस्तके अनेक वाचकांना आवडली आहेत. तशा लेखी प्रतिक्रिया मला वाचकांकडून मिळाल्या आहेत. 'अ प्रॉपर मॅरेज' हे पुस्तक फार मजेदार आहे, तर 'अ रियल फ्रॉम दि स्टॉर्म' हे राजकारणावरील अत्यंत कठोर पुस्तक असल्याचा निर्वाळा बहुतेक वाचकांनी दिला आहे. या मालिकेअंतर्गत पाच धारावाहीत कादंबऱ्या लिहिण्याचे योजले असले तरी त्या पाच कादंबऱ्या मी एकापाठोपाठ एक याप्रमाणे लिहिल्या नाहीत. पहिल्या तीन भागांनंतर १९६२ साली 'दि गोल्डन नोटबुक' ही अत्यंत गाजलेली कादंबरी मी लिहिली आणि प्रकाशित केली. या कादंबरीमुळे माझा जणु वैचारिक पुनर्जन्म झाला. १९६५ साली **'लँडलॉकड्'** हा या मालिकेतील **चौथा भाग** तर १९६९ साली **'दि फोर गेटेड सिटी'** हा **अखेरचा भाग** प्रकाशित झाला. **'दि फोर गेटेड सिटी'** हे शीर्षक की वाक्प्रचार असा संभ्रम वाचकांच्या मनात निर्माण होतो. त्याचे स्पष्टीकरण देताना डोरिस लेसिंग म्हणतात, "हा वाक्प्रचार पुराणकथांमधून मी खुडला आहे. बायबलमध्ये त्याचा उल्लेख आहे. हे फार पुरातन चिन्ह आहे. निग्रो लोकांच्यातही 'गावाला बारा दरवाजे' असा एक पुरातन आध्यात्मिक वाक्प्रचार आहे. एकंदरीत पाहाता ही दरवाजांची कल्पना वैश्विक



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

असल्याचं माझ्या लक्षात आले. शिवाय या मालिकेतील प्रत्येक कादंबरी मी चार भागात लिहिली आहे. म्हणून 'फोर गेटेड सिटी' या शीर्षकाची निवड मी केली.''

'दि फोर गेटेड सिटी' या कादंबरीत सर्वसामान्य माणसे आणि त्यांना येणारा गूढ अनुभव यांचा परस्परसंबंध दाखविण्याचा प्रयत्न डोरिस लेसिंग यांनी केला आहे. भ्रमिष्ट वेडी ठरवली गेलेली आपल्या समाजातील माणसे वरवर पाहाता निकोप वाटणाऱ्या माणसांपेक्षा अधिक काव्यमय वृत्तीची, मानवतेला आणि वास्तवाला धरून राहणारी असतात. असे दाखविण्यात लेखिका यशस्वी झाली आहे. याबद्दल स्पष्टीकरण देताना त्या म्हणतात, ''दिवसेंदिवस जीवनातील ताणतणाव वाढताहेत, त्यामुळे 'वेडे' ठरवले गेलेल्या रुग्णांची संख्याही वाढतेय. पण हा वाढता ताण तणाव कोणता? माणसं अधिकाधिक हळवी, संवेदनक्षम होण्याची कारणमीमांसा काय? जीवनाची गतिमानता आणि सामाजिक ताण याचा तो परिणाम आहे असं म्हणणं सयुक्तिक ठरेल की यापेक्षा वेगळं काहीतरी घडतंय? या साऱ्याचा वेध घेत व्यक्तीव्यक्तींमधील संबंध, घडणाऱ्या ठळक घटना आणि प्रगतीपथावर हनुमान उडी घेणारी युवा पिढी या सर्वांचा ऊहापोह करण्याचा प्रयत्न मी या कादंबरीत केला आहे. मी काही फार मोठा स्वतंत्र विचार आपल्यापुढे मांडला नाही. पण आजची युवा पिढी आणि त्यांचे ज्येष्ठ पालक या दोन पिढ्यांचा तुलनात्मक विचार करून त्यावरून निष्कर्ष काढण्याची क्षमता माझ्यात आहे असंही काही जणांचं मत होईल. 'जनरेशन गॅप' पिढ्यांमधील अंतर हा आता ठरीव साचाचा शब्द झाला आहे. दोन पिढ्यांत जरुर मतभेद असतात. पण ज्येष्ठ नागरिक युवा पिढीशी आपली तुलना करतात तेव्हा ज्या पर्यावरणात आणि सामाजिक परिस्थितीत आपण वावरतो त्याच स्थितीत युवा पिढी वाढते आहे, असं त्यांनी गृहित धरलेलं असतं. गोष्टी गृहित धरण्याची माणसाची क्षमता स्तिमित करणारी आहे. माझ्या मते आतापर्यंतच्या कोणत्याच पिढीला इतक्या कठीण परिस्थितीशी झगडावे लागलेले नाही. पालक ही गोष्ट विचारात घेत नाहीत हे कटु सत्य आहे.'' हे विचार ऐकल्यानंतर या कादंबरीतील 'लिंडा' या व्यक्तीरेखेची आठवण होते. युवा पिढीला कोणत्या अडीअडचणींना सामोरं जावं लागणार आहे हे कल्पनेनं जाणण्याकरता विशिष्ट क्षमता असावी लागते. आजच्या ज्येष्ठ नागरिकांमध्ये त्या क्षमतेचा संपूर्ण अभाव आहे असं त्यांना जाणवतं. ही बोच लेसिंग यांनी लिंडाच्या मुखातून वदवली आहे. त्या म्हणतात, ''सध्याच्या जीवनाची गतिमानता प्रचंड आहे. परिस्थिती झपाट्याने बदलत आहे. त्या बदलांना सामोरं जाणं अत्यावश्यक आहे. पण नेमकी हीच गोष्ट माझ्यासारख्या ज्येष्ठ नागरिकांना जमत नाही. आजची युवा पिढी मात्र अत्यंत तत्परतेने बदलणाऱ्या पर्यावरणाशी जुळवून घेण्याचा आटोकाट प्रयत्न करीत आहे. मला त्यांचे कौतुक वाटतं. ती खूप धाडसी आहेत. त्या दृष्टीनं ही युवा पिढी अद्भूत आहे. त्यांच्यात आपापसात मतभेद असले तरी ते बाजूला सारून ते



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

सर्वजण एकमेकांना मदत करतात. पाठिंबा दर्शवतात. आधार देतात. मला बर्नार्ड शॉ यांच्या एका वचनाची येथे आठवण होते. "ज्या व्यक्तींमध्ये कल्पनाशक्तीचा अभाव आहे अशा व्यक्तींना वाचवण्यासाठी प्रत्येक पिढीत ख्रिस्ताला सुळावर चढवायची जरुर आहे का?" व्यक्तिगत बाबतीत चांगला असणारा माणूस समष्टीबाबतीतही तितकाच चांगला असू शकतो हे मान्य करायला लोक तयार होत नाहीत. मला आजची युवा पिढी खूप आवडते. पण कितीतरी ज्येष्ठ नागरिकांच्या मनात त्यांच्याविषयी खुनशीपणाची भावना असते. नुकतीच मी अमेरिकेतील अनेक राज्यांना भेट दिली. तिथल्या समाजाशी संपर्क साधला तेव्हा कितीतरी लोकांच्या मनात युवकांविषयी तिरस्काराची भावना आढळली. यापैकी अनेक व्यक्ती शिक्षकीपेशातील आहेत हीच खरी शोकांतिका आहे. ही कादंबरी भविष्यवेधी आहे. भविष्यात आमूलाग्र बदल घडून येणार आहे. उत्पात होणार आहे ही भविष्यवाणी खरी होईल असा मला विश्वास वाटतो."

'सिमॉन द बुव्हा' यांनी लिहिलेल्या 'दि सेकंड सेक्स (१९४९) या पुस्तकापासून स्त्रीमुक्ती चळवळ सुरू झाली असे मानण्याचा प्रघात आहे. 'वन इज नॉट बॉर्न बट रादर बिकम्स अ वूमन" संस्कृती 'स्त्री' नामक प्राण्याला जन्म देते असे त्यांनी ठासून सांगितले होते. डोरिस लेसिंग यांनी लिहिलेल्या कितीतरी कादंबऱ्यात आणि विशेषकरून 'चिल्ड्रन ऑफ व्हायोलन्स' या मालिकेतील कादंबऱ्यात स्त्रियांच्या जीवनाला आकार देणाऱ्या अनेकविध शक्तींवर भेदक टीका केली आहे, अमेरिकेत १९७० ते ८० या दशकात स्त्रीसंघटनांनी स्त्रियांबाबत जे मुद्दे उपस्थित केले. त्या सर्व मुद्यांची सविस्तर चर्चा डोरिस लेसिंग यांच्या कादंबऱ्यात आढळते. हे कसे घडून आले याचे वाचकांना आश्चर्य वाटते. त्याबद्दल डोरिस म्हणतात, "अखेर मीसुद्धा एक स्त्री आहे, त्यामुळे स्त्रियांच्या सुखदु:खांची मला जाणीव आहे. खरं म्हणजे आमच्या पिढीने काही स्त्रीवादीत्त्वाचा शोध लावला नाही. माझी आईसुद्धा स्त्रीवादी विचारांची होती. किंबहुना स्त्रीवादीत्त्वाची खरी सुरुवात फ्रेंच राज्यक्रांतीपासून झाली."

'दि फोर गेटेड सिटी' ही कादंबरी समजायला कठीण असल्यामुळे अनेक बुद्धीवंतांना या कादंबरीने गोंधळात टाकले होते. यथार्थवादी वातावरणात राहणाऱ्या यथार्थवादी नायिकेला लेखिका अत्याधुनिक जगातील अलौकिक अनुभव घेण्याची संधी देते. (साहित्यिक यथार्थवादाची सुरुवात एमिल झोला या फ्रेंच कादंबरीकार व नाटककार याने केली) कादंबरीकार हा परिस्थितीचा केवळ निरीक्षक राहात नाही. एखाद्या विज्ञानशाळेतील प्रयोगकर्त्याप्रमाणे त्याने आपल्या पात्रांना विविध सामाजिक भावनिक स्थितींना सामोरे जायला लावायचे असते आणि त्यांच्या प्रतिक्रिया अभ्यासायच्या असतात. त्या प्रतिक्रियांचे चित्रण म्हणजे त्याची कादंबरी." या झोलाच्या विचारांची प्रचिती ही कादंबरी वाचताना येते. मार्थाच्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

बंडखोर आयुष्याचा वेध घेत डोरिस लेसिंग या अखेरच्या भागापर्यंत येऊन पोचतात. ही कादंबरी १९६९ साली प्रकाशित झाली. त्या काळापर्यंत मार्था मार्गक्रमणा करतेच. पण तिचा मृत्यू विसाव्या शतकाच्या अखेरीस होतो असे लेखिकेने या कादंबरीत चित्रित केले आहे. मार्थाच्या जीवनात घडलेले प्रसंग आणि त्यांची मांडणी त्यांनी फार प्रभावीपणे केली आहे. त्यामुळे मार्थाचा संपूर्ण जीवनपट वाचताना वाचक मार्थाच्या जीवनाशी एकरूप होतो. मार्थाबरोबर वाचकांचेही रूपांतर होते. भविष्यात घडणाऱ्या संभाव्य घटनांचा मागोवा घेत मार्थाचे जीवन चित्रित करण्याची अवघड कामगिरी डोरिस लेसिंग यांनी समर्थपणे पार पाडली आहे. १९६९ साली लिहिलेल्या या कादंबरीत भविष्यातील तीन दशकांचे-विसाव्या शतकाच्या अखेरपर्यंतचे चित्रण केले आहे. 'अशा तऱ्हेची अद्‌भुत कादंबरी आजपर्यंत माझ्या वाचनात आलेली नाही.' असे सुप्रसिद्ध लेखिका जॉइस कॅरॉल ओट्स् यांनी गौरवाने म्हटले आहे. या मालिकेमुळे एक उत्तम लेखिका म्हणून डोरिस लेसिंग यांच्या नावावर शिक्कामोर्तब झाले.

'चिल्ड्रन ऑफ व्हायोलन' या शीर्षकाची निवड डोरिस लेसिंग यानी केली तेव्हा व्हायोलन्स हा शब्द आताइतका प्रचलित नव्हता. त्या शब्दाचा लाक्षणिक अर्थही आतापेक्षा वेगळा होता. "लेखक प्रेषितासारखा असतो. त्याला दूरदृष्टी असते. आपण ज्या जगात राहातो तिथल्या परिस्थितीमधील बदलाची स्पंदनं लेखकाच्या निर्मितीक्षम मनाला सर्वाआधी जाणवत असावीत." असे मत काही जणांनी व्यक्त केले. पण त्यांना देण्यात आलेली ही प्रेषिताची बिरुदावली लेसिंगना मान्य नाही. भलत्या स्तुतीला बळी न पडता वास्तवाचे भान ठेवत त्या म्हणतात, "लेखकांना असे कोणतेही अतींद्रिय ज्ञान नसते. इतर लोकांच्या भावनांना शब्दरूप देणे हेच आम्हा लेखकांचे काम. त्या भावना नेमक्या शब्दात व्यक्त करण्याचे सामर्थ्य आमच्यात असते. ती एक कला आहे. सार्वत्रिक, वैश्विक भावनांना, विशेषत: संवेदनाक्षम मनाच्या व्यक्तींच्या भावनांना शब्दबद्ध करण्याची किमया बिनीच्या लेखकांमध्ये असते."

### दि गोल्डन नोटबुक

डोरिस लेसिंग यांची 'दि गोल्डन नोटबुक' ही कादंबरी १९६२ साली प्रकाशित झाली. विसाव्या शतकात प्रकाशित झालेल्या साहित्यातील उल्लेखनीय पुस्तकात या कादंबरीची गणना केली जाते. आपल्या लेखनाचा वाचकांवर इच्छित परिणाम होत नाही असे डोरिसला वाटत असले तरी प्रत्यक्ष स्थिती तशी नाही. त्यांच्या दि गोल्डन नोटबुक या एका पुस्तकाने अनेक तरुणींची मानसिकता आमूलाग्र बदलली.

ॲना वुल्फ ही या कादंबरीची नायिका. घटस्फोटिता ॲना आपल्या मुलीला घेऊन एका फ्लॅटमध्ये राहाते. कधी कधी सामाजिक बांधिलकीच्या नात्याने आपल्या फ्लॅटमधली एक



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

खोली ती भाड्याने देते. त्यात पैसे मिळवण्याचा फारसा उद्देश नसतो. आत्मचरित्रात्मक कादंबरीलेखनाने ॲना आपल्या लेखनाचा श्रीगणेशा करते. आफ्रिका हा अवाढव्य खंडात्म देश. कित्येक वर्षे तेथे ब्रिटिशांचे नियंत्रण होते. या वसाहतींमध्ये कम्युनिस्ट विचारसरणीच्या लोकांचा समूह होता. या पार्श्वभूमीवर ॲनाने कादंबरी लिहिली होती. या पहिल्याच कादंबरीने ॲनाला प्रचंड यश मिळवून दिले. त्यानंतर मात्र ॲनाला 'रायटर्स ब्लॉक' (निर्मितीक्षम लेखन करताना काही काळापुरता अंत:स्फूर्तीचा अभाव) झाला. त्यातून बाहेर पडण्यासाठी ॲनाची धडपड सुरु झाली. ॲनाने आत्मपरिक्षण करण्यास सुरुवात केली. आपले व्यक्तिमत्व एकसंध नाही याची तिला जाणीव झाली. आपल्या व्यक्तिमत्वाचे अनेक भाग एकत्रित करण्याचे मार्ग ॲना शोधू लागली. त्यामुळे तिचे मन:स्वास्थ्य बिघडले. ती दु:खीकष्टी झाली. आपल्या जीवनाला काही आकार उरणार नाही. आपला गोंधळ उडेल. मानसिक खच्चीकरण होईल अशी भीती ॲनाला वाटू लागली. यावर उपाय काय? ॲनाने (अर्थात् डोरिस लेसिंगने) चतुराईने मार्ग काढला. 'आपल्या आयुष्याच्या प्रत्येक घटकासाठी एका रंगाची वही ठेवायची असे तिने ठरविले. आफ्रिकेतील अनुभवांसाठी काळी, प्रचलित राजकारणासाठी लाल, स्वत:बद्दलच्या कथात्मक घटनांची नोंद करण्यासाठी पिवळी तर रोजनिशीसाठी निळी वही घ्यायची ॲनाने निश्चित केले. 'या चारही घटकांचे परस्परसंबंध अभ्यासणे' हा या कादंबरीचा मूळ हेतू आहे असे लेसिंगना वाटते. हे संबंध तपासताना ॲनाला आपल्या जीवनातील चुकभुलींची जाणीव होते. मानसिक हेटाळणीमुळे झालेला आघात; शारीरिक फसवणूक, व्यावसायिक काळज्या, कौटुंबिक ताणतणाव, मैत्रितील रुसवे फुगवे या सर्वांबरोबर साम्यवादी विचारसरणीमुळे झालेली दिशाभूत तिच्या लक्षात येते. वेगवेगळ्या दृष्टीकोनातून ॲना आपले जीवन न्याहाळते. अनेकविध अनुभवांचा साकल्याने विचार करते. आपल्या प्रतिक्रियांचे मापन करते. जाणीवेच्या एकमेकात गुंतलेल्या स्तरांमध्ये डोकावून पाहाते आणि अखेर आपले स्वत्त्व एका सोनेरी वहीत (गोल्डन नोटबुक) ग्रंथित करण्यात यशस्वी होते.

आगळ्या वेगळ्या संकल्पनेची ही कादंबरी आपल्याला कशी सुचली हे सांगताना डोरिस लेसिंग म्हणतात, 'माझी एक मैत्रिण होती. ती छोट्या छोट्या नोंदवह्या ठेवीत असे. राजकारण, मानसशास्त्र, पती व मुले, नोकरी-व्यवसाय अशा वेगवेगळ्या विषयांवरील नोंदी ती त्या वह्यात करीत असे. मला तिची ही पद्धत जरा चमत्कारिक वाटली. आपण जीवन जगतो तेव्हा असे कप्पे पाडून विचार करत नाही. अशा प्रकारे विचार करणाऱ्या व्यक्तीचं निश्चितच कुठेतरी, काहीतरी चुकतंय असं मला वाटू लागलं. दि गोल्डन नोटबुक या कादंबरीची रूपरेषा ठरवताना मी याचा उपयोग केला. या चौकटीवर बेतलेली ही कादंबरी लिहिताना इतर अनेक लेखकांप्रमाणे एक अपूर्णता मला जाणवत होती. जीवन इतकं जटिल आहे की ते शब्दांत व्यक्त करता येत नाही. कितीही परिणामकारक शब्द योजले तरी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

आपल्या मनातल्या सर्वच्यासर्व आशय कागदावर उतरवता येत नाही. कादंबरीलेखन चालू असताना ही रुखरुख माझ्या मनात सतत होती."

### स्वप्न आणि लेखन

माणसाला स्वप्ने पडतात. या स्वप्नांचा लेखनाच्या दृष्टीने कसा उपयोग होतो. यासंबंधीची भाष्य करताना डोरिस लेसिंग म्हणतात, "कथा कादंबऱ्यांचे कथासूत्र पुढे नेताना अनेकदा मी स्वप्नांचा आधार घेते. माझ्या दृष्टीने 'स्वप्ने' ही फार महत्त्वाची ठरतात. आपल्या मनाचा लपलेला भाग स्वप्नांमार्फत आपल्याशी संपर्क ठेवतो. मला माहित असलेला एक गणितज्ज्ञ आपल्या मेंदूला माहिती पुरवतो आणि एखाद्या संगणकाप्रमाणे मेंदूला कार्यान्वित करतो. मीसुद्धा त्या गणितज्ज्ञाच्याच कार्यपद्धतीचा अवलंब करते. मी माझ्या मेंदूला नवीन पुस्तकासाठी लागणाऱ्या माहितीचा पुरवठा करते आणि झोपी जाते. झोपेत मला स्वप्ने पडतात. त्या स्वप्नांचे मी विश्लेषण करते. बहुतेक वेळा त्या स्वप्नांद्वारे माझ्या लेखनपेचावरील उत्तर मला गवसते. 'दि गोल्डन नोटबुक' या कादंबरीची 'नायिका ॲना हिला स्वप्ने पडतात. स्वप्नातील तुटक भागात ॲनाला आफ्रिकेतील जमीन दिसते. इंडोचायनामध्ये बंदुकीकरता वापरला जाणारा धातू दिसतो. कोरियन युद्धात मारल्या गेलेल्या माणसांचे छिन्नविछिन्न देह दिसतात. रशियातील तुरुंगात मृत्यू पावलेला कम्युनिस्ट नेत्यांची पदके दिसतात. आम्हा लेखकांमध्ये खोलवर वस्ती करून असलेला एक अनामिक कलाकार असतो. हा फार काटकसरी असतो. स्वप्नांतील काही वेचक प्रतीकचिन्हांद्वारे तो एखाद्या व्यक्तीचा संपूर्ण जीवनपट आपल्यापुढे उभा करतो. इतकंच नव्हे तर भविष्याबद्दल काही इशारेही देतो. ॲनाचे आफ्रिकेतील अनुभव, युद्धाबद्दलची भीती, साम्यवादाबद्दलचा दृष्टीकोन आणि लेखक म्हणून मनात चालू असलेले द्वंद्व या साऱ्यांचे दर्शन ॲनाच्या स्वप्नामधून वाचकांना घडते."

"माझ्या स्वत:च्या लेखनातल्या बऱ्याच कल्पना स्वप्नांमधून मला मिळत असल्या तरी प्रत्यक्षपणे त्या मिळत नाहीत. समजा, मला स्वप्न पडलं तर लगेच 'अरे वा, आता हे मला लेखनात उपयोगी पडेल' असा विचार करून मी ते दप्तरी दाखल करत नाही. पण माझ्या स्वप्नांची रीतसर नोंद सकाळी मी माझ्या रोजनिशीत करते. त्यातली बरीचशी स्वप्न सामान्य असतात. मला वाटतं कधीतरीच मनरूपी खोल डोहातून स्वप्ने निर्माण होत असावीत."

"सलमान रश्दी या सुप्रसिद्ध लेखकाने आपल्या स्वत:च्या स्वप्नांबद्दलची हकीकत सांगितली होती. ते म्हणतात, "जेव्हां मी कादंबरी लेखन करीत असतो तेव्हा मला अगदी साधीसुधी स्वप्न पडतात. पण जेव्हा माझं लेखन मी थांबवतो तेव्हा माझं स्वप्नांचं जग



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अकल्पनीय रूप धारण करतं. त्याला आवर घालता येत नाही.'' मला वाटतं ज्या प्रकारचं पुस्तक मी लिहित असते त्यावर या गोष्टी अवलंबून असतात. जर मी एखादं साधं, वास्तववादी पुस्तक लिहित असेन तर त्या लेखनाचा भन्नाट स्वप्नांशी काही फारसा संबंध येत नाही. उदा. 'दि गुड टेररिस्ट' हे पुस्तक लिहिताना मी फक्त माझ्या मेंदूच्या एका वेगळ्या कप्प्याचा वापर करीत होते. हे पुस्तक लिहित असताना मला पडलेल्या स्वप्नांचा फारसा परिणाम माझ्या लेखनावर होणार नव्हता.''

'दि गोल्डन नोटबुक' मधील सौ. मार्क्स. 'मदर शुगर' ही व्यक्तिरेखा कशी निर्माण केली याविषयी स्पष्टीकरण देताना डोरिस लेसिंग म्हणतात, ''माझी स्वत:ची मानसोपचारतज्ज्ञ मार्क्ससारखी होती. ती रोमन कॅथलिक होती, युंगच्या विचारपद्धतीची पुरस्कर्ती आणि पुराणमतवादी होती. थोडक्यात मला आवडत नसलेल्या सर्व विचारधारा तिला मान्य होत्या. तरीसुद्धा व्यक्ती म्हणून तिचे स्थान उच्च होते. दुसऱ्यांना कशा प्रकारे मदत करावी याची तिला जाण होती. परोपकार करण्याचा अत्यंत अभावाने आढळणारा सद्गुण तिच्या ठायी होता. सौ. मार्क्स ही व्यक्तिरेखा मी तिच्यावरूनच बेतली आहे.''

या कादंबरीची नायिका ॲना आणि तिची मैत्रिण मॉली या दोघी तरुणी ''आम्हाला विवाहबंधनात कधीच पडायचं नाही.' असं निक्षून सांगतात. अगदी वेगळी विचारधारा असलेल्या या तरुणी आहेत असं सर्वसामान्य वाचकांना वाटतं. त्याबद्दल डोरिस लेसिंग म्हणतात, ''त्या काही वेगळ्या प्रकृतीच्या स्त्रिया नाहीत. काही विशिष्ट परिस्थितीमुळे समाजमान्य विचारसरणी बदलून त्यांना आता वेगळ्या वाटेने जायचंय. त्यांचे विचार वेगळ्या प्रकारचे आहेत असंही म्हणता येईल. खरं म्हणजे बहुतेक व्यक्तींच्या मनात विचार आणि भावना यांचा कल्लोळ झालेला असतो. त्याचं दर्शन मी या कादंबरीतील संवादातून घडवण्याचा प्रयत्न केला आहे. विविध समस्या सोडवत परिस्थितीवर मात करत वाटचाल करीत असता स्त्रिया कोणकोणत्या मानसिक अवस्थेतून जात असतात त्याचं दर्शन मला वाचकांना घडवायचं होतं. पण लोक गोल्डन नोटबुकमधील संवाद संदर्भाशिवाय उद्धृत करतात आणि माझ्या विचारांची ती नीलप्रत (ब्युप्रिंट) आहे, रेखाटन आहे असे मानतात. अशी संभाषणे लिहिण्यामागचा माझा मूळ उद्देश बाजूलाच राहातो.''

'दि गोल्डन नोटबुक'मध्ये सुरुवातीला ॲना म्हणते, ''मला जे काही दिसतंय ते भीषण आहे. सगळ्या समाजव्यवस्थेलाच तडा जाणार आहे.'' ॲनाच्या तोंडी घातलेल्या या वाक्याचा गर्भितार्थ स्पष्ट करताना डोरिस लेसिंग म्हणतात, ''माझ्या मनात काही विशिष्ट विचार होते. भविष्यात हे घडणार आहे असं मला सुचवायचं नव्हतं तर हे आत्ता आपल्या डोळ्यादेखत घडतंय असं मला निदर्शनास आणून द्यायचं होतं. आपण सर्वजण एका निसरड्या उतरंडीच्या शिखरावर आहोत. त्या उतरंडीच्या तळाशी काय स्थिती असेल ते



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मला सांगता येणार नाही. सध्या जगातली निम्म्याहून अधिक जनता दारिद्र्यरेषेखालील जीवन जगत आहे. त्यांना पोटभर अन्नही मिळत नाही. पुरेसे पोषण न मिळाल्यामुळे कित्येक बालकांची शारीरिक आणि मानसिक वाढ खुंटली आहे. ही फार गंभीर बाब आहे असं मला वाटतं. ॲनाच्या तोंडी ते वाक्य घालताना हा सर्व विचार मला अभिप्रेत होता.'

### कादंबरी : माहितीचा साठा

''कादंबरी हा वाङ्मयप्रकार म्हणजे पत्रकारितेची दूरस्थ शाखा आहे आणि एका विशिष्ट मर्यादित जगतात समाजाच्या एका विभागातील लोकांना दुसऱ्या विभागातील लोकांबद्दलची माहिती पुरवणे हे कादंबरीचे कार्य आहे.'' असे मत गोल्डन नोटबुकच्या नायिकेने-ॲनाने व्यक्त केले आहे ते आपले स्वत:चेच मत असल्याचे डोरिस लेसिंग मान्य करतात. त्या म्हणतात, ''कादंबरीची साहित्यिक मूल्ये काहीही असोत. पण कादंबरी ही वाचकांना माहितीचा फार मोठा साठा उपलब्ध करून देते. वेळोवेळी जगातील कानाकोपऱ्याचा वेध घेत माहितीचा प्रचंड साठा कादंबरीकाराला मिळवावा लागतो. आपण वानगीदाखल प्रूस्त या कादंबरीकाराचं उदाहरण घेऊ. प्रूस्त हा माझा अत्यंत आवडता लेखक आहे. त्याच्या काळातील समाजाचे उत्कृष्ट चित्र तो त्याच्या कादंबऱ्यातून आपल्यापुढे उभे करतो समाजातील एखाद्या विशिष्ट सामाजिक स्थराची होणारी उन्नती आणि दुसऱ्या एखाद्या स्तराची होणारी अवनती तो त्याच्या कादंबरीतील पात्रांद्वारे व्यक्त करतो. समाजातील निम्नस्तरातील माणसाने पैसा व प्रतिष्ठा संपादन केली तर यशावकाश त्याचा समावेश अभिजनवर्गात होतो. तो स्वत: अभिजन होतो. थॉमस मानच्या **'बडनब्रुकस'** या कादंबरीबद्दलही हेच म्हणता येईल. इतकेच नव्हे तर चेकॉव्ह, टॉलस्टॉय, दोस्तोएव्हस्की, टर्जिनेव्ह कादंबरीकार नसते तर सोव्हिएत रशियाच्या निर्मितीपूर्वी तेथील समाजरचना कशी होती ते आपल्याला समजलेच नसते. माझा एक मित्र माझ्या या मताशी सहमत नाही. एकोणिसाव्या शतकातल्या एकाही रशियन लेखकाने तिथे उदयाला येत असलेल्या औद्योगिक क्रांतीचा उल्लेखसुद्धा केलेला नाही. म्हणूनच कादंबरीकाराने निर्माण केलेले समाजचित्र ऐतिहासिकदृष्ट्या चुकीचे असते असे माझ्या मित्राला वाटते. अशा एखाद्या बाबतीत तसं घडलंही असेल. मी नाही म्हणत नाही. पण अनेक कादंबरीकार सर्व सामाजिक घडामोडींची दखल आपल्या लेखनात घेतात. अशी माहिती मिळवण्याच्या उद्देशाने मी स्वत: कितीतरी कादंबऱ्या वाचते. मला जेव्हा ऑस्ट्रेलियाला जायचे होते तेव्हा ऑस्ट्रेलियाबद्दलची पुष्कळशी माहिती मी कादंबऱ्यांच्या वाचनातून मिळवली. ऑस्ट्रेलियन लेखक पॅट्रिक व्हाइट यांच्या कादंबऱ्या मी वाचल्या. 'ऑस्ट्रेलिया फेलिकस' या कादंबरीचे लेखक 'हेन्री हॅंडेल



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

रिचर्डसन' हे विसाव्या शतकांतील नामवंत ऑस्ट्रेलियन कादंबरीकार होते. त्यापुढच्या पिढीमध्ये 'ख्रिस्तीना स्टीड' यांचे नाव प्रामुख्याने घ्यावे लागेल. 'ऑल फॉर लव्ह' या कादंबरीत तीने सिडनीमध्ये राहणाऱ्या लोकांचे जीवन कसे असते याचे प्रशंसनीय वर्णन केले आहे. इतरही अनेक सामान्य लेखकांच्या साध्या वाटणाऱ्या कलाकृतीतही त्या देशाचे उल्लेखनीय आणि नेमके वर्णन केलेले आढळते."

**कठिण किती ........**

या कादंबरीची नायिका ॲना अखेरीस म्हणते, "मी जेव्हा लिहायला बसते तेव्हा एखादा चिनी शेतकरी, कॅस्ट्रोचा एखादा सैनिक माझ्या पाठीमागून येऊन डोकावतात आणि माझे लेखन थांबवायला सांगतात. माझ्या खोलीच्या कोपऱ्यात उभे राहून ते म्हणतात, "आमच्याबद्दल काहीतरी लिहायचं सोडून निरर्थक गोष्टी खरडण्यात वेळ फुकट कशाला घालवतेस?" अशा वेळी लेखक म्हणून असलेले डोरिस लेसिंग यांचे जीवन आणि त्यांची राजकीय कारकीर्द या दोहोंमध्ये त्यांचा गोंधळ उडाल्यासारखा वाटतो. त्याबद्दल त्या म्हणतात, "खरोखरच राजकारणाबद्दल लिहायची माझी इच्छा असते. परंतु माझी राजकीय दृष्टी मी माझ्या कादंबरीत समाविष्ट करू शकत नाही. मला या साऱ्यांबद्दल लिहावेसे वाटले तरी कथाकादंबऱ्यातील कपोलकल्पित प्रसंगात त्यांची योजना करावी असं मला वाटत नाही, पण त्यांना सोडचिठ्ठी द्यावी असंही मला वाटत नाही. आपल्या कलाकृतीत तत्कालीन परिस्थितीतील राजकीय पेचप्रसंगांचे चित्रिकरण करणे हे लेखकाचे आद्य कर्तव्य असले तरी राजकारणाबद्दल लेखन करणे मला अवघड वाटते. बऱ्याचशा समाजवादी साहित्यांत तत्कालीन राजकीय परिस्थिती यांत्रिकपणे आणि भयानक रितीने व्यक्त केलेली आढळते हा धोकाही मला टाळायचा होता. वर उल्लेखिलेल्या ॲनाच्या वक्तव्यातून मी ॲनाच्या विश्वात राजकारण आणि इतिहास यांचा चंचुप्रवेश करण्याचा प्रयत्न करत होते."

"लेखिका म्हणून माझं जीवन आणि आमच्या काळातील दहशत निर्माण करणाऱ्या घटना यामध्ये माझ्या मनात संघर्ष चालू आहे. कल्पनाशक्तीच्या अपुरेपणाचे शल्य मला जाणवतं. लंडनमधल्या स्वत:च्या फ्लॅटमध्ये शांत वातावरणात बसून आपण व्हिएटनाममध्ये काय चाललं असेल हे कल्पनेनं जाणणं फार अवघड आहे. आपण घरी भोजनाचा आस्वाद घेत असता येथील विश्वविद्यालयात धाड घालून पोलिस विद्यार्थ्यांना अटक करीत असतात. या गोष्टींचा मेळ घालणं मला फार अवघड वाटतं."



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

### काळाचं प्रतिनिधित्व

दि गोल्डन नोटबुक या कादंबरीचा शेवट बुचकळ्यात टाकणारा आहे असं वाचकांना वाटतं. त्याबद्दल त्या म्हणतात, "मी जेव्हा ही कादंबरी लिहित होते तेव्हा डाव्या विचारसरणीवर एकापाठोपाठ एक आघात होत होते. डावी विचारसरणी उध्वस्त झाली होती, कोलमडून पडली होती. कादंबरीच्या अखेरीस मॉली पक्षातून बाहेर पडते आणि विवाहबद्ध होते. ॲना समाजकार्याचा निर्णय घेते आणि कामगार संघटनेत सामील होते. या दोन्ही कृती त्या काळाचं प्रतिनिधित्व करणाऱ्या आहेत. समाजवादी चळवळीत वर्षानुवर्षे कार्ये करणाऱ्या अनेक महिला दातओठ खात म्हणत असत, 'आग लागो या संघटनेला, मी तर येथून बाहेर पडणार आणि समाजकार्य करणार," अनेक महिला त्या संघटनेतून बाहेर पडल्या आणि त्यांनी आपापला मार्ग अनुसरला. राजकारणाच्या या जंजाळातून बाहेर पडण्यासाठी त्यांची काहीही करायची तयारी होती. समाजवादी चळवळीत कार्य करण्याचं ध्येय ठेवलेल्या स्त्रियांची पूर्वी लग्न करण्याची मानसिक तयारी नसे, पण अशा महिलांनी सुद्धा स्वेच्छेने विवाहबंधन स्वीकारले. कम्युनिस्ट पक्षाच्या हुशार संघटकांनी पक्षाच्या तत्त्वांना तिलांजली देत व्यापार, करमणूक अशी कार्यक्षेत्रे निवडली आणि भरपूर पैसे कमावला. (कम्युनिस्ट पक्षाच्या प्रत्येक सदस्याने) हाच मार्ग अनुसरला नसला तरी त्यांनी याच दिशेने पावले टाकली."

### संमिश्र प्रतिक्रिया

'दि गोल्डन नोटबुक' ही कादंबरी अनेक वाचक 'स्त्री पुरुष संघर्षाचे बायबल' म्हणून वापरतात असं लेखिकेने त्या कादंबरीच्या प्रस्तावनेत नमूद केले आहे. त्याचे स्पष्टीकरण देताना डोरिस लेसिंग म्हणतात, "माझे व्यक्तिगत अनुभव, विचार करण्याची पद्धत आणि भावभावना याचबरोबर सर्वसामान्य स्त्रियांच्या भावना आणि विचारधारा या सर्वांचा आधार घेऊन मी ही संपूर्ण कादंबरी लिहिली. 'मी स्त्री आहे आणि स्त्रीवादी भूमिकेतून मी हे लेखन करतेय असा विचारही माझ्या मनात आला नाही. आता ज्याला 'स्त्रीमुक्ती' म्हणतात त्या स्त्रीमुक्तीचा पुरस्कार मी या कादंबरीत करतेय अशी पुसटशी भावनाही माझ्या मनाला शिवली नाही. स्त्रीमुक्ती हा गुंतागुंतीचा विषय आहे आणि माझ्याकरिता काहीसा क्लेषकारकही ! पण हे पुस्तक प्रकाशित झाल्यावर पुरुषांच्या विशेषत: अमेरिकन पुरुषांच्या प्रतिक्रिया फार वाईट होत्या. पुस्तकपरिक्षणात टीकात्मक सूर होता. 'बायकांचं पुस्तक' अशी त्याची वर्णी लावली होती. स्त्रीद्वेष्टी, पुरुषांची वैरीण अशा तऱ्हेच्या अनेक बिरूदावली या पुस्तकाने मला बहाल केल्या. बहुतांश स्त्रीवर्गही माझ्यावर रागावला होता. 'तुम्ही आमची फसवणूक का करता? आमच्या खाजगी गोष्टी उघड करून का सांगता? अशा आशयाची दूषणे देणारी पत्रे अनेक स्त्रियांनी मला पाठवली. स्त्रीवाद्यांनी तर 'स्त्रियांचा तिरस्कार करणारी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

खोडसाळ लेखिका' म्हणून मला हिणवलं. एकंदरीत अनेक गैरसमजांचे मोहोळ या पुस्तकाभोवती उठले. फक्त माझ्या पुरुष मित्रांनी मला उत्तम प्रतिसाद दिला; लिहिण्यासाठी भरपूर उत्तेजन दिलं. या मिश्र प्रतिक्रियांमुळे मलाही आत्मपरिक्षण करणे भाग पडले. मी या कादंबरीत स्त्रियांच्या मनातील पुरुषांविषयीच्या टीकेला शब्दरूप दिले. श्वासोच्छ्वास जितका सहज तितकेच हे विचारही वर्षानुवर्षे स्त्रियांच्या रक्तात भिनलेले ! असं असूनसुद्धा आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या एकाही कादंबरीत त्याविरुद्ध आवाज उठवला गेला नव्हता. त्यामुळे ही अवघड कामगिरी मला पार पाडावी लागली. लोक भावनाशील असतात. या कादंबरीत वर्णन केलेल्या कित्येक प्रसंगांचे स्वत:च्या जीवनात घडलेल्या प्रसंगांशी साधर्म्य आहे असे पुरुषांना ही कादंवरी वाचल्यावर जाणवत असे, ही जाणीव त्यांना अस्वस्थ करीत असे. त्यांच्या प्रमादांचा तो आरसा होता. स्वत:च्या चुकांचा कबुलीजबाब देण्याऐवजी ही अस्वस्थ मंडळी माझ्यावर आगपाखड करीत, माझ्या लेखनावर टीकास्त्र सोडीत. पण आता हा विरोध मावळला आहे, या साऱ्याचा विसर पडला आहे. आता कित्येक पुरुष या पुस्तकाच्या स्तुतीपर पत्रे लिहितात. आता 'ओल्ड क्लासिक' या विभागात या पुस्तकाने 'अढळस्थान' मिळवले आहे.''

याच संदर्भात त्या पुढे म्हणतात, 'स्त्रीपुरुष संबंधात प्रचंड ताणतणाव असतात. एखाद्या व्यक्तीबरोवर आयुष्य काढणं काही स्त्रियांना फार कठीण वाटतं. माझ्या माहितीच्या अशा कितीतरी स्त्रिया आहेत की ज्या एकट्या राहातात. विवाहबंधनात पडण्याची त्यांची इच्छा नाही. इतरांनी 'आवश्यक' ठरवलेल्या कोणत्याही गोष्टीत त्यांना रस नाही. त्यांच्यासाठी एकांतवास हा फार मोठी चैन आहे. अशा आनंदी, एकांतप्रिय स्त्रिया मला कितीतरी पत्रे पाठवतात. तावच्या ताव लिहितात. मन मोकळं करतात. अशी पत्र आली की मला विलक्षण आनंद होतो. पत्रलेखन आता नामशेष होत चाललंय असं म्हणतात. पण माझा अनुभव उलट आहे.''

स्त्री पुरुष समानतेविषयी त्या म्हणतात, ''स्त्रियांना समान हक्क मिळाले पाहिजेत असं मला जरुर वाटतं. तरीसुद्धा स्त्रिया व पुरुष समान आहेत असं मी कधीच म्हणणार नाही. ते निश्चितच समान नाहीत. शारीरिक, मानसिक आणि बौद्धिक या तिन्ही स्तरांवर स्त्रीपुरुषांत असमानता दिसते. यापैकी एखाद्या बावतीत वजावट असली तर त्याची भरपाई करणाऱ्या इतर अनेक सद्गुणांची देणगी स्त्रियांना लाभलेली असते. जगातल्या कोणत्याही दोन व्यक्तींमध्ये झेरॉक्स कॉपीसारखे साधर्म्य आढळत नाही; मग ते स्त्रीपुरुषांत तरी कसं बरं आढळेल?'' असा प्रश्न उभा करत त्या वाचकांना आपले मत पटवून देतात.

डोरिस लेसिंग म्हणजे 'गोल्डन नोटबुक' असं अलिखित समीकरण जर्मनीमध्ये तयार झालं आहे. जर्मन जनतेला डोरिसची ओळख या पुस्तकामुळे झालेली आढळते. या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

विधानाला पुष्टी देत डोरिस लेसिंग म्हणतात, "पुस्तक प्रकाशित झाल्याला तब्बल दोन दशकांचा कालावधी लोटला आहे. तरी अजूनही या पुस्तकाचे पडसाद साऱ्या जगभर उमटलेले दिसतात. ही कादंबरी प्रसिद्ध झाली १९६२ साली ! त्यावेळी निषिद्ध मानल्या गेलेल्या गोष्टींचा संदर्भ आज पूर्णपणे बदलला आहे. नैतिकतेची व्याख्या खूप वेगळी झाली आहे. त्याबाबतीतले एके काळी स्फोटक वाटणारे विषय आज 'मवाळ' झाले आहेत. तरीसुद्धा वाचक या पुस्तकाला दाद देत राहातात याचं मला विलक्षण आश्चर्य वाटतं. काही वाचकांच्या मते हे पुस्तक म्हणजे पुरुषजातीला केलेलं आव्हान तर काहीना हे पुस्तक म्हणजे राजकीय कबुलीजवाब आहे असं वाटतं. या कादंबरीची नायिका ॲना हिच्या मनातील आध्यात्मिक गोंधळाबद्दलची ही कादंबरी आहे असं तिसऱ्या एका वाचक समूहाचं मत ! अशा अनंत विचारतरंगांमुळे मी काहीशी व्यथित झाले. कादंबरी निर्माण करताना असलेला लेखकाचा मूळ उद्देश आणि वाचकांचे विचार यात मध्यंतर पडण्याची शक्यता असते; हे कटु सत्य माझ्या लक्षात आलं, किंबहुना मी ते अनुभवलं. पण त्याचबरोबर 'पुस्तक ही जिवंत कलाकृती असून त्याला अनेक विचारफळं धरतात' या विचारांनी माझ्या मनाला दिलासा मिळाला; हाही एक भाग जमेस धरण्यासारखा आहे."

### रायटर्स ब्लॉक

"कादंबरीतील नायिकेला ॲनाला राइटर्स ब्लॉक (निर्मितीक्षम लेखन करण्यासाठी लागणाऱ्या अंत:स्फूर्तीचा अभाव) होतो हा उल्लेख वर आलाच आहे. तो डोरिस लेसिंग यांचा स्वानुभव आहे का अशी शंका काही वाचकांनी उपस्थित केली होती. त्या शंकेचे निरसन करताना त्या म्हणतात, "तसा राइटर्स ब्लॉक मला कधीच झालेला नाही. तशी भीतीही मला कधी वाटली नाही. 'रायटर्स ब्लॉक' बद्दल विशेष संशोधन करणाऱ्या मनोविश्लेषकांनी माझे विश्लेषण केले आहे. मला रायटर्स ब्लॉक झालेला बघायला माझे मनोविश्लेषण करणाऱ्या तज्ज्ञ महिलेला आवडलं असतं. परंतु मी मात्र त्याबाबतीत प्रत्येक वेळेस तिला निराश केलं. या 'रायटर्स ब्लॉक'चं मूळ कशात आहे ते मला शोधायचं होतं. काही लेखक पुस्तक लिहितात व नंतर आपले लेखन थांबवतात. आपण हे काहीतरीच लिहिलं या विचाराने ते अस्वस्थ होतात. सरतेशेवटी ते पुस्तक त्यांच्या कल्पनेतील पुस्तकापेक्षा खूपच निकृष्ट दर्जाचं निपजतं, म्हणजे हे परिपूर्णतेचं एक प्रकारचं विकृत रूप आहे की काय? असं माझ्या मनात येतं. मला स्वत:ला रायटर्स ब्लॉक आला नसला तरी लेखनासाठी वेळ काढणं हीच माझी खरी अडचण आहे. दिवसेंदिवस जीवनातील ताणतणाव वाढत आहेत. उतार वयात माझ्या जीवनात भरपूर शांतता आणि स्वास्थ्य येईल अशी हास्यास्पद कल्पना मी करीत असे. परंतु प्रत्यक्षात तसं काही घडलं नाही. तसे स्वास्थ्य मला कधी लाभले नाही."





मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

"कादंबरीत एक दर्जेदार तत्त्वज्ञान असले पाहिजे' असे मत ॲना व्यक्त करते. त्याचा विस्तार करताना डोरिस लेसिंग म्हणतात, "उत्तम कादंबरी वाचकाला जीवनाबद्दल विचार करायला लावते. वाचकांचे मन अधिक व्यापक करणाऱ्या, मनाची क्षितिजे रुंदावणाऱ्या कलाकृतीची गणना दर्जेदार कलाकृतींमध्ये करता येईल असं मला वाटतं."

गेल्या शतकातील पाश्चिमात्य स्त्रियांच्या संपूर्ण पिढीवर या कादंबरीतील विचारांचा प्रभाव होता. या कादंबरीला १९७६ सालचे फ्रेंच प्रिक्स पारितोषिक मिळाले. सॉल बेलो, डी. एच्. लॉरेन्स आणि नोबेल पारितोषिक विजेत्या आफ्रिकन लेखिका नादीन गॉर्डीमर हे लेखक आपल्यासारखे लेखन करतात, असे लेसिंगना वाटते. दि मॅरेजेस ऑफ झोन ३, ४ आणि ५ या पुस्तकाकडे आपला ओढा असला तरी गोल्डन नोटबुक ही कादंबरी वैयक्तिक दृष्टीने फार उपयुक्त ठरली, त्या पुस्तकामुळे आपले प्रशिक्षण झाले असे त्या आवर्जून म्हणतात. **'प्रत्येक कादंबरी लेखकाच्या जीवनात वैशिष्ट्यपूर्ण भूमिका बजावते'** असा त्यांना विश्वास वाटतो.

डोरिस लेसिंग म्हणतात, "दि गोल्डन नोटबुकसारखं दुसर एखादं पुस्तक तुम्ही पुन्हा लिहाल का?" असा प्रश्न वाचक मला अनेकदा विचारतात. माझे उत्तर नकारार्थी आहे लेखकाने आपल्या लेखनात एकाच संकल्पनेचा पुनर्वापर करू नये. माझे वाचक आणि प्रकाशक मी गोल्डन नोटबुकसारखे पुस्तक पुन्हा एकवार लिहिण्याचा आग्रह धरतात पण खरं सांगू का? पुस्तक हे नुकत्याच जन्मलेल्या अर्भकासारखं असतं. एकदा ते लिहिलं गेलं आणि त्याची नाळ तुटली की ते पुन्हा जन्म घेण्याकरिता लेखकाच्या गर्भाशयात घालता येत नाही. तो विषय त्या पुस्तकाबरोबरच संपला पाहिजे."

**'कॅनॉपस इन ॲरगॉस'** या मालिकेअंतर्गत एकूण पाच पुस्तके डोरिस लेसिंग यांनी लिहिले. 'कॉलनाइज्ड प्लॅनेट ५ शिकास्ता' हे पहिले पुस्तक १९७९ साली तर 'दि मॅरेजस बिटविन झोन ३, ४ व ५', 'दि सिरीयन अेक्सपेरिमेंट', 'दि मेकिंग ऑफ दि रिप्रेझेंटेटिव्ह फॉर प्लॅनेट ८', 'डॉक्यमेंट्स रिलेटिंग टू दि सेंटिमेंटल अेजंट्स इन दि व्हॉलीन अेम्पायर' हे पुढील भाग अनुक्रमाने प्रतिवर्षी एक याप्रमाणे प्रकाशित झाले. १९७५ सालापर्यंत त्यांनी अनेक लघुकथासंग्रह, कादंबऱ्या लिहिल्या होत्या. नाटक, संगीतिका लिहिण्याचाही अनुभव घेतला होता. त्यामुळे 'एका विशिष्ट प्रकारचे लेखन करणारी लेखिका' अशी त्यांची प्रतिमा झाली नाही. तरीसुद्धा डोरिस लेसिंग या 'वास्तववादी ललित साहित्य लेखिका' आहेत हे वाचकांना ठाऊक होते. त्यांचा 'वाचकवर्ग' तयार झाला होता. अशा वेळी अचानक 'कॅनॉपस इन ॲरगॉस' या मालिकेतील पुस्तके वाचकांच्या हाती आली. डोरिस लेसिंग अचानक 'सायन्स फिक्शन'कडे कशा काय वळल्या याचे वाचकवर्गाला फार आश्चर्य वाटले. १९८० च्या सुमारास 'सायन्स फिकशन' साहित्याने चांगलेच मूळ धरले होते. वाचकवर्गात अशा पुस्तकांची आवड निर्माण झाली होती. सायन्स फिक्शन लिहिणारे लेखकही प्रसिद्धीच्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

लाटेवर स्वार होत होते. तेव्हा अशा लेखक समूहात आपली गणना व्हावी या सुप्त हेतूने डोरिस लेसिंग यांनी हा साहित्य प्रकार हाताळला की काय अशीही शंका वाचकांच्या मनात आली. परंतु डोरिस लेसिंग यांना वास्तवाचे भान होते. आपल्या मर्यादांची जाणीव होती. 'सायन्स फिक्शन' लिहिण्याकरिता लहानपणापासून बुद्धीची जी वैज्ञानिक मशागत व्हावी लागते तिचा आपल्यात अभाव आहे हे त्यांना ठाऊक होते. म्हणून त्यांनी या मालिकेला 'सायन्स फिक्शन' न म्हणता 'स्पेस फिक्शन' असे नाव दिले. या मालिकेबद्दल आपले विचार व्यक्त करताना डोरिस लेसिंग म्हणतात, "लहानपणी झिंबाब्वेमध्ये असताना, मी, माझा भाऊ आईवडिलांबरोबर डोंगरावर जात होतो. कधी कधी मी एकटी आमच्या घराच्या बाहेरच्या अंगणात बसत असे. आकाशातील ताऱ्यांचे निरीक्षण करण्यात मी कित्येक रात्री घालवल्या आहेत. अशा तऱ्हेच्या निरीक्षणानंतर तुम्ही आपोआप लक्षावधी वर्षांच्या कालावधीचा विचार करू लागता आफ्रिकेतील ते मोकळं निळंशार आकाश आणि त्यावरील असंख्य तारे - हे सौंदर्य अगदी आगळे वेगळे. ते सौंदर्य इथे इंग्लंडमध्ये पहायला मिळत नाही. बालपणातील बराचसा काळ अशा गोष्टी करण्यात घालवल्यावर अवकाश ललित साहित्याची रूपरेषा मनात आपोआप तयार होते. काहीतरी नवीनता आणावी म्हणून मी अवकाश लेखनाकडे वळले नाही. कोणता विचार लेखकाला समाजापर्यंत पोचवायचा आहे यावर लेखनाचा घाट अवलंबून असतो. जर **लाखो वर्षांचा काळ कवेत घेणारी कादंबरी लिहायची असेल तर त्याकरिता लेखकाने नवीन घाट शोधलाच पाहिजे.** फक्त वास्तववादी कादंबरी लिहून हे उद्दिष्ट साध्य होणार नाही. म्हणून मी अवकाश लेखनाकडे वळले. या लेखन प्रकारामुळे मला काळ आणि अवकाश यामधील प्रदीर्घ आंदोलनाची संधी मिळाली. तसेच तत्कालिन सामाजिक समस्या आणि वादग्रस्त मुद्दे यावरील माझे विचार प्रकट करण्याची मुभा मिळाली."

"शिकास्ता, कॅनॉपस, सिरिअस, शम्मत या कादंबऱ्यांमधील प्रमुख शक्तिशाली गटांबद्दलची माझी मतं लोक विचारतात. वास्तवातील साम्राज्याची या तात्पर्यकथांची सांगड मी कधी घातली हे वाचकांना जाणून घ्यायचं असतं. एखाद्या खेळात जसं चांगलं वाईट असतं तसंच हे सर्व आहे. तुमच्याकडे चांगले साम्राज्य आहे, वाईट साम्राज्यही आहे आणि सिरियन साम्राज्यासारखे अधिक चांगलं व्हायचा प्रयत्न करणारे साम्राज्यसुद्धा आहे. मी ही जुनीच गोष्ट अवकाशात घडवून आणली. मी फक्त स्थानबदल केला. 'कॅनॉपस' या साम्राज्यातील नागरिक जाणकार आहेत. जागरुक आहेत. शिकास्तावर त्यांची बारीक नजर आहे. एकदा माझी मैत्रिण मला म्हणाली, "ज्यु, ख्रिश्चन आणि इस्लाम या तिन्ही धर्मांची तत्त्वे समजावणारी पुस्तके घेऊन कोणीही वाचत नाही." हे ऐकून माझ्या मनात विचार आला, "एखादा देवदूत जर या क्षणी आला तर काय घडेल?' म्हणून मी जुना करार, नवा करार, कुराण हे सारे धर्मग्रंथ वाचले. त्या सर्वांमध्ये एक सामाईक कल्पना आहे. एक प्रेषित



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

कोठूनतरी अवतीर्ण होतो आणि लोकांनी वेगळ्या प्रकारे वागले पाहिजे असे सांगतो. माझी भाषा काही धार्मिक लेखनाला साजेशी नाही. म्हणून मी ती संकल्पना अवकाश ललित साहित्यात वापरली आणि एक उत्तम साम्राज्य निर्माण केले. तुम्ही जर ही पुस्तके वाचलीत तर तुमच्या असे लक्षात येईल की या साम्राज्यातील बारकावे मी फारसे लिहिलेले नाहीत. कारण असल्या आदर्श साम्राज्याचं वर्णन करणं जवळ जवळ अशक्य आहे. आपण स्वत: तरी कुठे परिपूर्ण असतो? अशा चांगुलपणाचं वर्णन मी माझ्या साहित्यात कधीही करणार नाही.''

''भाषणबाजीचा मला तिरस्कार वाटतो. आपल्याला भूल पाडणाऱ्या अनेक गोष्टींपैकी ती एक आहे. अशा गुंगी आणणाऱ्या शब्दांमुळे आपले स्वत:चे विचारचक्र पूर्णपणे थांबते; असं मला वाटतं. त्याला कारण माझा भूतकाळ आहे. माझा राजकारणाशी जवळून संबंध आला. अनेक राजकीय प्रचारकी थाटाची भाषणे मी ऐकली. पण त्या साचेबंद भाषणांचा मला तिटकारा आला. कोणत्याही राजकीय भाषणाचा सारांश तीन वाक्यात देता येतो. म्हणूनच मुलांना लहानपणापासून भाषणबाजीतील निरक्षीरविवेक करायला शिकवले पाहिजे; म्हणजे त्यांचे अशा भाषणबाजीपासून रक्षण होईल. राजकीय नेते श्रोत्यांपेक्षाही खालच्या पातळीवर जाऊन भाषणे ठोकतात असं मला वाटते. कोणताही सर्वसामान्य माणूस राजकीय नेत्यांपेक्षा अधिक हुशार असतो. अशा माणसांनी व्यक्तिगत पातळीवर संवाद साधला की या गोष्टीची प्रचीती येते. मला जे समजतं त्यानुसार एकही राजकीय व्यक्ती खरं बोलत नाही. ते काय बोलतात त्यातल्या एकाही शब्दावर विश्वास ठेवता येत नाही. एकंदरीत परिस्थिती गंभीर आहे. अवकाश ललित साहित्य लिहिताना भाषणबाजीवर टीका करण्याचा उद्देश नव्हता. मला एक सामाजिक उपहासिका लिहायची होती आणि मी ती लिहिली. या उपहासिकेत भाषणबाजीच्या रोगासाठी एक रुग्णालय स्थापन झाल्याची कल्पना मी मांडली. मी जसजशी ही उपहासिका लिहित गेले तसतशा मला अशा चांगल्या कल्पना सुचत गेल्या. पुढे पुढे मात्र लेखनाचा तो बाज टिकवणे मला कठीण गेले. पण लेखनाने मला सर्वाधिक आनंद दिला.''

''पुनर्जन्म ही एक चित्तवेधक कल्पना आहे. माझा स्वत:चा त्यावर अजिबात विश्वास नाही. प्रदीर्घ जीवनाच्या वाटचालीत आपण त्या कल्पनेचा आधार घेतो. माझे गुरु शाह हे त्यांच्याबरोबर अध्ययन करणाऱ्या मंडळींना पुनर्जन्मावर चर्विचर्वण करण्यास प्रोत्साहन देत नाहीत. यापेक्षा विचार करण्यासारख्या इतर अनेक महत्त्वाच्या गोष्टी आहेत असे त्यांना वाटते. पुनर्जन्माविषयी बोलणे, त्यावर पुस्तके लिहिणे खूपच आकर्षक आहे. 'शिकस्ता' हे पुस्तक लिहिताना पुनर्जन्म हे एक आकर्षक रूपक किंवा एक साहित्यिक संकल्पना म्हणून मी वापरली आहे. पण काही लोकांनी त्याला पाठ्यपुस्तकाचे स्वरूप दिलं आहे. आपल्या धर्मातल्या श्रेष्ठ संकल्पनांचा समावेश ललित कलाकृतीत करणे ही गोष्ट सांगण्याची एक पद्धत म्हणून मी वापरली. या कादंबरीत 'विश्वाचा अंत' या कल्पनेचा विस्तार करण्याचा प्रयत्न मी केला आहे.''



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

"माझ्या या कादंबऱ्या वाचल्यानंतरच्या वाचकांच्या प्रतिक्रिया फार बोलक्या होत्या. दोन्ही प्रकारचे साहित्य आवडणारे वाचक असतात. खरं पाहिलं असता अवकाश ललित साहित्य आणि वास्तववादी ललित साहित्य हे पूर्णपणे वेगळे नाहीत. माझे अवकाश ललित साहित्य वाचल्यावर एक ऑस्ट्रेलियन प्राध्यापक मला म्हणाले, "तुम्ही आता यापुढे तुमचा वेळ वास्तववादी साहित्य लिहिण्यात फुकट घालवणार नाही असं मला वाटतं." याउलट तुम्ही हे असलं विचित्र साहित्य लिहिता ते मला अजिबात आवडत नाही. तुम्ही पुन्हा वास्तववादी साहित्य कधी लिहायला लागणार?" अशी पत्रही वाचक मला पाठवतात. हा सगळा गमतीचा भाग आहे."

"आजकाल माणसाच्या कल्पनाशक्तीवर काहीतरी विपरीत परिणाम झाला आहे असं मला वाटतं. काही लोक म्हणतात, "आम्ही काल्पनिक ललित साहित्य वाचू शकत नाही. म्हणजेच हजारो वर्षे माणूस आपल्या बुद्धीचा उपयोग ज्या तऱ्हेने करत होता ती क्षमता हल्लीच्या माणसांनी गमावली आहे असं मला वाटतं. वास्तववादाची सुरुवात होण्यापूर्वी माणसे प्राण्यांच्या गोष्टी, चमत्कारांच्या गोष्टी, नीतिकथा, परिकथा सांगत असत. त्यात वास्तववाद कधीच येत नसे. अशाच गोष्टी ऐकण्याचा अनुभव त्यांना असे. पण वास्तववादाचा उदय झाला आणि त्यामानाने अल्पकाळात माणसांना साहित्यिक अंगाने बुद्धीचा वापर करता येईनासा झाला. 'पीटर ब्राउनचा जन्म ४ जाने १९६७ साली बर्मिंगहॅममध्ये झाला' असं वाचलं की माणसांना बरं वाटतं. मला वाटतं या दोन्ही प्रकारच्या साहित्याचा आस्वाद घेण्याची क्षमता माणसाने गमावली आहे हा त्याचा फार मोठा तोटा आहे."

"ही पुस्तके वाचल्यावर 'अशा प्रकारचे लेखन दोन हजार साली लिहिले जाईल असे आम्हाला वाटले म्हणजे तुम्ही काळाच्या दोन दशके पुढे वाटचाल करीत आहात" अशीही गोड प्रतिक्रिया काही वाचकांनी व्यक्त केली. पण या मताशी मी सहमत नाही. ललित विज्ञानाचे चाहते ज्याला मुख्य प्रवाहातील लेखन म्हणतात, त्या लेखनावरसुद्धा ललित विज्ञान साहित्याचा प्रभाव पडलेला दिसतो. आज वास्तवाला धरून नसलेल्या कित्येक कादंबऱ्या 'जादूमय वास्तववाद' या शीर्षकाखाली लिहिल्या जातात ही गोष्ट फार मजेशीर वाटते."

"मी वास्तववादी कादंबऱ्या लिहायचं थांबवलं असं समीक्षकांना वाटतं, त्यामुळे त्यांची मनं दुखावली गेली आहेत. परंतु वास्तववादाच्या पलिकडे जाणारी कादंबरी पचवण्याची ताकद त्यांच्यात तितकीशी नाही. ते अनभिज्ञ लोक आहेत. ते आपले स्वत:चेच नियम तयार करतात. "वास्तववाद आणि सत्य या गोष्टींकडे तुम्ही का बरं पाठ फिरवलीत? ते सोडून तुम्ही ललित विज्ञानाची पळवाट का बरं शोधलीत?" अशा आशयाची पत्रे समीक्षक मला पाठवतात. त्यांनी ललित विज्ञान साहित्य अजिबात वाचलेलं नसतं. साहजिकच आमच्या



अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

काळातील उत्तम सामाजिक समीक्षा ललितविज्ञान साहित्यात आहे. याची त्यांना गंधवार्ताही नसते. बहुधा त्यांची मते विज्ञान ललित साहित्याबद्दल आधीच कलुषित झालेली असल्यामुळे ते शोधून काढण्याची तसदीही अशी माणसे घेत नाहीत. अशा घटनांमुळे मी कमालीची त्रस्त होते.''

''ललित विज्ञानाचे चाहते फारच संकुचित मनोवृत्तीचे असतात. ललित विज्ञान लिहिणारे लेखक त्यांच्या या संकुचित समूहाला धरून राहिले नाहीत तर ही मंडळी संतापतात. प्रत्यक्षात एखाद्या समूहाचे प्रतिनिधित्व करणाऱ्यांना हल्ली अशी गटवारी कमी करण्याची इच्छा असते. ललित विज्ञानाच्या ब्रायटनमध्ये भरणाऱ्या जागतिक सम्मेलनात मला 'प्रमुख पाहुणी' म्हणून आमंत्रित केलं होतं. तेव्हा त्यांनी ललित विज्ञानाच्या रशियन लेखकांनाही बोलावलं होतं. पूर्वी अशा आमंत्रणांचा स्वीकार करणे त्यांना त्रासदायक होत असे. पण ग्लासनोस्त चळवळीमुळे त्या लेखकांना या सम्मेलनाला प्रत्यक्ष हजेरी लावता आली. 'कॅनॉपस इन अॅरगॉस' या मालिकेतील पुस्तके लिहिताना मी ललित विज्ञान किंवा तत्सम काहीतरी प्रकार लिहितेय असं माझ्या मनातही आलं नाही. पण जेव्हा मी ललित विज्ञान लिहिते म्हणून लोकांनी माझ्यावर टीका करण्यास सुरुवात केली तेव्हा हा वेगळा प्रकार मी हाताळतेय हे मला समजलं. अर्थात् मी लिहिलं आहे ते खरं ललित विज्ञान नव्हेच-नुकतंच मी स्टॅनिस्ला लेग या लेखकाचं पुस्तक वाचले- ते खरं ललित विज्ञान. वैज्ञानिक कल्पनांनी शिगोशिग भरलेलं. त्यातल्या अर्ध्या कल्पना मला समजल्या नाहीत. त्यामुळे माझ्या आकलनाच्या दृष्टीने त्या फुकट गेल्या. तरीही त्यातला जो भाग मला समजला तो चित्तवेधक होता. ''वास्तववादासाठी आमच्याजवळ वेळ नाही'' असं सांगणारी कित्येक तरुण तरुणी मला भेटली. पण ही मंडळी पूर्वग्रहदूषित आहेत. त्यामुळे ते जीवनातील कितीतरी चांगल्या गोष्टीना मुकले आहेत. पण तेही जाणून घ्यायची त्यांची इच्छा नाही. तसेच मला अनेक मध्यमवयीन माणसे भेटतात. ती म्हणतात, ''क्षमा करा. पण तुमचे वास्तववादाला न धरता केलेले लेखन आम्ही वाचू शकत नाही.'' ही फार दयनीय गोष्ट आहे. मला ज्याअर्थी ललित विज्ञान सम्मेलनाला प्रमुख पाहुणी म्हणून बोलावलं, त्याअर्थी ही परिस्थिती बदलते आहे. याचाच मला आनंद झाला होता. परंतु तिथला माझा अनुभव फार चमत्कारिक होता.''

''त्या परिषदेला आमच्या काळातले बिनीचे विचारवंत आले होते. तसेच वृत्तपत्रांत विज्ञानलेखन करणारे, विज्ञान या विषयाची विलक्षण जाण असलेले ललित विज्ञान साहित्याचे लेखक आणि त्याचबरोबर अशा अनेक अधिवेशनांना हजेरी लावत फिरणारे विक्षिप्त लोकही या अधिवेशनाला आले होते. ते माझ्याजवळ येत आणि माझ्या कानात कुजबुजत, ''तू मुख्य प्रवाहातील लेखिका आहेस. मग तू इथे धडपडायला कशाला आलीस?'' अशी टोकाची भूमिका घेणारी मंडळी धोकादायक असतात.''



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

### दि गुड टेररीस्ट

'दि गोल्डन नोटबुक' नंतर डोरिस लेमिंग यांच्या 'दि ब्लॅक मॅडोना अँड विंटर इन जुलै', पर्टिक्युलरली कॅटस्. 'ब्रीफींग फॉर डिसेंट इनटू हेल', 'दि समर बिफोर दि डार्क' 'दि मेमॉसर्स ऑफ अ सर्व्हायव्हर' यासारख्या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या. तसेच 'आफ्रिकन स्टोरिज' 'दि स्टोरी ऑफ अ नॉन मॅरिअिंग मॅन अँड अदर स्टोरिज' यासारखे कथासंग्रह सुद्धा प्रकाशित झाले.

डोरिस लेसिंग या स्वत: ब्रिटिश कम्युनिस्ट पार्टीच्या सदस्या होत्या. विसाव्या शतकाच्या पाचव्या, सहाव्या दशकात अनेक हुशार विद्वान मंडळींना साम्यवादी विचारसरणीची मोहिनी पडली होती. आहेरे-नाहीरे या समाजातील दोन गटांमधील दरी मिटवून टाकून सर्वांना समान पातळीवर आणण्याच्या महत्वाकांक्षी विचारांनी त्यांना घेरले होते. अशा आदर्श रामराज्याच्या प्रस्थापनेत सहभागी होण्याच्या दृष्टीने अनेक मंडळीनी साम्यवादी संस्थांचे सभासदत्व घेतले होते. अर्थात् विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात रशियातील साम्यवादाचा बुरुज ढासळला आणि ही आदर्शवादी काल्पनिक विचारसरणी कशी फोल आहे याची जाणीव झाली. जगाच्या रंगमंचावर घडणाऱ्या या बदलाचे पडसाद डोरिस लेमिंग यांनी टिपले आणि साम्यवादी विचारसरणीचा त्याग केला. या बौद्धिक रुपांतरानंतर त्यानी 'दि गुड टेररिस्ट' ही राजकीय कादंबरी लिहिली. ती १९८५ साली प्रकाशित झाली.

"मुलांची शारीरिक व बौद्धिक वाढ होत असते. अवतीभवतीचे जग ती कुतूहलाने न्याहाळत असतात. मोठ्यांची संभाषणे कान देऊन ऐकत असतात. प्रसारमाध्यमांकडूनही हर तऱ्हेचे ज्ञान संपादन करीत असतात. या सर्व मिश्रणातून ती स्वत:चे मत बनवीत असतात. तरुण वय, सळसळते रक्त आणि लाथ मारीन तिथे पाणी काढीन अशी महत्त्वाकांक्षा, या साऱ्यांच्या जोरावर तरुण वर्ग एका विशिष्ट बंडखोर अवस्थेतून जातो. कालांतराने वास्तवाची जाणीव झाल्यावर तो उकळता लाव्हा हळूहळू थंड होऊ लागतो. कधी कधी मात्र या बंडखोरीतून 'माथेफिरू' निर्माण होतात अशा व्यक्तींमध्ये वाढत्या वयाबरोबर विचारांची तीव्रता कमी होत नाही उलट त्यांचे विचार अधिकाधिक धारदार होत जातात. अशा मंडळींवर ही कादंबरी बेतलेली आहे."

"काही व्यक्तींच्या बाबतीत विशिष्ट विचारप्रणाली दिलासा देणारी ठरते कारण अशा विचारप्रणालीमुळे विचारांची चौकट, ठोस मूल्ये आणि संकल्पना तयार होतात. त्या व्यक्तींना समाजात एक विशिष्ट स्थान प्राप्त होते. कित्येकदा त्यात मिरवण्याची सूक्ष्म छटाही असते." परिणामत: अशा विचारप्रणालीची एक 'नशा' निर्माण होते. त्यात बदल होणे फारच कठीण असते. याबद्दल डोरिस लेसिंग म्हणतात, "डाव्या विचारसरणीवर अभ्यारोपित करण्याच्या दृष्टीने मीही कादंबरी लिहिली नाही. उलट जी मंडळी क्रांती हीच आपली जीवनशैली बनवतात, अशा व्यक्तीरेखांवर 'दि गुड टेररिस्ट' ही कादंबरी मी लिहिली आहे. कोणतीही



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

कंटाळवाणी नोकरी करीत असता, 'आम्ही क्रांतीकारक आहोत आणि अल्पावधीत आम्ही या जगात बदल घडवून आणणार आाहोत' अशा वल्गना करणारे अनेकजण असतात. पण माझ्या कादंबरीतील पात्रे वायफळ बडबड न करता प्रत्यक्ष कृती करतात."

**कथावस्तू**

'दि गुड टेररिस्ट' या कादंबरीतील प्रमुख सूत्रधार आहे 'ॲलिस मेलिंग्ज'. छत्तीस वर्षाची ही मध्यमवयीन महिला मध्यम वर्गाची प्रतिनिधी आणि कसलेली कम्युनिस्ट कार्यकर्ती आहे. तसेच लोककल्याणाकरिता झटण्याचा आव आणण्याची दांभिकता तिच्यात ओतप्रत भरलेली आहे. रिकाम्या जागांचा कब्जा घेण्यात ती तरबेज आहे. जास्पर हा तिचा मित्र. पण जास्परशी असलेले तिचे संबंध फारच विचित्र आहेत. जास्पर समलिंगी, संभोगी असल्यामुळे एका दशकाहूनही अधिक काळ या मित्राच्या सहवासात घालवूनही त्या उभयातांच्यात शारीरिक जवळीक झाली नाही. अर्थात ॲलिस या संबंधाचे समर्थन करते. वैषयिक संबधामुळे व्यक्ती असंतुलित होतात आणि एखाद्या कार्याच्या दिशेने वापरता येणारा ऊर्जेचा स्त्रोत कमी होतो अशी ॲलिसची ठाम समजूत आहे. म्हणूनच जास्परशी असलेले संबंध समाधानकारक आणि निकोप आहेत असे ॲलिसला वाटते.

समाजातील भांडवलशहांचा वर्ग कसा नष्ट करायचा याबद्दलच्या घणाघाती चर्चेने कादंबरीची सुरुवात होते. संघटनेच्या ध्येयाची वाचकांना जाणीव होते. कादंबरीची नायिका आणि प्रमुख सूत्रधार या नात्याने ॲलिसने जास्तीत जास्त वेळ ध्येयपूर्तीसाठी देणे अपेक्षित असते. समाजातील आहेरे वर्गाला उलथून पाडणे ही अत्यंत अवघड कामगिरी पार पाडण्यासाठी काळजीपूर्वक करावयाच्या हालचालींचे उत्तम नियोजन करणे आवश्यक होते. त्यासाठी आपले सर्व लक्ष आणि शक्ती ॲलिसने त्या दिशेने वापरायला हवी होती. परंतु प्रत्यक्षात मात्र ती त्यासाठी अगदी थोडा वेळ देत उलट ॲलिस आपल्या संघटनेतील सभासदांचे पालकत्त्व स्वीकारते. दिसायला सुरेख पण निराशेने ग्रासलेली 'फाये' या कादंबरीत आहे. या सर्व उद्योगाचा कंटाळा आला असला तरी दुसरा काही मार्ग दिसत नसल्यामुळे नाइलाजाने या संघटनेत टिकून असलेली रॉबर्टा फायेची साथीदार आहे. रॉबर्टा फायेची सर्वार्थाने जपणूक करण्याची कामगिरी बजावताना दिसते. एकलकोंडा फिलिपही ॲलिसच्या संघटनेचा सभासद आहे. कणखर मनोभूमिका असणारा; स्वतंत्रपणे कार्य करणारा बर्ट जास्परला गुरुसमान असला तरी ॲलिसच्या दृष्टीने मात्र बर्ट हा तिच्या श्रेष्ठत्त्वाला आव्हान करणारा धोकादायक सहकारी आहे.

ॲलिस रिकाम्या घरांचा कब्जा मिळवते. त्या घरातील विजेचे दिवे चालू ठेवणे, पाण्याचे नळ उघडे ठेवणे अशा त्रासदायक कृतीनी ती व तिचे सहकारी अधिकारी वर्गाला सळो की पळो करून सोडतात ही कृष्णकृत्ये करताना तिची संघटना पोलिसांना शांत ठेवते अर्थातच



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

पोलिस त्यांच्या कारवायांकडे दुर्लक्ष करतात. त्यांना हुसकावून लावत नाहीत. या कार्याकरिता लागणारा पैसा ॲलिस लहानमोठ्या चोऱ्या करून मिळवते. इतकेच नव्हे तर प्रत्यक्ष आपल्या आईवडिलांच्या घरी जाऊन पैसे, पडदे व इतर अनेक वस्तू निर्लजपणे उचलून नेते. काही क्षण ॲलिस अगदी शहाण्या मुलीसारखी वागते. पण दुसऱ्याच क्षणी ती त्रस्त होते. डोरोथी मेलिंगला– आपल्या आईला 'मूर्ख' म्हणण्यापर्यंत तिची मजल जाते. आपल्या आदर्शाशी सहमत न झाल्यामुळे ती आईला 'फॅसिस्ट' हे विशेषण लावते. ॲलिसची आई कित्येक वर्षे ॲलिस व तिचा मित्र जास्पर या दोघांना आर्थिक पाठिंबा देते. परंतु दुर्दैवाने गरिबीमुळे त्रस्त झाल्यावर कंटाळून ती ॲलिसला म्हणते. "इकडे तिकडे धावपळ करून, लहानमोठ्या कृती करून आपण क्रांती घडवून आणू असं तुला वाटतंय, आपण कोणीतरी फार महत्त्वाची व्यक्ती आहोत अशी तुझी समजूत झाली आहे. पण हा निव्वळ भ्रम आहे. तुम्ही अगदी क्षुल्लक माणसं आहात. तुम्ही कधीच काहीही करणार नाही." येथे डोरोथी मेलिंगच्या आईच्या मुखातून लेखिका आपले स्वत:चेच विचार ध्वनित करते आहे असे वाटते. आईच्या दृष्टीने 'घरातील कोणतीही जवाबदारी न घेणारी ॲलिस खोटारडी आणि दांभिक आहे. मध्यमवर्गात लहानाची मोठी झाल्याचा ॲलिसला फारच अभिमान वाटतो. पण आपल्या वडिलांची चांगली नोकरी, मिळणारा पैसा यामुळेच आपले बालपण आनंदात गेले याचा मात्र ॲलिसला सोयीस्कर विसर पडतो. नोकरदार वर्गातच आपली पाळंमुळं आहेत याचे ॲलिस अदभूतीकरण करीत होती. परंतु स्वत: मात्र नोकरी न करणाऱ्या समाजाचा एक घटक म्हणून राहत होती. आपण काहीही खरेदी केले तर त्यांची किंमत देऊन मगच आपण तेथून बाहेर पडतो. पण खरेदी केल्यावर ॲलिस मात्र किंमत चुकती करण्याची जबाबदारी आई वडिल, मित्रमंडळी यासारख्या घाम गाळून अर्थार्जन करणाऱ्या करदात्यावर सोडून हळूच काढता पाय घेत असे. आपल्या संघटनेतील सभासदांची मातृवत् काळजी घेण्यात ॲलिस गुंतलेली असताना आय. आर. ए. ला पाठिंबा दर्शविण्यासाठी ते सभासद लंडनच्या गजबजलेल्या रस्त्यावरील एका गाडीत बॉम्बस्फोट घडवून आणण्याचा कट रचतात. बाँबस्फोट होतो. त्यात काही माणसे मृत्युमुखी पडतात तर काहीना इजा होते. पण आय. आर. ए. काही या घातपाताची जबाबदारी स्वीकारीत नाही. (I.R.A. आयरिश रिपब्लिकन आर्मी. १९१६ ते २१ च्या दरम्यान ब्रिटनपासून स्वातंत्र्य मिळवण्यासाठी या संघटनेची स्थापना झाली. रिपब्लिक ऑफ आयर्लंड आणि उत्तर आयर्लंड यांचे एकीकरण घडवून आणणे हे त्यांचे ध्येय होते. १९६९ साली या संघटनेचे विभाजन झाले. ऑफिशियल आय. आर. ए. निष्क्रीय झाली तर प्रोव्हिजनल आय. आर. ए. चे सभासद उ. आयर्लंड, ब्रिटन व युरोपमध्ये घातपाती कृत्ये घडवून आणू लागले. अखेर ऑगस्ट १९९४ साली त्यांनी युद्धबंदी घोषित केली) हे अरबांचेच कृत्य असावे असा अंदाज एक टॅक्सीचालक ॲलिसजवळ व्यक्त करतो ! 'सर्वसामान्य माणसाना काहीच कळत नाही, आमचे उदात्त हेतू या माणसाना कळणे शक्य



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

नाही.' असे म्हणत ॲलिस टॅक्सीत बसते. ॲलिसच्या डोळ्यात अश्रू उभे राहतात सर्व जगातील गरीब बिचाऱ्या जनतेच्या हितासाठी जणू काही ती झटत होती.

खरोखरच ही धीट, धीरोदात्त ॲलिस आणि तिचे उदात्त हेतू यांचं आकलन कोणालाच होत नाही. आपल्या कार्याची कटु परिणती होऊन सुद्धा आपण फार चांगले आहोत याची ॲलिसला खात्री वाटते. उपहासगर्भित शीर्षकात सुचविल्याप्रमाणे ती खरोखरच 'चांगली, सद्‌वर्तनी' दहशतवादी आहे. ॲलिसची गुंतागुंतीची व्यक्तिरेखा लेखिकेने अत्यंत समर्थपणे रंगवली आहे. संपूर्ण कादंबरी वाचताना आपण ॲलिसमध्ये अधिकाधिक गुंतत जातो. गदगदा हलवून तिला म्हणावेसे वाटते. ॲलिस, एक व्यक्ती म्हणून मला तुझा तिरस्कार वाटतो. तुला यापेक्षा कितीतरी चांगली कामे करता आली असती. आयुष्याला अर्थ प्राप्त होईल असं काहीतरी कर ग !' लेखिकेने व्यक्तीव्यक्तींमधील जटिल संबंधांची गुंफण इतक्या प्रभावीपणे केली आहे की वाचक नकळत तिच्याबरोबर पुढे पुढे जात राहतो.

### निर्मितीची कहाणी

'दि गुड टेररिस्ट' या कादंबरीच्या निर्मितीवर प्रकाश टाकण्याची विनंती केल्यानंतर लेसिंग म्हणतात, ''मला एक तरुण जोडपं माहित होतं. त्यातली तरुणी ही माझ्या मैत्रिणीची मुलगी, हुशार, चणचुणीत विशी उलटलेली ! उचापती करणाऱ्या युवा गटात ती राहात असे. त्यांच्यासाठी स्वयंपाक करीत असे. अशा लोकांच्या आहारपोषणाची जबाबदारी तिने आपणहून स्वत:कडे घेतली होती. ती एका मुलाबरोबर राहत होती. तो होता क्रांतीकारक. 'मध्यमवर्गीयांचे शोषण' हा त्याचा सिद्धान्त. कितीतरी वर्ष ती दोघंजपण बांडगुळासारखी माझ्या मैत्रिणीच्या घरी राहिली. शेवटी तिला त्या दोघांना हाकलून द्यावे लागले. त्याचा सूड उगवण्यासाठी 'आम्ही एका आयरिश दहशतवादी संघटनेत सामील होणार आहोत अशी धमकी देण्यास त्यांनी सुरुवात केली. माझ्या मैत्रिणीची ही कथा ऐकल्यावर माझ्या मनात विचार आला, 'अशा क्रियाप्रतिक्रियांचा ताळमेळ घालताना किती दहशतवादी नव्याने निर्माण होत असतील कुणास ठाऊक?' नेमक्या त्याच वेळी आयरिश संघटनेतील दहशतवाद्यांनी हॅरॉड्‌स्‌ या लंडनमधल्या सुप्रसिद्ध दुकानात बॉम्बस्फोट केला. तो एक अपरिपक्व प्रयत्न होता. माझ्या मैत्रिणीची मुलगी आणि तिचा साथीदार यांना अशाच प्रकारची घातपाती कामे करायची आहेत असं माझ्या लक्षात आलं.' या विषयावर आपण कादंबरी लिहावी हा विचार माझ्या मनात चमकून गेला. अमेरिकन दहशतवादी संघटनेशी संबंधित असलेल्या माझ्या एका मित्राने त्याबद्दलची बरीच माहिती मला दिली होती. प्रत्यक्ष काम करण्यापेक्षा आपली समाजातली प्रतिमा कशी असावी हे जपण्याची त्या संघटनेच्या सभासदांची धडपड असे. मी स्वत: राजकीय समूहात काम केले होते. 'आपण करतो तेच फक्त बरोबर आणि इतर सर्वजण करतात हे चूक' असा त्या समूहातील प्रत्येकाचा दुर्दम्य विश्वास. या सर्व अनुभवांमधून एक



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

सुंदर कथा निर्माण झाली आणि ती या कादंबरीच्या रुपात साकार झाली. हे लेखन चालू असताना मला एक आगळावेगळा अनुभव आला. माझ्या जीवनातील सर्व घटना आणि त्यांचा बारीक सारीक तपशील मला कोणीतरी सांगतंय आणि मी तो चोरून ऐकतेय असं मला वाटत होतं. त्या घटनानीच पुस्तकाची रूपरेषा ठरवली. हे पुस्तक मी अगदी झटपट लिहिलं एका वर्षाच्या आत ही कादंबरी प्रकाशित झाली. अशी ही जन्मकथा !''

तत्कालिन युरोपमधील राजकीय परिस्थिती विषद करून सांगताना डोरिस लेसिंग म्हणतात, ''ही कादंबरी १९७० सालच्या युरोपमधील परिस्थितीवर आधारित आहे. ब्रिटनमध्ये त्यावेळी मार्गरेट थॅचर यांचे सरकार अडचणीत सापडले होते, बेकारीची समस्या उग्र झाली होती. शिक्षणासारख्या आवश्यक गोष्टींवरील खर्चात कपात केल्यामुळे पंतप्रधानांवर टीका होत होती. पौंडाचे अवमूल्यन झाले होते. I.R.A. च्या लोकांनी मार्गरेट थॅचर यांच्या हत्येचा अयशस्वी प्रयत्न केला होता. या सर्व परिस्थितीचा विचारही ही कादंबरी लिहिताना माझ्या मनात होता.''

'दि गुड टेररिस्ट' ह्या पुस्तकातील विषयाचे लेखिकेने संशोधन केले असावे असा समीक्षकांचा अंदाज होता. त्या पुस्तकात कोठडीत राहणाऱ्यांचे जीवन, संघटनकौशल्य, इतरही अनेक बाबतीतली वर्णने प्रचंड बारकाव्यानिशी लेखिकेने केलेली आढळतात. या सर्व गोष्टी अभ्यासाशिवाय लिहिता येणार नाहीत असं समीक्षकाना वाटत होतं. कदाचित त्यांनी हे सारे कल्पनेने जाणले असावे किंवा वृत्तपत्रीय लिखाणातून हा तपशील घेतला असावा असाही काही समीक्षकांचा अंदाज होता. त्याबद्दल डोरिस लेसिंग म्हणतात, अनधिवास (जागा स्वत:च्या मालकीची नसताना बळकावणे व तिथे राहाणे) करणाऱ्या कितीतरी लोकांची मला माहिती होती आणि अशाच इतर लोकांबद्दलच्या गोष्टी मी ऐकल्या होत्या. त्यांच्या मनात पैशाचाच सतत विचार असतो. त्यामुळे साहजिकच संवादही पैशाबद्दलच होतात. एकंदरीत हे सर्व हास्यास्पद आहे.''

वाचकांच्या प्रतिसादाबद्दल त्या म्हणतात, ''या पुस्तकाला वाचकांनी उत्तम प्रतिसाद दिला. वाचकांनी या पुस्तकाबद्दलच्या प्रतिक्रिया मुद्दाम पत्र पाठवून मला कळवल्या. त्या फारच चित्तवेधक होत्या. विविध देशांतील अशा संघटनांमध्ये सहभागी झालेल्या कितीतरी लोकांनी मला पत्रे लिहिली. पण एकदा मी रोममध्ये गेले होते तेव्हांची आठवण दखल घेण्यासारखी आहे. मला एक स्त्री भेटली. तिचा नवरा या दहशतवादी लाटेमध्ये मारला गेला होता. ती अतिशय दु:खी होती. आपले दु:ख हलके करण्यासाठी ती वरचेवर तुरुंगात जाऊन दहशतवाद्यांची भेट घेत असे. ते सर्व दहशतवादी सुशिक्षित होते. प्रसन्न आणि कोणालाही भावेल असे त्यांचे व्यक्तिमत्त्व होते. एकेकाळी त्या सर्वांनी उच्चार करायलाही लाज वाटेत असे अमानुष गुन्हे केले होते. पण आता मात्र त्यांना उपरती होत होती. आपल्या कृत्यांची टोचणी लागून राहिली होती. अपराधीपणाची भावना त्यांच्या मनात निर्माण झाली होती. ही



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

पाशवी कृत्ये करताना आम्ही आमचे राहिलो नव्हतो. एका अनामिक पाशवी शक्तीने आमच्यावर ताबा मिळवला होता. शिडाच्या होडीत बसवून जणू काही कोणीतरी आम्हाला वेगाने पुढे नेत होतं. अशा रुपकांचा वापर करून ते आपल्या भावनाना शब्दरूप देत होते. त्या वेडेपणाच्या झटक्यातून ते बाहेर आले होते, आता ते तुरुंगात राहून आपल्या आठवणी कागदावर उतरवत आहेत. इतर भाषा शिकत आहेत. हे सर्व ऐकल्यावर माझ्या मनात अनेक प्रश्न उभे राहिले. अशा तऱ्हेच्या पाशवी शक्तीने ताबा घेतलेल्या माणसांचं पुढे काय होतं? ती काय करतात? याचा आपण विचारसुद्धा करत नाही.''

राजकीय पार्श्वभूमी असलेल्या या कादंबरीत लेखिकेने मानवी स्वभावाच्या अंहकार, भ्याडपणा, दुबळेपणा यासारख्या दोषांवर परखडपणे टीका केली आहे. मनुष्यस्वभावातील हे दोष कालातीत आहेत. अर्थात या टीकेलासुद्धा काळाचे बंधन नाही. म्हणूनच १९८५ साली प्रसिद्ध झालेल्या आणि दोन दशकांचा कालावधी उलटल्यावर आजही त्यातील ताजेपणा कायम आहे. ॲलिससारख्या व्यक्ती आपल्या आदर्शवादातून आपले व्यक्तिमत्त्व घडवतात आणि जगण्यासाठी हेतू निर्माण करतात. यालाच लेसिंग 'इंटलेक्चुअल पॅकेज डील' म्हणतात. ॲलिससारख्या व्यक्तींचे त्यावर अतोनात प्रेम असते. अशा व्यक्ती मतभिन्नता असणाऱ्यांचा तिरस्कार करतात. खरं म्हणजे व्यक्ती तितक्या प्रकृती या नियमानुसार मतभिन्नता असणे हे स्वाभाविक आहे. फक्त स्वत:च्याच विचारांशी एकनिष्ठ असणाऱ्या ॲलिससारख्या व्यक्तींच्या लेखी हे वास्तवही निरर्थक ठरते. मानवी समाजातील ही कालातीत वास्तवता दाखवण्यात लेखिका पूर्णपणे यशस्वी झाली आहे. म्हणूनच *व्हिटब्रेड* पारितोषिकासाठी या कादंबरीची निवड झाली आणि बुकर पारितोषिकासाठी सुद्धा या कादंबरीचा विचार झाला होता.

लॉस एंजल्समध्ये राजकारण आणि कादंबरी या विषयावर एक चर्चासत्र आयोजित केले होते. त्यात डोरिस लेसिंग, सुप्रसिद्ध लेखक मिलान कुंडेरा आणि इतर अनेक लेखकांनी आपले विचार सुस्पष्टपणे मांडले होते. त्या सर्वांनी 'राजकीय कादंबरी' ही कल्पना फेटाळून लावली होती. विसाव्या शतकातील कितीतरी श्रेष्ठ राजकीय कादंबरीकार 'आम्ही कधीच राजकीय कादंबरी लिहित नाही असे म्हणताना आढळतात. डिकन्स, झोला यांना खऱ्या अर्थाने 'राजकीय कादंबरीकार' असे संबोधता येणार नाही अशी मते त्या चर्चासत्रात नोंदवली गेली. त्याबद्दल डोरिस लेसिंग म्हणतात, 'गेल्या संपूर्ण शतकात कम्युनिस्ट पक्षाने अनेक देशात साहित्यविषयीचे राजकीय नियम ठरवून दिले होते. त्यामुळे एकापाठोपाठ एक अशा अनेक देशातील खरे साहित्य नष्ट झाले. सोव्हिएत रशियाने अश गाडाभर कादंबऱ्या निर्माण केल्या होत्या. त्या मुळीच वाचनीय नव्हत्या. पण प्रत्यक्षात अशाच कादंबऱ्यांना मान्यता मिळत होती. पारितोषिके जाहीर होत होती. प्रतिस्पर्ध्यांविषयी कट्टर शत्रुत्वाची भावना असणे त्यांच्याविषयी असहिष्णुतेचे धोरण अवलंबणे असल्या सगळ्या तिरस्करणीय गोष्टी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

त्या कादंबऱ्यात येतात. परंतु पक्षात दीर्घकाळ घालवलेल्या मूठभर व्यक्तींखेरीज या गोष्टी कोणाच्याच लक्षात येत नाहीत.'

राजकीय कादंबरीलेखनाबद्दल डोरिस म्हणतात, "संदेश देणारे पुस्तक मला लिहिल पाहिजे." असा विचार कोणाच्यातरी मनात आला आणि राजकीय कादंबरी लिहिली गेली असं कधी होत नाही. वैयक्तिक अनुभव आणि जवळपास पाशवी म्हणता येईल अशी शक्ती वापरून राजकीय कादंबरी लिहिली जाते. एका विलक्षण वेडाने झपाटल्यामुळे ती लिहिली जाते. राजकीय कादंबरी जेव्हा खरोखरीच्या भावनांतून लिहिली जाते तेव्हा ती नितांतसुंदर असू शकते. माझ्या पिढीतील लोकांना शासकीय नियंत्रणाचा भयंकर अनुभव आला आहे. "ही कादंबरी तुम्ही का लिहिता? ही उच्च स्तरांतील लोकाना मानवणारी कादंबरी आहे. तुम्ही बहुजनसमाजाकरीता का लिहित नाही?" यासारख्या प्रश्नांचा भडिमार करून माझ्या पिढीच्या लेखकांना शासकीय साहित्यिक नियंत्रणाने पिडले होते. या गोष्टीचं महत्त्व लक्षात घेण्यासारखं आहे. या त्रासामुळे एखाद्या गंभीर प्रकृतीच्या लेखकाचा शेवट होतो. ज्यांना लेखक व्हायचंय अशी माणसे पाककृतींप्रमाणे कलाकृती निर्माण करण्याच्या पद्धती सांगतात. हे फार घातक आहे. 'आपण या जगात कसे वागावे याविषयीचे महत्त्वाचे नैतिक प्रश्न राजकारण समाजापुढे निर्माण करते' या सलमा रश्दींच्या मनाशी मी सहमत आहे."

## दि फिफ्थ चाइल्ड आणि बेन इन दि वर्ल्ड

प्रत्येक लेखकाचे स्वतंत्र व्यक्तीमत्त्व असते मूळ प्रकृती आणि जगाच्या पाठीवर टक्केटोणपे खात झालेला जीवनप्रवास, अनुभवांची शिदोरी, समाजसंपर्क अशा अनेकविध गोष्टींमुळे त्यात घडून येणारे परिवर्तन– कोणत्याही गणिती प्रक्रियेत न मांडता येणारे हे एक अजब रसायन आहे. 'साहित्य हे लेखकाच्या मनाचा आरसा आहे' असं म्हणतात. त्या दृष्टीने पाहिलं असता लेखकाच्या मनाचं प्रतिबिंब काही प्रमाणात त्याच्या साहित्यात उमटते. डोरिस लेसिंग यांनी 'दि ग्रास इज सिंगिंग' या सामाजिक कादंबरीने आपल्या लेखनाचा श्रीगणेशा केला असला तरी रुळलेल्या वाटेने मार्गक्रमणा करणे हे त्यांच्या व्यक्तिमत्त्वात बसत नाही. बंडखोर वृत्तीच्या या लेखिकेला सतत काहीतरी वेगळे शोधण्याची ओढ असते. डोरिस लेसिंग यांनी बहुविध विषयावर वेगवेगळ्या छटा असलेल्या विभिन्न घाटाच्या कादंबऱ्या लिहिल्या. त्यामुळे अशा विषयपालटाची त्यांच्या वाचकवर्गाला सवय होती. एखादी नवीन कलाकृती अपेक्षित असतानाच १९८८ साली लेसिंग यांची 'दि फिफथ चाइल्ड' ही छोटेखानी, पाशवी कादंबरिका प्रसिद्ध झाली. ही किंचित् वास्तववादाकडून अतिवास्तव-वादाकडे झुकणारी रुपकात्मक कादंबरी आहे. या कादंबरीत वैज्ञानिक कादंबरीच्या रंगछटाही जाणवतात.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

**कथावस्तू**

डेव्हिड आणि हॅरिएट लोव्हॅरस हे एक सुखी दांपत्य. आपल्याला भरपूर अपत्यसुख लाभावे आणि मुलाबाळांच्या सहवासात आपले घर एक आनंदी गोकुळ व्हावे अशी त्या दोघांची तीव्र इच्छा. डेव्हिडच्या आईवडिलांना ही कल्पना तितकीशी पसंत नसली तरी मुलाच्या संसारात ढवळाढवळ करण्याचा त्यांचा स्वभाव नव्हता. डोरोथी ही हॅरिएटची आई. पतिनिधनानंतर तीन मुलींचा संसार पूर्ण केल्यावर आता तिन्ही मुलींच्या घरी अधूनमधून भेट देऊन समाधानाने उर्वरित आयुष्य घालविण्याचा तिचा मानस आपल्या मुलीची ही इच्छा ऐकून डोरोथी सावधानतेचा इशारा देते. पण खरं म्हणजे डोरोथीच्या मुखातून लेखिकाच आपले विचार प्रकट करते आहे असं वाचकाना जाणवतं. ती म्हणते. "हॅरिएट, तू इजिप्त किंवा भारतासारख्या देशात राहात असतीस तर अर्धी मुलं मृत्युमुखी पडली असती आणि उरलेल्यांना शिक्षण देणं तुला मुश्किल झालं असतं. अभिजनवर्गातील लोकांना अनेक मुलं झाली तर त्यांच्या संगोपनाकरता लागणारा पैसा त्यांच्याजवळ असतो. आणि गरीबाना जास्त मुलं झाली तर दारिद्र्यामुळे त्यातील अर्धी अधिक मुले लहानपणीच देवाघरी जातात. आपल्यासारख्या मध्यमवर्गाने मात्र काळजीपूर्वक निर्णय घ्यायला हवा. मोजकी मुलं असली तरच आपल्याला त्यांचे पालनपोषण, शिक्षण करता येते. खरंच तू या सगळ्याचा विचार कर." हे समाजशास्त्रीय सत्य स्थलकालातीत असल्यामुळे वाचक लेखिकेशी सहमत होतात. या दांपत्याला चार मुले होतात. पाचव्या खेपेला हॅरिएटला दिवस जातात. वास्तविक ही अवस्था काही तिच्याकरीता नवीन नव्हती. पण यावेळेस वाढणारा गर्भ वेगळा आहे हे हॅरिएटला जाणवत होते. पाचव्या अपत्याने 'बेनने' जगात प्रवेश केला आणि दिसामासानी वाढणारा बेन हे त्या दांपत्यापुढील प्रश्नचिन्ह झाले. सर्वसामान्य मुलांपेक्षा अतिप्रचंड वाढ असलेला विचित्र बेन 'निॲन्‌दिथराल' या आदिमानवाची आठवण करून देत असे. बेनचे हिंसाचारी वागणे, कोवळ्या वयाशी विसंगत वाटणारी त्याची शक्ती आणि त्या शक्तीचे पाशवी प्रदर्शन, आपले विचार परिणामकारक शब्दांच्या माध्यमातून प्रकट करण्याची असमर्थता या साऱ्यामुळे हॅरिएट तर त्रस्त होतेच पण 'अमानवी' धाकट्या भावामुळे चौथ्या अपत्यावर– पॉलवर मानसिक आघात होतो. पॉलला बेनची भीति वाटते. हा आपल्याला शारीरिक इजा करेल हे दडपण पॉलच्या मनात सतत असते. शिवाय बेनमुळे तो आईवडिलांच्या सहवासालाही पारखा होतो. बेनला अघोरी कृत्यापासून परावृत्त करण्यासाठी त्याच्या आईला सारी शक्ती व बुद्धी पणाला लावावी लागते. अखेर बेनला प्रायोगिक तत्त्वावर एका संस्थेमध्ये दाखल करतात. पण तिथली अमानुष वागणूक पाहून हॅरिएटमधील 'आई' कळवळते. आणि बेनला घरी आणते. गुहेमध्ये राहणाऱ्या आदिमानवासारखा चमत्कारिक बेन हा जनुकीय उत्परिवर्तनाचा परिणाम आहे हे मातापित्याना माहित होते. कधी कधी तर परग्रहावरून तर बेन आला नसावा ना?" अशी शंका हॅरिएटच्या मनात डोकावून जाई.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

त्याच्यापेक्षा वयाने मोठ्या असलेल्या गावातल्या उडाणटप्पू मुलांबरोबर तो दिवसभर बाहेर राहत असे. लहानग्या पॉलच्या हिताच्या दृष्टीने तशी तडजोड करणे हॅरिएटला भाग पडत हॅरिएटची ही कुतरओढ, अर्थार्जनासाठी डेव्हिडला करावे लागणारे कष्ट इत्यादींमुळे या दांपत्याचे आनंदी गोकुळाचे स्वप्न अक्षरश: धुळीला मिळालेले वाचकांना जाणवते. अठराव्या वर्षी घरातून बाहेर पडलेला बेन लंडनच्या रस्त्यावर दुर्दैवी आयुष्य जगू लागतो. 'या जगात कोणी कोणाला विचारत नाही. बेनसारख्याचा तर कुणी वाली नसतो.' या सत्याची जाणीव होत वाचक ही कादंबरी पूर्ण करतात.

## अनुवर्ती कादंबरी

'दि फिफ्थ चाइल्ड' ही कादंबरी अपूर्ण आहे असे वाटत राहते. म्हणूनच डोरिस लेसिंग यांनी 'बेन इन दि वर्ल्ड' हा त्या कादंबरीचा अनुवर्ती भाग लिहिला व तो १९८८ साली प्रकाशित झाला. या कादंबरीत बेनच्या आयुष्यातील तरुणपणाचा कालावधी रंगवला आहे. बेन एका वाईट चालीच्या स्त्रीच्या जाळ्यात अडकतो, फसवला जातो, मादक द्रव्यांचा चोरटा व्यापार करण्यासाठी ती बाई 'बिचाऱ्या' बेनचा उपयोग करते. नकळत बेन कुकर्मात अडकला जातो. या चोरट्या व्यापारासाठी तो फ्रान्स, ब्राझिल या देशांना भेट देतो. एका चित्रपट निर्मात्याचे लक्ष बेनकडे जाते. त्याचे विचित्र रूप पाहून आपल्या फायद्याकरता बेनचा उपयोग करून घेण्याची कल्पना त्याला सुचते. हे या कादंबरीचे कथानक समाजातील चांगल्या वृत्तीच्या व्यक्ती बेनच्या हितचिंतक आहेत हे वाचकाना जाणवतं. बेनचा समावेश मानवाच्या नामशेष झालेल्या जातीतच करावयास हवा असा वाचकांचा समज या दोन्ही कादंबऱ्या वाचल्यावर होतो.

## अशी साकारते कथा

या पुस्तकाच्या निर्मितीविषयीचा वृत्तांत सांगताना डोरिस लेसिंग म्हणतात. "या पुस्तकाचा विषय माझ्या मनात कित्येक दिवस घोळत होता. त्या पुस्तकात समाविष्ट करता येतील अशा अनेक नवीन कल्पना मला सुचत होत्या. अर्थात् अशा नुसत्या कल्पना सुचण्याला विशेष अर्थ नसतो. त्या कल्पना पुस्तकातील कथानकाच्या ओघात सहजपणे आणणं ही गोष्ट सर्वात महत्त्वाची असते. माझी पहिली कल्पना होती बुटक्यांबद्दल ! बुटक्या, लहानखोर माणसांबद्दल मला फार आकर्षण आहे. जगातल्या प्रत्येक देशात अशा माणसांवर रचलेल्या आख्यायिका असतात. या आख्यायिकेत वर्णन केलेली माणसे पूर्वी कधीतरी या पृथ्वीवर अस्तित्वात असावीत असा माझा स्वत:चा अंदाज आहे. शास्त्रीय स्पष्टीकरण मिळाले नसले तरी अमेरिकेत अशा अतिछोट्या माणसांचे सांगाडे सापडलेले आहेत. बुशमेन, पिग्मी हे लोक बुटके असतात."



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

"या बुटक्याच्या कल्पनेला जोड मिळाली लॉरेन आईलीच्या एका निबंधाची ! लॉरेन आइली हा अमेरिकन पुरातत्त्वशास्त्रज्ञ. त्यानी लिहिलेले निबंध माझ्या वाचनात आले होते. एका निबंधात त्याने एक किस्सा वर्णिलेला होता. 'मी मेनच्या समुद्रकिनाऱ्यावरून खेड्याकडे जाणाऱ्या रस्त्याच्या दिशेने चाललो होतो. संध्याकाळची वेळ होती. तिथे मला एक मुलगी दिसली. तिने मागे वळून माझ्याकडे पाहिले. त्यावेळी माझ्या मनात हिमयुगाबद्दलचे विचार घोळत होते. हिमयुगात या पृथ्वीवर कोणकोणते प्राणी राहत होते, ते कसे दिसत असावेत अशा प्रकारचे विचार मनात घोळत असतानाच माझ्या लक्षात आले. "अरे, ही मुलगी तर 'निॲनडीथराल' आहे. कुतूहलाने मी त्या मुलीजवळ गेलो. डोळ्याच्या पसरट खोबणी, डोक्याचा विचित्र आकार, चेहऱ्याची विशिष्ट ठेवण अगदी निॲनडिथराल थाटाची चेहरेपट्टी मी तिच्याशी दोन शब्द बोललो. त्यानंतर ती मुलगी निघून गेली. पण मला वाटलं, "हीच घटना पन्नास हजार वर्षापूर्वी घडली. असती तर?" हे वाचल्यावर माझं विचारचक्र सुरू झालं. या निॲनडिथराल मुलीऐवजी एखादा बुटका त्याजागी असता तर?"

"या दोन्ही कल्पनेत भर पडली वर्तमानपत्रातील एका पत्राची. अजूनही त्या पत्राचे कात्रण माझ्याजवळ आहे. एका स्त्रीला अत्यंत देखणी मुले होती. परंतु त्यानंतर तिने एका बुटक्या विचित्र मुलीला जन्म दिला. तिच्या आईच्या मते 'इव्हिल' होती. रात्री झोपल्यावर त्या मुलीच्या चेहऱ्यावरील निरागस भाव पाहून तिला आपल्या कुशीत घ्यावं अशी मातृसुलभ इच्छा तिच्या आईच्या मनात निर्माण होई. परंतु प्रत्यक्षात गोजिरवाण्या मुलीऐवजी 'इव्हिल' मुलगीच आपल्या कुशीत येईल या कल्पनेने ती आई अस्वस्थ होत असे. त्या मुलीमुळे ते सारे कुटुंब उदध्वस्त झाले होते."

"एखाद्या मिश्रधातूप्रमाणे या तीनही कल्पनांचे बेमालूम मिश्रण माझ्या मनात तयार झाले आणि त्यातूनच 'बेन इन दि वर्ल्ड' ही कादंबरिका साकारली. तरीसुद्धा या कादंबरीलेखनाला लागणारी ऊर्जा एका वेगळ्याच घटनेने मिळाली. कित्येकदा दहशत निर्माण करणाऱ्या भयावह परिस्थितीत आपल्याला काही करता येत नाही. अशा परिस्थितीपुढे आपल्याला नमावे लागते. हतबल व्हावे लागते. मी अफगाणिस्तानमध्ये गेले होते. तिथल्या समाजाची हलाखीची स्थिती पाहून मला फार वाईट वाटले. राग आला, उद्वेग वाटला. माझ्या या भावनांची तीव्रता इतकी होती की त्या भावना हेच या कादंबरीनिर्मितीचे इंधन ठरले; तीच या कथालेखनाची ऊर्जा ठरली. खरं म्हणजे घडणाऱ्या घटनांवर आपला काहीही ताबा राहत नाही. पण त्या घटनांवर आपले नियंत्रण आहे अशी आपण मनाची समजूत करून घेतो. त्यामुळेच आपल्याला त्या घटनांना सामोरे जाण्याची उभारी मिळते असं मला वाटतं.". या पुस्तकलेखनाचा हा सविस्तर वृत्तांत वाचकांना बरंच काही सांगून जातो.

दि फिफ्थ चाइल्ड ही कादंबरी रुपकात्मक आहे. आणि काही अंशी त्यात अद्भूत कल्पनाचित्रही रंगवलेले आहे. मग अजूनही आपण वास्तववादी परंपरेनुसार लेखन करतो.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

असं तुम्हाला वाटतं का? असा प्रश्न उपस्थित केल्यावर डोरिस लेसिंग म्हणतात, "मेरी शेलेच्या 'फ्रेकेस्टाइन' या व्यक्तीरेखेचे बेनशी साधर्म्य आहे. या पुस्तकाची इतर कोणत्याही दृष्टीने मी माझ्या त्या पुस्तकाशी तुलना करत नाही. पण एकीकडे अशक्य वाटणारी गोष्ट विचारात घ्यायची आणि ती खरोखरच अस्तित्वात आहे असा दृढ विश्वास ठेवून लेखन करायचे या तत्त्वावर ही पुस्तके आधारलेली आहेत. या एका बाबतीत ती दोन्ही पुस्तके सारखी आहेत. मेरी शेलेची 'फ्रँकेस्टाइन' ही व्यक्तीरेखा गोथिक परपरेतून घेतली आहे. परंतु मी मात्र बेनची निवड कोणत्याही परंपरेतून केलेली नाही. मला फक्त गोष्ट लिहायची होती; लोकांना वाचावीशी वाटेल अशी गोष्ट, कारण तो माझा व्यवसाय आहे."

लोकांच्या प्रतिक्रियांबद्दल बोलताना डोरिस लेसिंग म्हणतात, "ही कादंबरी प्रसिद्ध झाल्यावर लोकांच्या प्रतिक्रिया ऐकून माझी चांगलीच करमणूक झाली. कोणी म्हणत हे पुस्तक जनुकशास्त्रावर आधारलेले आहे, तर कोणाला वाटे जनुकीय उत्परिवर्तन सांगण्या-साठीच हे पुस्तक कलिहिले आहे. कोणी म्हणत. स्त्रीवादी भूमिका मांडणारी ही कादंबरी आहे तर कोणाला ती ज्युविरोधी प्रचार करण्यासाठी लिहिली आहे असे वाटे. हे पुस्तक अेडसबद्दल आहे किंवा पॅलेस्टाइन प्रश्नावर आधारित आहे असे म्हणणे म्हणजे बादरायण संबंध जोडण्याचा कडेलोटच आहे असं मला वाटतं."

"या पुस्तकाबद्दल मी अनेक वाचकांशी संवाद साधला. मला दोन मुद्याचं स्पष्टीकरण येथे आवर्जून करावसं वाटतं. या कादंबरीतील बेन हा 'इव्हिल' नाही. तो फक्त चुकीच्या वेळी, चुकीच्या ठिकाणी जन्माला आला आहे. हाच बेन जर वीस हजार वर्षापूर्वी जंगलात जन्माला आला असता तर त्याला कोणीही 'इव्हिल' ठरवले नसते. शतकानुशतकानंतर प्राप्त झालेला एक वेगळाच जनुक त्या मुलामध्ये आहे. अगदी वेगळ्या वृत्तीचा हा मुलगा आपल्या जटिल, गुंतागुंतीचे संबंध असणाऱ्या समाजात चुकून येऊन टपकला आहे. सुसंस्कृत समाजाचा एक घटक या नात्याने हॅरिएटला– बेनच्या आईला एका विशिष्ट पातळीच्या खाली येऊन वागता आले नसते. आईमुलगा नातेसंबंधांची या समाजात एक विशिष्ट चौकट तयार झालेली असते. त्यानुसार हॅरिएट बेनशी सहानुभूतीपूर्वक वागते. ती चौकट मोडून कठोरपणाने आणि क्रौर्याने तिला बेनशी वागताच आले नसते. तिच्या त्या वागण्यामुळेच संपूर्ण कुटुंब उध्वस्त झाले. "प्रत्यक्षात जर असं मूल जन्माला आलं तर त्याचा सांभाळ कशा प्रकारे करता येईल?" हाच विचार संपूर्ण कादंबरी लिहून होईपर्यंत मला सतावत होता. पण खरं म्हणजे अशा मुलाला पुरं पडता येईल, तोंड देता येईल असा कोणताही मार्ग मला त्या पुस्तकात सुचवता आला नाही. सुसंस्कृतपणाची एक प्रकारची 'बांधिलकी' असते. अनेकदा या बांधिलकीचेच दुष्परिणाम होतात. त्या दुष्परिणामांची पूर्वकल्पना आपल्याला येत नाही हाच मोठा दैवदुर्बिलास असतो."



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

## विद्यापीठीय पगडा

"साहित्यिक कलाकृती वाचून आनंद मिळवायचा असतो. त्याऐवजी कोणत्याही साहित्यिक कलाकृतीचे विश्लेषण करण्याची आपल्या बुद्धीला सवय जडली आहे. जगातील प्रत्येक विश्वविद्यालयातील साहित्यिक विभाग या विचारपद्धतीच्या विळख्यात सापडले आहेत. साहित्यिक कलाकृती कोणत्यातरी समस्येवर बेतलेली असली पाहिजे असं काही लोकांना वाटतं तर कलाकृतीतून कोणतातरी महत्वाचा मुद्दा आलाच पाहिजे असे डाव्या विचारसरणीच्या लोकांना वाटते. पुस्तकांमधून सर्वसामान्य माणसाना पटतील असे संदेश दिले गेले पाहिजेत असा धार्मिक गटाच्या लोकांचा आग्रह असतो. अशा प्रकारे विचार करण्याची दिशा पाहिल्यापासून मिळाल्यामुळे 'या कलाकृतीतून लेखकाला काय सुचवायच?" अशी पुस्तकाची छाननी वाचक करतात असं दिसतं. रेडिओवर एकदा 'दि फिफ्थ चाइल्ड' या कादंबरीवर चर्चा चालू होती. तेव्हा एक समीक्षक *'या पुस्तकाचं वर्गीकरण करता येत नाही'* असं वारंवार प्रतिपादन करत होता. कोणत्याही कलाकृतीचं वर्गीकरण करणे हीच जणू काही अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे असं त्याला वाटत होतं. अशा तऱ्हेने कलाकृती कप्प्यात बंदिस्त करणं आपण सोडून दिलं पाहिजे. खरं पाहता अशा कलाकृतीच्या वाचनाने कळत नकळत मानवाची अनुभवसंपन्नता या ना त्या प्रकारे वाढते असं ललितसाहित्य व कथाकथनाचा इतिहास सांगतो. म्हणूनच विश्लेषण न करता *साहित्यिक कलाकृती त्या कलाकृतीच्या निखळ आनंदाकरता वाचली गेली पाहिजे असं मला वाटतं."*

कल्पित, आदर्शवादी स्वप्ने ज्या पुस्तकात येतात त्या पुस्तकाचा समावेश 'ॲसिड बुक' या वर्गात करावा लागेल. असे डोरिस लेसिंग यांना वाटते. म्हणूनच 'फिफ्थ चाइल्ड' हे पुस्तक 'ॲसिडिक' आहे; कारण कादंबरीतील ते दांपत्य ठाकठीक आणि आत्मसंतुष्ट आहे. कौटुंबिक पातळीवरील आनंदाचा त्यांना इतका अभिमान आहे की तो आनंद आता उताराला लागणार असे वाचकांना वाटू लागते. किंबहुना तसेच घडण्याची ते वाट पाहातात. 'कौटुंबिकता हे आनंदी जीवनाचे केंद्र आहे का?" या प्रश्नावर त्या म्हणतात, "कौटुंबिकतेत एक आगळावेगळा आनंद भरून राहिलेला असला तरी तो नेहमीच असतो असं मला वाटत नाही."

## दि स्वीटेस्ट ड्रीम

डोरिस लेसिंग यानी लिहिलेल्या आत्मचरित्राच्या दोन भागात १९६२ साली 'दि गोल्डन नोटबुक' ही कादंबरी प्रसिद्ध झाली तो पर्यंतचा वृत्तांत आला आहे. त्यानंतरच्या आयुष्यातील घटनांचे विवरण करण्यासाठी आत्मचरित्राचा तिसरा भाग डोरिस लेसिंग लिहिणार का असा प्रश्न वाचकांच्या मनात येणे स्वाभाविक होते. त्याला उत्तर देताना त्या म्हणतात, "माझ्या आत्मवृत्ताच्या पहिल्या दोन भागांचे इंग्लंड व अमेरिका या दोन्ही देशात उत्तम स्वागत झाले.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

म्हणून माझे अेजंट आणि प्रकाशक या दोघांनी तिसरा भाग लिहिण्यासाठी माझ्यावर खूप दवाव आणला. परंतु हा तिसरा भाग लिहिणे जरा अवघड आहे. 'दि गोल्डन नोटबुक' प्रसिद्ध झाल्यावर मला मार्गदर्शकाची भूमिका बजावावी लागली. कित्येक तरुण-तरुणींच्यापुढे समस्या होत्या. त्या सोडवण्यासाठी, त्यावर उपाय शोधण्यासाठी मी त्यांना खूप मदत केली. तेव्हा पौगंडावस्थेत असलेली ती मुले आज गृहस्थाश्रमी झाली आहेत. सत्याची कास धरून आत्मचरित्राचा पुढचा भाग लिहायचा झाल्यास मला त्या मध्यमवयीन माणसांबद्दल लिहावे लागेल. अशा तऱ्हेने गौप्यस्फोट करणे योग्य होणार नाही. म्हणून त्याबद्दल लिहायचेच असेल तर आत्मचरित्राच्या रूपात न लिहिता सामाजिक स्वरुपात लिहवे लागेल.'' १९९९ साली त्यांनी हे विचार व्यक्त केले होते आणि पुढील दोन वर्षात ही उक्ती त्यांनी कृतीत आणलेली आपल्याला दिसते.

## अर्धशतक : पुस्तकांचे

डोरिस लेसिंग यानी लिहिलेली आणि हार्पर कॉलिन्सनी प्रकाशित केलेली ७७९ पानांची 'दि स्वीटेस्ट ड्रीम' ही कादंबरी २००१ साली वाचकांच्या हाती आली. ही त्यांची चोविसावी कादंबरी असली तरी या पुस्तकाने त्यांनी आपल्या पुस्तकांचे 'अर्धशतक' साजरे केले आहे. या कादंबरीतील दोन तृतीयांश कथानक लंडनमधील एका मोठ्या घरात राहणाऱ्या एकत्र कुटुंबातील आहे तर उरलेले एक तृतीयांश कथानक आफ्रिकेतील झिंबाब्वेसारख्या असणाऱ्या झिमलिया येथील आहे.

लेखिकेने प्रास्ताविक आणि मनोगत व्यक्त करताना एक सूचना केली आहे त्या म्हणतात, १९६२ नंतरच्या माझ्या आत्मचरित्राशी संबंधित व्यक्तींचा स्पष्ट उल्लेख झाला तर त्या व्यक्ती कदाचित् दुखावल्या जातील. म्हणून मी माझ्या आत्मचरित्राचा तिसरा भाग लिहित नाही. पण 'न लिहिता येणाऱ्या आत्मचरित्राचे डोरिसने कादंबरीत रुपांतर केले असावे' असाही गैरसमज वाचकांनी करून घेऊ नये असं मला वाटतं. १९६० च्या काळाचा गाभा, त्या दशकाचं चैतन्य मी पुन्हा या कादंबरीच आणण्याचा प्रयत्न केला आहे. त्या काळात परस्परविरोधी घटना घडल्या असल्या तरी त्यानंतरच्या तीन चार दशकांच्या तुलनेत ते दशक 'इनोसंट' होते. ही माझी वैयक्तिक कथा नसून १९६० च्या माझ्या काळाची कथा आहे.''

कादंबरीचे शीर्षक भूतकालदर्शक असून कधी वक्रोक्तीपूर्ण तर कधी विशुद्ध खेद व्यक्त करण्यासाठी त्याचा वापर त्यांनी केला आहे. तारुण्यातील राजकीय अथवा रोमँटिक आशाआकांक्षा कालांतराने विरून जातात. 'आदर्शवाद गळून पडतो. वास्तव फार वेगळे आहे याची जाणीव होते. या संदर्भावर ही कादंबरी बेतलेली आहे. कॉम्रेड जॉनी लेनॉक्स हा या कादंबरीचा खलनायक, डाव्या विचारसरणीचा, कडवा कम्युनिस्ट. जग आदर्श व



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुकंपामय असावे हे त्याचे स्वप्न. पण त्याचा शिरकाव तो आपल्या वैयक्तिक आयुष्यात होऊ देत नाही. क्रांती घडवून आणण्याकरीता तो आपल्या बायकामुलांना सोडून देतो. 'फ्रान्सिस' ही जॉनीची पहिली बायको. 'विशाल जग पाहण्याची दृष्टी तिला नाही असे जॉनीचे मत. त्यामुळ तो तिला कमी लेखतो परंतु ती उदार मनाने या मताचा स्वीकार करून विलक्षण सोशिकता दाखवते आणि सर्व घराला आधार देते.

कादंबरीच्या पूर्वार्धात १९६० ते ७० या दशकातील लंडनवर लक्ष केंद्रित केले असले तरी उत्तरार्धात १९८० सालच्या आफ्रिकेचा प्रामुख्याने विचार केला आहे. जॉनीची सावत्र मुलगी सिलव्हिया डॉक्टर म्हणून तेथे काम करते. एडस् या भयंकर रोगाचा विळखा तेथील जनतेवर पडला आहे आणि सिलल्व्हीया अशा रुग्णांवर उपचार करीत आहे. या कादंबरीतील झिमिलिया प्रांत म्हणजे लेसिंग यांची पूर्वीची मातृभूमी झिंबाब्वे तर त्याचे अध्यक्ष मंमोझी म्हणजे रॉबर्ट मुगाबे ! कादंबरीच्या उत्तरार्धात कादंबरीतील व्यक्तीरेखांपेक्षा तो देश आणि त्या देशाशी निगडीत असलेल्या समस्या यानाच प्राधान्य दिलेले दिसते. कादंबरीच्या पूर्वार्धात लेखिकेने निर्माण केलेल्या व्यक्तिरेखा इतक्या जिवंत आहेत की कथानक आपोआप पुढे सरकत राहाते. पण उत्तरार्धातील सिल्व्हीया ही व्यक्तीरेखा इतकी सौम्य आहे की आफ्रिका देशाचे वर्चस्व या भागात राहाते. राजकारणात पैशाचे गैरव्यवहार होतात. लाचलुचपतीच्या भस्मासुरामुळे आफ्रिकेच्या विकासात अडथळा निर्माण होतो. हजारो माणसे मृत्युमुखी पडतात. लेखिका आपले विचार सिल्व्हीयाच्या कथानकाच्या माध्यमातून व्यक्त करते.

अगदी अलिकडे डोरिस लेसिंग यानी जाहीरपणे स्त्रीवादांवर सडकून टीका केली होती. टोकाची स्त्रीवादी भूमिका घेतल्यामुळे पुरुषजातीवर खरोखरच अन्याय होत आहे असे त्यांना वाटते. असे असले तरी या कादंबरीचा सूर 'स्त्रीवाद्यांचे बायबल' समजल्या जाणाऱ्या 'दि गोल्डन नोटबुक' या कादंबरीच्या बराच जवळचा आहे. ही कादंबरी स्त्रीव्यक्तिरेखांवर आधारलेली आहे आणि त्या सर्व व्यक्तीरेखा त्यांच्या पती आणि मुलांच्या संदर्भातच लिहिल्या आहेत. त्यातील काही स्त्रिया 'फ्रान्सिन'च्या धर्तीच्या आहेत तर काही हिस्टेरिकल आणि उदास मनोवृत्तीच्या. या कादंबरीतील प्रभावी स्त्रिया त्यांच्या दुबळ्या पतिराजाना आधार देतात आणि संतुलित भक्कम पाया निर्माण करतात. पुरुषांना बरेच स्वातंत्र्य आहे असा आभास निर्माण केला असला तरी त्यामुळे ते अधिक सुखी, आनंदी असतात असे नाही. ही कादंबरी स्त्रीवाद्यांचा विरोध करीत नाही. गेल्या अर्धशतकात स्त्रियांच्या आयुष्यातील भावभावना आणि कर्तव्ये यांच्यातील जटिलता लेखिकेने या कादंबरीत चित्रित केली आहे. एखादी आदर्शवादी भूमिका घेऊन लेखन करण्यापेक्षा वास्तव दर्शविणारे हे लेखन प्रभावी झाले आहे. डोरिस लेसिंग यांची वैयक्तिक आणि राजकीय नातेसंबंधांची समज विलक्षण आहे. वयाच्या ऐंशीयाव्या वर्षी तर ही क्षमता अधिक दृढ झालेली आपल्याला दिसते. पण तरीसुद्धा



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

या कादंबरीऐवजी लेखिकेने आत्मचरित्राचा तिसरा भाग लिहिला असता तर त्यातील तपशील आपल्याला अधिक बारकाव्याने उमगला असता असे पुन: पुन्हा मनात आल्यावाचून राहात नाही.

**कादंबरी : एक आरसा**

'दि गोल्डन नोटबुक'ची नायिका ॲना वुल्फ ही अमूर्त आणि गूढ कल्पनांच्या विळख्यातून बाहेर पडण्याचा प्रयत्न करते. स्त्रियांच्या सुखदु:खांची फारशी दखल न घेणाऱ्या समाजात राहून माणसे अशा अमूर्त आणि गूढ संकल्पनांचा अंगीकार करतात. किंवा अंधश्रद्धांवर विश्वास ठेवतात. मार्क्सिस्ट विचारसरणी, फ्रॉइडचे तत्त्वज्ञान, लैंगिकता ही वाईट नाहीत. आपल्याला त्यावर मात करता येते. पण कळीचा मुद्दा असा आहे की त्या त्या कालानुसार आणि राजकीय विचारसरणीनुसार असलेल्या अमूर्त कल्पनांमुळे व्यक्तीच्या आनंदाला विरजण लागण्याचा धोका निर्माण होतो. १९६० च्या सुमारास लंडनमध्ये राहणाऱ्या ॲनासारख्या स्त्रियांच्या बाबतीत मार्क्स, फ्रॉइड, स्वत:त मश्गुल असलेले पुरुषमित्र हे त्यांच्या जुलूम जाचाचे रुप होते. विद्यमान काळात आत्मनाशाची वेगळी कारणे असतात. उदा. स्त्रीवादी भूमिका.

इतरेजनांवर टीका करणे, त्यांच्यावर भावनिक दोषारोपण करणे या माणसाच्या सहजप्रवृत्तीमुळे सुद्धा त्याच्या आनंदाला गंभीर धोका निर्माण होतो. ही सहजप्रवृत्ती कायमस्वरूपी असते. भविष्यात याला कधीतरी न्याय मिळेल असा विचार करून खऱ्या यातना चालवून घेतल्या जातात. म्हणूनच फक्त युटोपिया – कल्पितादर्शवाद 'इव्हील' असतो असे नाही तर युटोपिया परिपूर्णतेचा आणि आदर्शत्त्वाचा आग्रह धरतो म्हणून त्याला 'इव्हील' म्हटले पाहिजे. सभोवतालच्या व्यक्तींशी त्यांचा सहजस्वभाव जाणून घेऊन जुळवून घेणे आणि आपल्या स्वत:तील गुणदोष जाणून स्वत:शी जुळवून घेणे हा सुखी होण्याचा भागश: मार्ग आहे हेच या कादंबरीत लेखिकेला सुचवायचे आहे. पुरुष जसे आहेत तसे त्यांना स्वीकारण्याऐवजी पुरुषांमध्ये बदल घडवून आणणे असा स्त्रीवादीत्त्वाचा अर्थ अभिप्रेत असेल तर डोरिस लेसिंग मुळीच स्त्रीवादी नाहीत. 'आदर्श' त्या अमान्य करीत नाहीत. 'बदललेल्या काळानुसार माणसे स्वत:त बदल घडवून आणतात.' हा अनेक भ्रमांपैकी एक भ्रम आहे. या भ्रमाची त्या खिल्ली उडवतात.

प्रत्येक व्यक्तीचे बोटांचे ठसे वैशिष्टयपूर्ण आणि अंगभूतही ! अगदी त्या ठशांप्रमाणेच आपण आपल्याबरोबर एक नमुनाकृती बाळगत असतो, पण जोपर्यंत आपल्या अवतीभोवती त्या नमुनाकृतीचे प्रतिमारुप झालेले आपण पाहात नाही, तोपर्यंत आपल्याला त्या नमुनकृतीच्या अस्तित्वाची जाणीवही नसते. कादंबरीतील विविध पात्रांच्या आणि घटनांच्या चित्रणाने असे प्रतिमारुप तयार करणे, लोकांना स्वत:ला न्याहाळता येईल असा आरसा





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

उपलब्ध करून देणे हे कादंबरी लेखनाच्या अनेक कारणांपैकी एक महत्त्वाचे कारण असते असे डोरिस लेसिंग यांना वाटते.

### लेखनाचा प्रारंभ

लेखक आपल्या लेखनाची सुरुवात कशी करतो, लेखक म्हणून त्याची वाटचाल कशी होते, विचार अधिकाधिक परिपक्व कसे होतात अशा अनेक बाबतीत वाचकांच्या मनात शंकाकुशंकांचं काहूर उठतं. डोरिस लेसिंग यांच्या संदर्भात देशोदेशींच्या वाचकांनी अनेक प्रश्न उपस्थित केले होते. त्या प्रश्नांना उत्तरे देण्याच्या निमित्ताने डोरिस लेसिंग यांनी अनेक विषयावरील आपली मते व्यक्त केली आहेत.

आपल्या लेखनाविषयी डोरिस लेसिंग म्हणतात.

"माझ्यात उपजतच लेखकाची प्रवृत्ती होती. माझ्या वयाच्या दुसऱ्या दशकात मी काही कादंबऱ्या लिहिल्या होत्या. 'मी लेखिका होईन' याची मला खात्रीच होती. पण नुसतं लेखक होईन, लेखक होईन असं घोकत बसण्यापेक्षा प्रत्यक्ष लेखणी हातात घेऊन 'लिहायला सुरुवात केली पाहिजे' असा साक्षात्कार मला सव्वीस-सत्तावीसाव्या वर्षी झाला. त्यावेळी मी एका वकील महाशयांकडे टंकलेखक म्हणून काम करीत होते. एके दिवशी मी तडक त्या वकीलमहाशयांकडे गेले. मला कादंबरी लिहायची आहे; म्हणून "मी या नोकरीचा राजीनामा देतेय." असं निर्भयपणे सांगून मी ती नोकरी सोडली. घरी गेल्यावर मी 'दि ग्रास इज सिंगिंग' ही माझी पहिली कादंबरी लिहिण्याचा श्रीगणेशा केला. सुरुवातीला माझे लेखन काहीसे क्लिष्ट होत असे. पण सरावाने मला साधे, अर्थपूर्ण आणि परिणामकारक लेखन करणे जमू लागले."

*"ज्या मुलांना बाल्यावस्थेत मानसिक त्रास सोसावा लागतो. त्या मुलांचा उत्तम लेखक होण्याकडे कल असतो.* अशी मुले सतत निरीक्षण करीत असतात. मला माहित असलेल्या एका छोट्या मुलीचं उदाहरण माझ्या मनात येतं. आपल्या सभोवती घडणाऱ्या घटना, आईवडिलांमधील नातेसंबंध मी जेव्हा सूक्ष्म नजरेने न्याहाळते तेव्हा भावभावनांचा कल्लोळ तिच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसतो. तो पाहून 'भविष्यात ही मुलगी नक्की लेखिका होईल' अशी पैज लावण्याची माझी तयारी आहे. सूक्ष्म निरीक्षणाच्या सवयीमुळेच लेखक घडतो. माझ्या बाबतीतही असंच घडलं. मला आठवतंय तेव्हापासून मी सूक्ष्म निरीक्षण करीत असे, माझ्याभोवती काय घडतंय त्याकडे लक्ष असे. प्रत्यक्ष शब्दरूपात व्यक्त न केल्या गेलेल्या कितीतरी गोष्टींची जाणीव माझ्या अंतर्मनात होत असे. हे सारं अगदी विलक्षण आहे. माझ्या भावाला मात्र यातलं काहीही आठवत नाही. आमच्या बालपणातल्या कोणत्याही घटना त्याच्या स्मृतीत नाहीत. मला स्मरत नसलं तरी अगदी बालपणी माझ्या बाबतीत काहीतरी



अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

विशेष घडलं असावं. त्यामुळेच ही सूक्ष्म निरीक्षणाची माझ्यामधील प्रवृत्ती निश्चित झाली. लेखन हाच व्यवसाय निवडण्याची बीजं पेरली गेली.''

### खंत स्त्रीलेखिकांची

लेखनाच्या सवयीवर आणि लेखकाकडे असणाऱ्या वेळाबद्दल डोरिस लेसिंग यांनी विस्तारपूर्वक सांगितले आहे. त्या म्हणतात, ''लेखन हा एक सवयीचा भाग आहे. माझा मुलगा मी लहानाचा मोठा करत होते तेव्हा तो शाळेत किंवा खेळायला गेला की त्या मोजक्या वेळात मला लेखन करता येई. म्हणून थोड्या वेळात जलद लेखन करण्याचा शिस्त मी स्वत:ला लावून घेतली आहे. आठवड्याच्या अखेरीस जरा अधिक सवड मिळाली तर विश्वास ठेवता येणार नाही इतकं लेखन मी करते. आता त्या सवयी माझ्या देहात पुरत्या मुरल्या आहेत. झरझर लिहिलं तर माझं लेखन अधिक चांगलं होतं असं मला वाटतं. एखादा नवीन विषय लिहायला सुरुवात केली तर प्रारंभी थोडंसं अडखळल्यासारखं वाटतं. पण लेखन चालू असताना असं एखादं वळण येतं की त्या वळणानंतर पुढचं लेखन प्रवाही होऊन जात. त्यावेळी माझं लेखन छान होतंय असं मला वाटू लागतं. पण वाकप्रचारांची जुळणी करत मी लिहायला लागले तर ते लेखन चांगलं होत नाही. काही पुरुष लेखक प्रतिदिवशी ठराविक लेखन करतात. ग्रॅहम ग्रीन रोज दोन हजार शब्द लिहितात असं मला कोणीतरी सांगितलं. *पुरुषांना वेळापत्रक आखून त्याप्रमाणे लिहिता येते कारण त्यांची काळजी घ्यायला आई, बायको, बहीण यापैकी कोणीतरी असते. स्त्रियांना अशी सुविधा नसते.* माझ्या माहितीतील कोणत्याच स्त्रीलेखिका वेळापत्रकाप्रमाणे लेखन करीत नाहीत. अनेक व्यवधाने सांभाळून लेखन करायचं असल्यामुळे बहुतेक स्त्रिया माझ्या पद्धतीने लेखन करतात.''

डोरिस लेसिंग या बहुप्रसवा लेखिका आहेत. त्यामुळे सातत्याने त्यांचे लेखन चालूच असते. असे असले तरी एखादे पुस्तक हातावेगळे केले की त्यांना थोडा विसावा घ्यावा लागतो. त्या म्हणतात, ''एक पुस्तक पूर्ण करायला बहुतेक वेळा मला एका वर्षाचा कालावधी लागतो. कधी कधी दोन पुस्तकांच्या मध्ये दीर्घ कालावधी जातो; तर कधी माझी इच्छा नसतानाही भिडेखातर एखादा लेख लिहावा लागतो. मध्यंतरी माझे प्रकाशक बॉब गॉटलिब यांच्याशी मी गप्पा मारत होते. 'माझ्याकडे अगदी छोट्या छोट्या गोष्टी कोणी लिहून पाठवत नाही याचं मला आश्चर्य वाटतं.'' असं बोलण्याच्या ओघात, त्यानी मला सांगितलं. तेव्हा माझ्या लक्षात आलं, की खरोखरीच गेल्या कित्येक वर्षात मी छोट्या छोट्या गोष्टी लिहिल्याच नाहीत. त्यानंतर त्या छोट्या गोष्टी मी लिहिल्या. अंदाजे पंधराशे शब्दांच्या. मला हा लघुकथांचा वाङ्मयप्रकार फार भावला. असं लेखन करणं मला मनापासून आवडतं. त्या कथा अगदी वास्तववादी आहेत. लंडनमध्ये मी खूप भटकते. प्रत्येक शहर हा एक



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

रंगमंच असतो. तेथे नाट्य घडत असतं. त्याविषयीच्या या साऱ्या कथा असल्यामुळे १५ लघुकथांच्या या संग्रहाला मी 'लंडन स्केचेस' असेच नाव दिले.''

''एका वेळेस मी एकापेक्षा अधिक कादंबऱ्यांचे लेखन करीत नाही. एखाद्या नवीन कादंबरीचे लेखन चालू असता आधीच्या कादंबरीच्या मसुद्यावर त्यातील काही मुद्यांवर मी पुन्हा एकदा हात फिरवते. असे घडण्याची शक्यता मी नाकारत नाही. पण खरं म्हणजे मला एकापाठोपाठ गोष्टी करायला आवडतात. शक्यतो एका वेळी मी एकाच कादंबरीचे लेखन करते. कादंबरीलेखन चालू असताना त्या कादंबरीच्या घाटातील सुसूत्रता कायम राखणे महत्त्वाचे असते. तुकड्या तुकड्यानी लेखन केलं तर ती सुसूत्रता टिकवता येते नाही.''

### केल्याने देशाटन....

डोरिस लेसिंग या भाषेच्या वापराविषयी संवेदनशील आहेत. विचार व्यक्त करायला कधी कधी भाषा असमर्थ ठरते असे त्यांना वाटते. त्याबद्दल त्या म्हणतात, ''अगदी गुंतागुंतीच्या पद्धतीने माझ्या विचारांची मांडणी करायला मला आवडत नाही. पुस्तक हे सर्वांना समजेल अशाच भाषेत लिहिले गेले पाहिजे. म्हणूनच रुपके, तात्पर्यकथा, नीतिकथा यांचा खजिना माझ्याजवळ असतो. गहन आध्यात्मिक प्रक्रिया समजावून सांगताना अतिशय सोपा पण उत्तम साहित्यिक बाज निवडण्याची मी दक्षता घेते. भाषेलाही कशा मर्यादा पडतात हे मला दिवसेंदिवस अधिक प्रकर्षाने जाणवू लागले आहे. एखाद्या गोष्टीबद्दलचं सखोल ज्ञान दुसऱ्याला पटेल अशा शब्दांच्या अंगरख्यात कसं बरं बसवायचं? अशा वेळी भाषा खेदजनकरित्या तोकडी पडते. याची जाणीव झाली की मी कधी कधी निर्मितीकडे वळते. १९६०-६२ च्या काळ होता. 'दि गोल्डन नोटबुक' या कादंबरीचे लेखन चालू होते. ॲनाची स्वप्ने मला शब्दबद्ध करायची होती. मी योग्य शब्दांचा धांडोळा घेत होते. तेव्हा भाषेच्या मर्यादा प्रकर्षाने माझ्या लक्षात आल्या. स्वप्ने ही आरशासारखी असतात. आपल्या आत्म्याचे, अंतर्मनाचे विचार स्वप्नांमधून व्यक्त होतात. वाढत्या वयाबरोबर स्वप्नाबद्दलची ही वास्तवता माझ्या अधिकाधिक लक्षात येऊ लागली आहे. जगाची बहुविधता, खाणाखुणा स्वप्नांद्वारे किती चांगल्या प्रकारे व्यक्त होतात हे पाहून मी अचंबित होते. सकाळी उठले की मी रात्रीच्या स्वप्नांना ती स्वप्ने निसटू नयेत म्हणून नोंदवहीत शब्दबद्ध करण्याचा प्रयत्न करते. स्वप्नातल्या पर्यावरणात सत्य आणि आभास, प्रकाश आणि धूसरपणा यांचं असं काही मिश्रण असतं की ते शब्दांत पकडणं फारच कठीण होतं. एखाद्या चित्रपटात किंवा पेंटिंगमध्ये हे सर्व सहजतेनं आणता येतं. पण या गोष्टी पुस्तकात आणणं फारच अवघड असतं म्हणूनच माझ्या आयुष्यभरातल्या स्वप्नांच्या आधाराने आत्मचरित्र लिहिण्याची माझी योजना मी निकालात काढली आहे. तरीसुद्धा मी आतुरतेने माझ्या स्वप्नांचा मागोवा घेत राहीन तो माझा आवडता छंद आहे.''



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

प्रवास आणि लेखन यामधील संबंध स्पष्ट करताना डोरिस लेसिंग म्हणतात, "माझा जन्म पर्शियामधला (इराण). तिथल्या वैशिष्ट्यपूर्ण निसर्गाशी माझं नातं आहे. त्याची आठवण माझ्या मनात आजही ताजी आहे. मी जेव्हा स्पेनमधल्या ग्रॅनाडा या शहरी गेले तेव्हा मला माझ्या जन्मस्थानाची कर्मनशाहची आणि तिथल्या आजूबाजूला पसरलेल्या पर्वतराजींची आठवण झाली. माझ्या लहानपणी कर्मनशाह हे पर्शियाच्या (इराण) व्यापाराचं प्रमुख केंद्र होतं. पण आता ते शहर रसातळाला गेलंय. तिथला डोंगराळ परिसर कोरडा आणि धुळींनी भरलेला आहे. तशा प्रकारचा निसर्ग मला दक्षिण ऱ्होडेशियात (झिंबाब्वे) पुन्हा एकवार लाभला."

"लहानपणी मी खूप प्रवास केला मुलांनी लहानपणापासून प्रवासाचा अनुभव घ्यावा प्रवासात अनेक गोष्टी बघाव्यात, त्याचे पडसाद अंतर्मनावर उमटवून घ्यावेत यासाठी. पालकांनी मुलांना प्रवास करायला उत्तेजन दिलं पाहिजे. अशा अनुभवसंपन्नतेमुळे पुढील आयुष्यात कुठच्याही परिस्थितीशी त्यांना सहजपणे जुळवून घेता येते. माझंच उदाहरण पहा. मी दोन अडीच वर्षांची असताना कर्मनशाहहून तेहरानला गेले. एका जुन्या गाडीतून केलेला प्रवास आणि पाहिलेला प्रदेश मला आठवतो. इ. स. १९२४ साली आम्ही आम्ही काळ्या समुद्रमार्गे लेनिनग्राडला गेलो होतो. अशा मार्गाने प्रवास करून रशियाला पोचणारे आमचे एकमेव कुटुंब होते. मी त्यावेळी भुकेली आणि आईवडिलांशिवाय प्लॅटफॉर्मवर जमा झालेली कितीतरी मुले पाहिली. त्याचा ठसा माझ्या मनावर निश्चितपणे उमटला. त्यानंतर मी इंग्लंडला आले. आता मला इंग्लंड आवडत असलं तरी तेव्हा मला इथला दमटपणा, गारवा, क्षणाक्षणाला हवामानात होणारा बदल, तापमानातील चढउतार मला अजिबात आवडत नव्हता. त्यानंतर अगदी सावकाश जाणाऱ्या एका जर्मन बोटीने मी आफ्रिकेत आले आणि तिथून रेल्वेने सॅलिसबरीपर्यंत प्रवास केला. आम्ही सॅलिसबरीहून बैलगाडीने शेतावर गेलो. हा सर्व प्रवास मी पाच सहा वर्षांची असताना केला. हा प्रवास माझ्या बाबतीत खूप परिणामकारक ठरला. मी त्याबद्दल कृतज्ञ आहे. प्रत्येक संस्कृती वेगळी असते. एका संस्कृतीची विशिष्ट मूल्ये आणि संस्कृतीशी निगडीत असतात. संस्कृती आणि मूल्ये हे सर्व सापेक्ष असतं. त्यामुळे त्याचा फार गंभीरपणे विचार करण्याची जरुरी नसते. लेखकाच्या दृष्टीने या सर्व मुद्यांचे आकलन होणे महत्त्वाचे असते."

"लेखक म्हणून मान्यता पावल्यावर पुढील जीवनातही मी खूप प्रवास केला. पुस्तकांचा खप वाढवण्याकरीता व्यापाराच्या दृष्टीने मी अनेक देशांना भेटी दिल्या आहेत. लेखकांनी नुसती पुस्तकं लिहायची नाहीत, तर त्यांची विक्री करायलाही मदत करायची ही एक नवीनच आश्चर्यकारक पद्धत विकसित झाली आहे. माझ्या प्रकाशकांकरता मी स्पेनमधल्या माद्रीद, बार्सिलोना या शहरांना भेटी दिल्या. त्यानंतर मी ब्राझिलला गेले. मी पुस्तकांची विक्री चांगल्या प्रकारे करू शकते हा शोध मला ब्राझिलमध्ये लागला. अवकाश कथासाहित्य



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

तिथल्या लोकांना अधिक आवडले. त्यानंतर मी 'सॅन फ्रान्सिस्को'मध्ये गेले. तिथली मंडळी चांगल्या स्वभावाची, उत्तम पोषाख करणारी, मनमिळाऊ आणि आनंदी जीवन जगणारी आहेत. हेच अमेरिकेचं खरं स्वरुप आहे. त्यानंतर मी फिनलंडला गेले. जगातील अत्युत्तम पुस्तकाची दुकाने या देशात आहेत. वाचनसंस्कृती या मातीत रुजण्याची आणि विस्तारण्याचं प्रमुख कारण म्हणजे तिथल्या दीर्घ पल्ल्याच्या रात्री ! त्यानंतर मी ब्रायटनला गेले. 'इटली' देशातर्फे दिले जाणारे साहित्याचे मँडोला पारितोषिक मला मिळाले. सिसिली हे माफियामुळे बदनाम झालेले शहर आहे. ती बदनामी काही अंशाने दूर करण्यासाठी हे पारितोषिक सिसिलीमध्ये देतात म्हणूनच पारितोषिक स्वीकारण्यासाठी मी सिसिलीला जाऊन आले."

"तरुण वयाप्रमाणे संध्याछाया दिसू लागल्यावरही मी भरपूर प्रवास केला. १९९० ते २००० या दशकात मी अफगाणिस्तान, अर्जेंटिना, ऑस्ट्रिया, ब्राझिल, चायना, आइसलँड, इटली, पाकिस्तान, अमेरिका, झिंबाब्वे यासारख्या अनेक देशांना भेटी दिल्या. *'प्रेमी इंटरनॅशनल कॅथलुनिया' हा साहित्याकरता असलेला सर्वोच्च स्पॅनिश पुरस्कार* मला मिळाला. हा सन्मान स्वीकारण्यासाठी मी कॅटालोनियाला जाऊन आलो."

"मी चीनलासुद्धा भेट दिली. पण माझ्या साहित्यात चीनभेटीचे पडसाद फारसे उमटले नाहीत. मी फार थोडा वेळ चीनमध्ये घालवला. त्यावेळी मी जे पाहिले. अनुभवले, त्यावर आधारित मी माझी मते बनवली. चीनला जाण्यापूर्वी चिनी माणसे कशी आहेत याविषयी लोकांनी मला बरीच माहिती दिली होती. 'चिनी लोक राजकारणावर मोकळेपणाने बोलणार नाहीत. तसे बोलले तर आपल्याला शिक्षा होईल अशी भीती त्यांच्या मनात असते' असे लोकांनी मला सांगितले होते. पण प्रत्यक्ष चित्र खूपच वेगळे होते. चिनी लोक निर्भय होते. सांस्कृतिक क्रांतीबद्दलचे आपले विचार सडेतोडपणे व्यक्त करीत होते. शांघायमध्ये तर मी परस्परविरोधी दृष्ये पाहिली. एका रस्त्यावरील आकर्षक दुकानात युरोपियन पुस्तकांची विक्री चालू होती. तर त्याच्या पाठीमागच्या बाजूला एका खोलीत गरीब माणसे दाटीवाटीने राहत होती. एका संध्याकाळी त्या घरातून येणारे 'हॅपी बर्थडे.....' हे सूर मी ऐकले आणि मला फार चमत्कारिक वाटले. चिनी भाषेत वाढदिवसाच्या शुभेच्छा देण्याचं स्वतंत्र गाणं असेल अशी माझी अपेक्षा. पण इथे तर पाश्चात्याचं अनुकरण चालू होतं. यावरून एक महत्त्वाचा निष्कर्ष काढता येतो. जगात ज्या साम्राज्याचे वर्चस्व असेल, मग तो फ्रेंच, ब्रिटिश, किंवा अमेरिकन कोणताही असो, त्या समाजाच्या संस्कृतीचा प्रभाव अप्रगत देशांमधील जनतेवर होतो."

### गोष्टी वेल्हाळता

एखाद्या व्यक्तीची 'लेखक' म्हणून व्यक्तिमत्त्वाची जडणघडण होताना प्रवासाइतकंच कथाकथनाचंही महत्त्व आहे. त्याबद्दल डोरिस लेसिंग म्हणतात. "आफ्रिकन लोक गोष्टीवेल्हाळ



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

होते. परंतु आम्हाला वर्णद्वेषामुळे त्यांच्यात मिसळण्याची बंदी होती. गोऱ्या मुलांनी त्यांच्यात मिसळणे ही कल्पनाच त्याकाळी अमान्य होती. मला जर त्याचवेळी आफ्रिकन लोकांच्यात मिसळू दिले असते तर माझे बालपणाचे अनुभवविश्व अधिक समृद्ध झाले असते. आईने सांगितलेल्या गोष्टींप्रमाणे आफ्रिकन कथा ऐकून माझ्या आकलनाच्या कक्षा अधिक रुंदावल्या असत्या असं मला वाटतं."

"इथे इंग्लंडमध्ये 'कथाकथनकारांचे कॉलेज' आहे. १९८४ च्या सुमारास काही लोकांनी एकत्रित येऊन कथाकथन ही एक कला म्हणून पुनरुज्जीवीत करण्याचा प्रयत्न केला. ते चांगलं काम करीत आहेत. मी त्यांच्या काही सभाना हजेरी लावली आहे. तसेच मी त्यांची आश्रयदाता सभासद आहे. कथाकथन हे एखादा विनोद सांगण्यासारखं आहे असा कित्येक लोकांचा गैरसमज असतो. तो दूर करणे आवश्यक आहे आपला अनुभव दुसऱ्यांना सांगावा अशी इच्छा असणारे कोणीतरी असतेच. असे अनुभवकथन म्हणजे कथाकथन असाही काहींचा समज असतो. पण खऱ्या अर्थाने कथाकथन करणारे आफ्रिकेतील तसेच इतर सर्व देशांतील कितीतरी लोक या संस्थेकडे आकर्षित होतात. त्यात पारंपारिक आनुवंशिक गोष्टी सांगणारे असतात किंवा त्या प्रथेचे पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न करणारेही असतात. त्यामुळे कथाकथन हा प्रकार जिवंत राहिला आहे. काळाच्या ओघात टिकून राहिला आहे. लंडनमध्ये तसेच त्याच्या अवतीभवतीच्या परिसरात कथाकथनाचे कार्यक्रम होतात त्याला उत्तम प्रतिसाद मिळतो. लोक घरात बसून आरामात टेलिव्हिजनवरील कार्यक्रम पाहून विनासायास करमणूक करून घेण्याऐवजी कथाकथनाच्या कार्यक्रमाला हजेरी लावतात याचं मला आश्चर्य वाटतं."

आफ्रिकेतील वसाहतीमधील अनुभवातून 'दि ग्रास इज सिंगिंग' ही पहिली कादंबरी डोरिस लेसिंग यानी लिहिली. 'अ रिपल फ्रॉम दि स्टॉर्म' या कादंबरीचे कथानकही आफ्रिकेतील आहे. 'पर्टिक्युलरली कॅटस्' ही कादंबरी आफ्रिकेतील शेतकऱ्याच्या जीवनावर बेतलेली आहे. शिवाय 'आफ्रिकन स्टोरीज' हा त्यांचा कथासंग्रहसुद्धा प्रकाशित झाला आहे. म्हणून काही लोक त्यांचा उल्लेख 'आफ्रिकन लेखिका' असा करतात. त्याचं स्पष्टीकरण देताना डोरिस लेसिंग म्हणतात, "मी आफ्रिकन लेखिका' नाही. मी स्वत:ला 'स्त्रीलेखिका' असेही म्हणवून घेत नाही. मी लेखन करते तेव्हा मी स्त्री आहे याचं भान मला नसतं. किंबहुना तसा विचार करणं योग्य नाही. स्त्रीलेखिकांच्या मनात एक प्रकारची कटुता असते. 'जोपर्यंत स्त्रीजातीचा छळ चालू आहे तोपर्यंत स्त्री म्हणून लेखन करणं अत्यावश्यक आहे' असा त्यांचा दावा असतो. पण मला मात्र हे म्हणणं पटत नाही. दुय्यम दर्जाच्या नागरिकांत गणना केली तरी 'एक माणूस म्हणून जगायला तुम्हाला कोणी प्रत्यवाय करत नाही.' हे लेखन एक स्त्री म्हणून मी करते आहे. असा विचार करणे म्हणजे स्वत:ला दुसऱ्या तुरुगांत डांबून ठेवण्यासारखं आहे, जाणीवपूर्वक आपल्या संवेदनशीलतेला कुंपण घालण्यासारखं आहे, भावनांची गळचेपी करण्यासारखं आहे."



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

"आफ्रिकन लेखिका, स्त्रीलेखिका याबरोबर वर्णद्वेष करणारी लेखिका' असंही नामाभिधान प्रारंभी मला दिलं गेलं. त्यानंतर 'कम्युनिस्ट लेखिका' ही बिरुदावली माझ्यामागे लावली गेली. 'दि गोल्डन नोटबुक' प्रसिद्ध झाल्यावर माझी गणना स्त्रीवादी लेखिकात होऊ लागली. त्यानंतर सूफी लेखिका, गूढवादी लेखिका, अवकाश फिक्शन लेखिका अशी अनेक विशेषणे मला चिकटवण्याचा प्रयत्न झाला. लेखक म्हणून डोरिस लेसिंग ही फक्त मी आहे, अन्य कुणीही नाही."

### अन्य लेखकाचा परिणाम

काही विशिष्ट लेखकामुळे डोरिस लेसिंग यांना लेखन करण्याची स्फूर्ती मिळाली असावी. किंवा त्यांच्या लेखनाचा डोरिस लेसिंग यांच्या लेखनावर परिणाम झाला असावा असं अनेक वाचकांना वाटतं. त्यावर भाष्य करताना डोरिस लेसिंग म्हणतात, "मी अनेक लेखकांकडून स्फूर्ती मिळवलेली आहे. मी वाचलेल्या लेखकाची नामावली तुम्हाला सांगितली तर ती लांबलचक यादी पाहून तुम्हाला अचंबा वाटेल. प्रूस्तची पुस्तकं मी वाचली, अभ्यासली एक काळ असा होता की प्रूस्तच्या साहित्याबद्दल मला अधिकारवाणीनं बोलता येत होतं. टॉलस्टॉय, चेकॉव्ह, स्तान्दाल..... अशी शेकडो नावे घेता येतील. या लेखकानी वास्तववादी कथा-कादंबऱ्या लिहिल्या. 'वास्तववाद' हा गद्य वाङ्मयातील अत्युच्च प्रकार आहे. साहित्यात आढळणाऱ्या दृकप्रत्ययवाद, यथार्थवाद, अस्तित्ववाद यासारख्या कोणत्याही कोणत्याही वादाची तुलना वास्तववादाशी करताच येणार नाही. मी वाचलेले प्रथितयश लेखक मानवतावादी होते. त्यांची नीतीमूल्ये-जीवनमूल्ये समान होती. मी वाचलेल्या दर्जेदार साहित्यकृतीत प्रेमाची ऊब होती, अनुकंपा होती, मानवता होती. व्यक्तीव्यक्तींमधील नातेसंबंधानी हे साहित्य उजळून निघालं होतं. माझ्यावर परिणाम करणाऱ्या एखाद्याच विशिष्ट लेखकाचं नाव मला उदधृत करता आलं नाही तरी या साऱ्या साहित्याचा माझ्या मनावर निश्चितच परिणाम झाला. लेखनातील मूल्ये मला सापडली. या विनीच्या लेखकांच्या कलाकृतीतून जाणवणारी वृत्तीची विशालताच माझ्याकरीता सर्वाधिक परिणामकारक ठरली असावी. माझ्या बालपणी अवतीभवतीची माणसं संकुचित मनोवृत्तीची, वर्णद्वेशाने पेटलेली, हलक्या, फुलक्या विषयांवर निरर्थक गप्पा मारणारी अशी होती. अशा वेळी 'उत्कृष्ट साहित्याचं वाचन करणं' हाच एकमेव सुखकर पर्याय माझ्यासाठी खुला होता. त्याचा मला खूप फायदा झाला. 'युक्तिवाद' करून जी गोष्ट अनाकलनीय राहील ती गोष्ट आपल्या कलाकृतीतून लोकांना समजावणे हे कलेचे प्रमुख उद्दीष्ट असले पाहिजे' या टॉलस्टॉराच्या वचनानुसार मी साहित्यनिर्मिती केली."

### वाचन : जीवनशैली

आपल्या वाचनाबद्दल भाष्य करताना त्या म्हणतात, "एके काळी मला साहित्याची विलक्षण आवड होती. इतक्या थोड्या पैशात आपल्याला बरंच काही मिळतं हा विचारच



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मंत्रमुग्ध करणारा होता. अजूनही मी खूप वाचते आणि मी खूप जलदही वाचते. लेखकांकडे प्रकाशकाकडून भरपूर पुस्तके रोज येत असतात. माझ्याकडे प्रत्येक आठवड्यात आठ ते दहा पुस्तके येतात. एवढी पुस्तके वाचणे ही एक अवघड कामगिरीच असते. वाचनाचा वेग नसता तर मी पुरी पडू शकले नसते. बरेच वाचक पुस्तकाची पहिली दोन तीन प्रकरणे वाचतात. त्यावरून ते पुस्तकाबद्दलची कल्पना करतात. ते जर आवडले तर पुस्तकाचा पुढील भाग वाचतात. पण खरं म्हणजे ही पद्धत गैर आहे. ती पहिली प्रकरणे वाचताना तुमची मनोवस्था चांगली नसेल किंवा तुम्ही तुमच्या स्वत:च्या कामात व्यस्त असाल तर ते त्या पुस्तकावर अन्यायकारक ठरण्याची शक्यता आहे. काही लेखकांचे लेखन प्रशंसनीय असते. अशा लेखकांची, अगदी अलिकडे प्रकाशित झालेली पुस्तके मी वाचते. नवोदित लेखक आपल्या कादंबरीतून कोणत्या गोष्टी मांडणार आहे, किंवा कादंबरीत पुढे काय घडेल याचा अंदाज बांधता येत नाही. सतराव्या वर्षी मी दोन कांदबऱ्या लिहिल्या होत्या. पण त्या अगदी निकृष्ट दर्जाच्या होत्या म्हणून मी त्या फाडून टाकल्या. आपण फार चांगलं लेखन करतो असं लेखकाला वाटतं तेव्हा त्यांनी खूप वाचलं पाहिजे. उत्तम साहित्य वाचल्यावर त्या तुलनेत आपलं साहित्य खरोखरीच चांगलं आहे का ते लेखकाला पडताळून पाहाता येतं. म्हणूनच कितीतरी लोक मी कोणती पुस्तके वाचावीत त्याची शिफारस करतात. ती पुस्तकेसुद्धा मी आवर्जून वाचते एकंदरीत काय मी नेहमीच वाचत असते.''

एखाद्या निष्णात शल्यविशारदाप्रमाणे आपल्या व्यक्तीरेखांचे भावनिक विश्लेषण करण्यात डोरिस लेसिंग यांचा हातखंडा आहे, आपल्या या कादंबरीतल्या व्यक्तीरेखांची निवड त्या कधी आपल्या दैनंदिन आयुष्यातून करतात तर कधी अनेक व्यक्तीरेखांच्या संयुक्त विद्यमाने एखादी व्यक्तीरेखा तयार होते. काही व्यक्तीरेखांचा तर उगम शोधताच येत नाही असे लेसिंग यांना वाटते. त्यांच्याच शब्दात सांगायचे झाल्यास, ''मला हे खरंच माहित नाही. काही व्यक्तीरेखा मला प्रत्यक्ष भेटलेल्या माणसांवरून तयार होतात. पण काही व्यक्तीरेखा कुठून टपकतात तेच मला कळत नाही. माझ्या जाणीवेत किंवा अंतर्मनात त्या अचानक अवतीर्ण होतात. ते पाहून मी स्वत:सुद्धा स्तिमित होते. हीच तर लेखनाची खुमारी आहे ! कोणीतरी काहीतरी बोलतो, एखादा वाकप्रचार कानावर पडतो आणि त्यातूनच एखादी व्यक्तीरेखा साकार होऊ लागते. कधी कधी एखादी क्षुल्लक घटनाही कथानकाचे बीज ठरते.''

''मी माझ्या लेखनात अनेकदा पर्शियन शब्द वापरते. माझ्याकडे पर्शियन भाषेचा मोठा शब्दकोश आहे. बहुतेक लोकांना पर्शियन भाषा समजत नाही. त्यामुळे मी पर्शियन शब्द वापरले तर वाचकांना ते ओळखता येत नाहीत. माझ्या कादंबऱ्यातील व्यक्तीरेखांची विशेषनामेही मी लोकांना विशेष माहित नसलेल्या ग्रीक पुराकथांमधून घेते. असे एखादे नाव आपण निर्माण केलेल्या व्यक्तीरेखेला अगदी साजेसे आहे असे मला वाटले की मी त्या



अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

नावाची निवड करते. आपल्या ध्यानीमनी नाहीत अशा गोष्टी लेखक लिहिताना करीत असतो प्रत्येक लेखक सतत आपल्या लेखनाकडे आश्चर्याने पहात असतो''

''माझं पुस्तक जेव्हा लिहून पूर्ण होतं तेव्हा 'त्या पुस्तकाला पुरेशी सजीवता आपल्याला देता आली नाही' अशी भावना माझ्या मनात निर्माण होते. जे आपल्या मनात होतं ते तसं आपल्याला पुस्तकात उतरवता आलं नाही. आपल्याला त्या पुस्तकावर पुरेसा कब्जा मिळवता आला नाही असा निराशाजनक विचार प्रत्येक लेखकाच्या मनात येतो. माझ्या डोक्यात जेव्हा एखाद्या पुस्तकाचे कथानक घोळत असते तेव्हा आता हे कथानक कोणत्या अंगाने जाणार आहे. 'ते कथानक कसे वळण घेणार आहे' याचे मी त्रयस्थपणे निरीक्षण करते. पुस्तकाच्या कथानकात मी पूर्णपणे गुंतलेली असले तरी किंचितसा त्रयस्थपणा ठेवावा लागतो. लेखकाने शांतचित्ताने लेखन केले पाहिजे. रागाच्या भरात केलेले लेखन दर्जेदार होत नाही.''

### प्रेषित

अनेक वाचक डोरिस लेसिंग यांना प्रेषिताची उपमा देतात. प्रेषित म्हणून गौरवतात. त्याबाबत भाष्य करताना त्या म्हणतात, ''मी कोणतीही नवीन गोष्ट सांगितलेली नाही. पण मी माहित असलेल्याच गोष्टी चांगल्या शैलीत, वेधक, कुतूहलजनक पद्धतीने लिहिते.''

''कधी कधी मी अशा वैचारिक लाटेवर स्वार होते की ज्यामुळे भविष्यकाळात घडणाऱ्या घटनांची मला आधीच जाणीव होते. अर्थात् माझ्यासारख्या इतर अनेक लेखकांना ही गोष्ट साध्य होत असावी. अर्थात् त्याचं मला काही विशेष वाटत नाही. 'वाचकाच्या मनात प्रश्न निर्माण करणं' हे लेखकाचं खरं कार्य आहे. माझं पुस्तक वाचणाऱ्याला साहित्यिक कल्पनांची बरसात झाल्याची भावना होते. त्या वाचनामुळे कदाचित वाचक वेगळ्या दिशेने विचार करू लागतात. हेच लेखकाचं उद्दिष्ट असलं पाहिजे. गोष्टी कशा कार्य करतात, कशा घडतात याबद्दल विचार करण्यात आम्ही लेखक आमचा वेळ घालवतो. अवतीभवती घडणाऱ्या घटनांच्या बाबतीत आम्ही अधिक संवेदनशील असतो.''

''डोरिस लेसिंग यानी लेखनाला सुरुवात केली तेव्हा त्यांच्या लेखनाला वाचकवर्ग होता का?'' याचे शंकानिरसन करताना त्या म्हणतात, ''लेखकाला आयता वाचक कधीच उपलब्ध नसतो. त्याला स्वत:लाच तो निर्माण करावा लागतो. लेखक जेव्हा लेखनास सुरुवात करतो तेव्हा त्याला काय म्हणायचंय यात कोणालाही जरासुद्धा रस नसतो. लेखकाला आपला वाचकवर्ग निर्माण करायचा असला तरी लेखकाला वाचकांची निवड करता येत नाही. उलटपक्षी वाचकच आमची निवड करतात.''

### जाहीर वाचन

काही लेखक आपल्या स्वत:च्या पुस्तकातील गद्य उताऱ्यांचे जाहीर वाचन करतात. आवाजातील चढउतार, योग्य ठिकाणी घेतलेला पॉज, विशिष्ट शब्दांवर दिलेला जोर, काही



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

पंक्तींची पुनरुक्ती अशा अनेक अंगाने केलेले वाचन परिणामकारक ठरते. असे जाहीर वाचन डोरिस लेसिंग करतात का ते काही मंडळींना जाणून घ्यायचे होते. त्यावर त्यांनी जर्मनीत वैयक्तिक आयुष्यात घडलेला एक किस्सा सांगितला. "मी माझ्या ललित साहित्यातील वेचे वाचून दाखविण्याचे कार्यक्रम फारसे केलेले नाहीत. अशा प्रकारचं वाचन मी एकदा जर्मनीमध्ये केलं होतं. बाप रे, ती माझी जर्मनीची भेट अगदी अनर्थकारक झाली. त्याचं असं झालं. जर्मनीमधल्या एका शैक्षणिक संस्थेमध्ये मला बोलावलं होतं. "मी माझ्या ललितकलाकृतीचे वाचन करीन आणि मग तुम्ही मला प्रश्न विचारा" असं मी सांगितल्यावर त्यांच्याकडून मला अपेक्षित उत्तर आलं, "अहो, जर्मन लोकांकडून प्रश्न विचारले जाण्याची अपेक्षा तुम्ही करू नका." त्यावर मीही निश्चितपणे सांगितलं, "हे सगळं कसं हाताळायचं ते मी ठरवीन कारण मला त्याची जाण आहे." प्रत्यक्षात जे घडलं ते जर्मनीचं प्रातिनिधीक स्वरुप होतं. सभागृह खूप मोठं होतं. सर्व मंडळी तिथे बसली होती. मी ठरल्याप्रमाणे माझ्या ललित साहित्यातील वेचे वाचले. ते उत्तम झाले. त्यानंतर मी प्रश्नांकडे वळणार होते. पण त्या आधीच चार प्राध्यापकांनी प्रश्न विचारण्यास सुरुवात केली. हे प्रश्न खूप दीर्घ, क्लिष्ट, विद्यापीठीय स्वरुपाचे होते. हे ऐकून श्रोते उठू लागले. तेव्हा प्राध्यापकांच्या भावनांचा विचार न करता "हे पहा, आता श्रोत्यांच्या प्रश्नांकडे आपण वळू या" असं जाहीर केलं. ताबडतोब ते श्रोते व विद्यार्थी परतले. मग मी श्रोत्यांच्या प्रश्नांना उत्तरे दिली. हे प्रश्न खेळीमेळीचे होते. पण प्राध्यापक महाशय मात्र चिडले ! असा हा जर्मनीतील अनुभव !"

### अर्थार्जन आणि लेखन

लेखन आणि लेखनातून मिळणारा पैसा याविषयीचे आपले विचार व्यक्त करताना डोरिस लेसिंग म्हणतात, "अर्थप्राप्ती हा लेखनाचा एकमेव उद्देश नसावा. अर्थप्राप्ती आवश्यक असली तरीसुद्धा लेखकाने स्वत:च्या आनंदाकरता लिहिले पाहिजे; पैशाकरता नव्हे. लेखकाने गरीब असणं हा काही लेखकाचा दोष ठरत नाही. "पैसा" मिळवणं गौण असेल तर लेखकाने आपल्या लेखनाचे व्यापारीकरण करण्याची जरुरच भासत नाही. अमेरिका, रशिया, चीन यासारख्या देशात लेखकाला अचानक प्रसिद्धीच्या लाटेवर स्वार होता येते. पण तशी प्रसिद्धी इंग्लंडमध्ये मिळत नाही. असे असले तरी इंग्लंडमधील परिस्थिती लेखनाला अनुकूल आहे. या समाजात प्रत्येकाला शांतपणे हव्या असलेल्या गोष्टी करता येतात. प्रत्येकाला आपला खाजगीपणा जपता येतो. समाजातील इतर घटक त्यात अडथळे आणत नाहीत."

१९४९ साली डोरिस लेसिंग त्यांच्या तान्ह्या मुलाला– पीटरला घेऊन लंडनला आल्या. त्यावेळी त्यांची सांपत्तिक स्थिती फारच डबघाईची होती. हातात फक्त 'दि ग्रास इज सिंगिंग' या पहिल्या कादंबरीचे हस्तलिखित होते. "हा निर्णय फार धाडसाचा होता" असे अनेकांना



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

वाटते. त्याबद्दलची भूमिका मांडताना त्या म्हणतात, "माझ्या या कृतीचा धाडसाशी अर्थाअर्थी काहीही संबंध नाही. मला तसं करणं भाग होतं. 'सध्या लोकांची अर्थार्जनाची अपेक्षा आमच्या त्या काळच्या अपेक्षेपेक्षा कितीतरी अधिक आहे' हा खरा कळीचा मुद्दा आहे. "लेखनातून भरपूर पैसा मिळवण्याकरिता मी किती काळ प्रतिक्षा केली पाहिजे?" असा प्रश्न स्टॅनफोर्डमध्ये एका तरुणीने मला विचारला होता. असा प्रश्न माझ्या मनात कधी उद्भवलाच नाही. आर्थिक सुरक्षेबद्दल मी पूर्णपणे बेफिकीर असे. आमच्या काळातील बहुतेक जण मानसन्मान, सुरक्षा याचा विचारच करीत नसत. उपभोग्य वस्तूंचा विचार हा आम्हाला फारच बूर्झ्वा व तुच्छ वाटत असे. ज्या माणसांजवळ पैशाची ऊब नसते त्यांना खाण्यापिण्याच्या बाबतीत मिजास ठेवणे परवडत नाही. स्टोव्हवर रटरटा उकळणारे स्ट्यु-सूप आणि पाव यावर उदरनिर्वाह करावा लागतो. प्रत्येक गरीब माणसाला या अवस्थेतून जावंच लागतं. आपण त्यात काही विशेष करतोय असं मला कधीही वाटलं नाही. कालांतराने मला पैसा मिळाला आणि त्यानंतर मला भरपूर पैसा मिळाला. मी दोन छोट्या खोल्यांऐवजी मोठ्या घरात राहायला आले. पण माझे राहणीमान काही फारसे बदलले नाही. आता माझ्या पैशाचे व्यवस्थापन मी स्वत: पाहत नाही. मी हिशेबनीसाची नेमणूक केली आहे. आकडेमोड मला अजिबात जमत नाही. परंतु ब्रिटिश करनियमावलीनुसार मी दर तीन महिन्यांनी माझे स्वत:चे हिशेब जुळवते. अशा बेरजा वजाबाक्या मला करता येतात याचाच मला अभिमान वाटतो."

डोरिस लेसिंग यांच्या लेखनामागची प्रेरणा कोणती याबद्दल वाचकांच्या मनात औत्सुक्य होते. त्याबद्दल त्या म्हणतात, "पेंटर, आर्किटेक्ट, याप्रमाणे लेखक' हा जन्मावा लागतो. गेली चाळीस वर्षे मी माझा चरितार्थ लेखन करून चालवला आहे. तीच माझी सर्वात मोठी लेखन प्रेरणा आहे. मला लेखनाचं व्यसन आहे. मी जर काहीच लिहिलं नाही तर मला चैन पडत नाही. लेखन हे माझ्या जीवनाचं अविभाज्य अंग आहे. 'जित्याची खोड मेल्यावर सुद्धा जात नाही अशी नवी म्हण माझ्याकरिता तयार करावी लागेल मला सवयीने मी काहीतरी खरडत राहीन, हाच माझ्या थडग्यावरील संदेश राहील."

सुप्रसिद्ध लेखक जे. जी. बल्लार्ड जेव्हा शांघयचा निरोप घेऊन प्रथम इंग्लंडला आले तेव्हा 'आपण फारच संकुचित आणि मागासलेल्या छोट्याशा जगात परत आलो आहोत' असं त्यांना वाटलं. त्याविषयीच्या आपल्या भावना व्यक्त करताना डोरिस लेसिंग म्हणतात, "हो, मलासुद्धा इंग्लंडला परतल्यावर तसंच वाटलं. कोंदटलेल्या, उदास भागात आपण आलो आहोत, इथे सगळंच बंदिस्त आहे, सगळंच घराच्या चार भिंतींच्या आत कोंडलेले आहे, असं मला सुरुवातीला वाटत असे. हे सर्व सुंदर असलं तरी आखीवरेखीव व मानवनिर्मित आहे. इंग्लिश लोकांनी या भूमीचा प्रत्येक कोपरा न् कोपरा कृत्रिमरित्या सुंदर ठेवला आहे. ऱ्होडेशियासारखी (झिंबाब्वे) निसर्गाची अकृत्रिमता इथे फारशी आढळत नाही."



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

**वर्णभेद**

डोरिस लेसिंग यांचे हे विचार ऐकल्यावर त्यांना दक्षिण आफ्रिकेतील मोकळ्या माळरानावर परत जाण्याची ओढ वाटत असावी अशी शंका लोकांच्या मनात उपस्थित झाली त्यावर त्या म्हणतात, "मला काही मोकळ्या माळरानावर राहाता येणार नाही. मला भूतकाळात राहणं पसंत नाही. मला वास्तवात जगायला आवडेल. १९८२च्या सुमारास झिंबाब्वेला स्वातंत्र्य मिळाले. त्यानंतर दोन वर्षांनी मी तिथे गेले होते. तेव्हा झिबाब्वेचं सारं रुपच पालटून गेलेलं मला आढळलं. माझ्या आठवणीतलं झिंबाब्वे भूतकाळात जमा झालं होतं. मी जेव्हा आफ्रिकेत राहत होते तेव्हा तिथे गोऱ्या लोकांची सत्ता होती. मला ती बिलकुल मान्य नव्हती. येथील जीवन खरंच असह्य होतं. येथील गोरे लोक श्रीमंत तर काळे मात्र अत्यंत गरीब. काळ्या लोकांसाठी नियम वेगळे. त्यांच्याकरता रात्री नऊनंतर संचारबंदी करण्यात येई. काळ्यांवर होत असलेल्या अन्यायाची मला चीड येत असे. काळ्या लोकांशी माझा फारसा संबंध येत नसे. पण सर्व नोकरचाकर काळे असल्यामुळे त्यांच्याशी फक्त व्यवहारापुरते संभाषण होत असे. त्यामुळे माझी इच्छा असूनसुद्धा त्यांच्याशी सलोख्याचे संबंध ठेवणे फार कठीण होत असे. आता वर्णद्वेष हा वाक्प्रचार पूर्णपणे नाहीसा झाला असला तरी त्याकाळी आफ्रिकेत प्रचंड वर्णद्वेष होता. काळया लोकांविषयीच्या माझ्या सहानुभूतीपूर्ण दृष्टीकोनामुळे माझी गणना दुष्ट व्यक्तींमध्ये केली जात असे. गोऱ्या समाजात माझे स्थान खलनायकासारखे असे. कोणीही माझ्याबद्दल चांगला शब्द उच्चारीत नसत अर्थात् आता सगळं ठीक आहे. पण कधी कधी माझ्या मनात विचार येऊन जातो, "आपण कधीच ते शहर सोडलं नसतं तर?" तर माझं काय झालं असतं हे मी आज सांगू शकते. मी पुढील पाच वर्षात दारूच्या नशेच्या अधीन झाले असते. मी इतरही काही फारसे केले असते असे मला वाटत नाही कारण वसाहतवादी जीवनव्यवहार मी सतत पहात होते. हे अवतीभवती काय चाललंय? अशी नाराजगीपूर्ण विचारणा करणाऱ्या स्त्रिया माझ्या भोवताली होत्या. मला ते सहज करता आलं नसतं."

डोरिस लेसिंग यानी निर्माण केलेल्या ललित साहित्य संपदेत आफ्रिकेतील या पार्श्वभूमीचे उल्लेख अनंत वेळा येतात. त्या जे ललित साहित्य लिहितात ते खरं पाहता आत्मकथनच आहे असं लोकांना वाटतं. ललित गद्य लेखनात आत्मकथन आणि ललित लेखन यांचा परस्परसंबंध कसा असावा अशा विद्यापीठीय प्रश्न उपस्थित केल्यावर त्या म्हणतात, "असा प्रश्न तुम्ही कोणत्याही लेखकाला विचारलात तरी त्याला उद्वीग्नता येईल. आम्हा लेखकांच्या दृष्टीने हा प्रश्न पूर्णपणे अप्रस्तुत आहे. कोणत्याही लेखकाचे लेखन स्वत:च्या जीवनात आलेल्या अनुभवांवर आधारित असते पण ते आत्मकथन किंवा आत्मचरित्र नसते."



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

### लेखनवैशिष्ट्ये

डोरिस लेसिंग यांच्या कादंबऱ्यात एक गोष्ट प्रकर्षाने जाणवते. त्यांच्या कथाकादंबऱ्यातील पात्रापात्रांमधील संबंधात प्रचंड अस्थिरता आणि जटिलता असते. व्यक्तीव्यक्तींमधील संबंधाचं कादंबरीत घडणारं दर्शन हेच त्यांच्या लेखनाचं वैशिष्ट्य असतं. डोरिस लेसिंग यांना कादंबरीलेखन करीत असता घटना घडताना दिसतात. प्रत्यक्ष जीवनात, वास्तवात कोणतीही गोष्ट स्थिर नसते. परिस्थितीत सतत बदल घडत असतो. या सतत घडणाऱ्या घटनांवर भाष्य करणं हेच कादंबरीलेखनामागचे उद्दिष्ट असते. त्या कादंबऱ्यातील व्यक्तीरेखांकडे फार बारकाईने लक्ष ठेवतात. मनोविश्लेषणातील अनुभवचाच हा पुरावा आहे असं वाचकाना वाटतं.

डोरिस लेसिंग यानी आपल्या साहित्यकृतीत, विशेषत: 'दि गोल्डन नोटबुक' या कादंबरीत ठराविक नमुनाकृतीपेक्षा वेगळे असे स्त्रीजीवनदर्शन घडविले आहे. स्त्रिया अर्थार्जन करतात. पतीपासून विभक्त होऊन एकेकट्या राहातात. सर्व जबाबदारी होऊन घेऊन एकट्याने मुलांचे संगोपन करतात. समाजात अशा स्त्रियांची संख्या दिवसेंदिवस अधिकाधिक दिसू लागली आहे. अशा जीवनातील अडचणी आणि त्रासाचा या स्त्रिया बागुलबुवा करीत नाहीत. असे जीवन जगणाऱ्या स्त्रियांबद्दल त्यांना फार अभिमान वाटतो. त्यांच्याच शब्दात, "या देशात मुलांना वाढविण्याचे अनेकविध मार्ग उपलब्ध आहेत. अर्थात् हे नवनवीन मार्ग किती काळ चालू राहतील ते सांगता येत नाही कारण मला वाटतं सनातनीपणाच्या खुणा सगळीकडे दिसू लागल्या आहेत. पठडीतील विचारपद्धती पुन्हा येऊ घातली आहे. अशा काळात राहून ही स्थित्यंतरे न्याहाळणे हे मला. फार कुतूहलजनक वाटते."

डोरिस लेसिंग यांच्या लेखनात आई आणि मुले यांचे संदर्भ नेहमी येतात. उदा. 'दि वुम्ब वॉर्ड' ही कथा, 'दि फिफ्थ चाइल्ड' हे पुस्तक. लेडिज होम जर्नलमध्ये आलेली 'अमंग दि रोझेस' ही कथाही अशीच आहे. त्याचं स्पष्टीकरण देताना त्या म्हणतात, "अमंग दि रोझेस्' या कथेतील स्त्री आणि तिच्या दोन मुली, त्यापैकी शर्ली ही बंडखोर तर दुसरी मुलगी चांगली- आईच्या वळणावर गेलेली 'दि वुम्ब वॉर्ड' ही कथा म्हणजे माझा वैयक्तिक अनुभवच होता. एकदा उत्तर लंडनमधल्या हॉस्पिटलमध्ये मी गेले होते. माझ्या मैत्रिणीला भेटायला. तिथे मी जे दृश्य पाहिले तेच मी त्या कथेत लिहिले. या कथेतील स्त्री तिच्या नवऱ्याजवळ बसून तीन वर्षाच्या लहान मुलासारखी रडत होती. कारण काय तर ती तिच्या मुलाला सोडून कधी राहिली नव्हती. विधवा, घटस्फोटिता, अविवाहित किंवा दु:खाने गांजलेल्या स्त्रियांनी तिच्या मुलाला गराडा घातला होता. "त्या बिघडलेल्या मुलात अशी काय विलक्षण ताकद होती की या सर्व स्त्रिया त्याच्या तालावर नाचताहेत" असा विचार माझ्या मनात आला. म्हणून मी ती कथा लिहिली. 'अमंग दि रोझेस' ही कथा मी कशी लिहिली ते मला अजिबात आठवत नाही."



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

**अफगाणिस्तान**

१९८७ च्या सुमारास डोरिस लेसिंग यानी एक छोटसं ललितेतर पुस्तक लिहिलं. ते पुस्तक अफगाणिस्तानातील परिस्थितीवर आधारित होते. अफगाणिस्तानवर सोव्हिएत युनियनने आक्रमण केले होते. लाखो रशियन सैनिक संहाराची शस्त्रास्त्रे घेऊन अफगाणिस्तानमध्ये आले होते. त्यावेळी अफगाण योद्धयानी-मुजाहादिन यानी या हल्ल्याला तीव्र प्रतिकार केला. घरी तयार केलेले हातबाँब, गोफणी, जुन्या पद्धतीच्या बंदुका थोडक्यात काय मिळेल त्या शस्त्राचा उपयोग करून स्त्रिया आणि मुलांनीसुद्धा या स्वातंत्र्ययुद्धात भाग घेतला. 'अफगाण रिलीफ' या संस्थेशी डोरिस लेसिंग यांचा जवळून संबंध आला. १९८६च्या सप्टेंबरमध्ये निर्वासितांची स्थिती पाहण्यासाठी त्या पाकिस्तानला गेल्या पेशावरमध्ये स्वातंत्र्यसैनिकांच्या नेत्यांच्या त्यांनी भेटी घेतल्या. सर्वसामान्य नागरिकांशी वार्तालाप केला. बॉम्बवर्षावामुळे हा सुंदर प्रदेश बेचिराख झालेला पाहिला. या सर्व अनुभवावर आधारित त्यांनी एक पुस्तक लिहिले. त्याचे शीर्षक होते. 'दि विंड ब्लोज अवे अवर वर्डस्' या अनुभवांबद्दल भाष्य करताना डोरिस लेसिंग म्हणतात, "मी तिथे निर्वासितांच्या छावण्यांमधून फिरले. अफगाणिस्तानात फक्त पुरुष वर्तमानपत्र वाचतात. पण इस्लामी बंधनामुळे पुरुषांना स्त्रियांशी संवाद साधता येत नाही. म्हणूनच हे पुस्तक लिहिताना मी माझं लक्ष स्त्रियांच्या परिस्थितीवर केंद्रित केलं होतं. त्या पुस्तकाचं शीर्षक मी एका इस्लामिक लेखकाच्या साहित्यातून घेतलं. त्याने म्हटलं होतं, "आम्ही तुमच्याकडे मदतीची याचना करतो पण वारा आमचे शब्द दूर उडवून टाकतो."

"मी अफगाणिस्तानला थोड्या दिवसांकरता भेट दिली आणि हे पुस्तक लिहिलं. हे लेखन अधिकृत आहे का अशी शंका काही वाचकांनी मला विचारली. पण खरं पाहता पत्रकार नाही का अनेक देशाना थोड्या काळापुरत्या भेटी देतात. ते कधी अशा अधिकृतपणाचा विचार करतात का? मी मात्र या भेटीची टाचणं करून ठेवली होती. गेली काही वर्षे मी सतत या प्रश्नाचा अभ्यास करत होते. अफगाणी आणि पाकिस्तानी लोकांना समजून घ्यायचा प्रयत्न करत होते. फारशी भाषा जाणणाऱ्यांच्या सहवासात मी राहिले. अभ्यास आणि त्याला पूरक योजना यामुळेच मी हे पुस्तक लिहिले.

"माझी ही अफगाण सफर एका विशिष्ट अफगाणधार्जिण्या संघटनेने पुरस्कृत केली होती, असा बिनबुडाचा आरोप काही लोकांनी माझ्यावर केला होता." त्याचे खंडन करताना त्या म्हणतात, "डाव्या विचारसरणीच्या मंडळीनी केलेली ती साचेबंद टीका आहे. ही अफगाण सफर कोणत्याही राजकीय संस्थेने ठरवली नव्हती. 'अफगाण रिलीफ' ही संस्था मी आणि इतर मित्रमंडळीनी स्थापना केली होती या संस्थेने अफगाणमधील अनेक निर्वासिताना पाकिस्तानला जायला मदत केली. पण त्यात आमच्याकरता आर्थिक मदतीचा भाग अजिबात



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

नव्हता. मी आणि माझ्या सहप्रवाशानी आपापला खर्च केला होता. 'अफगाण रिलीफ' ही संघटना देशपार झालेल्या आणि देशात लढणाऱ्या अफगाणी लोकांशी उत्तम संपर्क ठेवून आहे. त्याचप्रमाणे लंडनमध्ये स्थायिक झालेले अफगाणी लोक त्या संघटनेचे सल्लागार आहेत. त्यांच्याशी माझे सलोख्याचे संबंध आहेत. अर्थात् या संबंधाला राजकीय छटा बिलकुल नाही. अफगाण संघटनेने आजपर्यंत प्रशासनाकरता एक पैसुद्धा खर्च केलेला नाही. लोकांनी स्वखुशीने इथे आणि पाकिस्तानात निधी उभा केला. स्पष्टच सांगायचं तर अफगाण रिलीफमधून फक्त अफगाणी लोकांचा फायदा झाला. बाकी कोणीही त्या संघटनेकडून कोणत्याही प्रकारचा आर्थिक लाभ घेतलेला नाही."

### संगीतिका

आपल्या संगीतीकेबद्दल त्या म्हणतात, "'दि मेकिंग ऑफ दि रिप्रेझेंटेरिव्ह फॉर प्लॅनेट अेट' या पुस्तकाचं संगीतीकेत रुपांतर होईल असं माझ्या कधी मनातसुद्धा आलं नाही. पण ते घडलं. 'फिलिप ग्लास' याना त्या पुस्तकावर आधारलेली संगीतिका तयार करायची होती. म्हणून आम्ही भेटलो. मला संगीतातलं काही कळत नाही. फिलिप ग्लास यानी स्वत:च्या संगीताचे नमुने माझ्याकडे पाठवले. पण ते ऐकायची सवय व्हायला मला वेळ लागला. पण मग मला ते संगीत आवडलं. मी आणि फिलिप ग्लास पुन्हा भेटलो. त्याच्यावर चर्चा केली. आमचे विचार जुळले. आमच्यात कोणत्याही मुद्यावर मतभेद झाले नाहीत. फिलिप ग्लास यांना ते पुस्तक आवडले. ते कथानक त्यांच्या संगीताशी लय साधणारे होते. आम्ही दीर्घकाळ बैठका केल्या नाहीत, पण अधूनमधून भेटत होतो. मी त्या संगीतिकेची संहिता लिहिली. संगीतबद्ध करताना काही नवीन ओळींची रचना आयत्या वेळी करावी लागते. ते एक मोठे आव्हानच असते ! ती कथा संगितीकेमधून आम्ही लोकांपर्यंत पोचवली." "फिलिप ग्लास यांच्याबरोबर काम करणे आनंददायी होते."

लोकांच्या मनात लेखकाबद्दल भपकेबाज कल्पना असल्या तरी प्रत्यक्षात लेखकाचं जीवन धोपटमार्गी असतं. या कंटाळवाण्या दिनक्रमातून सांगितीकेकडे वळणे ही एक प्रकारची छानशी विश्रांतीच. अर्थात् संगितीका सादर करणे फार खर्चिक असते. लंडनमधील नॅशनल ऑपेरा. हयूस्टन, ॲमस्टडॅम आणि कील या चारही ठिकाणी या संगितीकेचे प्रयोग केले गेले आणि प्रत्येक ठिकाणी ८५ टक्के तिकिटे विकली गेली. नवीन संगितीकेसाठी ही संख्या लक्षणीय आहे. लंडन सोडून इतर तिन्ही ठिकाणी समीक्षकांनी बऱ्या वाईट प्रतिक्रिया व्यक्त केल्या. फक्त लंडनमध्ये एकाही समीक्षकाने त्या संगीतीकेबद्दल एकही चांगला शब्द लिहिला नाही. पण प्रेक्षकांना मात्र हा प्रयोग इतका आवडला की त्यांनी उत्स्फूर्तपणे नाट्यगृहात उभे राहून पसंतीची पावती दिली."



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

### नाट्यलेखन

डोरिस लेसिंग यानी 'प्ले विथ अ टायगर' हे एकमेव नाटक लिहिलं. त्याविषयी त्या म्हणतात, "रंगमंचावरील माझी कारकीर्द काही प्रचंड यशस्वी झाली नाही. पण मला रंगमंचाविषयी प्रेम आहे. मला नाट्यगृहाचं वेड आहे. साहित्याचा हा घाट आपल्याला जमतो का ते पाहण्यासाठी मी नाट्यलेखन केले. पण या नाटकाच्या बाबतीत नेहमीच काही ना काही तरी चुकत गेलं. 'माझी अकार्यक्षमता झाकण्याकरता दिलेली ही सबब आहे' असा गैरसमज माझ्या या विधानामुळे होण्याची शक्यता आहे. पण वास्तव तसं नाही. 'एका विशिष्ट कलाकारानेच या नाटकात प्रमुख भूमिका करावी अशी माझ्या निर्मात्याची इच्छा होती. ती सफल होईपर्यंत तो निर्माता तब्बल तीन वर्षे थांबला होता. त्यानंतर तो निर्माता आणि दिग्दर्शक यांनी माझ्या नाटकाचा एक प्रवेश इतक्या चमत्कारिक पद्धतीने सादर केला की त्यामुळे मला मेल्याहून मेल्यासारखं वाटलं. 'पुरुषजातीविरुद्ध आवाज उठवणारं 'नाटक' म्हणून स्त्रीवाद्यांनी त्या नाटकाचा प्रयोग वेस्ट अेंड या प्रशस्त नाट्यगृहात १९६२ साली सादर केला. त्याऐवजी हाच प्रयोग जर छोट्याशा प्रायोगिक रंगभूमीवर झाला असता तर ते नाटक कदाचित् यशस्वी झालं असतं. त्या नाटकातील पात्रयोजनाही सदोष होती नाटककाराला असल्या अनेक विवंचना असतात. असले त्रास सोसण्यापेक्षा आणि मनस्तापाला सामोरं जाण्यापेक्षा शांतपणे कादंबरी लिहावी आणि लिहिली आहे त्याच स्वरुपात प्रकाशित करावी असा सुज्ञ विचार मी केला. अजूनही कधी कधी मला नाटक लिहिण्याचा मोह होतो. परंतु त्यातले धोके माहित असल्यामुळे अशा मोहापासून मी दूर राहाते."

### आशावादी लेसिंग

'प्रिझन्स वी चुझ टु लिव्ह इनसाइड' या पुस्तकात डोरिस लेसिंग यांचा आशावादी दृष्टीकोन दिसतो. शिक्षण, समाजशास्त्र, साहित्य, इतिहास अशा अनेक विषयांच्या अभ्यासाने आपले जीवनमान उंचावता येते, परिस्थितील पालट घडवून आणता येतो. असं त्यानी त्या पुस्तकात म्हटलं आहे. त्याबद्दल त्या म्हणतात, "बालपणातील बराचसा काळ मी निसर्ग सान्निध्यात घालवला. पौगंडावस्थेत मी झाडाझुडपात यथेच्छ भटकले. त्यामुळे कुरकुर न करता कोणत्याही परिस्थितीत आनंदी राहण्याचा माझा स्वभाव बनला. आता काहीही घडलं तरी त्यावरील माझी प्रतिक्रिया आशावादीच असते."

"आपल्यात सुधारणा करून घेण्याचे अनेक मार्ग आपल्यापुढे आहेत. तटस्थ राहून आणि त्रयस्थाची भूमिका घेऊन आपण आपल्याच वर्तनाचे परिक्षण करण्याची क्षमता आपल्याजवळ आहे. शंभरवर्षापूर्वी क्रूर वागणुकीबद्दल देश एकमेकांवर टीका करीत असत असं मला वाटत नाही. परंतु विद्यमान काळात क्रौर्याने वागले तर आपल्याला एकमेकांच्यावर



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मोकळेपणाने टीका करता येते. हा बदलच आशादायक आणि महत्त्वपूर्ण आहे. तसेच संधी मिळाली की बहुतेक देश लोकशाही यंत्रणेचाच स्वीकार करताना आढळतात. सर्व जगभर अशा घटना घडत आहेत. ही फार समाधानाची आणि आशादायक गोष्ट आहे.''

''केव्हा ना केव्हातरी या विश्वाचा अंत होणार आहे.'' असा विचार डोरिस लेसिंग यांच्या काही कादंबऱ्यात येतो. तसेच वैश्विक तापमानवृद्धी, हरितगृह परिणाम यासारख्या वैज्ञानिक घटनांचा उल्लेखही त्यांच्या साहित्यात आढळतो. त्यासंबंधी त्या म्हणतात, ''विज्ञानातील या सर्व आश्चर्यकारक कल्पनांनी सुसज्ज होऊन काही मी लेखन केले नाही. शास्त्रज्ञ गेली कित्येक वर्षे या विज्ञान समस्यांबद्दल चर्चा, विचारविनिमय करीत आहेत, त्याची मी दखल घेतली इतकेच ! वास्तविक ओझोन थराला पडलेलं छिद्र, अेड्स यासारख्या महाभयंकर आपत्तींबद्दल कोणीच अंदाज वर्तवला नव्हता. म्हणजेच भविष्यात घडून येणाऱ्या अनर्थाचं भाकित वर्तवणं आपल्याला तितकसं जमत नाही असंच म्हणावं लागेल. एड्सारख्या महासंकटाकडे लेखकाला दुर्लक्ष करता येणार नाही. एड्समुळे त्यांच्या साहित्यनिर्मितीत नक्कीच बदल घडून येईल. एवढेच नव्हे तर स्त्रीपुरुष नातेसंबंधांची वर्णने करतानाही खूप फरक पडेल. माझी पिढी ही बहुधा सर्वात भाग्यशाली होती. गर्भनिरोधक गोळ्यांचा शोध लागल्यामुळे आम्हाला आमच्या आधीच्या पिढीप्रमाणे गर्भधारणेची भीती बाळगावी लागली नाही आणि आमच्या काळात एड्स हा रोगच नसल्यामुळे स्त्रीपुरुष संबंधातून प्रसारित होणाऱ्या रोगांबद्दल चिंता करावी लागली नाही. विद्यमान तरुणी आमच्यासारखे मुक्त आणि रोमँटिक जीवन जगू शकत नाहीत. याबाबतीत माझी भूमिका 'ज्येष्ठ सल्लागार' अशीच असते.''

### वेगळाच अनुभव

आपल्या प्रदीर्घ आयुष्यात डोरिस लेसिंग यांच्याजवळ विविध अनुभवांचे भांडार आहे. मादक द्रव्य सेवनाचा अनुभव त्यांनी आपल्या आयुष्यात एकदा घेतला होता. त्याबद्दल त्या म्हणतात, ''मी एकदा मेस्कॅलिन घेतलं होतं. एकदा तो अनुभव घेतला हे चांगलं झालं. पण मी पुन्हा कधीही त्या मार्गाने जाणार नाही. ज्या दोन व्यक्तींनी मला मेस्कॅलीन आणून दिले त्याच व्यक्ती या घटनेला अधिक जबाबदार आहेत. मी मेस्कॅलिनचे सेवन केल्यावर त्या दोन्ही व्यक्ती माझ्यासमोर बसून होत्या. मी भावनेच्या भरात खिडकीतून बाहेर उडी घेईन अशी भीती त्यांना वाटत असावी. पण मी तसं काही केलं नसतं. त्यानंतर खूप वेळ मी रडत होते. माझ्या रडण्यामुळे ते दोघेही खूप अस्वस्थ झाले. या साऱ्याची मला चीड आली एकंदरीत ती वेळ मी निभावून नेली. माझ्या एका मैत्रिणीने एकदा मेस्कॉलीनचे सेवन केले होते. ते एक दुःस्वप्न ठरले. इतरही अनेक लोकांनी असे कटु अनुभव घेतले आहेत. माझ्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

बाबतीत पुन्हा असे घडायला नकोय.'' विचारप्रवाह बदलण्यासाठी लोक मादक द्रव्यांचे सेवन करतात. तुमची विचारधारा खंडित झाली असेल तर क्वचित्‌काळी अशा द्रव्यांचे सेवन केले तर इच्छित परिणाम साधता येतो. परंतु ती तुमची जीवनशैली होता कामा नये. अशा मादक द्रव्याचा वापर न करता लोकांनी आपली विचारशक्ती विस्तारित केली पाहिजे. आपल्या अंतर्मनाचा शोध घेतला पाहिजे. हे साध्य करण्यासाठी व्यक्तीला स्वत:ला एक प्रकारची शिस्त लावून घ्यावी लागेल. एखादी कला आत्मसात करण्यासाठी भरपूर वेळ द्यावा लागतो, मनाची एकाग्रता साधावी लागते. म्हणजेच तुम्हाला मादक द्रव्यांशिवाय वैचारिक उन्नती साधता येईल.''

### भ्रमनिरास

कम्युनिस्ट पक्ष म्हणून त्यांनी 'कम्युनिझम' या राजकीय तत्त्वप्रणालीचा अनुभव घेतला व कालांतराने त्यागही केला. त्याबद्दल डोरिस लेसिंग म्हणतात, ''युद्धाच्या वेळेस मी ऱ्होडेशियात होते, तेव्हा मी कम्युनिस्ट पक्षाची सदस्य होते. आम्ही आमच्याकरिता एका काल्पनिक कम्युनिस्ट पक्षाची निर्मिती केली होती. त्या पक्षाच्या साम्याभासाच्या मानसिकतेतच मी अनेक अवस्थांमधून गेले. जणु काही ती आमच्या पक्षसदस्यांची उत्क्रांतीच होती. पहिल्या अवस्थेत मला प्रकाश दिसला. सत्याकडे नेणारा हाच एकमेव मार्ग आहे अशी माझी खात्री झाली. दुसऱ्या अवस्थेमध्ये मी स्वत:ला पक्षकार्यात पूर्णपणे गुंतवून घेतले. त्यानंतरच्या तिसऱ्या अवस्थेत मात्र मी त्या पक्षाचा त्याग केला. माझा हा अंधविश्वासाचा काळ त्यामानाने लवकर संपला. आफ्रिकेत असताना मी पक्षाच्या सभांना हजेरी लावत असे. पक्षाच्या पत्रकांची विक्री करीत असे. मी १९४९ साली जेव्हा इंग्लंडला आले तेव्हा मी डाव्या विचारसरणीच्या, कम्युनिस्ट, कामगार अशा सामाजिक वर्तुळात वावरत असे. पण माझ्या पदरी माझा मुलगा होता. लेखनकामाठी करून उपजीविका करण्याच्या मी प्रयत्नात होते. माझ्या-जवळ पैसे नव्हते. माझे जीवन खूपच खडतर होते. त्यामुळे मला राजकारणाकरता फारसा वेळ देता येत नव्हता. १९५० च्या सुमारास कम्युनिस्ट पक्षाच्या एका कार्यकर्तीबरोबर मी राहात होते. माझी मित्रमंडळी, सहकारी हे बहुतेक त्या पक्षाचे सदस्य होते. आम्हाला रशियामध्ये काय चालले आहे त्याची कल्पना होती. प्राग ट्रायल्स, माणसांना फाशी देणे या गोष्टींनी आम्ही अचंबित होत होतो. पण आमच्या पक्षाला उज्ज्वल भवितव्य आहे अशी आम्हाला खात्री वाटत होती. म्हणून रशियात चाललेल्या घटनांकडे आम्ही दुर्लक्ष करीत होतो. ''प्रत्येक कम्युनिस्ट पक्षाच्या सदस्याची स्वत:ची परिकल्पना होती आणि त्या परिकल्पनेच्या आधारे तो सदस्य त्या पक्षाला धरून राहातो' असे आर्थर कोस्लरने म्हटले



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

होते ते अगदी खरे आहे. 'सोव्हिएत युनियनमध्ये घडणाऱ्या घटनांचा खऱ्या कम्युनिझमशी काहीही संबंध नाही अशी माझी स्वत:ची परिकल्पना होती. नंतर विसाव्या काँग्रेसमध्ये खुश्चेव्ह यांनी आपल्या भाषणांत स्टालीनच्या गुन्ह्यांची माहिती आम जनतेला दिली. ती ऐकून कित्येक कडव्या कम्युनिस्टांना धक्का बसला. ते सर्व ऐकून मी सुद्धा कम्युनिस्ट पक्षाचा त्याग केला. कम्युनिस्ट पक्षात अशा तऱ्हेने वाटचाल करणारी मी काही एकटी नव्हते. १९४० ते ५० या दशकात इंग्लंडमध्ये कम्युनिस्ट विचारसरणीच्या लोकांचे मोहोळ होते. त्या साऱ्यांची माझ्यासारखीच निराशा झाली. काही जणांना अवसाद खिन्नता आली. काहींनी धंद्यास सुरुवात केली आणि ते मोठे उद्योगपती झाले."

### सुफीझम

डोरिस लेसिंग या स्वत: गेल्या चार दशकाहून अधिक काळ सुफी तत्त्वप्रणालीच्या अनुयायी आहेत. सुफी पंथाच्या कथा व इतर साहित्यसंग्रहाला डोरिस लेसिंग यांनी प्रस्तावना लिहिल्या आहेत. त्या सुफी पंथाकडे वळल्या, त्यांत त्यांना रस वाटू लागला आणि त्यात त्या अधिकाधिक गुंतत गेल्या. त्याविषयी बोलताना त्या म्हणतात, "मला खरं म्हणजे या विषयावर बोलायला आवडत नाही. मी जे भाष्य करीन त्यावर शिक्कामोर्तब होतं आणि प्रसिद्धीच्या मिशाने मी तसं बोलतेय असं लोकांना वाटतं. सुफी पंथासारखी तत्त्वे असलेल्या एखाद्या शाखेच्या शोधात मी होते. प्रत्येक व्यक्तीला शिक्षक भेटण्याची आवश्यकता असते. मी अशा शिक्षकाच्या शोधात होते. अनेक लोक मला भेटले. पण त्यातील एकाहीविषयी 'गुरु' म्हणून मला ओढ वाटली नाही. मग मला 'शाह' नावाचा माणूस भेटला. तो 'सुफी' पंथाचा होता. माझ्या त्याच्याशी तारा जुळल्या. अशा तऱ्हेने १९६० सालापासून माझा या सुफी पंथाशी संबंध आला. या सर्व अनुभवाच्या गोष्टी आहेत. त्यामुळे त्या शब्दात व्यक्त करता येत नाहीत. लोक सुफी पंथाची माहिती देणारी पुस्तके वाचतात आणि 'मी सुफी पंथीय आहे' असे जाहीरपणे मिरवतात. खऱ्या अर्थाने सुफी तत्त्वज्ञान जाणणारे 'सुफी' अशा तऱ्हेची वर्तणुक करणार नाहीत. सुफी पंथातील श्रेष्ठी तर म्हणतात, "आम्ही स्वत:ला सुफी म्हणवणार नाही कारण सुफी ही एक विशाल शाखा आहे. सुफी या शब्दाचा आवांका खूप मोठा आहे." मला वाचकांकडून पत्रे येतात. "डोरिस, मी असे ऐकतो की तू सुद्धा सुफी पंथीय आहेस." अशा पत्रांना काय उत्तर द्यायचं ते मला समजत नाही. मी त्याकडे दुर्लक्ष करते. सुफी पंथाची एक लाट आली आहे. ते एक 'वेड' आहे. लोकांना सगळं झटपट हवं आहे. 'सुफीझम' पुस्तकात सापडणार नाही. लेखनातून सुफी पंथाचा संदेश शोधता येणार नाही. पुस्तके वाचून ते दिव्य ज्ञान मिळणार नाही. बुद्धीझमसारखाच तो एक पंथ आहे. या अनुभूतीच्या गोष्टी आहेत."



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

**निर्मितीचे प्रयोजन**

"वाङ्मयाचा समाजमनावर निश्चित परिणाम होत असतो. वाङ्मयामुळे आपल्या जाणिवा अधिकाधिक प्रगल्भ होत जातात हे अगदी शंभर टक्के खरं आहे. फक्त हा बदल अगदी सावकाश होत राहतो हे आता मला पटते. पण मी 'दि गोल्डन नोटबुक' ही कादंबरी लिहिली तेव्हां माझ्या मनाची अवस्था अगदी वेगळी होती. हे सारं जग नश्वर आहे. अशा तऱ्हेचे निराशाजनक विचार माझ्या मनात रुंजी घालत असत. समाजमनात वेगाने बदल व्हायला हवेत. जर साहित्यामुळे हे बदल झटपट घडून येणार नसतील तर लेखनाचा उपद्व्याप करायचा तरी कशाला? असं मला वाटत असे. आफ्रिकेत मी आणि माझी मित्रमंडळी त्याकरता धडपडत होतो. एका दशकात आम्ही सर्व परिस्थितीत निश्चित बदल घडवून आणू अशी आम्हाला खात्री वाटत असे. हे बदल घडवून आणण्यास सहाय्यकारी होणार नाही अशी कोणतीही कामे करणे आम्हाला निरर्थक वाटे. आमच्या राजकीय श्रद्धेचा तो भाग होता. त्या मानसिक अवस्थेबद्दल आता माझ्या मनात शंकाकुशंकांचं काहूर निर्माण होत असलं तरी त्या वयात अशा शंका माझ्या स्वप्नातही निर्माण झाल्या नाहीत."

"आपली राजकीय मते लेखनकामाठी करून समाजापर्यंत पोहोचवण्यापेक्षा घरोघरी जाऊन त्या मतांचा प्रचार करणे योग्य आहे" असा सल्ला मला डाव्या विचारसरणीची मंडळी देत असत. राजकीय विचारसरणीने भारलेल्या वातावरणात जे लेखक परिपक्व होतात ते धारदार टीकेचे लक्ष्य बनतात. अयशस्वी लेखकानीच बहुधा असा सल्ला दिलेला असे कारण द्वेषभावनेतूनच अशी मते व्यक्त होत हे आता माझ्या लक्षात येतं. त्या 'सल्ल्यातील' जहालपणाचं स्पष्टीकरण इथे मिळतं. पण हे लक्षात यायला काही काळ जावा लागला. माझी एक तरुण मैत्रिण लिहित होती. तेव्हा सुद्धा अगदी हीच प्रक्रिया मी पुन्हा एकदा अनुभवली. डाव्या विचारसरणीच्या विविध लोकसमूहांशी तिचे अतिशय मित्रत्वाचे संबंध होते. त्या प्रत्येक समूहाने त्यांची वैयक्तिक प्रतिकूल राजकीय मने तिला मोकळेपणाने सांगितली, तिच्यावर प्रभाव पाडण्याचा व दडपण आणण्याचा प्रयत्न केला. परंतु ती त्या सर्वांना पुरून उरली कारण लेखनकला तिला अवगत होती आणि आपले विचार प्रभावीपणे व्यक्त करता येत होते. नेमक्या याच गोष्टीचा त्यांना हेवा वाटत होता."

"समाजात परिवर्तन घडवून आणण्याचा हेतू मनात धरुन लेखक साहित्याची निर्मिती करतो असं मला वाटतं. पण जेव्हा तसं काही घडत नाही तेव्हां अपयशाची भावना लेखकाच्या मनात निर्माण होते. पण खरं म्हणजे या समाजात आपण बदल घडवून आणू ही भावनाच लेखकाच्या मनात का निर्माण होते? बदल घडवून आणणं वाटतं तितकं सोपं नाही. ते काहीही असो, लेखक आपली लेखनप्रक्रिया चालू ठेवतो. या सर्व खटाटोपाचा संभाव्य फोलपणा माझ्या मनात आला तरी त्यावर मात करत मी स्वत:वर लिहिण्याची जबरदस्ती करते."



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

डोरिस लेसिंग यांच्या लेखनामुळे अनेक व्यक्तींमध्ये आमूलाग्र बदल घडून आला आहे. कित्येकाना विचाराची एक नवी दिशा मिळाली. या व्यक्ती एकेकट्या भासल्या तरी अशाच व्यक्ती एकत्र येऊन समाज बनलेला असतो. त्यांनी आणि रोनाल्ड लेंग, बकमिनिस्टर फुल्लर, बॅरी कॉमनर यासारख्या कितीतरी समकालीन लेखकांनी आपल्या लेखनाने एकमेकांच्या साहित्याला नवनवीन मुद्यांनी बळकटी आणली आहे. त्यांचे लेखन अधिक प्रभावी आणि परिणामकारक झाले आहे. त्यांचे साहित्य जगभर वाचले जात आहे. इतर इंग्लिश लेखनांच्या तुलनेत डोरिस लेसिंग यांचे स्थान खूप वरचे आहे. त्याबद्दल त्या म्हणतात,"मी विविध प्रकारची पुस्तकं लिहिली. माझी पुस्तकं जेव्हा वाचक वाचतात तेव्हा त्यांच्या मनात अनेक शंका निर्माण होतात, त्यांना प्रश्न विचारावेसे वाटतात. मला वाचकांवर प्रभाव पाडायचा नसतो. माझ्याचप्रमाणे त्यांनी विचार करावा असेही मला वाटत नाही. मी फक्त वाचकांची उत्सुकता जागी करते. मी वाचकांना अधिक सावध करते. बौधिकदृष्ट्या अधिक सजग करते. वाचन ही मेंदू उत्तेजित करणारी उपचारपद्धती आहे असं म्हणतात. त्याचा परिणाम म्हणून की काय पण माझ्या कादंबऱ्या वाचल्यानंतर वाचक प्रश्न विचारतात हे मात्र खरं. लेखनाच्या दृष्टीने मला सॉल बेलो, डी. एच्. लॉरेन्स, नादिन गार्डीमर या लेखकांशी जवळीक वाटते."

**पिढीतील अंतर**

डोरिस लेसिंग यांच्या पिढीत आणि सध्याच्या तरुण पिढीतील फरक स्पष्ट करताना त्या म्हणतात,"विश्वास ठेवता येणार नाही इतका पाशवीपणा मी समाजात पाहिला आहे. माझ्या आईवडिलांचे आणि त्यांच्या पिढीतील अगणित लोकांचे आयुष्य पहिल्या महायुद्धामुळे उद्ध्वस्त झाले होते. त्या परिस्थितीचे आमच्या पिढीवर किती अघोरी परिणाम झाले आहेत ते मानवी कल्पनाशक्तीच्या आकलनाच्या पलीकडेच आहेत. युद्धामुळे आपल्याला ओळखता येणार नाहीत असे व्रण मानवतेवर पडतात. दुसऱ्या महायुद्धानंतर नेस्तनाबूत झालेल्या समाजाने पुन्हा उभारी धरायचा, जखमांवर मलमपट्टी करण्याचा निष्फळ प्रयत्न केला आणि तिसऱ्या महायुद्धाला सामोरं जायची तयारी सुरू केली. माणसाने मानवजातीवर किती अन्याय केला आहे हे पाहून तरुणांना बंड करून उठण्यास चिथावणी मिळते. मध्यमवयीन माणसांनी अनुभवलेल्या भीषणतेमुळे त्यांच्या मनावर विलक्षण ताण पडला आहे. आजच्या तरुण पिढीने मानवतेचा हळूहळू ऱ्हास होत असलेला पाहिला आहे.

आमच्या पिढीतील लोकांना दोन आघाड्यांवर युद्ध खेळावे लागले होते. पहिली आघाडी म्हणजे डाव्या विचारसरणीनुसार वागणं. हे फारच अवघड आहे. याचा मला तितकासा त्रास झाला नसला तरी माझे अनेक मित्र त्यामुळे उद्ध्वस्त झाले आहेत. माझ्या पिढीतील कम्युनिस्ट पक्ष सोडलेल्या कितीतरी व्यक्तींचा चांगुलपणावरचा विश्वासच उडाला आहे.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

माणसे कितीही पराकोटीची अघोरी कृत्ये करू शकतात हे आम्हाला समजलं आहे. त्यामुळे कोणत्याही पाशवी घटनेचे आम्हाला आश्चर्य वाटत नाही. आताच्या तरूण पिढीला आमच्या पिढीला सोसावे लागले तशा अत्याचारांना सामोरं जावं लागणार नाही. पण कदाचित काही वेगळ्या प्रकारचा त्रास सहन करावा लागेल. या तरुणांना झपाट्याने बदलणाऱ्या परिस्थितीशी तडजोड करावीच लागेल.''

### नवोदित लेखकांसाठी

दोन पिढ्यांमधील फरकांप्रमाणेच दोन पिढीतील लेखकांमधला फरकही डोरिस लेसिंग यांनी स्पष्टपणे सांगितला आहे. त्या म्हणतात,''आताच्या पिढीतील लेखक आणि मागच्या पिढीतील लेखक यांच्या विचारसरणीत फरक आहे. आताच्या तरूण लेखकांना झटपट प्रसिद्धी, यश आणि पैसा हवा असतो. मला वाटतं त्यानी आपलं काम प्रामाणिकपणे करत रहावं. यश यायचं असेल तेव्हा येईलच. माझ्या पहिल्या कादंबरीने मला अमाप यश दिलं. म्हणूनच मी हे असे विधान करणं सोपे आहे. पण वस्तुस्थिती अशी आहे की या पहिल्या कादंबरीमुळे यश मिळालं तरी फारसा पैसा मिळाला नाही. कित्येक वेळा माझ्याकडे पैसे नसत. एक़दा तर केन्सिंग्टनमध्ये चालताना मला रडू कोसळलं. खरोखर माझ्याजवळ एक नवा पैसा सुद्धा नव्हता. रस्त्याने जाणाऱ्या एका अनोळखी माणसाला समजले तेव्हा,''असू दे, पुढच्या आठवड्यात तरी तुझ्याकडे थोडे पैसे असतील ना?'' या शब्दात त्याने मला धीर दिला.''

''माझ्याकडे नवोदित लेखकांच्या अनेक कादंबऱ्या अभिप्रायार्थ येतात. त्यांच्यात लेखन-कौशल्य दिसतं. परंतु त्या कथा जितक्या दर्जेदार व्हायला हव्यात तितक्या त्या नसतात. म्हणूनच 'हीच कादंबरी पुन्हा एकवार लिहा' असा अभिप्राय लिहून मी ती परत पाठवते. परंतु माझ्या सूचनेप्रमाणे ते वागत नाहीत. त्यांची चिकाटी कमी पडते. ते नवोदित लेखक त्या कथानकाच्या पाठपुरावा करीत नाहीत. ती कादंबरी पुन्हा लिहित नाहीत. त्यामुळे कलाकृती अपेक्षेइतक्या उत्तम उतरत नाहीत. ''लेखक होणं फार सोपं आहे, कागद आणि पेन असलं की झालं'' असा गैरसमज हे त्याचं प्रमुख कारण आहे. कधी कधी मी माझ्या कथा चार चार वेळा लिहिल्या आहेत. प्रत्येक लेखनात त्या कथेचा घाट अधिकाधिक चांगला होतो. प्रत्येक वेळचे लेखन आधीच्या वेळेपेक्षा चांगले होते हा माझ्या अनुभव आहे. आपण सुशिक्षित समाजात राहतो. त्यामुळे अनेक व्यक्तींमध्ये साहित्यिक कौशल्ये आढळतात. पुष्कळ लेखक बऱ्यापैकी लेखन करतात पण लेखनाचा ध्यास घेत नाहीत. लिहून झाल्यावर त्रयस्थपणे आत्मचिकित्सा केली पाहिजे आणि ते लेखन चांगले नाही असे लक्षात आल्यावर ते फाडून टाकण्याची मानसिक तयारी हवी. नवीन लेखकांची सहसा कोणी डाळ शिजू देत नाही. नवोदित लेखकांनी स्वत:ला आनंद मिळेल असे लेखन केले पाहिजे. इतर लोक काय



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

म्हणतील याचा विचार करता कामा नये. शेवटी जीवन हे नुसत्या लेखनावर अवलंबून नसते, जीवन जगायचे असते. त्या अनुभवातूनच तुमचे विचार परिपक्व होतील. अनुभवातून निर्माण झालेले लेखन परिणामकारक ठरेल. प्रत्येक लेखकाला आपला वाचकवर्ग निर्माण करावा लागतो. सत्यावर आधारलेले लेखन हाच आपला वाचकवर्ग निर्माण करण्याचा एकमेव मार्ग आहे."

"आव्हान, उत्तेजन विरहीत जीवन असूच नये असं मला वाटतं. मला कितीतरी युरोपियन, अमेरिकन व्यक्ती माहीत आहेत. हुशार आहेत, चुणचुणीत आहेत. त्यांना मुलंबाळं आहेत. निष्काळजी जीवन जगताहेत. थोडक्यात, त्याना हवं असलेलं सारं काही जीवनात मिळालेलं आहे. अशी माणसं सुद्धा मला फारशी 'सुखी' दिसत नाहीत. उलट 'कशाला जगायचं?' असं म्हणताना दिसतात. म्हणजे कंटाळा ही एक सामाजिक समस्या झाली आहे. या लोकांना कशाचा कंटाळा येतो तेच मला समजत नाही. याउलट मला सगळ्या गोष्टीत अजूनही रस वाटतो. मला आवडतात त्या गोष्टी मला करता येतात, हवं त्या प्रकारचं आयुष्य मला जगता येतं हे माझं भाग्य आहे."

**प्रकाशक आणि समीक्षक**

इंग्लंडमधील साहित्यजगताबद्दलची परिस्थिती वर्णन करताना डोरिस लेसिंग म्हणतात, "इंग्लंडमध्ये दर्जेदार संपादक आणि हुशार समीक्षक आहेत. परंतु दुर्दैवाने ते एक संकुचित जग आहे. इथे सगळेच एकमेकांना ओळखतात. लेखक काल्पनिक कथा कादंबऱ्या यासारखं साहित्य प्रकाशित करतात. त्यानंतर जर त्याच लेखकाने आपलं आत्मवृत्त प्रकाशित केलं तर समीक्षकांचा त्या लेखकाच्या साहित्याकडे बघण्याचा दृष्टीकोन लगेच बदलतो." ही व्यक्तीरेखा प्रत्यक्ष भेटलेल्या या व्यक्तीवर बेतलेली आहे, अशी मतं मांडली जाऊ लागतात. समीक्षक लेखकाच्या कल्पनाशक्तीला श्रेय देत नाहीत. त्यामुळे टीका फार खालच्या पायरीवर जाते. ही समीक्षा अनेकदा व्यक्तिगत आणि द्वेषपूर्ण होते. म्हणूनच माझ्या पुस्तकाची परिक्षणे मी सहजी बघायला मिळाली तर मी वाचते. पण त्यात व्यक्त केलेल्या विचारांना मी फारसे महत्त्व देत नाही. ब्रिटनमधील बहुतेक लेखक समीक्षकांनी केलेल्या टीकेकडे उपेक्षेनेच पाहातात. त्या परिक्षणांमुळे पुस्तकाची विक्री होतेय की नाही याकडेच प्रकाशकाचे लक्ष असते आणि ते तसेच असणे योग्य ठरते. परिक्षणात पुस्तकाबद्दल अनुकूल मत दिले गेले तर त्यामुळे लेखकाचा नावलौकिक होण्यास मदत होते आणि अप्रत्यक्षपणे त्याचा पुस्तक विक्रीसाठीही उपयोग होतो. एखाद्या कलाकृतीची विक्रीची किंमत किती ठेवावी लागेल आणि ती कलाकृती सर्वोत्तम विक्री होणाऱ्या पुस्तकांच्या यादीत समाविष्ट होईल की नाही यावर प्रकाशकांचे धोरण अवलंबून असते. अमेरिकेतही याहून वेगळे चित्र नाही. हे पुस्तक बाजारातील शेल्फवरून केव्हा नाहीसे होईल ते कॉम्प्युटर ठरवतात. म्हणजेच 'पुस्तकाचे



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

शेल्फ लाइफ किती असेल अशी भाषा बोलली जाते. ही काही लेखकांना उत्तेजन देणारी परिस्थिती नाही.''

''पुस्तकाबद्दलची आपली मते समीक्षेमधून व्यक्त करणारे समीक्षक जगाच्या प्रत्येक कानाकोपऱ्यात असतात, नवनवीन पुस्तकांचा मागोवा ते सतत घेत असतात. पण माझं मत मी स्पष्टपणे सांगू का? या समीक्षेचा लेखकाच्या दृष्टीने काहीही उपयोग नसतो. समीक्षेमुळे पुस्तकांचा खप वाढतोच असं नाही. वाचकांचाही अशा समीक्षेमुळे कोणत्याही तऱ्हेचा फायदा होत नाही. उलट कित्येकदा एखाद्या वाङ्मयीन कलाकृतीबद्दलचे समीक्षकाचे विचार वाचल्यावर वाचक वाचनापासून परावृत्त होण्याची शक्यता असते. इतर समीक्षकांना किंवा ज्यांना विश्वविद्यालयात वाङ्मयाचं अध्यापन करायचं आहे अशा मोजक्या माणसांना त्या समीक्षेचा उपयोग कदाचित होत असेल. पण सर्वसामान्य वाचकाना अशा तऱ्हेच्या उलटसुलट चर्चा आणि युक्तीवाद याचा काय उपयोग? जे लोक प्रत्यक्ष पुस्तक वाचतात, त्यांचा आनंद लुटतात, ते वाचन त्यांना उपयुक्त वाटतं, अशा लोकांसाठी ही समीक्षा वगैरे सर्व अप्रस्तुत असतं.''

''कधी कधी एखादा उत्तम कादंबरीकार दुसऱ्या लेखकाच्या कलाकृतीची समीक्षा करतो. खरं म्हणजे प्रत्येक चांगला लेखक हा 'उत्तम समीक्षक' असतोच असं नाही. तरीसुद्धा त्या लेखकाकडून दुसऱ्या पुस्तकाची समीक्षा करून घेतात कारण त्याच्याभोवती असलेलं 'प्रसिद्धीचं वलय', लेखक म्हणून असलेला त्याच्या नावाचा दबदबा, साहित्यिकांच्या वर्तुळातील त्या लेखकाची पत ! पण खरं पाहता साहित्यिकांची एकमेकांच्या कलाकृतीं–बद्दलची मते चुकीची असण्याचा संभव अधिक असतो. उदाहरण द्यायचं झालं तर थॉमस मान आणि ब्रेक्त हे साहित्यातील दोन दिग्गज, पण त्यांनी एकमेकांना कधी चांगलं म्हटलं नाही. म्हणून कादंबरीकारांनी समीक्षकाची भूमिका घेऊ नये. जातीवंत समीक्षकच एखाद्या कलाकृतीला योग्य न्याय देतात. अर्थात कधी कधी एखादा फर्डा लेखक उत्तम समीक्षक असण्याची शक्यता असते. परंतु हा अपवादच असतो. हे सर्व लक्षात घेऊन नवोदित लेखकाना ''समीक्षणे, दूरदर्शन अशा प्रसिद्धी माध्यमापासून तुम्ही दूर रहा'' असा सल्ला द्यावासा वाटतो. लेखकानी लिखित शब्दाच्या माध्यमाद्वारे समाजाशी संपर्क ठेवणे संयुक्तिक असते. अर्थात आर्थिकदृष्ट्या असा सल्ला मानणे तसे कठीणच आहे.''

### टोपणनाव

डोरिस लेसिंग यानी 'जेन सोमर्स' या टोपणनावाने 'दि डायरी ऑफ अ गुड नेबर' आणि 'इफ दि ओल्ड वुड...' अशा दोन कादंबऱ्या प्रकाशित केल्या. नवोदित लेखकांना कशा प्रकारची वागणूक वाचक, प्रकाशक व समीक्षकांकडून मिळते आणि प्रकाशक, समीक्षक या साहित्यिक वर्तुळातील घटक कसे बेगडी आहेत हे सिद्ध करण्यासाठी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

टोपणनावाचा वापर करणं ही कल्पनाच फार चातुर्याची आहे. त्याबद्दल त्या म्हणतात,"दि डायरी ऑफ अ गुड नेबर' ही दीर्घ कादंबरी मी 'जेन सोमर्स' या टोपणनावाने प्रकाशकांकडे पाठवली, त्याचं मुख्य कारण वेगळं होतं. या कादंबरीतील अनेक व्यक्तिरेखा या माझ्या अवतीभवती वावरणाऱ्या खऱ्या व्यक्तींवर बेतलेल्या होत्या. त्या व्यक्तींनी ही कादंबरी वाचण्याची शक्यता फार कमी होती पण मला धोका पत्करायचा नव्हता. शिवाय प्रकाशक, आणि समीक्षकांशी संबंधित असलेला एक धाडसी प्रयोग मला करायचा होता.

ही कादंबरी मी माझ्या नेहमीच्या प्रकाशकांकडे पाठवली. पण त्यानी ती साभार परत केली. मग मला असं समजलं की त्या प्रकाशकांनी ती कादंबरी स्वतः वाचलीच नव्हती. ती इतर कोणालातरी वाचायला दिली होती. मायकेल जोसेफ हे माझ्या पहिल्या कादंबरीचे प्रकाशक. त्यांच्याकडे मी ही कादंबरी पाठवली आणि एका स्त्री पत्रकाराची म्हणून मला ती प्रसिद्ध करायची आहे असं सांगितलं. त्यांच्याकडे फिलिपा हॅरिसन ही एक हुशार महिला काम करत होती. कादंबरी वाचल्यावर ती उत्स्फूर्तपणे उद्‌गारली,"डोरिस लेसिंगच्या लेखनाची आठवण करून देणारी ही कादंबरी आहे." शेवटी ही महिला आपला गौप्यस्फोट करील या भीतीने तिलाही 'सत्य' सांगून मी माझ्या प्रयोगात सहभागी करून घेतले. माझे अमेरिकेतील प्रकाशक बॉब गॉटलिब यांनीही तर्काने वस्तुस्थिती जाणली. माझ्या फ्रेंच प्रकाशकांनी मला फोन केला,"मी आता एका नवोदित, इंग्लिश लेखिकेची पहिली कादंबरी विकत घेतली आहे. पण तू तिला त्या लेखनात मदत केली होतीस का?" त्यामुळे त्यालाही खरं सांगणं भाग पडलं. अखेर कादंबरी प्रकाशित करण्यापूर्वी माझ्या साहित्याच्या अभ्यासकांकडे मी ती पाठवली. पण एकाच्या सुद्धा मनात शंकेची पाल चुकचुकली नाही. एकंदरीत काय वरील चार व्यक्ती सोडल्या तर ही कादंबरी मी लिहिली आहे हे मान्यवर समीक्षकांना व इतर प्रकाशकांनासुद्धा समजलं नाही. अपेक्षेनुसार 'अनोळखी, नवोदित' लेखिकेच्या या पहिल्या कादंबरीचे 'थंडे स्वागत' या कादंबरीच्या वाट्याला आले. या कादंबरीची फारशी दखल कोणी घेतली नाही. या कादंबरीचे एक छोटेसे परीक्षण– ते सुद्धा बहुतेक स्त्री पत्रकारांनी लिहिलेले– कुठेतरी छापून आले. साहित्यिक यंत्रणेशी माझा घनिष्ट संबंध आला. त्यातल्या चांगल्या वाईट गोष्टींची मला कल्पना होती. 'जेन सोमर्स' या टोपण नावाने प्रसिद्ध केलेल्या पुस्तकाचं भवितव्य काय ठरणार हे मी जाणून होते. कॅनॅडियन टेलिव्हिजनवर झालेल्या मुलाखतीत हा प्रश्न मला विचारला होता. तेव्हा 'इंग्लिश समीक्षक' या पुस्तकाला चांगलं म्हणणार नाहीत असं भाकीत मी वर्तवलं होतं आणि ते तंतोतंत खरं ठरलं. या पुस्तकाबद्दल खोडसाळ, छोटेखानी परिक्षणे येऊन गेली. परंतु इतर देशात मात्र या पुस्तकाची उत्तम विक्री झाली. याउलट ज्या समीक्षकांनी आजपर्यंत प्रकाशित झालेल्या माझ्या एकाही पुस्तकाची दखल घेतली नव्हती त्यांना ही कादंबरी आवडली होती. या कादंबरीच्या लेखिकेला 'जेन सोमर्सला' वाचकांकडून चांगला प्रतिसाद मिळाला. कादंबरी आवडल्याची



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनेक पत्रे आली. तेव्हा याच टोपणनावानं आणखी एक कादंबरी लिहायचं मी ठरवून टाकलं.'

'जेन सोमर्स'ची व्यक्तिरेखा मी माझ्या मनाशी निश्चित केली होती. मध्यमवर्गीय, इंग्लिश, मर्यादित अनुभवांची पुंजी असलेली, नोकरीच्या विश्वात रममाण होणारी एक सर्वसामान्य महिला म्हणजे जेन सोमर्स ! तिने विश्वविद्यालयीन शिक्षण घेतले नव्हते. अगदी तरुण वयात तिने नोकरी करण्यास सुरुवात केली. ती घरून सरळ ऑफिसला जाई. ऑफिस हेच तिचे विश्व होते. तिचे लग्न झाले असले तरी तो एक उपचार होता. तिला मुले झाली नाहीत. बाहेरगावी जाणे तिला आवडत नसे. कधी कधी ऑफिसच्या कामासाठी तिला अन्य ठिकाणी जावे लागले तरी तिला घरी परतण्याची ओढ असे. एकंदरीत तिचे अनुभवविश्व अगदी संकुचित होते. कोणती गोष्ट बरोबर, कोणती चूक याबद्दलचे तिचे विचार निश्चित स्वरूपाचे होते. माझ्या परिचयातील अनेक व्यक्तिरेखा एकत्र करून मी 'जेन सोमर्स'ची व्यक्तिरेखा निश्चित केली होती. पोषाखाच्या बाबतीत चोखंदळ असलेली माझी मैत्रिण, माझी आई, आनंदी व सुखासीन बालपण असलेली पण अचानक वैधव्य नशिबी आलेली दुसरी मैत्रिण अशा अनेक व्यक्तिरेखांवरून मी 'जेन सोमर्ससी' व्यक्तिरेखा माझ्या मनाशी तयार केली होती. म्हणूनच मला तिच्या नावाने लिहिताना अनेक गोष्टींची काटछाट करावी लागली. तिच्या व्यक्तिमत्त्वाला साजेशा गोष्टींच फक्त लिहाव्या लागल्या. अमेरिकेतसुद्धा या कादंबरीचे उत्तम स्वागत झाले. एका अमेरिकन प्रकाशकाला पुस्तक फारच आवडले. पण 'लेखक प्रसिद्ध नसल्यामुळे आम्ही त्या पुस्तकाच्या प्रसिद्धीकरता काही करू शकत नाही' या शब्दात त्यानी दिलगिरी व्यक्त केली. म्हणजेच लेखकाची लोकप्रियता व्यक्तिमत्त्व, छायाचित्र, इतर माहिती या सर्वांची जोड त्यासाठी असावी लागते.'

"लेखकाचं नाव झालेलं असल्याशिवाय प्रकाशक त्या लेखकाच्या लेखनाचा गंभीरपणे विचार करीत नाहीत" हे दाखविण्यासाठीच हा टोपणनावाचा प्रयोग केला का? या वाचकांच्या प्रश्नावर त्या म्हणतात,"मला अगदी हे काळं आणि हे पांढरं असं स्पष्टपणे सांगायचं नाही. उत्कृष्ट कादंबरी प्रकाशित होणारच नाही असं मला म्हणायचं नाही. पण बहुतेक वेळेस अशा लेखकाला आपलं हस्तलिखित घेऊन अनेक प्रकाशकांचे दरवाजे ठोठावावे लागतील. मला माहीत असलेला प्रत्येक प्रकाशक आपल्या हातातून निसटलेल्या साहित्यकृतीबद्दल टीका करणाऱ्या गोष्टी सांगत राहतो. नाकारलेल्या साहित्यकृतींची यादीच प्रत्येक प्रकाशकाजवळ असते. पण मला वाटतं तरुण लेखक आश्रयावर फारच अवलंबून असतात आणि तीच फार वाईट वृत्ती आहे. जेन सोमर्सबद्दलच्या वाचकांच्या प्रतिक्रिया मला अपेक्षित अशाच होत्या. "जेननी प्रयत्न केला तर ती आणखी छान लिहू शकेल" अशा प्रकारची प्रतिक्रिया वाचकांकडून येणार हे मला आधीच ठाऊक होतं. उलटसुलट मते व्यक्त करणारी अनेक पत्रे मला आली. त्यापैकी एक पत्र तर फार मजेशीर होतं. त्यात लिहिलं होतं



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

एका रोमँटिक कादंबरीकार स्त्रीने. तिने एकोणसत्तर कादंबऱ्या लिहिल्या होत्या आणि लाखो प्रतींची विक्री झाली होती. त्या कादंबऱ्यांवर अजिबात टीका झाली नाही. ती लेखिका अतिशय श्रीमंत आहे. तिला या सर्वांचा कंटाळा आला म्हणून तिने आपली अडसष्टावी कादंबरी दुसऱ्या नावाने तिच्या प्रकाशकाकडे पाठवली. तिच्या प्रकाशकाने उत्तर पाठवले,'ही कादंबरी आमच्या प्रकाशन दर्जाइतकी नाही. तुम्ही यापेक्षा अधिक चांगले लेखन करावे. त्यानंतर तीच कादंबरी तिने त्याच प्रकाशकाकडे स्वत:च्या नावाने पाठवली. तेव्हा त्याचे उत्तर आले,"वा ! नेहमीप्रमाणेच तुमची कादंबरी अप्रतिम आहे !"

"वर्षानुवर्षे आपले हस्तलिखित घेऊन प्रकाशकांकडे फेऱ्या मारणाऱ्या लेखकांचीही पत्रे मला आली. त्यांनी स्वत:ची हस्तलिखितही मला वाचायला आणून दिली. ते लेखन खरोखरच चांगले नव्हते. पण आपलं लेखन दर्जेदार नाही याची त्या लेखकांना अजिबात जाणीव नव्हती; त्याचं मला फार आश्चर्य वाटतं. आपली खरी गुणवत्ता प्रकाशक ओळखत नाहीत असा त्यांचा ठाम समज होता व त्याचा त्यांना राग आला होता. बरं, दुर्दैवाने प्रकाशकही 'हे पहा, हे पुस्तक काही चांगलं नाही असं स्पष्टपणे सांगत नाहीत. उलट लेखकाला वाईट वाटू नये म्हणून 'तुमचं पुस्तक आमच्या प्रकाशनसंस्थेला योग्य नाही' असं उत्तर देतात. या उत्तरामुळे 'दुसऱ्या एखाद्या प्रकाशकाला आपलं पुस्तक आवडेल' अशी खोटी आशा लेखकाच्या मनात निर्माण होते, त्या आशेने तो वर्षानुवर्षे वेगवेगळ्या प्रकाशकांकडे जात राहातो. "तुम्ही आता या पुस्तकाचा नाद सोडून द्या आणि दुसरं पुस्तक लिहा" असा सहृदय आणि योग्य सल्ला प्रकाशकांनी लेखकांना द्यायला हवा असं मला वाटतं."

'विकलांगता आणि मृत्यू या दोहोंशी कसा सामना करायचा, त्याना कसं सामोरं जायचं याचे प्रशिक्षण 'दि डायरी ऑफ अ गुड नेबर' या कादंबरीच्या अभ्यासाने मिळेल. ही कादंबरी भावना हेलावणारी आहे. कधी कधी तर ही कादंबरी वाचणे अशक्य होते. "डोरिस लेसिंग त्या संदर्भात म्हणतात,"ज्यांनी कधीही वृद्धांचा सहवास घेतला नाही किंवा आपल्याजवळच्या व्यक्तीचा मृत्यू पाहिला नाही, अनुभवला नाही अशा व्यक्तींना ही कादंबरी वाचणे अशक्य वाटते. म्हातारपण आणि त्यामुळे आलेली शारीरिक विकलांगता ही अनेकदा बाधक ठरते, धक्कादायक वाटते. "या साऱ्याचा आपल्याला उबग येतो' असे बोलून आपण पळवाट काढत असतो. या उबग येण्याचं खरं कारण वेगळेच असतं. आपणही कधी ना कधीतरी त्या अवस्थेत जाणार आहोत आणि त्यावेळी लोकांना आपला ऊबग येईल ही भीती त्यांच्या मनात असते. आपण अगदी भाग्यवान असलो तरच अन्यथा आपल्याला या परिस्थितीला सामोरं जावं लागणार आहे म्हणून त्याची मानसिक तयारी करणे उचित ठरेल. माझ्या कादंबरीची निवेदिका जेन सोमर्स हिनेसुद्धा त्या वृद्धेची जबाबदारी स्वीकारताना अशीच मानसिक तयारी केली होती. वृद्धत्त्व, त्याच्या अनुषंगाने येणारी विकलांगता आणि



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दु:ख हे सारे तिला धक्कादायक व्हावे अशीच माझी इच्छा होती. म्हणून तर कादंबरीच्या सुरुवातीपासून जेन सोमर्स ही व्यक्तिरेखा मी अहंकारी आणि काहीशी भ्रमिष्ट अशीच उभी केली होती.''

'दि डायरी ऑफ अ गुड नेबर' या कादंबरीत एक मध्यमवयीन स्त्री एका जख्खड म्हातारीला तिच्या आयुष्याच्या अखेरच्या काळात मदत करते. याउलट 'मेमॉयर्स ऑफ अ सर्व्हायव्हर' या कादंबरीत वयात येणाऱ्या तरूणीचा विकास कसकसा होतो त्याचे सूक्ष्म निरीक्षण करते. या दोन गोष्टींची समांतरता वाचकांच्या लक्षात येते. दूर करता येणार नाही अशा अडथळ्यांमुळे दोन पिढ्या एकमेकांपासून दुरावतात. अतिवृद्ध आणि तरुण अशा दोन्ही वयाच्या माणसाना समजून घेणं, त्यांच्याशी सुसंवाद साधणं अशक्य आहे असं डोरिस लेसिंग याना सुचवायचं आहे असं वाचकाना वाटत राहतं. त्यावर त्या म्हणतात, ''कोणत्याही दोन पिढ्यांमध्ये अंतर असतं असं आपण नेहमी म्हणतो. पण ही संकल्पना मला फारशी पटत नाही. वृद्ध मंडळी अनुभवाने समृद्ध तर तरुण पिढी अननुभवी. माझ्या 'मेमॉयर्स ऑफ अ सर्व्हायव्हर' या कादंबरीत वयात येणारी तरुणी वृद्धेला समजून घेऊ शकत नाही. कारण तरुण-तरुणी अनुभवांच्या अभावामुळेच वृद्धांपासून विलग केली जातात. याउलट त्या वृद्ध स्त्रीला पौगंडावस्थेची पक्की जाणीव असते. कारण त्या अवस्थेतून ती स्वत: गेलेली असते, त्या अवस्थेतून जाण्याचा अनुभव तिच्या गाठीशी असतो. त्यामुळे त्या तरूणीच्या जागी आपण स्वत:च आहोत अशी कल्पना ती वृद्धा करते आणि तरूणीची सुखदु:खे समजून घेते. या कादंबरीतील निवेदकाची खात्री आहे की त्या वृद्धेला पडद्या-पाठीमागे काय चालले आहे ते समजते. वृद्धेला जाणवणारी ही स्वप्ननगरी म्हणजे प्रत्यक्ष त्या वृद्धेचेच जीवन आहे. तिच्या स्वत:च्या बालपणातील ते वास्तव आहे. कादंबरीतील वास्तवात वयात येत असलेली ॲमिली म्हणजे त्या वृद्धेच्या स्वत:च्या पौगंडावस्थेचे प्रतिबिंब आहे. या कादंबरीत वास्तव आणि स्वप्न हे एकमेकांना पूरक ठरतात आणि निवेदकाच्या भूतकाळाचे दर्शन घडवतात. गेली कित्येक वर्षे 'स्वप्नांमधून निर्माण होणारे आत्मचरित्र लिहावे' अशी इच्छा माझ्या मनात होती. परंतु तुटक, अस्पष्ट स्वप्नांच्या जुळणीतून अकृत्रिम आणि सुसंगत आत्मचरित्र लिहिणे हे जवळजवळ अशक्य गोष्ट होती. 'मेमॉयर्स ऑफ अ सर्व्हायव्हर' हे माझे काल्पनिक आत्मचरित्र आहे. त्यातील नेमकेपणा अडचणीत टाकणारा होता म्हणून की काय कोण जाणे, पण ही गोष्ट कोणाच्याच लक्षात आली नाही हे मात्र मला खटकतं.''

जेन सोमर्स या टोपणनावाने लिहिलेल्या कादंबरीत ''तरुणांना माहीत असतं तर / वृद्ध करू शकत असते तर''. हे पालुपद मोठ्या कुशलतेने डोरिस लेसिंग यानी वापरले आहे. त्या म्हणतात, ''मला सगळं माहीत आहे असं समजणं चुकीचं आहे. यापूर्वी लोकांनी सगळं सांगून ठेवलं आहे. पण आपणही म्हातारे होणार आहोत यावर लोक विश्वास ठेवत नाहीत.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

काळ वेगाने धावत असतो. थोड्याच काळात आपल्याला म्हातारपण येणार आहे याची जाणीव लोकांना होत नाही." प्रत्येक प्रकारची साहित्यकृती लिहिताना त्या उत्क्रांत होत गेल्या असाव्यात. म्हणूनच या कादंबऱ्यातील वास्तववादी सम्यक्‌दर्शनात पूर्वीपेक्षा अधिक अलिप्तपणा जाणवतो असे टीकाकारांना वाटते. त्यावर त्या म्हणतात,"तो बहुधा माझ्या वयाचा परिणाम असावा. आपण एक प्रकारे अलिप्त होतो. प्रत्येक पुस्तकाकडे 'एक सोडवण्याची समस्या' या दृष्टीने मी पाहते. त्यामुळे आपोआप कलाकृतीचा घाट निश्चित होतो. मी आता स्पेस फिक्शन लिहिणार आहे' असं ठरवून काही पुस्तक लिहिता येत नाही. तुम्ही लिहिण्याची सुरुवात करा, आपल्याला काय सांगायचंय ते निश्चित करा, तेच साहित्यकृतीचा घाट ठरवते."

'मेमॉयर्स ऑफ अ सर्व्हायव्हर' ही कादंबरी वाचल्यावर डोरिस लेसिंग भविष्यकाळाबद्दल सचिंत आहेत असं लक्षात येतं. भविष्यकाळात अंदाधुंदी माजेल आणि रानटीपणा दिसून येईल असा अंदाज डोरिस लेसिंग यानी वर्तवला होता. त्याबद्दल त्या म्हणतात,"मी अनेक पावसाळे पाहिले आहेत. परिस्थिती आणि घटनांची पुनरावृत्ती होत असते. एखादी परिस्थिती कधीही बदलणार नाही असे आपल्याला वाटत असतं. पण कधीकधी अगदी अकल्पितपणे बघता बघता एका रात्रीत त्या परिस्थितीत बदल होतो. आपले वय जसजसे वाढत जाते तसतशा अशा गोष्टी वारंवार पुन:पुन्हा घडताना आढळतात. माझ्या लहानपणी ऱ्होडेशियात (झिंबाब्वेत) गोऱ्या लोकांची राजवट होती. त्यात काहीही बदल होणार नाही खात्री वाटत होती. परंतु प्रत्यक्षात गोऱ्यांची सत्ता संपुष्टात आलेली मी पाहिली. दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी स्टालिन, हिटलर यांचा राजकारणावर इतका प्रभाव होता की ही माणसे कायमच अधिकार-पदावर राहणार अशी सर्वसामान्यांना खात्री वाटत होती. पण प्रत्यक्षात स्टालिनही गेला आणि हिटलरही गेला ! कायमस्वरूपी भासणाऱ्या सर्व प्रकारच्या गोष्टी काळाच्या ओघात नाहीशा होतात. मोठ्या चळवळी निर्माण होतात आणि कालांतराने त्यांचा ऱ्हास होतो हे आपण डोळ्यादेखत पाहातो. 'मेमॉयर्स ऑफ अ सर्व्हायव्हर' मध्ये मी हेच दाखविले आहे."

### अमेरिकेतील अनुभव

डोरिस लेसिंग पूर्वायुष्यात कम्युनिस्ट पार्टीच्या सदस्य होत्या. म्हणून कित्येक वर्षे अमेरिकन सरकारने त्यांना प्रवेश नाकारला होता. त्यानंतर १९६९ साली त्या प्रथम अमेरिकेला गेल्या. नॉफ हे लेसिंग यांचे अमेरिकेतील प्रकाशक आणि बॉब गॉटलिब हे संपादक – डोरिस लेसिंग यांच्या अमेरिकेतील वास्तव्यात प्रशंसनीय संपादनकौशल्य असणाऱ्या गॉट्लिब यांनी ठिकठिकाणी त्यांच्या व्याख्यानांचे आयोजन करण्यास मदत केली. न्यूयॉर्क, बर्कले विद्यापीठातही त्यांनी व्याख्याने दिली. ती व्याख्याने ऐकण्यासाठी युवक-युवतीनी गर्दी केली. व्याख्यानाला उत्तम प्रतिसाद दिला. सळसळत्या उत्साहाने



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

विद्यार्थ्यांनी आपल्या शंकांचे निरसन करून घेतले. युवकांमधील ओसंडून जाणारी कार्यशक्ती पाहून डोरिस लेसिंग यांना आश्चर्य वाटले. अमेरिकेतील उदारमतवादाने त्या प्रभावित झाल्या. गतकाळातील स्मृतीना उजाळा देत त्या म्हणतात, "अमेरिकेतील जनतेला माझे लेखन अधिक चांगल्या तऱ्हेने समजले आहे. इंग्लंडमध्ये जर एखादा लेखक नियमितपणे लेखन करू लागला तर पुढे पुढे त्या लेखनाकडे दुर्लक्ष होते, त्या लेखनाची फारशी दखल घेतली जात नाही. परंतु अमेरिकेमध्ये समीक्षक लेखकाने लिहिलेल्या प्रत्येक कलाकृतीची छाननी करतात. लेखन प्रवासातील अडथळे दूर करीत, अडीअडचणींवर मात करीत प्रयत्नपूर्वक केलेल्या लेखनाचा हे समीक्षक आस्थापूर्वक विचार करतात असं मला वाटतं."

"ब्रिटिश लेखक आणि विद्यापीठ यांचा एकमेकांशी फारसा संबंध येत नाही. परंतु अमेरिकेत याच्या उलट परिस्थिती आहे. तेथील विद्यापीठात निर्मितीक्षम लेखन कसे करावे यांचे प्रशिक्षण देणारे कार्यक्रम असतात. अशा कार्यक्रमांना संकुचित कुंपण घातलेले नसते. लेखक तेथे येऊन राहतात. स्वत:चे काम करतात. शिवाय आठवड्यातून एक-दोन वेळा ते विद्यार्थ्यांची भेट घेतात. त्यांना मार्गदर्शन करतात. पण इंग्लंडमध्ये लेखकाना एखाद्या मासिकाकरिता किंवा प्रकाशन संस्थांमध्ये काम करावे लागते."

डोरिस लेसिंग पूर्णवेळ प्राध्यापक म्हणून अमेरिकेतील विद्यापीठात येण्यास तयार आहेत का? असा प्रश्न उपस्थित केल्यावर त्या म्हणतात, "अशी जबाबदारी मी स्वीकारणार नाही. अवघ्या चौदाव्या वर्षी मी शाळा सोडली. त्याआधी मी फारच थोडं ज्ञान मिळवलं होतं. या तुटपुंज्या ज्ञानावर एवढे मोठे पद स्वीकारणे मला योग्य वाटत नाही." विसाव्या शतकातील इंग्लिश साहित्यात निर्विवादपणे आपले मानाचे स्थान प्रस्थापित करणाऱ्या या लेखिकेला ही जबाबदारी पेलणे अवघड वाटावे याचे लोकांना आश्चर्य वाटले. सद्यास्थितीत व्यावसायिक शिक्षणाचे जग खरोखरच जाचक आहे. प्रज्ञावान् व्यक्तीने जर पुरेसे व्यावसायिक शिक्षण घेतले नाही तर त्याच्या उत्कर्षाचे दरवाजे बंद होतात ही वस्तुस्थिती लोकांच्या लक्षात आली.

डोरिस लेसिंग यांच्या लेखनशैलीचा आणि व्यक्तिमत्त्वाचा जबरदस्त प्रभाव अमेरिकेतील अनेक मान्यवर व्यक्तींवर पडला होता. ते सर्व लेसिंगचे चाहते बनले परंतु डोरिस लेसिंग यानी आपले शिष्यत्व घेण्यासाठी किंवा अनुयायित्व पत्करण्यासाठी कधीच कोणाला उद्युक्त केले नाही. विद्यमान काळ आणि आपण याची सांगड घालताना त्या म्हणतात, "मी डिनॉसॉर आहे असं मला वाटतं. नवनवीन तंत्रज्ञान मला अजिबात समजत नाही. 'बार्नस् आणि नोबल' यांच्याकरिता मी इंटरनेटवर होते. तेव्हा ऑस्ट्रेलिया, कॅनडा, फ्रान्स यासारख्या अनेक देशातील लोकांनी मला फोन केले. मी त्यांच्याशी अनौपचारिक गप्पा मारल्या. तरीसुद्धा आपण वास्तवापासून दूर आहोत असं मला तीव्रतेनं वाटत होतं. त्यातल्या त्यात 'इ-मेल' ही कल्पना मला चांगली वाटते. पण या वयात (पंचाऐंशीव्या वर्षी) मी संगणक शिकण्याची आणि वापरण्याची तसदी घ्यावी असं मला वाटत नाही. माझं सर्व लेखन मी टाइपरायटरवर



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

करते.''

"या विश्वाच्या पसाऱ्यात मानवजाती टिकून राहायला हवी असेल तर माणसांनी पर्यावरणाशी जुळवून घेतले पाहिजे. कित्येक नवीन कल्पनांचा स्वीकार केला पाहिजे. कधी कधी परस्परविरोधी भासणाऱ्या कल्पनासुद्धा ग्रह्य धरल्या पाहिजेत. व्यक्ती म्हणून स्वतंत्र विचार केला पाहिजे. समूहाच्या मानसिकतेला आपण बळी पडता कामा नये.'' असा अत्यंत मौल्यवान आणि देशस्थलकालातीत सल्ला डोरिस लेसिंग देतात. वयाच्या पंचाऐंशीच्या वर्षीसुद्धा त्यांची स्वतंत्रपणे विचार करण्याची शक्ती पूर्णपणे जागृत आहे.

"भविष्यकाळ कसा असेल?'' असा प्रश्न उपस्थित केल्यावर त्या म्हणतात,"पुढच्या शतकात माणसाचं आयुष्य कसं बदलेलं याचं सुरेख चित्रण 'आर्थर क्लार्क' या विज्ञानकथा-लेखकानं नुकतंच केलं आहे. त्यांचं म्हणणं काय आहे हे आजच्या तरुणांना नक्कीच समजेल. मला मात्र त्यातल्या अर्ध्याअधिक गोष्टी समजल्या नाहीत. कारण मी अजून भूतकाळात वावरतेय. अतिप्रगत तंत्रज्ञानामुळे काही बाबतीत आपलं नुकसान झालं आहे. हल्लीच्या कितीतरी मुलांना लांबलचक मोठं वाक्यसुद्धा नीट वाचता येत नाही, मग मोठ्या पुस्तकांची तर गोष्टच सोडा !''

"चारशे वर्षांपूर्वी जेव्हा छपाईची कला मानवाला अवगत झाली. तेव्हा माणसाने काही बौद्धिक क्षमता गमावल्या. मौखिक पाठांतराची क्षमता कमी झाली. आपण पूर्वी करत होतो त्याप्रमाणे आफ्रिकेमध्ये आजही तीव्र स्मरणशक्तीच्या जोरावर सर्व गोष्टी लक्षात ठेवणारी माणसे आहेत. पण आपल्याला आपल्या नातेवाईकांचे, मित्रमंडळीचे, संबंधितांचे पत्ते आणि फोन नंबर लक्षात राहात नाहीत. वह्यातून धांडोळून ते मिळवावे लागतात. आणखी एक बदल मला जाणवतो. हल्लीचे तरुण अधिकाधिक उत्तेजकांची अधिकाखाणीने मागणी करताना दिसतात. उत्तेजकांच्या यासारख्या मागणीमुळे माणसं कंटाळतात. त्याना शांतता हवी असते. मग ती शांतता मिळवण्यासाठी बरेच लोक अलिकडे बौद्ध धर्माकडे वळताना दिसतात. त्यामानाने मी खरोखरीच भाग्यवान आहे. माझ्या घरी रात्री जरासुद्धा आवाज येत नाही. माझ्या घरातली ही शांतता आनंददायक आहे.''

"मी माझ्या आयुष्यातील एका टप्प्याच्या अखेरीस येऊन पोहोचले आहे. मी आता काहीतरी नवीन घडण्याची वाट पहात आहे. असं काहीतरी घडेल याची मला सुतराम् कल्पना नसते. तरीसुद्धा घटना घडतात. कोणत्याही नवीन गोष्टीचा अव्हेर करण्याकडे सर्वसामान्य माणसाचा कल असतो. या सहजप्रवृत्तीनुसार कोणतीही नवीन गोष्ट आपण उत्स्फूर्तपणे नाकारतो. पण आपण जर अशा अनपेक्षित घटनांवर लक्ष ठेवले तर आपण त्या घटनांचे आनंदाने स्वागत करतो. स्वत:च्या जीवनाकडे पाहाण्याचा दृष्टिकोन मी सतत बदलते. म्हणून भूतकाळही मला वेगळा वाटतो.''

वृद्धापकाळातील आपल्या जीवनाबद्दल डोरिस लेसिंग म्हणतात, "गेल्या वर्षी मी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अथेन्स, व्हिएन्ना, झिंबाव्वे असा प्रदीर्घ प्रवास केला होता. खूप दगदग झाली. त्याचा परिणाम म्हणून की काय गेल्या वर्षी नाताळच्या आधी मला अर्धांगाचा सौम्य झटका आला. एके दिवशी सकाळी उठले तेव्हा मला हात उचलताच येईना. माझा एक हात लुळा पडला. माझ्या वाचेवर परिणाम झाला. माझ्यां मनातली शंका खरी ठरली. डॉक्टरांनी त्यावर शिक्कामोर्तब केले. कालांतराने मी त्यातून सहीसलामत बाहेर पडले. पण मला घाबरावयाला तो सौम्य झटका पुरेसा होता. तेव्हापासून माझ्या मनात मृत्युबद्दलचे विचार सतत घोळत असतात. आता आणखी किती काळ मी जगणार आहे हे मला माहीत नाही. त्यामुळे एखादे नवीन पुस्तक लिहायला घेताना माझे मन साशंक असते. आपण हे काम करायला घ्यावे का? आपल्या हातून ते पूर्ण होईल का? अशा तऱ्हेच्या शंकांचं काहूर माझ्या मनात उठतं अखेरचे बोलावणे येण्यापूर्वी मला अजून किती वर्षे जगता येईल, त्या कालावधीत मला किती पुस्तके लिहिता येतील हा हिशेब माझ्या मनात चालू असतो."

"वृद्धत्त्वामध्ये काही आनंददायक गोष्टी आहेत का?" असा प्रश्न विचारल्यावर डोरिस लेसिंग म्हणतात, "वृद्धत्त्वाच्या दिशेने होणारी वाटचाल कंटाळवाणीच असते. वयामुळे सर्व सांधे आखडतात. त्याचा मला त्रास होतो. दिवसेंदिवस घराबाहेर पडणे कष्टदायक होऊ लागले आहे. त्यामुळे मानसिक दौर्बल्य येते. याउलट वाढत्या वयाबरोबर मनाचा समतोल–पणाही येतो. चित्तवृत्ती शांत होतात. तारुण्यात ज्या गोष्टी अवास्तव महत्त्वाच्या वाटतात त्या गोष्टींची असोशी कमी होते. वृद्धापकाळातील ही शांतचित्तता मला आनंददायी वाटते."

"माझ्या डोक्यात कल्पनांची कमतरता कधीच नसते. पण त्यापैकी कोणत्या कल्पनांचा या वयात पाठपुरावा करायचा याबाबतीत आता मला काळजीपूर्वक निर्णय घ्यायला लागतो. पूर्वी चांगल्या न लिहिल्या गेलेल्या कादंबऱ्या मी फाडून टाकल्या आहेत. विस्कळीत लिखाण तसेच ठेवणं मला आवडत नाही. मी ते लिखाण फाडून टाकते."

"यमराजाचे बोलावणे येईपर्यंत लेखकाचे आयुष्य ही त्याची खाजगी बाब असते. काही गोष्टींबद्दल मी अजिबात भाष्य करीत नाही. पण मी रोजनिशी लिहिते. दीर्घकाळपर्यंत ती रोजनिशी जाहीरपणे वाचता येणार नाही आणि समजा लोकांनी ती वाचली तरी त्यातून काय निष्पन्न होणार? मी आजपर्यंत लिहिलेल्या पुस्तकांमधून जे निष्कर्ष काढता येतील त्यापेक्षा वेगळं काही त्या रोजनिशीतून समजणार नाही असं मला वाटतं. लेखकाचे सडेतोड विचार समजल्यासुद्धा लोकांना लेखकाच्या वैयक्तिक आयुष्यात का डोकवावंसं वाटतं याचं मला आश्चर्य वाटतं. लेखकाचे खाजगी आयुष्य समजल्यामुळे खरंच काही फरक पडतो का? आपल्याविषयी जगाला काय माहीत आहे आणि काय नाही याविषयी उपेक्षा केलेली बरी. समजा एखादी खाजगी बाब तुम्ही उघड करून सांगितली तरी सर्वसामान्य लोकांना त्याचा अर्थ समजतो असं नाही. त्याच पिढीतील आणि जवळपास तशाच प्रकारचे अनुभव घेतलेल्या काही व्यक्तींनाच त्याचा बोध होतो. एकूण काय, आपण सर्वजण आपला खाजगी-



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

पणा जपत असतो.''

डोरिस लेसिंग यांच्या कथांनी अनेकांचे जीवन उजळून निघाले. त्यांच्या कादंबऱ्यांमुळे अनेक तरुणींच्या वैयक्तिक आणि खाजगी प्रश्नांची उकल झाली. त्यांची प्रत्येक कादंबरी हा एक आगळावेगळा प्रयोग आहे. त्यातून त्या जीवनाचा शोध घेण्याचा प्रयत्न करतात, आत्मोन्नतीचा मार्ग शोधतात आणि वाचकांचेही रूपांतर घडवून आणतात. वाचक जेव्हा डोरिस लेसिंग यांची पुस्तके अथपासून इतिपर्यंत वाचतात तेव्हा त्या कथानकाबरोबरच रेखाटलेल्या आत्म्याच्या उत्क्रांतीमुळे वाचकांचीही मानसिक उत्क्रांती सहज घडून येते. डोरिस लेसिंग आणि अन्य मान्यवर लेखकांच्या ललितकलाकृतींचा समाजमनावर परिणाम होत असतो, पण तो झटपट होत नाही मंद गतीने होतो. त्यांनी आपल्याकरिता किती मोठे काम करून ठेवले आहे याची जाणीव होण्यासाठीही काही वर्षांचा कालावधी जावा लागतो. तरल संवेदनशीलता, जीवन तावून सुलाखून घेणाऱ्या स्वत:च्या अनुभवातून मनाच्या खोल कप्प्यातून आलेले शब्द आणि काळाच्या चैतन्यातून साकार झालेलं लेखन हे त्यांच वैशिष्ट्य. 'जीवन जगणे हा एक नितांत सुंदर'प्रवास आहे' असे मानणाऱ्या या लेखिकेने आपल्या साहित्याची अभिनव भेट वाचकांना देऊन वाचकांचा जीवनप्रवास सुखकर व संपन्न करण्याचा प्रयत्न केला आहे. त्या भेटीचा स्वीकार करून त्याचा सन्मान केला पाहिजे.

## डोरिस लेसिंग यांच्या दोन मुलाखती

### (१) लेखक प्राध्यापक असतो का?

पॅरिसमधून प्रसिद्ध होणाऱ्या LIRE (वाचन) च्या एप्रिल १९९९ च्या अंकात ती प्रसिद्ध झाली होती. नॉं-मोरीस द मॉंट्रेनी यांनी ती घेतली होती.

**प्रश्न : गोल्डन नोटबुक** – ही कादंबरी प्रसिद्ध चाळीस वर्षे झाली. या कादंबरीत 'स्वातंत्र्या' विषयी कर्तव्य असलेल्या प्रौढांचे चित्रण केलेले आहे. हे प्रौढ आपल्या स्वत:चे अगदी कापूस पिंजल्यागत विश्लेषण करतात, बेसुमार मद्य पितात, भांडतात, पुन्हा दिलजमाई होते. प्रचलित असलेल्या सिद्धांताची आणि तत्त्वज्ञानाची त्यांच्याशी भिडून चर्चा करतात. एकमेकांना आव्हान देतात. उदा. 'पुरुष विरुद्ध स्त्रिया या विषयासारख्या विषयांवर. हे सारे एकीकडे करीत असतात. परंतु त्याच वेळी गोंधळलेली मुले या प्रौढांचे निरीक्षण करतात. FIFTH CHILD (पाचवे अपत्य) ही आपली अलीकडची कादंबरी. या कादंबरीत **गोल्डन नोटबुक** जे काही चित्रण केलेले आहे त्याच्याविरुद्ध अगदी नेमकेपणाने केलेले चित्रण आहे. (या पाचव्या अपत्याचे नाव **बेन**) या मुलाचे माता-पिता हे चांगले स्थिरावलेले, सदिच्छानी ओतप्रत भरलेले दिसतात. याउलट त्यांचा मुलगा **बेन** हा एक मानसशास्त्रीय अग्निगोल (Bomb) असावा. सुखी कुटुंब याबाबत त्या मातापित्यांचे जे स्वप्न असते, ते बेन साफ उद्ध्वस्त करतो. विचारांचे जे प्रचलित वारे असतात त्याविरुद्ध जाण्यात



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

आपल्याला आनंद होतो का? म्हणजे 'बंड करणे' हा विचार हवेत असताना बंड करणे या विचाराला आपली सहानुभूती नाही हे सांगण्यात आपल्याला आनंद वाटतो का? समाजाशी जुळवून घेणे हा विचार जेव्हा प्रचलित व फॅशनेबल होईल तेव्हा आपण त्या विचाराबद्दल सहानुभूती दाखविणार नाहीत का?

**लेसिंग :** मी लेखक आहे. फक्त लेखक असे सांगावयास मला आवडेल. विद्यमान काळात जगणारी एक व्यक्ती. एखाद्या **महान प्रकल्पाची** मी धर्मगुरू नाही. इ. स. १९६० ते १९७० च्या दरम्यानच्या काळातील स्त्री-मुक्तीवादी चळवळीतील ठोकळेबाज व्यक्ती (Sterotype) यांच्या संबंधी मी प्रबंध लिहित नाही. मला त्या कादंबरीच्या अगदी अखेरच्या कालखंडापर्यंत एक गोष्ट सांगावयाची होती. ही गोष्टी सुद्धा अशी की जिचे राजकीय वा सामाजिक विश्लेषण अगदी त्याच्या बारीकसारीक तपशीलात जाऊन केले, तरी ते अपुरेच ठरेल अशी. हाच न्याय माझ्या सर्वच पुस्तकांच्या बाबतीत आहे. – यात अर्थातच **फिफ्थ चाईल्ड** ही कादंबरी आलीच. एखाद्या विशिष्ट कालखंडात समाजातील जवळजवळ सर्वच लोकांना ज्या प्रश्नांना सामोरे जावयाचे असते, त्याबद्दल मी माझ्या मगदूराप्रमाणे लिहिण्याचा प्रयत्न करते. या पलीकडे जाण्यावर म्हणजे भविष्यकाळाची दिशा दर्शविणे, एखाद्या गोष्टीचा, घडामोडीचा निषेध करणे, कशाबद्दल तरी आपली मते कंठरवाने जाहीर करणे, हीच लेखकाची सामाजिक भूमिका आहे यावर माझा विश्वास नाही वा तशी माझी श्रद्धाही नाही. अथवा या प्रकारची भूमिका त्याने वठविणे आवश्यक आहे असे मला वाटत नाही. **एवंच लेखक हा प्राध्यापक नाही.**

ते काहीही असो लेखक हा प्राध्यापक आहे हा जणू एक सर्वसामान्य नियम आहे अशा प्रकारे मी 'लेखक' या व्यक्तीबद्दल बोलणे हे निखालसपणे, नि:संशयपणे चुकीचे आहे. माझेच उदाहरण घ्या. कल्पनाधिष्टित अशी कार्यक्रम पत्रिका, अगर सामाजिक वागणूक कशी करावी याविषयी संबंधी मार्गदिपिका सादर करण्याची माझी इच्छा नव्हती. समजा यदा-कदाचित अशी कार्यक्रम पत्रिका माझ्याकडे असली तर मग निश्चितपणे मी कधीही लेखन केले नसते. स्त्रिया या अशा – अशा प्रकारच्या आहेत. पुरुष हे स्त्रियांच्या दृष्टीने जटीलच प्रश्न असतो. त्यांच्याबरोबर विद्यमानकाळाच्या पुढे स्त्रियांचे संबंध या-ना त्या प्रकारचे असावयास हवेत, आपल्या मुलांना याच प्रकारचे शिक्षण मिळावयास हवे. बर्लिनमध्ये भिंत तोडली जात असताना ज्या काही घटना घडत होत्या, त्यासंबंधी सरकारने एक विशिष्ट कायदा जाहीर करावयास हवा होता. विशेष करून त्याकाळात ज्या घटना घडल्या, त्या विशिष्ट प्रवृत्तीच्या निर्देशक आहेत, हे त्या कायद्यात ग्रथित करावयास हवे. मोंगोलिया, निकाराग्नुवा, मिखिल गोर्बाच्याही, अगर मिसेस थॅचर या सर्वांना अमूक-अमूक दिशेने आगेकूच करावयास हवी असे मी सांगितले असते. खरे म्हणजे यातले मला काय ज्ञातही नसेल?



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

वस्तुस्थिती अशी आहे की सर्व प्रथम या विषयसंबंधी मी फारसा विचारच करीत नाही. विद्यमान घटकेला जे प्रश्न असतात, ते मला ज्ञात असतात. खरे म्हणजे ते सर्व जगालाच ज्ञात असतात. मी अनेक कादंबऱ्या लिहिल्या आहेत ही वस्तुस्थिती आहे. परंतु दूरदर्शन पहाणाऱ्या सर्वसामान्य प्रेक्षकापेक्षा मी अधिक चांगली भविष्यवेत्ती आहे हा गुण मी अनेक कादंबऱ्या लिहिल्या आहेत या वस्तुस्थितीमुळे मला प्राप्त होत नाही.

**प्रश्न :** ते काहीही असो. आपण कम्युनिस्ट पक्षाच्या सदस्य होतात.

**लेसिंग :** नक्कीच. १९५० नंतरची दोन-तीन वर्षे. ब्रिटिश कम्युनिस्ट पक्षाच्या अखत्यारीतील तो भाग, म्हणजे की तो आफ्रिकन कम्युनिस्ट पक्ष अगदी-अगदी पक्का ब्रिटिश कम्युनिस्ट पक्ष होता. आम्ही वादविवाद करीत होता. चहापान करीत होतो. समजा मी फ्रेंच कम्युनिस्ट पक्षाच्या कार्यकर्त्यांच्या सभेत सहभागी झाले असते तर, – आपण फ्रेंच आहात म्हणून मी काय सांगते आहे ते आपणास नक्कीच समजेल – तर्काला कोणतीही सूट न देणाऱ्या आणि सैद्धांतिक बाबतीत लक्षणीय अशी सुसंगतता – फ्रेंचाची जी खासियत आहे. – त्याचा अनुभव मला मिळाला असता. इंग्लिश कम्युनिस्ट पक्षाशी ही वैशिष्टे फारच कमी प्रमाणात मिळती-जुळती आहेत. फ्रेंच राज्यक्रांतीतील जॅकोबिनिझम ही जी विचारधारा होती ती फ्रेंच कम्युनिस्ट पक्षाने आत्मक्षात करून आखीव-रेखीव केली होती. याउलट समाजाशी फटकून वागणाऱ्या एखाद्या बिरादरीचे (Club) स्वरूप ब्रिटीश कम्युनिस्ट पक्षाला होते. ब्रिटीश समाजाची एक खास प्रकृती आहे. तो समाज एका भयानक जातीव्यवस्थेला पाठिंबा देतो. लोकांना एका विशिष्ट कक्षात बंदिस्त करतो. या अशा सामाजिक व्यवस्थेविरुद्ध ब्रिटीश कम्युनिस्ट पक्ष झिंम्बाब्वेतील ब्रिटीश राजवटीला असलेल्या आमच्या विरोधाचे एका विशिष्ट परिणामकारकतेने प्रतिनिधित्व करीत होती.

ही जी ब्रिटीश समाजव्यवस्था आहे – संभाषणाच्या ओघात आपल्या परवानगीने मी हे विधान करीत आहे – ती विद्यमानकाळीही अगदी घट्टपणे पाय रोवून उभी आहे. या समाजव्यवस्थेची **दि फिफ्थ चाईल्ड** या कादंबरीवर सखोल छाप उमटलेली आहे. मी लंडन– स्थित होण्यापूर्वी कितीतरी अगोदर मी कम्युनिस्ट होते. निदान स्वतःला तसे म्हणवून घेत होते. माझ्यावर कोणालाही कसलेही बंधन लादता येणार नाही अशी कम्युनिस्ट होते. झिंम्बाब्वेत खरे म्हणजे कम्युनिस्ट पक्षच नव्हता. पण इंग्लडपेक्षाही अधिक प्रमाणात मी झिंम्बाब्वेत 'बिनधास्त' होते.

नंतर मला जाण आली. आम्ही कम्युनिस्ट आहोत अशी बनावणी करीत आहोत. प्रत्येक पक्ष हा फक्त 'कम्युनिस्ट' होता. आम्ही कम्युनिझिम कधी अवतरणार याची वाट पहात होतो. विशिष्ट पक्षाबद्दल काही कर्तव्य आहे याच्याशी 'कम्युनिस्ट' विचारांचा काहीही संबंध नव्हता!

**प्रश्न :** स्त्रियांबद्दल गौरवाने बोलणाऱ्यांपैकी आपण एक आहात. अर्थात निश्चितपणे असे सांगता येईल की याबाबतीत आपण आदर्शच आहात. आपण ज्याचे वर्णन – स्त्री-पुरुष





मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

संबंध – एक जटील प्रश्न असे केले आहात त्या प्रश्नाचे आजवर ज्यांनी पृथ्थकरण केले आहे त्यानाही ज्याची बरोबरी करता येणार नाही अशा आहात्.

**लेसिंग :** लेखक या नात्याने माझी जी मर्यादा आहे त्यात राहून मला आपण म्हणालात ती वस्तुस्थिती आहे की नाही हे मला सांगता येणार नाही. 'स्त्री-पुरुष' संबंध याबाबतचे जे प्रश्न आहेत त्याचे पृथ्थकरण व विश्लेषण करण्याच्या हेतूने ग्रंथ लिहिता येतील का? मी याबद्दल तशी साशंकच आहे. याऐवजी मी असे म्हटले आहे की 'स्त्री-पुरुष संबंधा'मध्ये अनेक प्रश्न जरूर अनुस्यूत आहेत आणि माझ्या लिखाणातून ते प्रश्न प्रतिबिंबित होतात. हे सारे प्रश्न निश्चित अशा परिस्थितीतून वर येतात. स्त्री व पुरुष यांचा दृष्टीकोन एकच नसला, तर त्या प्रश्नात अंर्तभूत असलेल्या शक्ती वा घटना उघड वा स्पष्ट करणे वा दडवून ठेवणे यांची माझ्या पुस्तकांनी दखले घेतली आहे. यात **दि फिफ्थ चाईल्ड** या कादंबरीचा समावेश आहे. आपले अपत्य **बेन** याला कसे हाताळावे याविषयी माता-पित्यात मतभेद आहेत. परंतु माता-पित्यानी आपल्या अपत्याला कसे वाढवावे याचा तो सत्य व वास्तव असा युक्तीवाद समजला जावा याचा तो युक्तीवाद प्रतिनिधी नाही. तसे असले तरी मी हा विषय आपलासा करून मी त्यात तज्ज्ञ आहे असे समजले जाते.

माझ्या एका आत्मनिरीक्षणापासून आपण सुरुवात करू या. एखादी ठोस व निश्चित प्रतिक्रिया कशी व्यक्त करावी हे मला कधीच ज्ञात झाले नाही. अनेक दिवस मला या भावनेने पधाडले होते. त्रस्त केले होते. स्त्री जेव्हा पुरुषावर प्रेम करते. तेव्हा आपली अस्मिता व वैशिष्ट (identity) कायमचे गमावून बसण्याचा धोका स्त्री नेहमीच का पत्करते? हे प्रेमसंबंध बिघडले वा अयशस्वी ठरले, तर या धक्यातून सावरणे तिला जवळजवळ अशक्य. परंतु लक्षवेधी व दिमखदार प्रेमसंबंधाचे तारू फुटण्याचे प्रसंग आले तरी पुरुष आपले स्थान पुन्हा एकदा प्रस्थापित करून घेतात. होय आणखी एक प्रश्न आहे. आपल्या अस्तित्वतेच्या आतल्या भागात स्त्रियाना पुरुषाशिवाय का बरे राहता येत नाही. याउलट पुरुषानी पुन्हा एकदा आपल्या लैंगिक भावना – प्रश्न यांची नीट व्यवस्था लावली की सरतेशेवटी त्यांचे सर्व ठीकठाक व चांगलेच होते. स्त्री वा स्त्रिया यांच्याबरोबरच्या भावनिक लैंगिक संबंधापासून आपल्याला अलिप्त ठेवण्यात आपली नोकरी, महत्त्वाकांक्षा, तत्त्वज्ञान, आधिभौतिकता, खेळ, अगर आपली मोटार यांच्याबरोबर असलेला सहभाग पुरुषाना प्रथम अवसर देतो व मागाहून त्यांना साथ देतो. अधिक करून काळ जसा पुढे जात आहे, तसतसे मला असे दिसू लागले आहे की, स्त्रियांचे पुरुषावर केंद्रित झालेले मन, हा मुद्दा 'स्त्री-मुक्तीवादा'चा मूलस्त्रोत आहे. सरतेशेवटी 'स्त्री-मुक्तीवादा'चे हास्यास्पद व दिमाखदार लेबल चिकटायला येईल असाच तो विचार आहे.

**प्रश्न :** आपणास नेमके काय सांगायचे आहे?

**लेसिंग :** नेमके एकच सांगायचे आहे. एक अत्यंत आवश्यक असा युक्तीवाद आहे.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

पाश्चिमात्य जगातील स्त्रियाना त्या ज्या ज्या ठिकाणी काम करतात, त्या ठिकाणी खात्रीदायक परिस्थिती, स्त्री-पुरुष वेतनातील समानता आणि स्त्रियाना स्वायत्तता स्त्री-मुक्तीवादी विचारसरणीमुळे प्राप्त झाली आहे; आणि अजूनही प्राप्त करून देत आहे. याउलट ज्या स्त्री-मुक्तीवादी चळवळीत फक्त **स्त्रियांचाच समावेश आहे** त्या पुरुषांच्यातील त्रुटीसंबंधी कल्पांतापर्यंत रवंथ करण्याकरिता त्या स्त्रिया एकत्र येतात. अर्थात अशा सभात पुरुष नसतातच. या सभातून पुरुषांच्यातील त्रुटींची चर्चा होते. आपल्या सर्व प्रकारच्या दु:खाबद्दल सभेला उपस्थित असलेल्यात चर्चा व फेकाफेकी होते. थोड्याच वेळापूर्वी ज्या परदास्याबद्दल बोलले ते परदास्य या सभातील चर्चामुळे धगधगते होते. चांगल्या स्त्रियांच्या बालीश बडबडीची ही आधुनिक आवृत्ती आहे. पराकोटीचा स्त्री-युक्तीवाद खरे म्हणजे केवळ एक साधन, शस्त्र वा अवजार असावयास हवे त्याऐवजी तो एक साध्य बनला. पुरुषाबद्दल वाटणारे संपूर्ण आकर्षण या प्रकारच्या स्त्री-मुक्तीवादातून प्रतिबिंबित होते, अशी माझी श्रद्धा आहे. पण मला या सर्वाबद्दल निश्चित असे काही सांगता येणार नाही. उदा. सिमाँ द बुव्हार यांचे स्त्री- मुक्तीवादावर खरोखरच प्रेम होते अगर त्याला केवळ प्रोत्साहन द्यावे अशी तिची इच्छा होती. परंतु तिच्या दृष्टीकोनातून आदर्श स्त्रीत्व या संकल्पनेचे नाव जाँ पॉल सार्त्र हे होते.

तथापि मी हे जे काही सांगितले आहे. त्याचा माझ्या लिखाणाशी फारसा संबंध नाही. अनेक चांगल्या व भल्या व्यक्तींना आपआपल्या परीने ह्या प्रकारचा अनुभव आला आहे, अशी माझी श्रद्धा आहे. मी लिहिलेल्या पुस्तकापेक्षाही या मुद्याची मला जीवनाने निश्चितपणे शिकवण दिली आहे. अविवाहित राहणे इत्यादी हीच माझी प्रकृती होती हे नि:शंकपणे मला कालौघात उमजले होते. माझ्या पुस्तकांपासून आपण दोघे फारच दूरवर आले आहोत.

**प्रश्न :** ते काहीही असो. आपल्या सर्वच पुस्तकांबद्दल एक विधान करता येईल विशेष करून चिल्ड्रेन ऑफ व्हायोलन्स (हिंसेची अपत्ये) या नावाची कादंबरी मालिका ही आपल्या स्वत:च्या तरुणपणाला जवळची नाही का? त्या कादंबऱ्याचे मूळ आपल्या तरुणपणातच घट्टपणे मूळ धरून नाही आहे का? वसाहत अंकीत आफ्रिका. त्याठिकाणची महाकाय शेते, क्रांती इत्यादीत त्या कादंबरी मालिकेची मुळे अगदी पक्केपणी आहेत.

**लेसिंग :** अगदी नेमकेपणे बोलायचे झाल्यास, त्या परिस्थितीतून जे विचार व भावना उफाळून येतात, त्या भावनांचे जगावर रोपण करण्यास मला माझ्या पुस्तकांनी कदाचित अवसर दिला असेल. मी दुभंगणारी अगर मोडून पडणारी व्यक्ती नाही. कालौघात मी वारंवार 'कठीण' (Ossified) बनत गेले. असे होत असताना मी काही आभासाना – म्हणजे माझ्याकडे काही सिद्धांत आहेत या आभासाना – शरण जाते. विद्यमान काळीही माझे अनेक टिकाकार आहेत. उदा. दि गोल्डन नोटबुक ही कादंबरी मालिका कालबाह्य आहे. मी मार्क्सवादी आहे, प्रगतीवादी आहे असा विचार करून मी त्या कादंबरी मालिकेच्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

लिखाणास सुरुवात केली होती. त्यानंतर समजा आपण एकंदर सगळ्याच कल्पनांचा घट्ट असा पोत, निरीक्षणे, संविधाने, ही काढून टाकली की मग अनेक गोष्टीबद्दल कमी-अधिक दिलचस्प कल्पना, मनात आणणे शक्य आहे. तसेच राजकीय उत्साह, उत्कटतेने वाटणे वा त्या भावना मनात निर्माण होणे शक्य आहे. परंतु गोष्टी सांगणे त्या वाचणे, त्या निर्माण करणे – या सर्व गोष्टी एका सर्वस्वी वेगळ्याच विचारधारेत (Mode) कार्यरत असतात. हे विधान केवळ शारीरिक पातळीवर करण्याची माझी इच्छा आहे. तत्त्वप्रणालीच्या पातळीवर नाही. बौद्धिक पातळीवरही नाही.

**प्रश्न :** कादंबरी लेखनाचे तंत्र, कथनाचा विकास इत्यादी गोष्टी आपण जवळजवळ दुर्लक्षच करता. त्याच्याशी काहीही कर्तव्य नाही अशा प्रकारे लेखन करता याबाबत आपली कानउघडणी काही वेळा करण्यात आलेली आहे.

**लेसिंग :** त्याचे असे आहे मी याबाबतील स्वयंशिक्षित आहे. तीस वर्षांची होईपर्यंत– अर्थात याला फारच नगण्य असे अपवाद आहेत – मी जुन्या वसाहतवादी– ऱ्होडेशियात (झिंम्बाब्वे) माझे जीवन व्यतीत केले होते. प्रत्यक्ष वाङ्‌मयापासून फार दूर असलेल्या वेगवेगळ्या विचारधार, सिद्धांत यांचे जग आहे, याची कल्पनाच करता येत नव्हती. ते शक्यही नव्हते. आमच्या अवतीभोवती, ग्रामीण भाग होता, जनावरे होती, वृक्षवल्ली होत्या, आणि याशिवाय अत्यंत कुपमंडूक असा समाजही होता. मला त्या समाजाशी जुळवून घेणे कधीही शक्य झाले नाही. (गौरवर्णियांच्या दृष्टीने त्यानीच मंजूर केलेल्या) कायद्यानुसार कृष्णवर्णीय अस्तित्वातच नव्हते. आम्हा (सर्व गौरवर्णियापासून) त्या कृष्णवर्णियांचे जग अगदी हवाबंदपणे अलग करण्यात आलेले होते.

मी सर्वस्वी माझ्या (स्वत:च्या मार्गदर्शनाखाली) लिहिण्यास सुरुवात केली. मी माझ्या तब्बेतीने (Fashion) माझा मार्ग मी शोधून काढाला. **प्रुस्त, स्तानदाला, थॉमस मान** अगर ते महान इंग्रजी लेखक **डिकन्स, थॉमस हार्डी** (हा निसर्गाचे वर्णन किती छान करी) **व्हर्जिनिया वुल्फ, रिचर्डसन, डिफो.** (या लेखकांच्या साहित्याकडून मार्ग दर्शन घेऊन). मी वाङ्‌मयीन नवनिर्मिती कशी करावी, वा वाङ्‌मयीन साहित्य कृती कशी निर्माण कशी करावे हे मी कधी शिकलेच नाही. याशिवाय अजूनही **माझी अशी धारणा आहे, की वाङ्‌मयीन शिक्षण असे कधीही नसते.** त्या क्षेत्रात ग्रंथांची किंवा व्यक्तीची वेळप्रसंगी व सहजासहजी भेट होते अगर त्यांच्याशी वादसंवाद होतो, असे झाले म्हणजे ग्रंथ वा त्या व्यक्ती आपल्याशी एकाएकी संभाषण करू लागतात. आपण जे काही पहाणे वा ऐकणे आवश्यक असते वा ज्याची आपणास जरूरी असते ते आपणास ते ग्रंथ वा त्या व्यक्ती आपणास दाखवून देतात. प्रत्यक्ष लेखन करताना जो अनुभव येतो तो जमेस धरून, कधी प्रयोग कधी चुका करून आपण वाटचाल करीतच राहतो. एवंच ही सारी प्रक्रिया हा संकर आहे. अगदी वेगवेगळ्या प्रभावानी परिपूर्णपणे युक्त असा. (या संकरात बोलपट– चित्रपट, मिथ्थिके,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

संगीत, चित्रकला या सर्वांचा समावेश आहे) आपणास आश्चर्य वाटेला इतक्या प्रमाणात हे सगळे प्रवाह आपल्याशी जुळवून घेण्यास राजी असतात. या सर्व प्रक्रियेबद्दल समीक्षक आणि प्राध्यापक या दोघांचेही आपले असे सिद्धांत आहेत, हे मला चांगले ज्ञात आहे. परंतु त्यापेक्षा त्यात अधिक काही आहे असे मला वाटत नाही. प्रत्येक कादंबरीचा लेखक तो आपल्या कादंबरीचे जे काही करतो. तीच त्याची कादंबरी असते. (The Novel is whatever each author makes of it) तिथे काहीही क्लुप्त्या नसतात. ती (कादंबरी) केवळ अस्तित्वात असते – जशा प्रकारे ती लिहिली गेली आहे तशीच ती अस्तित्वात असते. हे कादंबरी लेखन आहे. ते वेगवेगळे घाट घेईल. (कादंबरी ही इमारत आहे मानले तर) उभारणीच्या दृष्टीने कितीतरी गुंतागुंतीचा ती घाट घेईल, अगर ती एक सरळ रेषेत वाटचाल करणारी कादंबरी असेल. सरळ रेषेत याचा अर्थ असा की त्या कादंबरीत जे काही लिहिले गेले आहे त्यानुसारच जे काही घडत असते, त्यानुसारच ती कादंबरी लिहिलेली असते.

**प्रश्न :** म्हणजे आपणाला सिद्धांत पसंत नाहीत.

**लेसिंग :** मी अनेक वर्षांपूर्वी कम्युनिस्ट पक्षात होते. 'या क्षणाचे जे महान प्रश्न आहेत' असे जे समजले जात होते. त्यांच्याकडे मला प्रत्येक गोष्ट लोटीत होती. परंतु मी लिहिलेल्या साहित्यात, आणखी एका गोष्टींबद्दलही मला भान आहे. ही गोष्ट म्हणजे कितीतरी गुढ आणि अधिक सखोल अशी प्रक्रिया.

**प्रश्न :** आपण 'फिफ्थ चाईल्ड' या कादंबरीचेच उदाहरण घेऊ या. परंपरागत मूल्याकडे भोळसटपणे परत फिरण्याचा जो विचार आहे त्याबद्दलची ती कादंबरी ही टिकात्मक– समिक्षा आहे अशा स्वरूपात तिच्याकडे पहाता येईल. आपल्या अपत्याचे संगोपन व त्याची वाढ करण्यात मग्न होत असताना पार थकून गेलेल्या आदर्श माता-पित्यांची ती कहाणी आहे या दृष्टीकोनातूनही त्या कादंबरीकडे पहाता येईल. समाजात ज्या (निकृष्ट वाटणाऱ्या) चमत्कारिक व्यक्ती असतात, त्यांच्याकडे समाज ज्या दृष्टीने पहातो, त्याचे प्रतिबिंब त्या कादंबरीत आहे असेही कोणी म्हणेल. अहो आश्चर्यम् एका आदर्श कुटुंबात जन्माला आलेल्या सर्वसामान्य मुलापेक्षा अगदी सर्वस्वी वेगळ्या बालकाचीही ती कहाणी आहे. मध्यमवर्गीय कुटुंबातील बालकांचे, मानसिक संतुलन बिघडून ती गुन्हेगारीकडे का वळते (Deliquency) याचेही ते पृथ्थककरण आहे व विश्लेषण आहे या दृष्टीकोनातूनही आपणास त्या कादंबरीकडे पहाता येईल. याशिवाय ठगांच्या टोळीचा प्रमुख होणाऱ्या एका निगरगट्ट व बिनधास्त नायकाची ती कथा आहे असेही आहेच की,

**लेसिंग :** ओ, (विवेचन वा विश्लेषणापेक्षाही) ते फारच सोपे आहे. आपण ज्याचे वर्णन केले आहे ते (कादंबरीच्या) त्या कथनाच्या कालौघात घडलेल्या घटना आहेत असे भासेलही. याचे साधे कारण असे की १९८० च्या दशकाच्या ऐनभरात (Heart) मी त्या





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

कादंबरीचे लेखन केले. थोडक्यात त्याक्षणी त्या काळी जी गोंधळाची व गुंतागुंतीची परिस्थिती होती (imbroglio) ती त्या कादंबरीत मी पकडलेली आहे. सुरुवातीलाच सांगते. (अशा गोष्टीत मी नेहमीच याबद्दल खुषी व समाधान मानलेले आहे) माझ्या स्वत:शी बोलण्याकरता मला एखाद्या कथानकाची कल्पना करण्याची आवश्यकता असते. एका वाचकाकडून मला एक चमत्कारिकक भासणारे, तसाच परिणाम करणारे, चक्रम, परंतु त्याजबरोबर विनोदी अगर घृणा येईल असे तिरपाकडे, राक्षसी, अस्वाभाविक (Bizzare) पत्र आले. तिची तक्रार वेगळीच होती. ती तिने वरवर धार्मिक भासणाऱ्या पण अर्धवटपणे धार्मिक अशा शब्दात व्यक्त केली होती. ती तक्रार चौथ्या बालकासंबंधी होती. हे बालक प्रत्यक्ष सैतानासारखेच (Devil) होते. या पृथ्वीगोलाबाहेरचे, धोकादायक असे. या पत्राने मी चिंताग्रस्त झाले. एक जुने मिथ्यक या पत्रातील प्रतिपादन हा भाग आहे असे मला दिसायला लागले. अनेक जुन्या कथाना हे मिथ्यक प्रिय आहे. हे मिथ्यक आहे ('Changling') संबंधी. चेंजलींग म्हणजे खास करून पऱ्या (fairyies) जन्माला आलेल्या बालकाऐवजी चोरून दुसरेच एक बालक त्या ठिकाणी ठेवतात. म्हणजे त्या वाचकाच्या दृष्टीकोनातून जन्माला आलेल्या खऱ्या बालकाऐवजी, एका राक्षसी प्रवृत्तीच्या बालकाला पऱ्यानी नेऊन ठेवले व खरे बालक त्या पऱ्या घेऊन गेल्या) एवंच पुढे त्या कुटुंबाला ज्या दुर्दैवाला सामोरे जावे लागले, ते या 'पऱ्यांच्या' वागण्यामुळे. मी या संविधानाला घेऊनच सुरुवात केली. इंग्लंडची प्रकृती जवळजवळ प्रदर्शित करणारे हे संविधान हे प्रत्यक्षात आहे. फ्रेंच भाषेत Changeling या शब्दाचे चांगले भाषांतर उपलब्ध नाही असे मला वाटते. (डोरीस लेसिंग असे म्हणण्यालाकारण त्यांचा प्रश्नकर्त्या हा फ्रेंच होता. **मराठी भाषेत या शब्दाचे भाषांतर उपलब्ध आहे का असा विचार करण्याचे कष्ट घेण्याचेही कारण नाही)** म्हणूनच मी याबाबतीत आपले समाधान करीन की नाही याबाबत मी साशंक आहे. इंग्लिश मध्यम वर्गियांचा जुलूम अगर इंग्लंडमध्ये मिळणारे शिक्षण याबद्दल मी काही मुद्दा प्रस्थापित करत होते असे प्रत्येक इंग्लिश वाचकाला वाटते.

**प्रश्न :** म्हणजे आपण जे काही सांगत आहात त्याचा अर्थ काय?

**लेसिंग :** इंग्लंडमध्ये मध्यम वर्गात एक विचार व रचना पद्धती आहे. ती नेमकी व वैशिष्ट्यपूर्ण असून, फार सामर्थ्यशाली आहे. विशेष करून इंग्लंडमधील मध्यम वर्गीय स्त्रियांत... हे सगळे मध्यमवर्गीय 'भयानकपणे' कार्यक्षम आहेत. भयानकपणे सक्रीय आहेत, भयानकपणे कर्तबगार आणि अत्यंत परिपूर्णतेचा घ्यास असलेले. (Terribly efficient इत्यादी). कप्याकप्यात समाजाची विभागणी करणे, परिमंडलांच्या सीमा ठरविणे, सामाजिक उतरंड, सामाजिक वेगळेपणा यांचा निर्देश करणे या एकाच महान कल्पनेने झपाटलेले. लहानपणापासून आणि शाळा सोडली त्या दिवसापासून – मी तेव्हा चौदा वर्षांची होते. ऱ्होडेसियातले ग्रामीण भाग, वनस्पती आणि प्राणी हे शाळेतील वर्गापेक्षा जास्त आकर्षक



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

वाटत होते. मला शाळेतील वर्गापेक्षा त्या इतर गोष्टीबद्दल दिलचस्पी होती. मला या वस्तुस्थितीची चांगलीच जाणीव झाली होती. आपल्यात समान काय आहे, याचा आपण कधीही विचारच करीत नाही.

आपण केवळ परस्परविरोधी गोष्टी पाहतो; होय – नाही. पांढरे आणि काळे. आपले स्थान नक्की करण्यात, ते सिद्ध करण्यात आपण आपणास गुंतवून घेतो; आणि अशा प्रकारे आपली जडण-घडण फारच वरच्या पातळीवरची आहे असे आपणास वाटू लागते एवंच आपण आपल्या प्रभुत्वाखाली असलेला प्रदेश नक्की करीत असतो. हे मी सांगितले आहेच. याच प्रकारे आपण मुलत: रहात असतो, जीवन व्यतीत करतो. जवळजवळ ह्याच प्रकारच्या प्रश्नाबरोबर (आणि ह्याच अडचणी बरोबर) आपण मुकाबला करतो. परंतु नेमके कोणत्या कारणाने आपल्यात विभाजन झाले हे शोधून काढण्याचा प्रयत्न करणे, ही गोष्ट एक लेखक म्हणून मला महत्त्वाची वाटते.

इ. स. १९६० च्या आसपास The Golden Note Book या कादंबरीकरिता साहित्य जमविण्यात तिचे लेखन करण्यात व्यस्त होते. याचा अर्थ असा नाही की स्त्रियांची परिस्थिती, पती-पत्नी अगर कादंबरीची रचना, याबाबत प्रबंध तयार करण्यात मी गुंतले होते. असा माझा दावा अजिबात नव्हता. आपणाला नव्हे आपणासारख्या सर्वांनी ज्यानी परंपरागत व जनमान्य नैतिकतेनुसार वागण्यास नकार दिला होता अशा सर्व लोकांनी आपले स्वातंत्र्य जाहिर करण्याची आपली गरज ही किती खुळेपणाची ही कबुली देऊन नतमस्तक होण्याची अवस्था येईपर्यंत अनेक अडचणींशी काहीही झाले तरी या सर्वांना मुकाबला करण्याची पाळी आली होती. मी हे एवढेच समजावून घेण्याचा प्रयत्न करीत होते. इतर अनेकाप्रमाणे, अधिक करून भित्रे समाजनिष्ठ (Conformist) अगर परंपरावादी पुरुष हे काही आपल्यासारख्यांपेक्षा काही अधिक चांगले जीवन कंठीत होते असे नाही. ते लोक सुद्धा, त्यांच्या स्वत:त जे विसंवाद वा विसंगती होत्या, ओझ्यासारखी अशी जी त्यांची महान तत्त्वे होती, आपले वेगळेपण सिद्ध करणे ही त्यांची जी गरज होती, त्या सर्वांचे ते भक्ष होते.

**प्रश्न :** आपण अनेक महान चळवळीत सामील झाला होतात, अनेक आपण जवळून पाहिल्या होत्यात या सर्व चळवळींनी अगदी एकापाठोपाठ एक अशा प्रकारे आपल्या जीवनमार्गात येऊन अडथळे आणले. या सर्व चळवळी सर्वसामान्यपणे फक्त एक फार्सच होता का? इ. स. १९५० नंतरच्या कालातील **साम्यवाद.** त्यानंतर **'स्त्री-मुक्तीवाद'** ही चळवळ. त्यानंतर इ. स. १९७० च्या अखेरीस आणि या दशकाच्या अखेरीस आपण लिहिलेल्या पुस्तकातून स्पष्टपणे दिसणारा गुढवादी, पूर्वेकडचा गुढवाद यांचा शोध. त्याच–प्रमाणे Memoirs of a Surviver हे आपले पुस्तक अगर शिकिस्तासारखे Shikista विज्ञान ललित साहित्यात गणना केली जाते ते पुस्तक – हे सारे 'फार्स' या वर्गातच लोटावयाचे



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

का? तेवढीच त्यांची किंमत आहे का?

**लेसिंग :** नाही. मी सिनिकलही नाही. तशीच संधीसाधुही नाही. संघर्ष मला ज्याप्रमाणे आढळतात. त्यानुसार मी त्यांनी स्वीकारते वा सामोरी जाते. उदा. हे संघर्ष पुढील चळवळीत अनुस्यूत होते. इ. स. १९५० या दशकातील **'मार्क्सवाद'**, त्यानंतर इ. स. १९६० च्या दशकातील **'स्त्री-मुक्तीवाद'** आणि त्यानंतरच्या इ. स. १९८० सालातील **'पूर्ववाद'** (Orientalism) कदाचित विद्यमान काळातील **'पर्यावरणवाद'.** मी हे सांगताना (Inverted Commas) उद्‌गार चिन्हांचा सर्वत्र उपयोग केला आहे. तो अशा उद्देशाने की समाजातील सर्वच लोकांचा त्या सर्व चळवळीत सर्वसामान्यपणे जास्त सहभाग आहे त्याचा निर्देश करावा. यासाठी आपणा सर्वांच्या समोर असलेल्या अडचणी समान असल्या तरी आपणास एक हा ना तो गट निवडण्याची आवश्यकता भासते. यामुळे मी अगदी नेहमीच बुचकळ्यात पडते. 'नियंत्रण ठेवणाऱ्या स्त्रिया', 'जनता प्रिय नेते' आणि 'स्त्री-स्वातंत्र्याच्या पुरस्कार करणाऱ्यांना विरोध करणारे प्रखर स्त्री-मुक्ती विरोधी', 'वेगवेगळ्या चळवळीचे प्रचारक' आणि इतर सर्व जे कोणी आम जनतेचे नेतृत्व करीत असतात. त्या सर्वांच्या बाबतीत हे कथानक – आपणास या-ना त्या गटाची निवड करावीच लागते – चांगलेच लागू पडते. मी आजवर जी पुस्तके लिहिली आहेत. ती सर्व पुस्तके एकाच गोष्टीचा निर्देश करतात. काही वेळा मी त्यात असतेच असे नाही. आपणा सर्वात एक मिती (Dimension) वा परिमाण अस्तित्वात आहे. त्याचा शब्दात आविष्कार करता येत नाही. आपण त्या मितीला वा परिमाणाला, एखाद्या पाटातून वाहू देण्याबाबत सिद्धांत तयार करण्याचा प्रयत्न केला, तरी तसे त्या मिती व परिमाणाच्या बाबतीत ते करता होणार नाही इतकी ती सामर्थ्यशाली आहे. आपण सर्वस्वी मूर्ख व्यक्ती आहोत आणि आपण जणू काही नगण्य आहोत अशा प्रकारे आपण वर्तन करतो.

**प्रश्न :** मग लेखन हा मनोविश्लेषणाचा एक घाट असावा का?

**लेसिंग :** गोष्टींची 'उद्‌गार चिन्हात' रवानगी करणे, मनोविश्लेषणामुळे शक्य होते. निदान तसे मी समजते. अभिजात मनोविज्ञान अगर मनोविश्लेषण एखाद्या सिद्धांताच्या अनुषंगाने **'फिफ्थ चाईल्ड'** या कादंबरीतील **बेन** या व्यक्तीरेखेच स्पष्टीकरण देण्याची आपणास आशा करता येईल, या विचारावर माझी श्रद्धा नाही. मी जेव्हा तीस वर्षाची होते, तेव्हा एका आत्यंतिक तणावाच्या स्थितीचा अनुभव मला आला. मला एक स्त्री भेटली. तशी ती सर्व सामान्यच होती. **दि गोल्डन नोटबुक** या कादंबरीत रेखाटलेल्या **दि मदर शुगर** सारखी. या स्त्रीने (माझी मानसिक अवस्था) दूर करण्यासाठी काही एका विशिष्ट प्रकारचे मानसशास्त्रीय उपचार माझ्यावर केले. या घटकेलाही त्या ज्या वेगवेगळ्या उपचार पद्धती होत्या त्यांचे माझे काहीही देणे-घेणे नाही. ही स्त्री **'युंग'** यांच्या मानसशास्त्रीय सिद्धांताची अनुयायी होती. या कारणाने ती जन्माने ज्यू होती तरी तिने ख्रिश्चन धर्मातील कॅथलिक





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

पंथाचा स्विकार केला. परंतु त्या विशिष्ट बौद्धिक तत्त्वप्रणालीत्मक संरचनेत (त्याचबरोबर दुसऱ्या बाजूला फ्राईड पंथियापैकी जे कोणी स्टॅलिनवादी आहेत. त्यांनाही मला जाणता येईल व त्यांची गणना करता येईल) एका अस्सल व्यक्तित्त्व होते. हा जो तिचा माझा संपर्क होता. त्याची व्याप्ती किती मोठी होती. ती दुसऱ्या कोणाकडे पोहोचविता येणार नाही, तिचा आविष्कारही करता येणार नाही. परंतु या संपर्काने मला माझ्या अडचणीतून बाहेर काढले. एवंच मला अशी एक व्यक्ती भेटली होती की, तिला एखादा विषय कसा शिकावा याची मार्गदीपिका अगर धर्मगुरू वापरतात तशा कार्यक्रम पत्रिकेत तसेच सिद्धांतात व प्रबंधात तिला बंदीस्त करता आले नसते.

**प्रश्न :** इ. स. १९६४ च्या सुमारास म्हणून तुम्ही एका सुफी मार्गदर्शकाची (Master) ची निवड केलीत का?

**लेसिंग :** अगदी बरोबर. तो जो काही आहे तो आहे. परंतु मदर शुगर गुरू नव्हत्या तसा तोही नाही. तो फक्त एक आध्यात्मिक मार्गदर्शक असा की जो एखादी गुढ विचारसरणी अगर कोणतेही ठोकळेबाज कर्मकांड आपल्यावर लादत नाही. मला एखाद्या धर्माच्या तुरुंगात न टाकता ईश्वर कशाचे प्रतिनिधित्व करतो. याविषयी मी स्वत:च माझ्या मनाचा निर्णय घ्यावा यासाठी मला प्रोत्साहीत करतो. खरे म्हणजे धर्मांच्या (धर्म विचारांच्या) बाबतीत मी अगदी बालीशपणे ॲलर्जिक आहे – – माझी प्रकृती जी सखोलपणे धार्मिक आहे तिच्या बद्दल मला पराकोटीचा आदर असला तरी.

### (२) कम्युनिझमने मागे ठेवलेली मानसिकता.

कम्युनिझमचा अंत झाला हे खरे आहे. परंतु त्याने आपल्या मागे ठेवलेल्या मानसाची तपासणी झालेली नाही. मी जे काही सांगणार आहे, त्याची ओळख पूर्व युरोप आणि मध्य युरोपमधील लोकांना ताबडतोब होईल असे मला वाटते. मी पश्चिम युरोपबद्दलही बोलणार आहे. मी किमान सहा मुद्यांना स्पर्श करणार आहे. त्यातील प्रत्येक अर्थातच अधिक सुलभ करून. त्या मुद्यांपैकी प्रत्येक मुद्दा असे दाखवून देतो की, आपण कम्युनिझमचा अंत पाहत असलो तरी कम्युनिझमने एक प्रवृत्ती मागे ठेवलेली आहे. विचार करण्याच्या ज्या मार्गांचा उगम कम्युनिझमच्या काळात झाला अगर ज्या मार्गांना कम्युनिझमने खतपाणी दिले ते मार्ग अजूनही आपल्या आयुष्याचे नियंत्रण करतात.

भाषा हा प्रथम क्रमांकाचा मुद्दा. कम्युनिझमने भाषेची प्रकृती खालच्या पातळीवर नेली, आणि भाषेच्याबरोबर विचारांची प्रकृतीही. एका वाक्यानंतरही खास अशी कम्युनिझमची निकृष्ट भाषाशैली (Jargon) ओळखता येते; ठोस पाऊले उचलणे (Concrete steps) आंतर विरोध, एकमेकांच्या विरुद्ध असलेल्या गोष्टी एकमेकात बेमालूमपणे घुसणे आणि अशाच प्रकारच्या अनेक शब्दप्रयोगाबद्दल तारुण्यात असतानाच काही थोड्या लोकांनी चेष्टा





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

केली होती असं नाही. मनाला मृतवत करणाऱ्या घोषणाना आपल्या मूळ स्थानापासून अगदी दूरवर पोहोचवण्याची ताकद होती. याचा प्रत्यय मला इ. स. १९५० साली प्रथम आला. त्याचे असे झाले मी लंडन टाइम्समधील एक अग्रलेख वाचीत होते. त्यात मला खालील वाक्य आढळले. "The demo last saturday was irrefutable proof that the concrete situation....." आजवर कोंडवाड्यात बंदिवान केलेल्या प्राण्याप्रमाणे त्या शब्दांना डाव्यांनी बंदिवान केले होते. त्याचा आदर आता सर्वसामान्यांत होऊ लागला होता. त्या शब्दांबरोबर कल्पनाही आल्याच. मजूरपक्षाच्या परंपरावादी विचारसरणीच्या उदारमतवादी वृत्तपत्रात अनेक लेख आपणास असे आढळतात की, ते "मार्क्सवादी" आहेत. परंतु त्या लेखाच्या लेखकाला त्याचे ज्ञान नव्हते.

याशिवाय कम्युनिझमने मागे ठेवलेल्या परंपरेच्या वारशाचा एक भाग असा आहे की, तो टिपणे अधिक कठीण आहे. प्रत्यक्षात फारसे सांगण्यासारखे काहीही नसताना वृत्तपत्रातील जास्तीत जास्त जागा कशी भरता येईल हे उद्दिष्ट नजरेसमोर ठेवून कम्युनिझमची "भाषा" तयार करण्यात आली होती. या भाषेत अगदी १९८५-८६ पर्यंत इझवेस्तीया, प्रवदा आणि सुमारे हजारो कम्युनिस्ट वृत्तपत्रे त्या भाषेत लिहिली जात होती. याचे अर्थातच साधे कारण असे होते की, समजा या वृत्तपत्रांनी एखाद्या प्रश्नावर एखादी भूमिका घेतली. मग वेळ पडली तर या भूमिकेचे समर्थन करावे लागले असते. नेमका हाच भाग फारच धोकादायक होता. आता या वृत्तपत्रांना खऱ्या भाषेच्या वापराचा शोध पुन्हा एकदा लागला आहे. परंतु त्या एकेकाळच्या मृतवत भाषेच्या वापराची परंपरा अजूनही विद्यापीठातून काही विभागात आढळून येते. विशेष करून समाजशास्त्र, मानसशास्त्र या ज्ञानशाखांचे काही भाग आणि वाङ्मयीन समीक्षा क्षेत्रातील काही भाग.

उत्तर येमेन येथे माझा एक तरुण मित्र आहे. त्याने अगदी अलीकडच्या काळात खूप स्वार्थत्याग करून पैन् पै वाचवली. ती कशासाठी? तर उत्कृष्टतेची गंगोत्री असलेल्या ब्रिटन या देशाला जाण्यासाठी. बौद्धिक आणि नैतिक क्षेत्रात अज्ञानी असलेल्या देशात पाश्चिमात्यांचे ज्ञान आणि पारंगतता यांचा प्रसार कसा करता येईल याचे शिक्षण घेण्याची त्याची इच्छा होती. हे शिक्षण देणारी जी समाजशास्त्र ज्ञानशाखा आहे, तिचा अभ्यास तो करणार होता. त्याला इ. स. १९८७ साली आठ हजार पौंड खर्च आला (म्हणजे सुमारे आठ लाख रुपये) त्याला अभ्यास करण्यासाठी म्हणून जे साहित्य सुचविण्यात आले होते. ते मी बघावयास मागितले. त्याने मला एक भला मोठा गलेलठ्ठ ग्रंथ दाखविला. तो इतक्या वाईट, इतक्या विद्रूप, इतक्या रित्या भाषेत लिहिलेला होता की, तो समजावून घेणेसुद्धा कठीण होते. या ग्रंथांत शेकडो पृष्ठे होती. पण त्यात ज्या कल्पना विशद करण्यात आल्या होत्या, त्या फक्त दहा पृष्ठात सहज साधेपणाने समजावून सांगता आल्या असत्या. एकेकाळी जे मार्क्सवादी होते अथवा मार्क्सवाद्यांनी ज्यांना शिकविले होते असे लेखक ही अशा प्रकारची पुस्तके वा



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

ग्रंथ लिहितात. ब्रिटनमध्ये अप्रगत देशातून आणि जे देश 'बंदिस्त' आहेत अशा देशातून विद्यार्थी येतात. या विद्यार्थ्यांना मी वर वर्णन केलेल्या निकृष्ट व खालच्या पातळीवरच्या प्रकृतीचे इंग्रजी कसे लिहावे हे शिकविले जाते. मी नुकतीच झिंम्बाब्वेला गेले होते. तेव्हा मला काय आढळून आले? तात्यापंतोजी (Pedantic) थाटात पुन्हा रित्या निकृष्ट भाषा शैलीत विद्यार्थ्यांना इंग्रजी भाषेचा परिचय करून दिला जात होता. या विद्यार्थ्यांची समजूत अशी होणार की, हीच इंग्रजी भाषा आहे आणि त्याचप्रमाणे त्यांनी ती लिहावी वा त्यात संभाषण करावे.

विद्यापीठातही प्राध्यापक मंडळी किती गोंधळ उत्पन्न करणारे व दुर्बोध लिहितात (Obfuscation) हे मला माहीत आहे. त्याची सुरुवात कम्युनिझमपासून झालेली नाही असे कोणीतरी म्हटले आहे. स्विफ्ट या इंग्लिश लेखकाने हे मागेच सांगितले आहे. कम्युनिस्टांची पंतोजीगिरी आणि शब्दबंबाळपणा यांचा उगम जर्मन विद्यापीठात आहे. आता हा रोग वेगाने पसरून मुळातील चांगल्या गोष्टींचा नाश करणाऱ्या बुरशीसारखा (mildew) जगात तो सर्वत्र पसरत आहे. पुस्तकाचे जे दुकान विद्यार्थ्यांकरिता पुस्तके विकते, अशा एखाद्या पुस्तकाच्या दुकानात आपण सकाळ घालवली. एवढा वेळ खर्चूनही आपणास नवी व रसरशीत अशी पुस्तके शोधून सापडत नाहीत. विचारांना मरगळ आणणारे, हे स्वत:ची वाढ स्वत:च करणारे यंत्र कसे बंद पाडायचे? एखादी हवाबंद अशी काचेची पेटी असावी. त्याच्या आत आतील हवा काढून घेतल्याकारणाने जी पोकळी निर्माण होते, त्यात कल्पांतापर्यंत सातत्याने एक यंत्र गरगर फिरत आहे. यापूर्वी उल्लेखिलेल्या यंत्रासारखेच हे यंत्र आहे. अशाप्रकारे मी त्या यंत्राकडे पाहते. हे काचेचे आवरण तोडून शुद्ध हवेला या काचेच्या पेटीत प्रवेश कसा द्यावयाचा? ज्यांनी आपल्या स्वत:ला मृत भाषेत लपवून ठेवले आहे, यदाकदाचित या कल्पनासारखे ते आहे, असे होईलही. विद्यापिठात संशोधन करण्याकरिता म्हणून स्थापन केलेले जे विभाग आहेत, त्यांना या कल्पना उपयुक्त वाटतील आणि त्या अगदी परिपूर्णपणे अंतर्भेद करणाऱ्या आहेत असे होईलही. परंतु मी यापूर्वीच याचा निर्देश केला आहे. काही ठिकाणी काम चालू आहे. या कामास आपण अवसर दिला तर ते काम समाजात परिवर्तन घडवून आणीलही. मानव हा प्राणी कसा विचार करतो, यासंबंधी आपण जो विचार करतो त्याऐवजी मानव हा प्राणी प्रत्यक्षात कसा वागतो, ह्याविषयी हे काम चालू आहे. अंतर्दृष्टी प्राप्त होईल, जे सत्य आपल्याला दिसत नाही हे दिसण्याचे मार्ग सापडेल. परंतु या सर्व कल्पना या वारंवार आपणासमोर प्रथमच सादर केल्या जातात, पण त्या अवाचनीय दुर्बोध भाषेत.

हा दुसरा जो मुद्दा आहे. तो पहिल्या मुद्याशी संलग्न आहे. आपल्या वर्तनावर परिणाम करणाऱ्या शक्तीशाली कल्पना एखाद्या छोट्या वाक्यात किंवा एखाद्या वाक्प्रचारात आपणास आढळून येतील. अनेक लेखकांच्या मुलाखती घेतल्या जातात. मुलाखत घेणारा या सर्व



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

लेखकांना पुढील प्रश्न विचारतोच. आपणास असे वाटते का लेखकाने अमूक अमूक.... करावे? लेखकाची राजकीय भूमिका काय आहे, याच्याशी हा प्रश्न नेहमीच निगडीत असतो. याठिकाणी आपण एक गोष्ट उन्मेखून लक्षात घेतली पाहिजे. सर्व लेखकांनी एकच गोष्ट मग ती गोष्ट काहीही असो केली पाहिजे हे या प्रश्नाची शब्दयोजना करताना गृहित धरले गेले आहे. या सर्वापाठीमागे भला मोठा इतिहास आहे. एकोणिसाव्या शतकातील रशियाच्या आपण काही काळ मागे जाऊ या. या काळी रशियात महान समीक्षक – बेलीन्स्की, डोब्रोलुबोव्ह, चेरनिशेवस्की आणि तसेच अनेक – विद्यमान होते. सामाजिक प्रश्नांशी लेखकांना कर्तव्य असले पाहिजे अशी या समीक्षकांची इच्छा होती. रशियन वाङ्मयाचा सुवर्ण काळ असे आपण ज्या काळाचे आजकाल वर्णन करतो; या सुवर्ण काळात आपण ज्या लेखकांची गणना करतो त्या सर्व लेखकांना या समीक्षकांनी केलेल्या टीकेचे घाव सहन करावे लागले आहेत. अर्थात हे सारे एका फार वरच्या पातळीवर घडत होते. डोनाल्ड फँगर यांनी आपणास हे स्पष्ट करून सांगितले आहे की, समाजशास्त्रात आणि सामाजिक टीका यांच्यात अंतर्भूत असलेल्या सर्व विभागांचा समावेश रशियन कादंबरीतच आहे. परंतु हे सारे का झाले याबद्दल माझा एक समज वा श्रद्धा आहे. त्या लेखकांची जी प्रकृती होती ती हे तसे का घडले याचे कारण आहे. साहित्य समीक्षक जे काही म्हणत होते, याचा त्याच्याशी सुताराम संबंध नाही. खातानाच पुडिंग (किती चांगले) झाले आहे याचा पुरावा मिळतो ते खाल्याने (the proof of the pudding is in the eating) असे आम्ही ब्रिटनमध्ये सांगतो या सर्व महान लेखकांचे एकंदर साहित्य विचारात घेतले तर काय आढळते? या प्रकारे लिहिलेच पाहिजे, असे त्या महान लेखकांना वाटले म्हणून त्या लेखकांनी लिहिण्याचे चालू ठेवले, हे असे नव्हते असा एकही क्षण त्यांचे साहित्य वाचताना येत नाही किंवा कंटाळवाणेपणाचा धक्का आपल्याला एकाही क्षणी मिळत नाही. या साहित्य समीक्षकांपेक्षाही फार जुन्या परंपरेला अनुसरून या महान लेखकांनी लेखन चालूच ठेवले होते. आपल्या स्वत:च्या वैयक्तिक अनुभवाशी ईमान राखून लेखक लिहित असला तर मग जे काही कागदावर उतरवले जाते, ते अनिवार्यपणे दुसऱ्या लोकांची बाजूच मांडणारे असते. गोष्टी कथन करणाऱ्यांनी गेली हजारो वर्षे असे गृहित धरले आहे की, त्यांचे अनुभव हे सर्व-साधारण स्वरूपाचे असलेच पाहिजेत. आपण जीवनाशी फारकत घेऊन अगर आपल्या खास अशा हस्तीदंती मनोऱ्यात राहून कथाकथन करण्याचा व्यवसाय चालविणे आपल्याला शक्य होईल हे त्यांच्या मनी कधीही आले नाही. (कथेचा) घाट की आशय हा जो कथा कथनाबद्दलचा जो दृष्टिकोन आहे याबद्दलचा जो न संपणारा वाद आहे त्याची त्याने इतिश्री होईल. परंतु आमच्या (ब्रिटनमधील) काही प्रादेशिक विद्यापीठातून घाट की आशय या रोगाची लागण झालेली असल्याकारणाने वाङ्मयाच्या वाढणाऱ्या (विद्यापिठात) विभागात घाट की आशय अजूनही विद्यमान आहे. एका सामुदायिक स्वरूपाच्या सद्सद्विवेकबुद्धी-



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

ऐवजी आपल्या स्वत:च्या वैयक्तिक सद्सद्विवेकबुद्धीवर आपला हक्क आहे असे प्रतिपादन या महान रशियन लेखकांनी केले नसते तर? तसे झाले असते तर गोगोल, टॉलस्टॉय, डोस्टोएव्हस्की, चेकॉव्ह, तुर्जीनेव्ह आणि या तारांगणात चमकणारे दुसरेही अनेक लेखक यांचे आपणास स्मरणही झाले नसते आणि त्यांच्या साहित्याचे वाचनही आपण केले नसते.

इ. स. १९१७ साली ('रशियन सत्ताग्रास' ज्याला रशियन क्रांती असे नाव आहे) सामाजिक अन्यायाविरुद्ध लेखकांनी लिहिलेच पाहिजे हे सूत्र सत्तास्थांनी आल्यानंतर जे काही झाले ते आपण पाहिले आहेच. या सूत्रांचे नाव आहे 'समाजवादी यथार्थवाद' (realism). लंडनमध्ये इ. स. १९५० च्या सुरुवातीला या धरतीच्या साहित्याचे प्रचंड वाचन एका कम्युनिस्ट प्रकाशकासाठी केले होते. दुसऱ्या ज्या कोणाला दुर्दैवाने या प्रचंड साहित्याचे वाचन करणे भाग पडले असेल. त्याला हे ज्ञात आहे की, समाजवादी यथार्थवादाच्या अनुषंगाने कादंबऱ्यांची निर्मिती केली गेली. पण त्या कादंबऱ्या कशा होत्या? या अगोदर विद्यापीठात शिकविणाऱ्या प्राध्यापकांच्या पुस्तकांचा उल्लेख केला आहे. त्यांच्या पुस्तकातील मृत भाषे इतक्याच मृतभाषेत त्या लिहिलेल्या कादंबऱ्या होत्या याचे कारण काय? 'मृत' भाषेत पुस्तके लिहिण्यासाठी कोणती पाककृती / सूत्र आवश्यक आहे? लेखकांनी ज्या प्रकारची पुस्तके / कादंबऱ्या लिहिल्याच पाहिजेत असा फतवा होता. असे लेखन करून साऱ्या लेखकांनी अगदी एखाद्या उपजत प्रवृत्तीमुळे (instinctivly) ते ज्ञात होते हे दाखवून दिले होते. याचे कारण असे आहे की, हे लेखक आपल्या अगदी सर्वस्वी मनाच्या वेगळ्या अशा भागातून लिहित होते. दूरदर्शनवर एक मुलाखतकार एका लेखकाची मुलाखत घेत होता. त्यांच्यात झालेली जी प्रश्नोत्तरे आहेत ती मी कदापि विसरणे शक्य नाही. मुलाखतकार असे म्हणाला,"आपण जी साहित्य निर्मिती केलेली आहे त्यात अनेक गोष्टींचा प्रभाव पडलेला आहे. पण त्या प्रभाव पाडणाऱ्या गोष्टीत आपणावर हायडेगर यांचा प्रभाव हा सर्वात महत्त्वाचा होता असे आपणास सांगता येईल का?

लेखकाने उत्तर दिले,"तुम्हाला समजत नाही." तुम्ही एखाद्या प्रसंगाचे वर्णन करता आहात, समजा सकाळच्या न्याहरीचा प्रसंग, आपल्या कादंबरीतला नायक काय खात असतो. हे आपल्याला माहीत असले पाहिजे. तो अंडी आणि बेकन खात आहे? पॅनकेकस खात आहे? त्यावेळी हवेत गारवा होता की उकडत होते? सूर्याचे रणरणते ऊन बाहेर होते का? पानांची भाजावळ चालल्याचा वास हवेत होता का? त्याने आदल्या रात्री आपल्या पत्नीबरोबर समागम केला होता का? तो तिच्या प्रेमात अजूनही आहे का? त्याने कोणत्या रंगाचा शर्ट परिधान केला आहे? मालक आपल्यासमोर जे काही तुकडे ठेवील त्यासाठी कुत्रा मालकाच्या अवतीभोवती घोटाळतो आहे का? तुम्ही यांचे वर्णन जरी केले नाहीत तरी तुम्हाला हे सर्व ज्ञात असावयास हवे याचे कारण त्याचमुळे त्या प्रसंगाला जीवन प्राप्त होते.

"हा – माझ्या लक्षात आले याचा अर्थ तुम्ही आपले स्वत:चे वर्णन एक यथार्थवादी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

(realist) असे करता आहात'' ! ही दोन टोके कधीही एके ठिकाणी येणार नाहीत. ती एके ठिकाणी येणे शक्य नाही याचे कारण मनाच्या दोन वेगवेगळ्या भागात ती दोन टोके असतात. त्यापैकी एक समीक्षक हा विभाग आहे. दुसरा भाग हा सर्वसमवेशक (holistic) आहे. मेंदूच्या (solar Plexus) या भागात नीट कोठेतरी त्याचे स्थान वर बहुधा असावे ''the fine delight that fathers thought'' अशी Hopkins यांची एक विलोभनीय वाक्य रचना आहे. लेखक त्यासंबंधी बोलत असावा. याउलट समीक्षक एका वेगळ्याच चैतन्या (spirit) सारख्या प्रवृत्तीबद्दल बोलत असतो. समाजवादी यथार्थवाद आणि त्याही अगोदर एकोणिसाव्या शतकातील रशियन समीक्षक यांच्यात ही प्रवृत्ती आपणास आढळते. कम्युनिझमशी निष्ठा असणाऱ्या व्यक्तींच्या मनोरचनेच्या चौकटीत खिश्चन धर्म आणि ज्यू धर्मात अनस्यूत असलेल्या द्वंद्वात्मक / स्वयंगती (dialectics) कडून हा आकृतिबंध आला होता. याबद्दल मला खात्री आहे. सेरवान्ते या विश्व विख्यात स्पॅनिश लेखकाचे एक चरित्र आहे. हा चरित्रकार आपणास असे सांगतो की, स्पॅनिश इनक्वीझिशन हे सेरवान्तेच्या मानगुटीवर सदैव स्वार झालेले होते. लेखकाने अमूक अमूक केले पाहिजे का? लेखकाने अमूक अमूक करावयास नको का? त्यांचे ते कर्तव्य नाही का? या अशा प्रश्नांचा इतिहास फार पुरातन व मोठा आहे. पण हे प्रश्न अगदी जुजबी सहजपणे वापरण्याऱ्यांना तो इतिहास ज्ञात नाही असे दिसते. दुसरा एक प्रश्न बांधिलकी – हा शब्द काही वर्षांपूर्वी चांगलाच प्रचलित होता. अमूक अमूक लेखक हा 'बांधिलकी' असलेला लेखक आहे का? तुम्ही बांधिलकी मानणारे लेखक आहात का? लेखक असा प्रतिप्रश्न करण्याची शक्यता आहे की बांधिलकी पण ती कशाला? ''राहू दे राहू दे'' तुम्हाला हे एवढे सुद्धा माहीत नसेल तर मग मला ते तुम्हाला सांगता येणार नाही. अशा शब्दात त्या लेखकाची कानउघडणी करून आपण नैतिकदृष्ट्या वरच्या स्थानावर आहोत असे प्रश्नकर्त्या लेखकाला बजावीत असतो. 'बांधिलकी' या प्रश्नाचा आणखी एक वारसदार आहे. जनतेची जाण (consciousness) उंचावणे. हे दुधारी शस्त्र आहे. जनतेची जाण उंचावताना जनतेजवळ ज्या कशाबद्दल काहीही माहिती नाही तिला त्या माहितीची अत्यंत आवश्यकता आहे. या जनतेला या माहितीचा पुरवठा करावा लागतो. ह्या जनतेला ज्या नैतिक पाठिंब्याची आवश्यकता असते तोही दिला पाहिजे. परंतु या प्रक्रियेचा अर्थ जवळ जवळ नेहमी एकच असतो. शिक्षकाने (पक्षी नेत्याने) ज्या प्रचाराला पसंती दर्शविली आहे, ती माहिती विद्यार्थ्यांना (जनतेला) देण्यात येते. 'जाण उंचावणे' हे 'बांधिलकी' प्रमाणे योग्य व अचूक राजकीय धोरण असण्यासारखेच आहे. म्हणजे हा जुनाच – 'राजकीय डॉन.' पक्षाचे धोरण !

वाङ्मयीन समीक्षेच्या क्षेत्रात एक फारच समान अशी विचार पद्धती प्रचलित आहे. तो कम्युनिझमचा परिणाम आहे अशा स्वरूपात त्याकडे पाहिले जात नाही. पण प्रत्यक्षात तो आहे. प्रत्येक लेखकाला मी या पुढे सांगणार आहे त्याचा अनुभव आलेला असतो. एखादी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

कादंबरी, एखादी कथा ही या ना त्याबद्दल असते. मी fifth child या शीर्षकाची लघु कादंबरी लिहिली आहे. तिची रवानगी ताबडतोब वेगवेगळ्या कप्प्यात करून अनेक समीक्षकांनी ती कोणत्या 'या ना त्याबद्दल' आहे हे सांगितले. काहींनी पॅलेस्टीन प्रश्नाच्या कप्प्यात, काहींनी जनुक शास्त्राचे संशोधन, काहींनी 'स्त्री-वाद', काहींनी ज्यू-विरोध इत्यादी इत्यादी अशा वेगवेगळ्या कप्प्यात त्या कादंबरीची रवानगी केली. एक दिवस फ्रान्समधून एक पत्रकार माझ्या दिवाणखान्यात आली. ती स्थानापन्न होण्याअगोदर मला म्हणाली, अर्थात fifth child ही कादंबरी AIDS विषयाची आहे. पुढील संभाषणाचा प्रतिबंध करण्यासाठी हे परिणामकारक बूच आहे – असे मी डोरीस लेसिंग तुम्हाला खात्रीपूर्वक सांगते. या अशा प्रकारच्या विधानावर लेखक असे म्हणाला की, मला AIDS या प्रश्नासंबंधी किंवा पॅलेस्टिनच्या प्रश्नासंबंधी लिहिण्याची इच्छा असली तर मी एक पुस्तिका लिहिली असती. लेखकाने असे उत्तर दिले तर त्याच्याकडे प्रश्नार्थक मुद्रेने पाहिले जाते. याचे कारण हा अशा प्रकारचा विचार हा अपरिचित बनला आहे. ललित लेखकाच्या कल्पनाशक्तीतून निर्माण झालेली कोणतीही साहित्यकृती ही कोणत्या ना कोणत्या प्रश्नासंबंधी खरोखरच असते हा विचार पुन्हा एकदा सांगावेसे वाटते की सुप्रसिद्ध झाडनाव्ह यांनी प्रथम प्रतिपादलेल्या व अंमलातही आणलेल्या 'समाजवादी यथार्थवादाचा' वारसदार आहे. केवळ एखादी कथा सांगण्याकरिता लेखक गोष्ट लिहितो असे सांगणे शिष्ट संमत नाही. तसे कोणी केले तर ती कृती प्रतिगामी तर असतेच, पण ती पराकोटीचा छचोर (fnivolous) आहे असे समजण्यात येते. हजारो विद्यापिठे आहेत. त्या प्रत्येकात वाङ्मयीन विभाग असतात. हे सर्वच विभाग 'समाजवादी यथार्थवाद' स्वरूपाच्या विचाराच्या पकडीत आहेत. असे असले तरी कथा-कथनाचा जो इतिहास आहे तो आपणास काय सांगतो? तो असे सांगतो की, मानवी अनुभवावर या ना त्या मार्गाने प्रकाश न टाकणारी एकही कथा वा कादंबरी आजवर तरी कधीही लिहिली गेलेली नाही. प्रत्येक कथा-कादंबरी या ना त्याबद्दल असलीच पाहिजे ही मागणी हा धर्मनिष्ट विचार आहे आणि कम्युनिझमच्या फार पूर्वीच्या काळात गेल्यास तो धार्मिक विचारातून आलेला विचार आहे. या धार्मिक विचाराची इच्छा, साध्याभोळ्या जन-सामान्यांचे मन सुधारण्यासाठी पुस्तके लिहिली गेली पाहिजेत, या पुस्तकातून दिल्या जाणाऱ्या संदेशाचे नमुने मी आपणास पेश करीत आहे. 'आपल्या घरट्यात राहणारे छोटे पक्षी सहमती दर्शवितात.' चांगल्या मुलांनी त्यांना जे काही सांगितले गेले आहे, ते त्यांनी केले पाहिजे. चांगल्या मुलांनी तसे करणे हे त्यांचे कर्तव्यच आहे. वेल्स या भागातील एका हॉटेलमधील भिंतीवर ही वचने लिहिलेली मला आढळली. उदा.: समजा एखाद्या लेखकाने भीतभीत असे सांगितले की (ते त्यांनी सांगावयास हवेच) "Eternal Spring." हे जे माझे पुस्तक आहे ते मध्य पूर्वेतील पाणी टंचाईबद्दल अजिबात नाही. त्याला आधुनिक साहित्य समीक्षक असे प्रत्युत्तर करतील की, "या लेखकाला आपण 'खरोखरच' कशाबद्दल लिहित



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

आहोत याची काहीही कल्पना नाही ?" राजकीयदृष्ट्या अचूक व योग्य काय (political correctness) याबद्दल बरेचसे काही सांगितले गेले आहे आणि सांगितले जातही आहे. परंतु मला असे वाटते की, मी जे काही पुढे सांगणार आहे त्याची नोंद उपयुक्त ठरेल. तत्त्वप्रणालीच्या स्फूर्तीतून निर्माण झालेल्या पण त्या कोतवाल समितीत (Vigilance comittee) स्वत:ची नेमणूक स्वत: करून घेतलेल्या समित्यांच्या कारभारासारखे हे आहे. मला अर्थातच याठिकाणी असे सुचवायचे नाही की, कम्युनिझमने आपली मशाल या 'राजकीयदृष्ट्या अचूक व योग्य काम करणाऱ्यांच्या' हवाली केली आहे. मला एवढेच सुचवायचे आहे की, मनाला गतकालात लागलेल्या सवयी त्याबद्दल वारंवार व अनेक वेळा दिलेले ज्ञान, मन ते आत्मसात करते. जनानी काय करावे? (ज्ञान नसूनही) (जनहो खादी वापरा) हे आपल्याशिवाय इतर जनांना सांगितले जाते या विचारात अगदी उघडउघडपणे काहीतरी आकर्षक आहे. मी हे अगदी शिशुवर्गात वापरलेल्या भाषेत व मार्गाने सांगत आहे. (मी ते अधिक बौद्धिक परिभाषेत सांगत नाही) याचे कारण तो सगळाच भाग शिशुवर्गातही वागणूकीत शोभेल असा अगदी फारच प्राथमिक (Primitive) स्वरूपाचा आहे. व्यवस्था, नियंत्रण ठेवणे. मर्यादा आखून देणे या सर्वांची गरज मानवी मनात अगदी सखोल अशा ठिकाणी असते. सर्व प्रकारच्या कला या नेहमीच एकांड्या शिलेदारासारख्या, ज्यांची वागणूक अगम्य असते अशा राहिल्या आहेत. त्या कलांना फारच झुकते माप देऊन बोलायचे झाल्यास त्या आपणास अस्वस्थ करतात. याच कारणाने कलाक्षेत्रातील विशेष करून वाङ्मयाने 'कोतवाल समित्या' (House Committee), रशियन बोलशेव्हिकांचे झाडनाव्ह यांच्या नेमणूकांना स्फूर्ती दिली. या कोतवाल समित्या वा हे कोतवाल यांनी काय केले? त्यांना फारच झुकते माप घ्यावयाचे झाल्यास त्यांना इतरांना नैतिक पाठ देण्याचे झटके येत असत आणि त्यांच्याबद्दल पराकोटीचे वाईट सांगावयाचे झाल्यास त्यांनी लेखकांचा छळ कसा केला जाईल हे पाहिले. अचूक राजकीय धोरण ही भूमिका घेणाऱ्या समोर कोणाचे आदर्श आहेत आणि यांच्या पूर्वसुरीबद्दल त्यांना ज्ञान नाही असे दिसते. परंतु ज्यांना ते आहे पण त्याबद्दल त्यांना काहीही वाटत नाही या गोष्टीचा मला अधिक त्रास होतो.

'अचूक राजकीय धोरण' या भूमिकेला काही चांगली बाजू आहे का? आहे अर्थातच आहे. आपला दृष्टीकोन पुन्हा एकदा तपासून पाहण्यास आपणास ती भूमिका भाग पाडते आणि तसे करणे नेहमीच उपयुक्त आहे. परंतु त्रासदायक गोष्ट ही आहे की चळवळीच्या परिघावर असलेले वेडे लोक ते कायम परिघावर राहत नाहीत. ते केंद्रस्थानी येतात. थोडक्यात कुत्र्याचे शेपूट त्यालाच वाकुल्या दाखविते. सगळ्याच जनता चळवळीच्या बाबतीत हे होते. आपण जे काही गृहित धरतो त्याकडे काळजीपूर्वक पाहण्यासाठी आपल्या कल्पनांचा निमूटपणे आणि सुजाणपणे वापर करणाऱ्या प्रत्येक पुरुष / स्त्री गणिक किमान वीसजण विध्वंसक स्वरूपाचा आरडाओरडा करणारे असतात. या आरडाओरडा करणाऱ्यांची





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

इच्छा दुसऱ्यावर सत्ता गाजविणे ही असते. हे लोक वंशवाद, वर्णवाद विरोधक; स्त्री-मुक्ती-वाद आणि आणखी कसे जे काही आहे तसे असले तरी ते काही कमी आरडाओरडा करणारे विध्वसंक ठरत नाहीत.

विद्यापिठातून जी असहिष्णुता दिसून येते, तिचा शोध 'अचूक राजकीय धोरण' या भूमिकेने लादलेला नाही. ते खास करून कम्युनिझमने जन्म दिलेले बाळ आहे. पूर्वीच्या कम्युनिस्ट देशांतील विद्यापीठात असहिष्णुतेचे – आपण तानाशाही हा शब्द तूर्तास बाजूस ठेवू या – अधिराज्य होते. पाश्चिमात्य जगातील काही विभागात तरी त्याच दृष्टीकोनाची लागण झालेली आहे. यातूनच विद्यापीठाच्या धोरणाला वळण मिळते. आपण सर्वांनीच हे पाहिलेले आहे. उदा. : माझे एक प्राध्यापिक मित्र आहेत. जनूक शास्त्राच्या वर्गातून चलेजाव करणारे विद्यार्थी आणि त्या विद्यार्थ्यांची जी तत्त्वप्रणाली आहे तिच्याशी सहमत नसलेल्या प्राध्यापकांच्या वर्गावर बहिष्कार टाकणे याचे वर्णन या प्राध्यापक मित्राने माझ्याजवळ केले आहे. या विद्यार्थ्यांना चर्चा करण्यासाठी आणि त्यांना प्रिय असलेली तत्त्वप्रणाली ही वास्तवात अशी आहे हे प्रत्यक्ष घटना व वस्तुस्थिती द्वारा दाखविणारी चित्रफीत पाहण्यासाठी विद्यापिठातील आपल्या खोलीत या विद्यार्थ्यांना यावे असे आमंत्रण या प्राध्यापक मित्राने त्यांना दिले. जीन्स व टी-शर्ट परिधान केलेले सुमारे सहा युवक त्याच्या खोलीत रांगेने आले; स्थानापन्न झाले हा प्राध्यापक मित्र त्यांच्याशी युक्तीवाद करत होता. तेव्हा ते सर्व चिडीचूप बसले. चित्रफीत दाखविली जात होती. त्यावेळी त्यांना आपली नजर खाली जमिनीकडे रोखून ठेवली आणि त्यानंतर त्या सर्वांनी खोलीतून एकदम चलेजाव केले. क्रियाशील तरुण कम्युनिस्टांप्रमाणे या विद्यार्थ्यांनी आपल्या मनाला झापडे लावून घेतलेली आहेत. त्या वागणूकीचे हे दूरदर्शनच्या पडद्यावर होणारे चित्रण पाहून आणि त्या संबंधीचे वर्णन ऐकून या विद्यार्थ्यांना कदाचित धक्का बसला असावा.

आम्ही ब्रिटनमधील शहरातून पुढील गोष्टी होताना नेहमी पाहतो व ऐकतो. शिक्षण समित्या आणि शालेय व्यवस्थापन समित्याकरवी प्रमुख-शिक्षक (head-master). अगर शिक्षकांना, पूर्वीच्या काळी हडळींची शिकार करणारे जसे गट होते तशा प्रकारचे गट आणि टोळ्या हुसकावून लावतात. हे कृत्य करण्यासाठी अत्यंत घृणास्पद आणि वारंवार क्रूर डावपेचांचा उपयोग करतात. आपण त्यांना भक्ष बनविले आहे ते वर्णवादी आहेत, वंशवादी आहेत अगर कुठल्यातरी अर्थाने ते प्रतिगामी आहेत असा दावा वा प्रतिपादन या टोळ्या करतात. याबद्दल न्याय मागण्याकरिता वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे अगर उच्चस्तरीय समित्यांकडे पुन्हा-पुन्हा आणि वारंवार केलेल्या निवेदनांच्या चौकशीतूनच हे गट आणि टोळ्या यांचे हे अन्याय होते हेच सिद्ध झाले आहे. केप टाऊनमधील माझ्या एका तरुण मैत्रिणीच्या बाबतीत हाच प्रकार घडला. आतंकवादी मुसलमान आणि घट्ट (आणि मठ्ठ) कम्युनिस्ट यांनी एकजूट करून या प्राध्यापिकेला घालवून दिले. **(आतंकवादी मुसलमान आणि घट्ट (आणि मठ्ठ)**



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

**कम्युनिस्टांची एकजूट होणे हे भारतीयांना अपरिचित नाही. चाणक्य डांगे – मुस्लिम लीगची किती तरफदारी करीत होते याची भारतीय इतिहास साक्ष देईल)** या प्राध्यापिकेच्या अगोदर जो प्राध्यापक होता त्याच्या बाबतीत हीच वर्तणूक केली गेली होती आणि तिच्यानंतर आलेल्या प्राध्यापकाच्या बाबतीत पूर्वीच्या धोरणानुसार व तंत्रानुसार ते कार्यवाही करीत आहेत हे नि:संशय. या गटाचे आणि टोळ्यांचे भक्ष ठरलेले सर्वजण गौरवर्णिय होते. परंतु ते वर्णवादी होते का? ते अर्थातच नव्हते. सर्वसामान्यपणे न आढळणारी शय्यासोबत करणारे? अजिबात नाही. कम्युनिझम स्वरूपी गालीचे अनेक कोट्यावधी लोकांच्या पाया खालून परिस्थितीने ओढून घेतल्याकारणाने हे सारे लोक अगदी घायकुतीला येऊन धाव-धाव करीत आहेत. या लक्षावधी लोकांना हे ज्ञात नसेल की, ते सारे दुसऱ्या एखाद्या जडीबुटी स्वरूपाच्या ठोकळेबाज विचार ढाच्याचा (dogma) शोध तहान-भूक बाजूला ठेवून करीत आहेत. आंतकवादी मुसलमानांच्या विचारसरणीत यातील काहींना सुरक्षित स्थान अगोदरच सापडले आहे.

मी यानंतर जो मुद्दा मांडणार आहे त्याचा वरवर पाहाता येथवर मी निर्देशिलेल्या मुद्यांशी फारच कमी संबंध आहे असे वाटेल पण त्या सर्व मांडलेल्या मुद्यांच्या तळाशी तोच मुद्दा कळीचा आहे असे मला वाटते. (Excitement) रोमांचककारी जबरदस्त संवेदनातून (शक्तीशाली) वाटणारा आनंद ही दिवसेंदिवस अधिक-अधिक शक्तीशाली बनत जाणारी प्रेरणा आहे. हाच तो मुद्दा आहे. एखादी व्यक्ती वीस वर्षाची असते – मानवतेची आगेकूच करण्याच्या नावाखाली कोट्यावधी तरुणांनी खून केले गेले किंवा त्या तरुणांचा हालहाल करून छळ करण्यात आला अशा युगात – आपणालाच फक्त सत्य गवसले आहे व ते आपल्यापाशीच आहे, या विचारापेक्षा अधिक आनंददायी विचार कोणता असणार आहे? क्रांतिकारी राजकारण, हाऊस समित्या (म्हणजे कोण देशभक्त व कोण देशद्रोही ठरविणारी समिती) जागृकतेसाठी देण्यात येणाऱ्या घोषणा हे सारे करावयाची धुंदी देणारे ते द्रव्य आहे. इ. स. १९९१ च्या वसंत ऋतूत मला स्पेनमध्ये एक तरुण भेटला. प्रख्यात इंग्लिश कवी बायरन यांच्यासारखीच त्याची जडणघडण होती. पॅरिसमध्ये १९६८ साली (तरुणांचे जे प्रख्यात आंदोलन झाले) त्यात भाग घेण्याच्या दृष्टीने तो फारच लहान होता हे वास्तव त्याच्या जीवनातील अत्यंत दु:खदायकच घटना होती. मी त्याला विचारले – ती क्रांती अयशस्वी ठरलेली आहे असे असतानाही तुला असे का वाटते? मी हा प्रश्न त्याला विचारला यानेच तो आश्चर्यचकित झाला. त्या क्रांतीत भाग घेणे हे किती रोमांचकारी exciting असले पाहिजे – असे तो म्हणाला, ती क्रांती घडत असतानाच त्या पहाटे आपण जिवंत आहोत. यापेक्षा अधिक सुखदायक विचार कोणता? आपणास त्या क्रांतीत भाग घेण्याचे स्फुरण होते; आपणास तसा बुलावा होता अगदी उच्च स्तरातील, रोमांचासारखा वाटणारा, कामलीचा मनोहारी अशी चौकट (fix) हे सारे. सुखदायकता



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

इच्छा दुसऱ्यावर सत्ता गाजविणे ही असते. हे लोक वंशवाद, वर्णवाद विरोधक; स्त्री-मुक्तीवाद आणि आणखी कसे जे काही आहे तसे असले तरी ते काही कमी आरडाओरडा करणारे विध्वसंक ठरत नाहीत.

विद्यापिठातून जी असहिष्णुता दिसून येते, तिचा शोध 'अचूक राजकीय धोरण' या भूमिकेने लादलेला नाही. ते खास करून कम्युनिझमने जन्म दिलेले बाळ आहे. पूर्वीच्या कम्युनिस्ट देशांतील विद्यापीठात असहिष्णुतेचे – आपण तानाशाही हा शब्द तूर्तास बाजूस ठेवू या – अधिराज्य होते. पाश्चिमात्य जगातील काही विभागात तरी त्याच दृष्टीकोनाची लागण झालेली आहे. यातूनच विद्यापीठाच्या धोरणाला वळण मिळते. आपण सर्वांनीच हे पाहिलेले आहे. उदा. : माझे एक प्राध्यापिक मित्र आहेत. जनूक शास्त्राच्या वर्गातून चलेजाव करणारे विद्यार्थी आणि त्या विद्यार्थ्यांची जी तत्त्वप्रणाली आहे तिच्याशी सहमत नसलेल्या प्राध्यापकांच्या वर्गावर बहिष्कार टाकणे याचे वर्णन या प्राध्यापक मित्राने माझ्याजवळ केले आहे. या विद्यार्थ्यांना चर्चा करण्यासाठी आणि त्यांना प्रिय असलेली तत्त्वप्रणाली ही वास्तवात अशी आहे हे प्रत्यक्ष घटना व वस्तुस्थिती द्वारा दाखविणारी चित्रफीत पाहण्यासाठी विद्यापिठातील आपल्या खोलीत या विद्यार्थ्यांना यावे असे आमंत्रण या प्राध्यापक मित्राने त्यांना दिले. जीन्स व टी-शर्ट परिधान केलेले सुमारे सहा युवक त्याच्या खोलीत रांगेने आले; स्थानापत्र झाले हा प्राध्यापक मित्र त्यांच्याशी युक्तीवाद करत होता. तेव्हा ते सर्व चिडीचूप बसले. चित्रफीत दाखविली जात होती. त्यावेळी त्यांना आपली नजर खाली जमिनीकडे रोखून ठेवली आणि त्यानंतर त्या सर्वांनी खोलीतून एकदम चलेजाव केले. क्रियाशील तरुण कम्युनिस्टांप्रमाणे या विद्यार्थ्यांनी आपल्या मनाला झापडे लावून घेतलेली आहेत. त्या वागणूकीचे हे दूरदर्शनच्या पडद्यावर होणारे चित्रण पाहून आणि त्या संबंधीचे वर्णन ऐकून या विद्यार्थ्यांना कदाचित धक्का बसला असावा.

आम्ही ब्रिटनमधील शहरातून पुढील गोष्टी होताना नेहमी पाहतो व ऐकतो. शिक्षण समित्या आणि शालेय व्यवस्थापन समित्याकरवी प्रमुख-शिक्षक (head-master). अगर शिक्षकांना, पूर्वीच्या काळी हडळींची शिकार करणारे जसे गट होते तशा प्रकारचे गट आणि टोळ्या हुसकावून लावतात. हे कृत्य करण्यासाठी अत्यंत घृणास्पद आणि वारंवार क्रूर डावपेचांचा उपयोग करतात. आपण त्यांना भक्ष बनविले आहे ते वर्णवादी आहेत, वंशवादी आहेत अगर कुठल्यातरी अर्थाने ते प्रतिगामी आहेत असा दावा वा प्रतिपादन या टोळ्या करतात. याबद्दल न्याय मागण्याकरिता वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे अगर उच्चस्तरीय समित्यांकडे पुन्हा-पुन्हा आणि वारंवार केलेल्या निवेदनांच्या चौकशीतूनच हे गट आणि टोळ्या यांचे हे अन्याय होते हेच सिद्ध झाले आहे. केप टाऊनमधील माझ्या एका तरुण मैत्रिणीच्या बाबतीत हाच प्रकार घडला. आतंकवादी मुसलमान आणि घट्ट (आणि मठ्ठ) कम्युनिस्ट यांनी एकजूट करून या प्राध्यापिकेला घालवून दिले. (**आतंकवादी मुसलमान आणि घट्ट (आणि मठ्ठ)**



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

**कम्युनिस्टांची एकजूट होणे हे भारतीयांना अपरिचित नाही. चाणक्य डांगे – मुस्लिम लीगची किती तरफदारी करीत होते याची भारतीय इतिहास साक्ष देईल)** या प्राध्यापिकेच्या अगोदर जो प्राध्यापक होता त्याच्या बाबतीत हीच वर्तणूक केली गेली होती आणि तिच्यानंतर आलेल्या प्राध्यापकाच्या बाबतीत पूर्वीच्या धोरणानुसार व तंत्रानुसार ते कार्यवाही करीत आहेत हे नि:संशय. या गटाचे आणि टोळ्यांचे भक्ष ठरलेले सर्वजण गौरवर्णिय होते. परंतु ते वर्णवादी होते का? ते अर्थातच नव्हते. सर्वसामान्यपणे न आढळणारी शय्यासोबत करणारे? अजिबात नाही. कम्युनिझम स्वरूपी गालीचे अनेक कोट्यावधी लोकांच्या पाया खालून परिस्थितीने ओढून घेतल्याकारणाने हे सारे लोक अगदी घायकुतीला येऊन धाव-धाव करीत आहेत. या लक्षावधी लोकांना हे ज्ञात नसेल की, ते सारे दुसऱ्या एखाद्या जडीबुटी स्वरूपाच्या ठोकळेबाज विचार ढाच्याचा (dogma) शोध तहान-भूक बाजूला ठेवून करीत आहेत. आंतकवादी मुसलमानांच्या विचारसरणीत यातील काहींना सुरक्षित स्थान अगोदरच सापडले आहे.

मी यानंतर जो मुद्दा मांडणार आहे त्याचा वरवर पाहाता येथवर मी निर्देशिलेल्या मुद्यांशी फारच कमी संबंध आहे असे वाटेल पण त्या सर्व मांडलेल्या मुद्यांच्या तळाशी तोच मुद्दा कळीचा आहे असे मला वाटते. (Excitement) रोमांचककारी जबरदस्त संवेदनातून (शक्तीशाली) वाटणारा आनंद ही दिवसेंदिवस अधिक-अधिक शक्तीशाली बनत जाणारी प्रेरणा आहे. हाच तो मुद्दा आहे. एखादी व्यक्ती वीस वर्षाची असते – मानवतेची आगेकूच करण्याच्या नावाखाली कोट्यावधी तरुणांनी खून केले गेले किंवा त्या तरुणांचा हालहाल करून छळ करण्यात आला अशा युगात – आपणालाच फक्त सत्य गवसले आहे व ते आपल्यापाशीच आहे, या विचारापेक्षा अधिक आनंददायी विचार कोणता असणार आहे? क्रांतिकारी राजकारण, हाऊस समित्या (म्हणजे कोण देशभक्त व कोण देशद्रोही ठरविणारी समिती) जागृकतेसाठी देण्यात येणाऱ्या घोषणा हे सारे करावयाची धुंदी देणारे ते द्रव्य आहे. इ. स. १९९१ च्या वसंत ऋतूत मला स्पेनमध्ये एक तरुण भेटला. प्रख्यात इंग्लिश कवी बायरन यांच्यासारखीच त्याची जडणघडण होती. पॅरिसमध्ये १९६८ साली (तरुणांचे जे प्रख्यात आंदोलन झाले) त्यात भाग घेण्याच्या दृष्टीने तो फारच लहान होता हे वास्तव त्याच्या जीवनातील अत्यंत दु:खदायकच घटना होती. मी त्याला विचारले – ती क्रांती अयशस्वी ठरलेली आहे असे असतानाही तुला असे का वाटते? मी हा प्रश्न त्याला विचारला यानेच तो आश्चर्यचकित झाला. त्या क्रांतीत भाग घेणे हे किती रोमांचकारी exciting असले पाहिजे – असे तो म्हणाला, ती क्रांती घडत असतानाच त्या पहाटे आपण जिवंत आहोत. यापेक्षा अधिक सुखदायक विचार कोणता? आपणास त्या क्रांतीत भाग घेण्याचे स्फुरण होते; आपणास तसा बुलावा होता अगदी उच्च स्तरातील, रोमांचासारखा वाटणारा, कामलीचा मनोहारी अशी चौकट (fix) हे सारे. सुखदायकता



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

यासारखी जी मानसिकता आहे, तिचा आपल्या एका राजकीय विश्लेषकाने चांगल्या प्रकारे गोषवारा दिला आहे. ही निदर्शने करण्यात जवळजवळ कोणताच मुद्दा अनुस्यूत नव्हता; असलाच तर तो फार छोटा होता. म्हणजे काहीतरी प्रत्यक्ष साध्य करण्याच्या दृष्टीकोनातून पाहाता. हा विश्लेषक म्हणतो विद्यमान काळातील डाव्या गटांचे जे राजकारण आहे त्यातला बराचसा भाग हा काही साध्य करण्यासाठी नसतो त्याच्याशी त्याना काहीही कर्तव्य नसते. साध्य हा मुद्दाच नाही साधन हाच मुद्दा आहे.

या (पाश्चिमात्य) जगात आपल्या आयुष्यातल्या मधल्या चरणात असलेले अनेक आहेत ते सत्ता स्थानावर आहेत. परंतु इ. स. १९६८ सालच्या फ्रान्समधल्या विद्यार्थी क्रांतीत झालेल्या घटनात सहभागी झाल्याचा त्यांचा जो अनुभव आहे तो त्यांना रसरशीत व जिवंत वाटतो म्हणजे युद्धातील रणभूमीवरील लढायातील सैनिकांसारखा. इ. स. १९६८ सालच्या घटना हा त्यांच्या आयुष्यातील परमोच्च बिंदू. एक मुद्दा उन्मेखून लक्षात घ्या. कम्युनिस्टांनी निदर्शनांचा, दंगलींचा, मोर्चाचा, अर्ज विनंत्या करणाऱ्यांचा इ. तसेच नव्हे तर क्रांतीचाही शोध लावलेला नाही. एकोणिसावे शतक या सर्व घटनांनी अगदी परिपूर्ण भरलेले आहे. इ. स. १८४८ सालच्या युरोपमधील घटना त्या शतकाच्या फक्त एक भाग आहेत त्या कितीतरी अगोदरची फ्रेंच राज्यक्रांती. फ्रेंच राज्यक्रांती ही आपल्यापैकी अनेकांच्या मानसिकतेची गंगोत्री आहे. यासाठी जाँ जाक रूसो याला आपणाला दोष खरोखरच देता येणार नाही. संवेदनाक्षमता आणि उद्दीपन (elation) यांची पूजा करावी याचा शोध त्यांनी लावलेला नाही. जे ग्रंथ अजूनही आपणास काही शिकवितात त्या ग्रंथातून या कल्पना त्याने प्रतिबिंबीत केल्या. मनाला उत्तेजित करणाऱ्या कल्पनांनी या जगातील देशांना, राष्ट्रांना झंझावाताप्रमाणेच नेहमीच झपाटून टाकलेले आहे. कल्पना या सुर्वश्रेष्ठ आहेत असे मानणारे लोक नेहमीच होते. या कल्पना पूर्वी नेहमीच धार्मिक स्वरूपाच्या कल्पना होत्या, ही वस्तुस्थिती आपण आपल्या मनात ठेवावी तसे करणे कदाचित उपयुक्त ठरेल (काही विभागात त्या अजूनही धार्मिक आहेत आणि त्यांचा प्रसार फारच जलद होत आहे) आपण ज्या मानसिक आकृतिबंधाची तपासणी करीत नाही असे आकृतिबंध आपल्या मनात आहेत. हे आकृतिबंध आपल्या वागणुकीवर नियंत्रण ठेवतात.

निदान अगदी नजीकच्या भूतकाळात, कालपरवापर्यंत क्रांती ही मतपेटीशी तुलना करता उदात्त गोष्ट आहे, हे अगदी पक्केपणी गृहीत धरले जात होते. गंभीर प्रकृतीच्या तरुण व्यक्तीचे योग्य स्थान हे क्रांतिकाराबरोबर राहण्यात आहे. हे पूर्वी आणि अनेक वेळा अजूनही गृहित धरले जाते. क्युबा आणि निकारागुआ हे देश असोत, कोणत्याही देशातील प्रस्थापिताशी मतभेद दर्शविणारे लोक असोत, तळागळातील लोकांना सोसाव्या लागणाऱ्या दुःख व वेदना यांच्याविरुद्ध आवाज उठविणारे असोत अथवा निषेध व्यक्त करणारी वा बहिष्कार टाका असे आवाहन करणारी जी निदर्शने होतात त्याच ठिकाणी त्यांच्याबरोबर



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

राहणे त्यांच्याशी एकजूट करणे, गंभीर प्रकृतीच्या तरुण व्यक्तींचे त्या ठिकाणी स्थान आहे हे गृहित धरले जात होते, अजूनही जाते. नव्या क्रांतीची ती स्थाने आहेत. गडांस्क (झेकोस्लोकीया) अगर बर्लिनमधील कुविख्यात भिंत तोडली जात होती, त्यावेळी पाश्चिमात्य जगातील लाटा मागून लाटा त्याठिकाणी धडकत. थोडक्यात ज्या ठिकाणी जनतेच्या भावनांचा उद्रेक होत असे त्याठिकाणी त्या तरुण व्यक्ती हजर असत. समजा या तरुणाईचा एक विशिष्ट थर खाटमांडूकडे घेऊन जाणारा जो रस्ता आहे,त्यावर रोमांचकारी अनुभवाच्या शोधार्थ आगेकूच करीत असला तर त्याचवेळी या तरुणाव्यतिरिक्त राहिलेल्या तरुणाईचा दुसरा भाग दुसऱ्या कुठेतरी होणाऱ्या क्रांतीतून येणारी झिंग अनुभविण्यात मशगूल होता. आपल्या देशातच राहावे आणि आपल्या मायदेशाच्या भल्यासाठी झटावे यांचा ही तरुणाई कधी विचार करीत असलीच तर तिच्या मनात येणारा तो शेवटच्या क्रमांकाचा विचार आहे. त्यांनी या प्रकारचे वर्तन करावे असे त्यांना सुचविले तर ते ऐकल्यानंतर त्यांना कंटाळा येतो आणि ते जांभया द्यायला लागतात. या तरुणाईच्या मायदेशांचे मूल्यमापन, ते मायदेश घृणास्पद असून ते इतक्या खालच्या पातळीवरचे आहेत की, त्यांच्याकडे लक्ष देण्याची त्या देशांची लायकीच नाही असे केले जाते. या अशा विचारसरणीने एका महाभयंकर विरोधाभासाला जन्म दिला. कम्युनिस्ट राजवटीच्या जोखडाखाली पिचत असलेले देश पश्चिम युरोपमधील देशांकडे स्वतंत्र आणि विपुलता यांनी भरलेले नंदनवन आहे आणि त्याकडे आपणास कधीही पोहोचता येणार नाही अशा दृष्टीकोनातून पहात होते. पण याउलट पाश्चिमात्य देशातील तरुणाई आपले मायदेश हे सहन करता येत नाहीत अशा वेदना दुःख, छळ, दडपशाही याचे प्रतीक आहेत असे ह्यांना वाटत असल्याकारणाने ते इतर देशांकडे लढाई व सत्य यांच्या शोधार्थ धावधाव करीत होते. छळ, दडपशाही, हालअपेष्टा, दुःख व वेदना सोसण्याचा अनुभव घेण्याची जी या तरुणाईची गरज आहे ती आजवर कोणी जाणलीच नसावी. याच कारणाने पाश्चिमात्य जगात होत असलेल्या तथाकथित दडपशाहीला अतिशयोक्ती स्वरूप देऊन तिचा 'शोध' एकामागून एक येणाऱ्या पाश्चिमात्य देशातील राजकीय चळवळींनी लावलेला आहे. म्हणजे त्यांनी कम्युनिस्ट देशातील वा इतर अप्रगत देशातील सत्यकथा आपल्याशा केल्या नाही आहेत. आपण तुरुंगात आहोत. त्या तुरुंगवासातील सर्व हालअपेष्टा आपण मोठ्या धैर्याने आणि शूरतेने सामोरे जाऊन ते सारे सोसले आहे. तुरुंगात त्यांची उलट तपासणी करणारे त्यांचा छळ करतात. मोठ्या कौशल्याने हा तुरुंगवासीय त्यांच्यावर मात करतो. याचे कारण उलट तपासणी करणाऱ्यात चांगला कोण आणि वाईट कोण हे ताबडतोब ओळखण्यात इतके ते चतुर असतात. अशा प्रकारच्या फॅन्टसीजमध्ये आपल्या स्वतःच्या आयुष्यातील अनेक सुखी वर्षे त्यांनी घालविलेली असतात. तथापि या लोकातील एकहीजण राजकीय कारणासाठी तुरुंगात कधीही जाणार नसतो. अर्थात हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी अथक प्रयत्न केले तर गोष्ट वेगळी. सहजासहजी





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

घडणारी ती गोष्ट नाही. Walter Mittys ही एका गाजलेल्या चित्रपटातील त्या चिटपटाइतकीच गाजलेली व्यक्तीरेखा. ही व्यक्ती कायम स्वप्ने पहात असते. स्वप्ने ही वस्तुस्थिती आहे असे तिला वाटते तसेच हे क्रांतीचे वॉल्टर मिट्टी आहेत. अस्मानी स्वरूपाचे अपघात व दुर्दैवी घटना, दडपशाही, छळ, तुरुंगवास, गाडीतून नेलेले अग्निगोल, सेमेटेक्स (प्लास्टिकच्या आवरणातून कसलाही वास नसलेली स्फोटके) आणि धीरोदत्तपणे सोसलेल्या यातना या अशा गोष्टींनी या वॉल्टर मिट्टींचे हे क्रांतीचित्र भारलेले असते. हे जे न दिसणारे क्रांतीचित्र आहे ते छळ आणि दडपशाही ही चालूच रहावी यासाठी ते क्रांतीचित्र योगदान करते आणि तसे त्यानी केलेलेही आहे. म्हणूनच शांततामय आणि लोकशाही देशात होणारे सर्वसामान्य स्वरूपाचे राजकीय आणि सामाजिक प्रयत्न, हे अनेक तरुण मंडळींना फारसे आकर्षक वाटत नाहीत. हे वास्तव सिद्धच झालेले आहे.

माझा सरतेशेवटीचा मुद्दा हा यापूर्वीच्या छेदकातील मुद्याचा विकास आहे. हिंसा करणे आणि खून करणे या गोष्टी अनेक लोकांना प्रिय आहेत. अर्थात या गोष्टी नेहमीच अस्तित्वात होत्या / असतात आणि यापुढेही नेहमीच राहतील. परंतु आदर्श परिस्थितीत असे लोक अल्पसंख्य असतील असे मला वाटते. युरोपच्या इतिहासात दोन शतके क्रांतीची आहेत या वस्तुस्थितीचा एक परिणाम असा झाला आहे की उच्च हेतूने प्रेरित होऊन केलेल्या हिंसेला 'पवित्र' करून घेतले गेले आहे. आपली अशी अपेक्षा असते की, ठार मारणे आणि छळ करणे यासारख्या गोष्टींना सहमती दर्शविणारे, त्यांच्याशी एकरूप होणारे असे अनेक लोक नसतातही. पण नेमके हेच लोक त्या गोष्टींना जेव्हा सहमती दर्शवितात. त्यांच्याशी एकरूप होतात, तेव्हा आपला अपेक्षाभंग होतो. युरोपमधील समाजशास्त्रज्ञ युरोपिय समाजातील काहींना 'मृदू ह्रदयाचे' असे ठरवून त्यांच्यासाठी एक खास वर्ग निर्माण करतात. या अशा व्यक्ती 'मृदू ह्रदयी' असतात. त्यांना फाशीची शिक्षा, चाबकाचे फटके मारणे, वाईट अशी तुरुंगवासाची शिक्षा आणि तळागाळातील लोकांना सोसावी लागणारी दु:खे व वेदना या सर्वांबद्दल घृणा असते. हे 'मृदू ह्रदयी' या सर्वांच्या राग मनात ठेवतात. त्यांचा द्वेष करतात. हे 'मृदू ह्रदयी' या सर्व गोष्टीबद्दल नेहमीच आंदोलने उभारीत असतात. पण हेच लोक एका चांगल्या उद्दिष्टासाठी केलेल्या दहशतवादाचे अनेक वेळा खुल्या दिलाने स्वागत करतात. युरोपच्या सुरुवातीच्या कालखंडात फ्रेंच राज्यक्रांतीतील दहशतीबद्दल वाटणाऱ्या रोमांचकारी प्रेमाची सुरुवात झाली. ह्यानंतर रशियन क्रांतीने त्याला प्रोत्साहन दिले. पुढे चिनी क्रांतीने त्याला आणखी प्रोत्साहन दिले. या सर्वांचा परिणाम एवढाच आहे की, डाव्या गटाचे पाईक – अनुयायी – उदारमतवादी लोक या अशा थोडक्यात कोट्यावधी माणसांना 'सिझोफ्रेनिया' या मानसिक रोगाची लागण झालेली आहे. (या रोगाने पछाडलेली व्यक्ती बाहेरच्या जगातील वास्तव विसरून आपल्या स्वत:च्या मानसिकतेत मशगूल असते) I.R.A (आयरीश रिपब्लिकन आर्मी) ही दहशतवादी संघटना आणि इटलातील रेड ब्रिगेड्स



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

(लाल तुकड्या) ही दहशतवादी संघटना या दोन्ही संघटनांनी आजवर जे खून केले आहेत. त्या कृत्यांचे ही उदारमतवादी मंडळी पूजन करीत नसली, तरी त्यांच्याबद्दलची त्यांची जी सहिष्णूवृत्ती आहे त्यातून त्या रोगांची लागण चांगल्या प्रकारे सहजपणे आविष्कृत होते. इटालीतील एका विशिष्ट वयोगटातील फारच थोड्या तरुणांचे या रेड ब्रिगेड्स या संघटनेत मित्र होतेच. इतकेच नव्हे ते तरुण स्वत: कधी ना कधी त्या दहशतवादी संघटनेत सामील झाले होते. इटालीतील तरुणांनी हे असे वागणे आधुनिक फॅशनला धरून असलेले विलोभनीय वागणे समजले जात होते. शक्य कोटीतील अत्यंत उच्च हेतूनी प्रेरित होऊन राजकीय कारणासाठी खूनाखूनी करण्यासाठी शेकडो तरुणांनी पाठिंबा दिला होता. या रेड ब्रिगेडमध्ये सामील झालेले बहुसंख्य तरुण हे तळागाळातून आलेले नव्हते. ते चांगल्या सधन मध्यमवर्गीयातून किमान मध्यम वर्गीयातून आलेले होते या सर्वांच्या मनाला जोडणारा दुवा होता. अर्थातच त्यांनी नुकत्याच मागे टाकलेल्या युद्धाचा. आपण सर्व पाश्चिमात्यांनी हे मान्य करू या की हे युद्ध इटालीसाठी अत्यंत वाईट व कुरूप असेच होते. दुर्दैवाने आपण इतर पाश्चिमात्य या गोष्टी विसरण्याची प्रवृत्ती प्रकट करतो. परंतु शोषण नसलेला समाज इत्यादी त्या 'मृदू ह्रदयां'च्या व्यक्तींना पडलेली हळूवार अशा फलदाई आणि कोणत्याही प्रलोभनापासून मुक्त असलेल्या भविष्यकाळाची स्वप्ने होती. परंतु जे कोणी अशा संघटनेत भूई धरून राहिले; ते कोणत्याही प्रकारची दयामाया न दर्शविणारे अत्यंत क्रूर खूनी बनले. एक गोष्ट खरी आहे त्या तरुणांतील बहुतेकांची मानसिक सफाई व शुद्धी होऊन, ते चांगले नागरिक झाले आहेत. परंतु या तरुणांनी एकेकाळी जी हिंसक व क्रूर कृत्ये केली होती. नेमक्या त्याच कारणासाठी त्यांचे कौतुक केले जात होते आणि अजूनही केले जाते. डाव्या गटात अजूनही जे काही लोक आहेत ते या तरुणांच्या वागणुकीचे समर्थन करतात ते असे का करतात? मला असे वाटते की याचे कारण पुन्हा एकदा 'क्रांतिकारी रोमॅन्टीसिझम' (क्रांती या घटनेबद्दल वाटणारे रोमँटीक प्रेम).

आता मी माझ्या शेवटच्या मुद्याकडे वळते. यापेक्षा दुसरेही अनेक मुद्दे असण्याची शक्यता आहे. याचे कारण कम्युनिझमने पाश्चिमात्यांचे मानस अनेक प्रकारे घडविलेले आहे. पण त्याची आपणास जाणही नसते. म्हणूनच मी अनेक मुद्यांना स्पर्शही केला नाही असे म्हटले. युरोपमधील डावे गट, सामाजिक चळवळी, इतकेच नव्हे तर उदारमतवादी चळवळीला इतकी इजा पोहोचली आहे की, त्यातून त्या बाहेर येणे अशक्य. याचे कारण सोव्हियट युनियन हे आप्तवाक्य (Paradiqm) बनले होते. ते देखील असे की, ते यशस्वी ठरले तर उत्तम. अयशस्वी ठरले तर तो एक प्रयोग होता अशी सफाई. म्हणूनच त्यात सुधारणा करण्यास वाव आहे अशी धारणा होती. काही दशके, अर्धे शतक, नव्हे पाऊण शतक ज्या 'मृदू ह्रदयी लोकांना' सामाजिक गोष्टी अधिक चांगल्या असाव्यात अशी आस लागली होती, त्यांचे मन सदैव सोव्हियट युनियनने ग्रासले होते. परंतु सोव्हियट युनियनचा



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

खुनाखुनीचा इतिहास, निष्पाप जनतेचे प्रचंड प्रमाणात झालेले शिरकाण, दिखाऊ वा मथवलेले खटले (show trails) यांनी भरलेला आहे. हा असा अपयशाने काठोकाठ भरलेला इतिहास हा सरतेशेवटी दूरवरचा विचार करता, महत्त्वाची बाब आहे. युरोपमधील सर्व प्रगतीशील चळवळींची जी कल्पनाशक्ती होती ती सोव्हियट युनियनच्या अनुभवाची गुलाम होती. परंतु वस्तुस्थिती अशी कटू होती की, हा अनुभव युरोपच्या दृष्टीने अप्रस्तुत होता.

या वास्तवापेक्षा पर्यायी वास्तव कल्पिणे सहज शक्य आहे. आपण समाजवादांचा विकास करण्याचा निर्णय घेतला आहे हे सांगणारा युरोपचा इतिहास अगर सोव्हियट युनियन यांचा कुठलाही संदर्भ न देता एका न्यायाधिष्ठित समाजाचा विकास करण्याचा निर्णय घेतला आहे हे सांगणारा युरोपचा इतिहास अशी कल्पना युरोपिय माणसास करता येईल. आपण एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. सोव्हियट युनियनमधील जुलमी राजवट मोठ्या गुलाबी घोषणा करून अस्तित्वात आलेली असल्याकारणाने न्यायाधिष्ठित पण जो समाजवादी वा कम्युनिस्ट नाही असा समाज निर्माण करणे हे कल्पनेतही अशक्य होऊन बसले होते. ज्यू धर्मीयांचा उच्छेद करण्यासाठी ज्यू धर्मीयांची करण्यात येणारी खुनाखुनी, जाळपोळ, लुटालूट, बलात्कार, श्रमछावण्या (concentration compl) तर्काचा कीस काढणारी अर्थहीन– मूर्खपणा आविष्कृत करणारी भाषा,त्याच्या जोडीला सोव्हियट युनियनची सत्तर वर्षे असा इतिहास असणाऱ्या सोव्हियट युनियनबरोबर आपण पाश्चिमात्य मनाने एकरूप (Identify) झालो आहोत, हे आपणा युरोपियनाना सांगण्याची गरज नाही. एवंच अपयश पुन्हा पुन्हा अपयश आणि आपण युरोपियांच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचे म्हणजे सोव्हियट अपयशाचे समर्थन करण्यासाठी मनाला वळवळ करावयास लावणारे हजारो मार्ग. युरोपचा इतिहास वेगळाच झाला असता असे मला वाटते. **समाजवाद इतका बदनाम झाला नसता.** सरतेशेवटी महत्त्वाचा भाग म्हणजे भांडवलशाही की समाजवाद यातही कशाची निवड करावयाची अशी आपल्या मनाला आपोआप सवय लागली नसती.

रशियनांच्या दृष्टीने आणि आता स्वतंत्र झालेल्या परंतु काही काळ कम्युनिस्ट असलेल्या राष्ट्रांच्या दृष्टीने सोव्हियट युनियनची गेल्या नव्वद वर्षांची कथा ही शोकांतिका आहे. अर्थात थोड्या खालच्या पातळीवर ती युरोपचीही शोकांतिका आहे. या शोकांतिकेचा प्रत्यक्ष वा तितकासा प्रत्यक्ष नसलेल्या प्रभावाने युरोपिय मने भ्रष्ट झाली आहेत. ती किती प्रमाणात झाली आहेत हे सांगण्याचा काल अजून यावयाचा आहे. युरोपिय मन भ्रष्ट झाले आहे याचे कारण युरोपिय मन आपल्या स्वतःच्या अनुभवापेक्षा हे बिगर युरोपिय लोकांच्या अनुभवानी कायम ग्रासलेले असे. त्याचे कारण हे वा ते असेल. अनेक वेळा असे सांगण्यात येते की, जी ही कारणे असतील त्याची आजवर तरी तपासणी झालेली नाही. माझा निष्कर्ष असा आहे की, आपल्या विचारावर प्रभुत्व गाजविणाऱ्या आकृतिबंधाचे आपणाला जोवर



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

ज्ञान होत नाही तोवर आपण ते आकृतिबंध कोणता घाट घेऊन वर येतात हे आपणास जाणता येत नाही; म्हणजे आपण हताशच असणार आणि आपणापुढे खरे म्हणजे कोणताच पर्याय नाही. आपण आपल्या मनावर, आपल्या वागणूकीवर लक्ष ठेवल्यास शिकण्याची आवश्यकता आहे. आपण पुन्हा नव्याने काही विचार करण्याची आवश्यकता आपल्या उद्दिष्टांची व्याख्या करण्याचा हा काळ आहे असे मला वाटते.

**प्रश्न :** आपण सुरुवातीला भाषेच्या उपयोगाबद्दल आणि तिच्यावर नियंत्रण ठेवल्याने होणाऱ्या गर्भित व सूचक अशा राजकीय परिणामाबद्दल बोललात. पूर्व युरोपमधील देश आणि दक्षिण अमेरिकेतील लॅटीन राष्ट्रे यांच्या अनुभवातून. कारण या सर्व देशांना हुकूमशाही राजवटीचा अनुभव आहे. आम्हा अमेरिकन लोकांना काही शिकता येईल का? या देशातील अनेक अशी शेरेबाजी करतात की पाश्चिमात्य देशातील लोक खास करून अमेरिकन हे आपल्या देशातील सरकारकडे बघताना फारच भोळसटपणे पाहतात. मग ते सरकारवर टीका करीत असोत वा नुसता मतभेद दर्शवित असू देत. अनेक वेगवेगळ्या प्रकारच्या हुकूमशाही देशात राहिलेल्या लोकांबरोवर मी बोललो आहे. त्यापैकी जवळजवळ एकहीजण आपल्या देशातील सरकार जे काही सांगते त्यावर विश्वास ठेवत नाही. याउलट अमेरिकेचे आहे. अमेरिकेतील जवळजवळ प्रत्येकजण सरकार जे काही सांगते त्यावर विश्वास ठेवतो. फारच थोडे त्यासंबंधी टीका करतात अगर त्याबद्दल प्रश्न उपस्थित करतात.

**लेसिंग :** पूर्व आणि मध्य युरोपमधील लोकांची तशी भावना नाही, असे मला वाटते. पश्चिम युरोपमध्येदेखील. अमेरिकन लोक आपल्या सरकारच्या धोरणांकडे वा दोषांकडे फारशा दौषक भावनेने पाहात नाही अशी समजूत दृढ आहे. याचे कारण असे असेल की, पश्चिम युरोपमधील आम्ही सर्वजण सर्वसामान्यपणे चांगले चिकित्सक आहोत. आम्ही सिनिकल आहोत. आम्हास जे काही सांगितले जाते, त्यावर काही आम्ही खरोखरच विश्वास ठेवीत नाही. अर्थात याला अपवाद आहे. तो निवडपूर्वीच्या काळाचा, त्या काळात प्रत्येक जणाला निवडणूक ज्वराची काहीशी बाधा झालेली असते. अमेरिकेत ज्या ज्यावेळी नवा अध्यक्ष अधिकारावर येतो त्यावेळी त्या अध्यक्षाकडून अमेरिकन लोक सर्वच गोष्टींची अपेक्षा करतात. वास्तविक हा अध्यक्ष अधिकारावर येण्यापूर्वीचा जो अध्यक्ष होता त्याला ज्या प्रश्नांना सामोरे जावे लागते होते, तेच प्रश्न या नव्या अध्यक्षाकडे आलेले असतात. ही जर वस्तुस्थिती आहे तर अमेरिकन लोक अवास्तव अपेक्षा का करतात? प्रत्यक्ष प्राप्त परिस्थिती लक्षात घेता परिस्थिती फारसा बदल पडणार नाही, हे तुम्हा अमेरिकनाना ज्ञात असते. परंतु प्रत्येकवेळी ज्यावेळी ते नवा अध्यक्ष निवडतात, त्यावेळी जणू नव्या युगाचा आरंभ आता लवकरच होणार आहे, अशा थाटात अमेरिकन बोलू लागतात ते असे का करतात याबद्दल मला अजिबात कल्पना नाही.

**प्रश्न :** कम्युनिझमने प्रक्षेपित केलेल्या मूल्यांची त्यांची लायकी नव्हती त्यापेक्षा ती



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मूल्ये अधिक लायक वा श्रेष्ठ आहेत असे पाश्चिमात्य बुद्धीजीवीनी मानले. आपण त्याबद्दल बोललाच आहात. पाश्चिमात्यांचा स्वत:च्या मूल्यांकडे आणि संस्कृतीकडे तुच्छतेने पाहणे या सर्वांचा उगम कुठल्या ना कुठल्या प्रकारच्या अपराधी मनोवृत्तीतून झाला आहे. आपण ह्या माझ्या विधानाशी सहमत आहात का?

**लेसिंग :** आम्ही ज्या समाजात वास्तव्य करतो त्यापेक्षा अधिक चांगल्या अगर कोणत्या ना कोणत्या प्रकारच्या आदर्श समाजव्यवस्थेची काही कारणाने का होईना पाश्चिमात्यांना अपेक्षा नेहमीच होती व आहे ही. परंतु हा विचार कुठून आला हे मला माहीत नाही आणि अलीकडच्या काळात या प्रश्नांसंबंधी विचार करण्यात मी माझा खूपच वेळ खर्ची घातलेला आहे. पाश्चिमात्य समाजातील बहुसंख्य नागरिकांच्या दृष्टीने जी समाजव्यवस्था, जिच्यात दोष असले तरी ती प्रत्यक्षात तशी फारच चांगली आहे असे असतानाही आम्ही पाश्चिमात्य या समाजव्यवस्थेबद्दल इतके पराकोटीचे का बरे असमाधानी आहोत? काही वेळा ज्या देशात आपण पाश्चिमात्य वास्तव्य करून असतो त्या देशाविषयी वाटणारी तुच्छता आणि घृणा यातून त्या भावनेचा उगम झालेला असावा. (म्हणजे सोव्हियट युनियनने ते 'तसे' होण्या-अगोदर) पाश्चिमात्य देशातील लोकांना वाटत होते, कम्युनिस्ट देशात 'हिरवे' जास्त आहे अगर यदाकदाचित सध्या ते नसले, तर ते हिरवे होणारच आहे. ही जी अशा प्रकारचा विचारधारा आहे. तिचे पर्यवसान, फार विलक्षण अशा विरोधाभासात होते. उदा. : अगदी चांगली सुस्थापित स्थान मंडीत करीत असलेले ब्रिटीश तरुण तो कम्युनिस्ट असल्या-कारणाने, तिसऱ्या जगातील देशात काम करावयास जातात. मी झिम्बाब्वेबद्दल बोलत आहे हे तरुण त्याठिकाणी जाऊन दाखल झाले की, त्याना त्या ठिकाणची राजकीय व सामाजिक परिस्थिती फारच हृदयद्रावक आहे असे त्याना आढळून येते. त्यांची हृदये विदीर्ण होतात. नंदनवन अस्तित्वातच नाही, हे त्यांना पुन्हा एकदा पहावयास मिळते. पण मुद्दा असा आहे की, हे नंदनवन अस्तित्वात असेल अशी लोक अपेक्षा का करतात?

### डोरिस लेसिंग यांचा जीवनपट

**१९१९ –** जन्म २२ ऑक्टोबर पर्शियामधील (सध्याचे इराण) कर्मनशाह येथे. वडील– डाल्फ्रेड कुक टेलर. आई – एमिली मॉड मॅकवेध. १९२१ मध्ये भाऊ हॅरीचा जन्म.

**१९२४ –** ऱ्होडेशियामधील (सध्याचे झिम्बाब्वे) बॅंकेट या छोट्या गावी सर्व कुटुंबासह स्थलांतर. वडीलांचा व्यवसाय – तंबाखू आणि मक्याची शेती.

**१९३३ –** 'सॅलिसबरी' येथील रोमन कॅथलिक माध्यमिक शाळेतील शिक्षण समाप्त.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

१९३९ – सिव्हिल इंजिनिअर फ्रँक विस्डम यांच्याशी विवाहबद्ध. या विवाहापासून जॉन आणि जीन ही दोन अपत्ये. १९४३ साली घटस्फोट. त्यानंतर मुलांचे वास्तव्य वडीलांजवळ.

१९४३-४९ – सॅलिसबरीत सेक्रेटरी आणि स्टेनोग्राफरची नोकरी. मार्क्सिस्ट विचार-सरणीच्या एका छोट्याशा राजकीय संघटनेत सहभाग परंतु कम्युनिस्ट पक्षाला वसाहतवादी सरकारची बंदी.

१९४५-४९ – मर्क्सिस्ट विचारसरणीच्या 'गॉटफ्रेड लेसिंग' या जर्मन तरुणाशी पुनर्विवाह. १९४७ साली मुलगा 'पीटर' याचा जन्म. त्यानंतर पुन्हा घटस्फोट. सरकारी कचेरीत नोकरी करण्यासाठी वडील पूर्व जर्मनीत परत. छोट्या पीटरसह लंडनला प्रयाण.

१९५० – 'दि ग्रास इज सिंगिंग' ही कादंबरी प्रकाशित (मायकेल जोसेफ, न्यूयॉर्क क्रॉवेल).

१९५१ – 'धिस वॉज दि ओल्ड चीफ्स कंट्री' प्रकाशित (मायकेल जोसेफ न्यूयॉर्क क्रॉवेल).

१९५२ – 'मार्था क्वेस्ट' हे चिल्ड्रन ऑफ व्हयोलन्स' या मालिकेतील पहिले पुस्तक प्रकाशित. (मायकेल जोसेफ, न्यूयॉर्क सायमन अँड शूस्टर १९६४).

१९५३ – 'फाइव्ह शॉर्ट नॉव्हेल्स' (मायकेल जोसेफ, हार्मंड्स्वर्थ, पेंग्वीन १९६०)

१९५४ – 'अ प्रॉपर मॅरेज' चिल्ड्रन ऑफ व्हायोलन्स' या मालिकेतील दुसरे पुस्तक.
(मायकेल जोसेफ, न्यूयॉर्क, सायमन अँड शूस्टर १९६४) लेखकांच्या संघटनेतर्फे 'फाइव्ह शॉर्ट नॉव्हेल्स' या पुस्तकाला सॉमरसेट मॉम पारितोषिक

१९५६ – 'रिट्रीट टू इनोसन्स' प्रकाशित (मायकेल जोसेफ, न्यूयॉर्क, प्रॉमिथिअस १९५९)

१९५७ – 'दि हॅबिट ऑफ लव्हींग' (मॅकगिब्बन अँड की, न्यूयॉर्क बेलंटाइन, क्रॉवेल, पॉप्युलर लायब्ररी)

१९५८ – 'अ रिपल फ्रॉम दि स्टॉर्म', 'चिल्ड्रन ऑफ व्हायोलन्स' या मालिकेतील तिसरे पुस्तक. (मायकेल जोसेफ, न्यूयॉर्क सायमन अँड शूस्टर १९६६)

१९६२ – 'दि गोल्डन नोटबुक' (मायकेल जोसेफ, न्यूयॉर्क, सायमन अँड शूस्टर 'प्ले विथ अ टायगर' हे एक तीन अंकी नाटक (मायकेल जोसेफ)



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

१९६३ – 'अ मॅन अँड टू विमेन' (मॅकगिब्बन अँड की न्यूयॉर्क सायमन अँड शूस्टर, पॉप्युलर लायब्ररी).

१९६४ – 'आफ्रिकन स्टोरीज' (मायकेल जोसेफ, न्यूयॉर्क, सायमन अँड शूस्टर, पॉप्युलर लायब्ररी १९६५)

१९६५ – 'लँडलॉकड्' 'चिल्ड्रन ऑफ व्हायोलन्स' या मालिकेतील चौथे पुस्तक (मॅक्गिल्बन अँड की, न्यूयॉर्क सायमन अँड शूस्टर १९६६)

१९६६ – दि ब्लॅक मॅडोना अँड विंटर इन जुलै (पँथर)

१९६७ – पर्टीक्युलरली कॅट्स (मायकेल जोसेफ, न्यूयॉर्क, सायमन अँड शूस्टर)

१९६९ – 'दि फार गेटेड सिटी','चिल्ड्रन ऑफ व्हायोलन्स' या मालिकेतील पाचवे पुस्तक (मॅकगिल्बन अँड की, न्यूयॉर्क नॉफ)

१९७१ – 'ब्रिफींग फॉर अ डिसेंट इंन्टू हेल' (जोनाथन केप. न्यूयॉर्क. नॉफ)

१९७२ – 'दि स्टोरी ऑफ अ नॉन मॅरिअिंग मेन अँड अदर स्टोरीज' (जोनाथन केप) अमेरिकन शीर्षक 'दि टेम्प्टेशन ऑफ जॅक ऑर्कनी. (न्यूयॉर्क. नॉफ)

१९७३ – 'दि समर बिफोर दि डार्क' (इजोनाथन केप, न्यूयॉर्क, नॉफ)

१९७४ – 'दि मेमॉयर्स ऑफ अ सर्व्हायव्हर' (ऑक्टॅगांन, न्यूयॉर्क, नॉफ १९७५)

१९७६ – विदेशी लेखकांकरिता ठेवलेल्या 'फ्रेंच प्रिक्स मेडिसिज' या पारितोषिकाने सन्मानित.

१९७८ – 'स्टोरीज' (न्यूयॉर्क नॉफ)

१९७९ – कॉलोनाडजड् प्लॅनेट फाइव्ह. शिकास्ता – 'कॅनॉपस इन अॅरगॉस अर्काइव्हज' या मालिकेतील पहिले पुस्तक. (जोनाथन केप, न्यूयॉर्क, नॉफ).

१९८० – 'दि मॅरेजेस बिटविन झोन्स थ्री, फोर, अँड फाइव्ह' 'कॅनॉपस इन अॅरगॉस : अर्काइनज्' या मालिकेतील दुसरे पुस्तक.

१९८१ – 'दि सिरीयन अेक्सपरिमेंट' 'कॅनॉपस इन अरगॉस : अर्काइव्हज् :' या मालिकेतील तिसरे पुस्तक.

१९८२ – 'दि मेकिंग ऑफ द रिप्रेझेंटेटिव्ह फॉर प्लॅनेट अेट' 'कॅनॉपस इन अॅरगॉस : अर्काइव्हज' या मालिकेतील चौथे पुस्तक (जोनाथन केप, न्यूयॉर्क नॉफ)

१९८३ – डॉक्युमेंट्स रिलेटिंग टू द सेंटिमेंटल अेंजटस् इन दि व्हॉल्येन अेम्पायर (जोनाथन केप, न्यूयॉर्क नॉफ)



अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

| | |
|---|---|
| १९८४ – | 'द डायरीज ऑफ जेन सॉमर्स (न्यूयॉर्क, रँडम हाऊस) जेन सॉमर्स या टोपण नावाखाली लिहिलेल्या 'दि डायरी ऑफ अ गुड नेबर' आणि 'इफ द ओल्ड कुड' (मायकेल जोसेफ १९८३-८४ न्यूयॉर्क नॉफ) या दोन कादंबऱ्यांचे संकलन. |
| १९८५ – | 'दि गुड टेररिस्ट' (जोनाथन केप, न्यूयॉर्क नॉफ) व्हिटब्रेड पारितोषिक. |
| १९८६ – | डब्ल्यू. एच्. स्मिथ साहित्यिक पारितोषिक. |
| १९८७ – | पामेरो पारितोषिक प्राप्त. |
| १९८८ – | 'दि फिफ्थ चाइल्ड' (जोनाथन केप, न्यूयॉर्क, नॉफ) |
| १९९२ – | आफ्रिकन लाफ्टर (न्यूयॉर्क, हार्पर कॉलिन्स) 'लंडन ऑड लँड' (हार्पर कॉलिस) अमेरिकन शीर्षक 'दि रिअल थिंग : स्टोरीज अँड स्केचेस (हार्पर कॉलिन्स). |
| १९९५ – | अंडर माय स्कीन. |
| १९९८ – | वॉकींग इन शेड. |
| २००१ – | 'दि स्वीटेस्ट ड्रीम.' |

**–सौ. सुमती जोशी**

---

"फक्त एकच स्वप्न पहाण्याच्या लायकीचे आहे... आपण जिवंत असतो तेव्हा आपण जिवंतच असतो, असे स्वप्न पाहणे आणि आपण जेव्हा मृत होऊ तेव्हाच फक्त मृत व्हायचे."

"याचा नेमका अर्थ काय आहे?"

"प्रेम करावे." आपल्यावर प्रेम केले जावे. आपण किती नगण्य आहोत याचा विसर कधीही पडू देऊ नका. ज्या हिंसेचा उच्चारही होत नाही आणि तुमच्या अवतीभोवतीच्या आयुष्यातील घृणास्पद विषमता यांच्याशी कधीही जुळवून घेऊ नका. असे व्हायचेच हा विचार कधीही मनात येऊ देऊ नका. अत्यंत दुःखद स्थळीदेखील आनंदाचा शोध घ्या. सौंदर्य ज्या ठिकाणी विसावा घेते; तेथपर्यंत सौंदर्याच्या पाठोपाठ जा. सामर्थ्याला मान द्या पण सत्तेला कधीही देऊ नका. गुंतागुंतीचे जे आहे जे सोपे करण्याचा कधीही प्रयत्न करू नका आणि जे सोपे आहे ते कधीही गुंतागुंतीचे करू नका. याही सर्वापलीकडे सरते शेवटी जागरुक राहा, प्रयत्न करा आणि समजावून घ्या. प्राप्त परिस्थिती आणि आजूबाजूची परिस्थिती यांपासून कधीही पळ काढू नका आणि कधीही कधीही विसर पडू देऊ नका.

**–अरूंधती रॉय**



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

# लेखमाला

## मार्सेल प्रूस्त

**–विष्णू सदाशिव ब्रह्मे**

**प्रकरण तेरा**

काबुर्गची प्रूस्तची ट्रिप आणि त्यानंतर लागलीच त्यानं सुरू केलेलं कादंबरीवरील काम या दोहोंमध्ये लागेबांधे जुळलेले होते असं म्हटलं तर ते वावगं ठरू नये. ही ट्रिप तशी फारशी सुखदायी ठरली नसली तरी तिचे परिणाम मात्र खचितच लाभदायी ठरले. तिनं प्रूस्तच्या स्मृतींना उजाळा दिला आणि त्याचे अनुभवविश्व समृद्ध केले. बऱ्याच कालावधीनंतर बाहेरील जगात तो वावरला होता, ते जग त्यानं अगदी जवळून डोळे भरून पाहिलं होतं. नॉर्मन किनाऱ्यावरील प्रस्तर, तो विशाल समुद्र शहरातील कोरीव दगड आणि रंगीत तावदानं याचं त्यानं चिकित्सक नजरेनं घेतलेलं दर्शन या साऱ्यांचा एकत्रित परिणाम म्हणजे कादंबरी हाती घेण्याची त्याच्यामध्ये निर्माण झालेली उर्मी. आजवर त्यानं कधीच काम केलं नसेल असं काम करायला तो उद्युक्त झाला. एवढंच नव्हे तर त्या कामात तो पार बुडून गेला. तरुणपणी त्यानं संकल्पिलेल्या 'मास्टरपीस'ची तयारी करण्याच्या, त्याला मूर्त रूप देण्याच्या कामी त्यानं स्वत:ला पूर्णपणे वाहून घेतलं.

निर्मितीक्षण आला पण, प्रूस्तच्या आयुष्यातील इतर गोष्टींप्रमाणे संथगतीनं आला; यातना देत आला; अनिश्चितपणे तो साकार होऊ लागला. सुरुवातीला रूपरेखा, उद्दीष्ट स्पष्ट नव्हतं. प्रगतीची प्रक्रिया अडखळत होत होती. यशस्वी पूर्ती होईल ही भावना क्षीण होती. आताची त्याची निर्मिती प्रक्रिया आधीच्या निर्मिती प्रक्रियेहून भिन्न नव्हती, फारशी लक्ष्यवेधी तर खचितच नव्हती.

१९ नोव्हेंबर १९०७ च्या 'ल फिगरो'मध्ये त्याचा 'इम्प्रेस्सिऑं द रूट ऑं ओटोमोबिल' हा लेख छापून आला. कॉं (Caen), बेएझ, लिसिएझ, एव्हेसझ आणि ग्लिासोल्ले इथल्या स्थळांना त्यानं 'माझा शोफर, हरहुन्नरी ॲगोस्तिनेल्ली' याच्याबरोबर भेटी दिल्या होत्या. त्या भेटीच्या वृत्तांताची गोळाबेरीज त्यानं प्रस्तुत लेखात केली होती. लेखाच्या प्रारंभी केलेलं कॉंच्या कळसाचं मनोवेधक वर्णन पुढं 'द्यु कॉंते द् शे स्वान'मध्ये अवतरलेले दिसते. लेखाची एक प्रत त्यानं ॲगोस्तिनेल्लीला त्याच्या गावी पाठवून दिली होती. त्या तरुण शोफरनं दिलेल्या तिची पोच त्याला विशेष करून भावली होती.

'ल फिगरो'च्या २६ डिसेंबरच्या अंकात त्याचा गुस्ताव द बोर्दावरील लेख प्रसिद्ध झाला,'डी' या टोपण नावानं. आधल्या आठवड्यात बोर्दाचं निधन झालं होतं. अतुलनीय



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

तलवार बहादूर या शब्दात त्यानं बोर्दाचं वर्णन केलं होतं. ज्याविषयी प्रूस्तला स्वत: उबग होती त्या टुकार 'सोसायटी-श्रद्धांजली'चं ते विडंबन होतं. याचाच वापर त्यानं पुढं स्वानच्या निधनाच्या शोकांतिकेत अखेरचा स्क्रू पिरगळण्याच्या कामी केला. जराजर्जर बोर्दा त्याच्या आयुष्याच्या अखेरीस द्वंद्वयुद्धाच्या स्थळी 'सेकंड' म्हणून उपस्थित राहिला होता, या गोष्टीचा उल्लेख करून प्रूस्तनं औद्धत्याचा कळस गाठला होता. लिहिलं होतं,'आमची स्मरणशक्ती दगा देत नसेल तर, ज्याच्यासाठी तो "सेकंड" म्हणून हजर राहिला, तो होता आमचा लेखक मॉसिए मार्सेल प्रूस्त, जो ज्याच्या स्मृतिसंबंधीची सुयोग्य उपचार पद्धती नेहमीच जतन करत असतो.' त्यानंतर काही आठवड्यांनी प्रूस्त याहून अगदी भिन्न अशा विडंबनपर लिखाणात गुंतून गेला. त्याच्या कादंबरीपासून या लिखाणानं त्याला बाजूला नेलं असं भासत असलं तरी वस्तुत: 'आ ला रशार्श'च्या द्राविडी-प्राणायम सदृश मार्गावरून अंतिम उद्दिष्टाप्रत नेणारं हे लिखाण ठरलं एवढं बारीक खरं.

१९०८ च्या जानेवारीत एका फ्रॉडनं अवघ्या पॅरिसमध्ये भयंकर खळबळ माजवली. या प्रकरणावर वर्तमानपत्रांचे रकानेच्या रकाने भरले जाऊ लागले. या फ्रॉडचा नायक होता. लेमॉईन नामक एक सराईत भामटा. आपण लावलेल्या शोधाचं आमीष पुढं करून श्रीमंतां-कडून पैसे उकळायची कला त्याला अवगत होती. अलिकडेच त्यानं दावा केला होता तो कृत्रिमरित्या हिरे तयार करू शकते. बऱ्याचशा तज्ज्ञ मंडळीची त्यानं खात्रीही पटवून दिली होती. या मंडळीत 'डॉ. बीर'च्या जगप्रसिद्ध हिरे. खाण कंपनीचा संचालक सर जुलियस वेर्नरीही होता. त्यानं लेमॉईनचे प्रयोग वरवर पाहिले होते आणि त्यानं पूर्ण पारखून उचलेले खडे त्याचे स्वत:चे असावेत एवढे चांगले असल्याचा त्यानं निर्वाळा दिला होता. वस्तूत:, लेमॉईननं ते 'डॉ. बीर' च्या दक्षिण आफ्रिकेतील खाणीमधून खरीदले होते. त्यानंतर सर जूलियसनं कृत्रिम हिऱ्याची फॅक्टरी त्याला उभारता यावी म्हणून जवळजवळ वीस लाख फ्रँक्स आगाऊ रक्कम दिली होती. परंतु प्रत्यक्ष कामाला असमर्थनीय दिरंगाई होत राहिल्यानं सर जुलियसच्या मनात संशय रुजला, बळावला, पक्का झाला. अखेरीस हा सगळा मामला त्यानं कोर्टाच्या निदर्शनास आणून दिला. लेमॉईनवर खटला भरला गेला. खटला मार्चपर्यंत चालला.

या खटल्यानं प्रूस्त हादरला. हा हादरा जबरदस्त होता, व्यक्तिगत स्वरूपाचा होता. त्याच्या आईचं निधन झालं. तेव्हापासून तो स्टॉक मार्केटमध्ये रस घेऊ लागला होता. हा आर्थिक व्यवहार बराचसा लाभदायकही ठरत होता. त्यानं काही भांडवल 'डॉ. बीर'च्या कंपनीमध्येही गुंतवले होते. परंतु प्रूस्तत केसमधील गांभीर्यापेक्षा त्यातील एकूण गमतीशीर मामल्यानं त्याची कल्पनाशक्ती चेतवली गेली. एका संध्याकाळी त्यानं निर्णय घेतला, या फालतू केसवर लेख लिहायचे. 'ज्यात बऱ्याचशा लेखकांची नक्कल करण्याचा मी प्रयत्न करीन.' यातील पहिल्या गटात बाल्झाक, एमिल फाग्वेट, मिशले आणि एडमंड गाँकूर या



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

लेखकांचा समावेश होता. हे लेख 'ल फिगरो'च्या साहित्यिक पुरवणीमध्ये २२ फेब्रुवारी १९०८ रोजी प्रसिद्ध झाले. दुसऱ्या हप्त्यामध्ये फ्लॉबेर आणि साँ बव्ह यांचा. हे लेख १४ मार्चच्या अंकात छापून आले आणि रेनानवरील शेवटचा लेख २८ मार्चच्या अंकात प्रसिद्ध झाला.

फ्रेंच साहित्यातील अत्यंत विनोद प्रचूर आणि अत्यंत मार्मिक म्हणून प्रूस्तच्या या विडंबनांचा निर्देश करता येईल. यामध्ये या नामवंत लेखकांच्या लेखन शैलीचं विडंबन करून त्यानं त्यांची साहित्यिक, समीक्षा केलेली होती. 'ला बिब्ल'च्या प्रास्ताविकात त्यानं म्हटलं होतं : 'एखाद्या लेखकाच्या अनन्य वैशिष्ट्यांचा पूर्ण संघात अनुभवण्यासाठी वाचकाला सहाय्य करणं, त्यांच्या नजरेसमोर तंतोतंत तशाच लक्षणांची मालिका उभी करणं, ज्यायोगे लेखकाच्या प्रतिभेचे हे महत्त्वपूर्ण गुणधर्म त्याच्या ध्यानी येतील – प्रत्येक समीक्षकाचं हे पाहिलं काम आहे.' तथापि, या लेखांद्वारे ती 'अनन्यसाधारण वैशिष्ट्यं' हुडकून काढण्याचीच फक्त नव्हे तर ती हास्यास्पद करण्याची कामगिरीही त्यानं पत्करली असल्याचं दिसतं. पूर्वसूरींचं अनुकरण करण्याचा, नक्कल करण्याचा धोका त्यानं अन्य क्षेत्रांमध्ये केव्हाच पार केलेला होता. परंतु निवेदनात्मक कल्पित कथा लिहिण्याच्या प्रयत्नांमध्ये तो धाका अद्यापीही भय वाटावा असा असल्याचं त्याला वाटत असावं. थोर लेखकाच्या प्रगतीमध्ये अशी एक वेळ येते. जेव्हा, त्याच्या स्वत:च्या साहित्याच्या भल्यासाठी, त्यानं स्वत:ला कमी लेखून त्याच्या थोर पूर्वसुरीची वाहव्वा करणं थांबवायला पाहिजे. प्रूस्त आता अशा वाङ्मयीन उंचीवर पोहोचला होता, जिथून इतर शिखरं त्याच्याच उंचीची वा त्याच्याहून कमी उंचीची त्याला वाटत होती. त्याची 'लेमॉईन विडंबनं' म्हणजे कौतुकाच्या विषारी आल्कली द्रव्यावरील अक्सर इलाज होती, त्याच्या कादंबरीच्या घोरापासून त्याला त्यांनी चिंतामुक्त केलं होतं आणि ती सुरू करण्याचा आखरी प्रयत्न करण्यासाठी त्याची मानसिक तयारी केली होती. वस्तुत: या विडंबनामधून 'आ ला रशार्श' च्या दिशेनं तो अनेक पातळ्यांवरून सरकत होता. आपण विनोदप्रचूर लिहू शकतो याचा त्याला प्रथमच शोध लागला होता. 'ले प्लेझिर ए ले जूर' आणि 'झाँ सान्तेय' यामध्ये पूर्णपणे अभावानेच असलेली त्याची विनोदवृत्ती पूर्ण सामर्थ्यानं विडंबनांमध्ये अवतरली होती आणि ती पुढं 'आ ला रशार्श' मध्ये सातत्यानं आढळून येणार होती; पात्रं आणि त्यांच्याकरवी उघड होणाऱ्या मानवी दौर्बल्याचे कायदेकानू / नियम याबाबतीतील निवेदकाच्या दृष्टीकोनामध्येच केवळ नव्हे, तर स्वत: संबंधीच्या त्याच्या औपरोधिक वृत्तीमध्येही 'झाँ सान्तेय' ज्यामुळे बिघडली गेली होती त्या आत्मसंतुष्टतेपासून आणि आत्मसंभावनेपासून या विडंबनांनी प्रूस्तची मुक्तता केली होती. इतरेजनांची व्यक्तिवैशिष्ट्यं अधोरेखित करण्याचं आणि त्यांना ॲब्सर्ड बनवण्याचं एक प्रभावी साधन म्हणून विडंबन, त्याच्या कादंबरीच्या प्रमुख घटकांपैकी एक बनणारं होतं.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

प्रूस्तला विडंबनांची मालिका तयार करायची नव्हती, त्याला लिहायची होती एक अजोड कादंबरी. 'झाँ सान्तेय'च्या सत्तर वह्या आणि अलिकडच्या काळात जमलेल्या अशा नोंदवह्या ह्यावर काम करण्याची निकड त्याला भासू लागली. कमी-अधिक प्रमाणात तुटक वाटणाऱ्या घटनांच्या मालिकांचं कादंबरी म्हणता येईल अशा स्वरूपात रूपांतर करण्याची ओढ त्याला लागली.

प्रूस्तच्या पुनर्लेखनाचा संपूर्ण इतिहास वा त्यानं घेतलेल्या निरनिराळ्या टप्प्यांची कालनिश्चिती, निर्मिती प्रक्रियेसमयी त्याला घ्यावे लागलेले निर्णय याविषयी लिहिणं, निदान या घटकेला अशक्य आहे. एवढंच म्हणता येईल की, त्यानं काही निर्णय या काळात घेतले होते आणि या अशा निर्णयाची जंत्री करणं तसं फारसं अवघड नाही. यांपैकी सर्वात महत्त्वपूर्ण निर्णय : त्याचं पुस्तक एका शोधाची कहाणी सांगेल, ज्ञानाच्या शोधाची. त्याचा नायक स्वानुभव जाणून घेण्यासाठी आणि त्याचं मूल्यमापन करण्यासाठी सदैव प्रयत्नशील असेल. पुस्तकाच्या प्रारंभापासून तो शिकत असल्याचं दाखवलं जाईल. एकाच वेळी तो बऱ्याच गोष्टी शिकत असेल – प्रेम, प्रवास, साहित्यिक, मैत्र, समाज – संपूर्ण यादी लंबी-चौडी होईल. निवेदन कालक्रमानुसार आणि तर्काधिष्ठित असेल. नायक जसा जगत असेल, नवीन अनुभव संपादन करत असेल, वयानं मोठा होत असेल त्या कालानुसार निवेदन पुढं सरकत जाईल आणि त्याचे स्वत:चे अनुभव तो अधिक चांगल्या प्रकारे जाणण्यास शिकेल, तसं निवेदन तर्काधारे केलं जाईल. हे पुस्तक निदान एका दृष्टीनं, एका विचारी तरुण माणसाची भ्रमणगाथा बनेल.

निवेदकाचा बौद्धिक / तार्किक विकास कादंबरीत अधोरेखित होणं हे प्रूस्तच्या दृष्टीनं महत्त्वाचं होतं. शक्यता आहे, प्रूस्तनं आधीचे कादंबरीकार आणि संगीतरचनाकार ('आशय' आणि 'पुनरावर्ती रूपचिन्हं' यांच्याविषयी तो आस्थेनं बोलत असे) यांच्या काही सूचनांच्या, संकेतांच्या आधारे रचनेची एक कल्पक पद्धती त्यानं तयार केली होती. त्याचा नायक सदैव आपल्या अनुभवाचे सर्व पैलू अभ्यासात राहील आणि ते सारे कादंबरीच्या प्रकरणात आणि विभागात अंतर्भूत करायचे हे त्यानं मनाशी पक्कं केलं होतं. नायकाचं बालपण ज्यात चित्रित करण्यात येईल त्या अगदी प्रारंभीच्या प्रकरणातही प्रेम, सोसायटी आणि समलिंग संभोगीवृत्ती या संबंधीच्या मजकूर येईल; गॉथिक स्थापत्यकला, नोकरचाकर, साहित्यिक, निसर्ग, प्रवास, थिएटर आणि ज्यू यांच्याविषयीचा मजकूर त्यात असेल. लहान मूल असताना या विषयासंबंधी जे शिकणं शक्य आहे ते नायक शिकेल आणि त्यानंतर ते त्यापुढील प्रकरणांमधून येत राहील, अर्थात अधूनमधून आणि काहीशा वेगळ्या आघातानं. एका प्रकरणात नायक प्रेमाशी संबंधित असेल, -दुसऱ्यामध्ये सोसायटीशी, आणखीन पुढल्या प्रकरणात समलिंग संभोगीवृत्तीशी, परंतु, केवळ या विषयांतर्गतच त्याचा वावर मात्र सातत्यानं कदापि असणार नाही. त्याचा अनुभव सदैव त्याच्या सर्व पैलूंनिशी सादर केला



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

जाईल. प्रत्येक प्रकरण हे एक आवर्तन असेल, स्वयंपूर्ण तरीही आधीच्या आवर्तनाचे पडसाद उमटवणारे आणि पुढील आवर्तनाची पूर्वल्पना देणारे.

प्रत्येक प्रकरणातील निवेदनही पुढं सरकत जाईल ते आवर्तन पद्धतीनंच. बरेचसे विषय कमी अधिक प्रमाणात बव्हंशी एकसमयावच्छेदेकरून मांडले जातील. प्रेमाशी संबंधित असलेले प्रामुख्यानं गंभीर स्वरूपांचे प्रसंग आणि सोसायटीशी संबंधित असलेले प्रामुख्यानं विनोदी स्वरूपाचे प्रसंग यांची सरमिसळ असेल. परंतु, या व्यतिरिक्त इतर प्रकारचेही प्रसंग असतील, एका अवस्थेमधून दुसऱ्या अवस्थेमध्ये होणारे बदल परिणाम: असंख्य असतील तद्वतच तुटकही. लागोपाठ येणारे परिच्छेद नायकाच्या आजीशी संबंधित असतील, वेश्यागृहाला त्यानं दिलेल्या भेटीशी संबंधित असतील, थिएटरविषयीच्या त्याच्या आवडी-निवडीविषयी असतील, ज्यूंच्या त्याच्या निरीक्षणाविषयी असतील. भोजनपार्टी, समारंभ यासमयी लक्ष्य सतत बदलत राहील. इथं निरीक्षक डझनभर वेगवेगळ्या संभाषणाचे तुकडे गोळा करील आणि डझनभर वेगवेगळ्या व्यक्तींचे ठसे उमटवत जाईल. प्रत्येक ठिकाणी नाविन्य असेल, प्रत्यक्ष जीवनाच्या बहुविधतेशी मिळतीजुळती बहुविधता असेल.

प्रत्येक मालिकेत नायकाला त्याचा अनुभव चांगल्या रीतीनं उमजत जातो. अशा आवर्तन मालिकेत नोंदवह्यांची सामग्री मांडणं म्हणजे त्या सामग्रीचं एका कादंबरीमध्ये रूपांतर करणं होय. परंतु रूपांतर परिपूर्ण होण्यासाठी केंद्रीभूत विषयाची गरज होती. हा विषय त्याला आढळला स्मृती आणि कला याविषयींच्या बर्गसाँच्या विचारामध्ये. त्याच्या नायकाचा शोध म्हणजे अपेक्षाभंगाची एक मालिका असेल. तो प्रेम करण्याचा, मैत्री जोडण्याचा आणि प्रवास करण्याचा प्रयत्न करील आणि कालांतरानं त्याला आढळून येईल की यातील एकही खरोखरीचे समाधान देऊ शकत नाही. त्याच्या लक्षात येईल की, वर्तमानामध्ये कुठल्यातरी गोष्टीनं जागृत केलेल्या गतकालाचं चिंतन हेच जीवनानं देऊ केलेलं एकमेव सौख्य आहे. त्याला कळून येईल की, हे चिंतन म्हणजेच कला असेल, निदान कलेशी निकटचं साहचर्य असलेलं ते असेल. स्वत:च्या पेशाची त्याला खात्री पटेल, अहेतूक स्मृतींना तो स्वत:ला समर्पित करील; तो एक कादंबरीकार बनेल, स्वत:च्या गतकाळाची कहाणी तो सांगेल.

प्रूस्तच्या ध्यानी आलेलंच असणार की, कादंबरीच्या आशयसूत्रांमध्ये काही वैगुण्य, दोष राहतील. कादंबरी वास्तववादी, तीमधील आशय एका गूढ संकल्पनेचा परिचय करून देणारा. अहेतूक स्मृतीसंबंधीचे उतारे काहीसे विचित्र करण्याचा संभव नाकारता येत नव्हता. वस्तुत: अंत:प्रेरणेचे ते उदात्तीकरण असेल. नाहीतरी अहेतूक स्मृती म्हणजे अंत:प्रेरणेचे एक रूपच नव्हे का? – स्वत:ला बुद्धिप्रामाण्यवादी म्हणवणाऱ्या प्रूस्तनं बुद्धीला असं कमी लेखावं हे नवलच ! बऱ्याचशा प्रकरणांमध्ये त्याचा नायक ज्ञानाचा शोध घेताना दाखवला जाईल आणि त्याच्या बुद्धीच्या सहाय्यानं त्याला तो लागेलही. परंतु शेवटच्या प्रकरणात बुद्धी ही अपर्याप्त अशी स्वाभाविक शक्ती असल्यानं त्याला समजून येईल. बराच काळ अशी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

स्वाभाविक संपादन केलेलं ज्ञान स्वत:चं बरंचसं मोल गमावून बसणं अटळ आहे.

अहेतूक स्मृतीच्या विषयामध्ये, प्रूस्तच्या दृष्टीकोनानुसार, असं बरंच काही होतं जे निर्विवादपणे उचित होतं, रास्त म्हणता येईल असं होतं. त्याच्या कल्पनेमध्ये सतत केंद्रस्थानी होता कलेविषयीचा दांडगा विश्वास आणि अनुभवाच्या इतर स्वरूपाविषयीचा दांडगा अविश्वास. यावरच अहेतूक स्मृतीच्या विषयाचा भर होता. कला ही मुळातच बौद्धिक नसते, किंबहुना ती बौद्धिक नसतेच मुळी, तर पूर्णपणे भिन्नभिन्न मानसिक प्रक्रियेची ती तालीम असते अशी त्याची धारणा होती. त्याची कलेची संकल्पना आत्मचरित्राशी अत्यंत निगडीत होती आणि तशी ती नेहमीच राहणार याबाबत तो ठाम होता. कारण कला आणि स्मृती जर का निगडीत असतात तर त्याच्या स्वानुभवांमधून उचल करण्यावाचून त्याला गत्यंतरच नव्हतं आणि त्याची इच्छा असेल तेवढे ते साहित्यकृतीमध्ये अंतर्भूत करण्याचा अधिकार त्याला निश्चितच होता. त्याच्या नोंदवह्यांमधील सर्व आणि त्या व्यतिरिक्त अन्य लेखनसामग्रीही वापरणं त्याला सहजी शक्य होतं. वस्तुत: एक कल्पित आत्मचरित्र त्याला लिहिता येण्याजोगं होतं. ते कादंबरीही होऊ शकेल, कारण ज्याला आशयसूत्र आहे असं ते आत्मचरित्र असेल. अनुभव त्याचे असतील, परंतु त्यातील अपेक्षाभंग आणि ज्या अंतिम प्रकाशाप्रत ते घेऊन जाणार ते वैश्विक असेल; जे मुळात यादृच्छिक होतं, त्याला कलेच्या अटळपणाचा संदर्भ लाभेल.

प्रूस्तनं जे विविध निर्णय मनाशी घेतले होते ते सूज्ञपणाचे आणि एकमेकांशी सुसंबद्ध होते किंवा जी संरचना त्यानं कथानकाला कल्पिली होती ती पूर्णपणे समाधानकारक होती असं गृहित धरून चालणं अशक्य आहे. परंतु, निदान त्यानं कल्पिलेली संरचना फार बंदिस्त तरी नव्हती. त्याला हवं ते कमीअधिक प्रमाणात तो करू शकत होता. म्हणजे असं, तो विषयांतर करू कशत होता किंवा बिनदिक्कत विसंगतीही पत्करू शकत होता. परंतु संरचनेसंबंधी सर्वसाधारण नियम करणं ही एक गोष्ट होती आणि त्यानुसार कादंबरी लिहिणं, निदान तिची सुरुवात करणं ही दुसरी गोष्ट होती; खास करून, प्रूस्तसारख्या दीर्घ-सूत्री आणि सहजगत्या विचलीत होणाऱ्या व्यक्तीला तो जाणून होता की, तो सुरुवात करू शकेल, तशी त्याची इच्छाही होती. परंतु ते स्वत:ला इतर संकल्पांमध्ये गुंतवत राहिला, जे सारे यशदायी नव्हते, आणि पुढे जे निष्फळ ठरेलही.

१९०८ च्या फेब्रुवारीमध्ये लेमॉईन खटल्याच्या निमित्तानं प्रूस्त विडंबनाच्या कामा गुंतला असताना त्यानं मादम स्ट्रॉसला लिहिलं होतं,'एका काहीशा प्रदीर्घ कामाला सुरुवात करण्याची माझी इच्छा आहे आणि सुरुवात केलीच तर, तुम्हाला भेटायला येणं मला अवघड होईल.' परंतु, त्यानं सुरुवात मात्र केली नाही. वसंतामध्ये तो विडंबनांमध्येच मग्न होता. रेनानवरील त्याचं विडंबन 'ल फिगरो'च्या २८ फेब्रवारीच्या अंकात छापून आल्यानंतर काही दिवसांनी लेमॉईनची जामीनावर सुटका झाली होती आणि जूनमध्ये तो भामटा



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

कॉन्स्टॅन्टिनोपलला पळूनही गेला होता. परिमणी, खटल्याचे वृत्तपत्रीय-मोल संपुष्टात आलं होतं. अधिक विंडबनं लिहिण्याची आवश्यकता उरली नव्हती. परंतु, जी लिहून झाली होती त्यांचा एक छोटासा संग्रह काढण्याचा विचार प्रूस्तच्या मनात रुजला. त्यानिमित्तानं तो प्रकाशक शोधू लागला. गॉस्ता द केइल्लावेर या आपल्या मित्राला त्याच्या घरी जाऊन भेटला. त्याची पत्नी जान्न ही त्याची एकेकाळची प्रेयसी. तिला तेव्हाचा आपल्या प्रेमात पडलेला प्रूस्त आठवला, आपल्या वडीलांच्या नोकराशी असलेले त्याचे प्रेमळ संबंधही तिला आवठले. त्यावरून तिनं खवचटपणाने त्याला छेडलं. त्यावर तो उत्तरला,'द्वारपाल काही मनात भरला नाही, अर्थात त्याच्याशी माझी तशी जानपहेचान होऊ शकलेली नाही, तुझा घरगडी रू द मिरोमेन्सिला तुझ्याकडे होता नाही, काहीसा सामान्यच आहे.' या भेटीत तिच्या तेरा वर्षाच्या मुलीच्या, सीमॉच्या-सौंदर्यानं तो काही क्षण स्वत:लाही विसरला. गॉस्ता आल्यावर त्यानं संग्रहाची कल्पना त्याला सांगितली. त्याला ती कल्पना आवडली. कालमान-लेव्ही या प्रकाशकाकडे प्रूस्तच्यावतीनं शब्द टाकण्याची तयारीही दर्शवली. परंतु, प्रूस्तला तेवढा धीर धरवला नाही. त्यानं स्वत:चं त्या प्रकाशकाला पत्र लिहिलं. त्यात छपाईचा खर्च उचलण्याची त्यानं तयारीही दाखवली. पुढं विनयानं लिहिलं,'तुम्हाला तसदी देण्याचा मला एवढा खेद होत आहे की,'हे लेख तुम्ही प्रकाशित केले नाहीत तर त्यानं मला अधिक आनंद होईल' आणि कालमान-लेव्हीनं ते प्रकाशित करण्यास नम्रपणे नकार दिला. 'मरक्यूर द फ्रान्स' आणि 'फास्क्वेल' यांनीही ते नाकारलं. परिणामी, प्रकाशनाचा विचार बारगळला.

याच वर्षी हिवाळ्यात लेमॉईन खटल्याप्रमाणेच जर्मनीमधील एयूलेनबुर्ग (Eulenburg) प्रकरणानं फ्रांसमध्ये खळबळ माजवली. या प्रकरणात ड्रायफस खटला आणि ऑस्कर वाईल्डचा छळ या दोहोंची अत्यंत खेदजनक वैशिष्ट्यं सामावली होती. यापैकी पहिल्यामध्ये राजकीय कारस्थानानं न्यायालयीन कामकाजाचं स्वरूप विकृत करून टाकलं. होतं तर, दुसऱ्यात आरोपी अपराधी होता आणि त्याचा गुन्हा होता समलिंगसंभोगी प्रवृत्ती. प्रकरण घडलं ते असं : कैसर दुसरा विल्हेम याच्याभेवती अगदी घनिष्ट मित्रांचं वर्तुळ होतं. त्यांचे शत्रू त्यांचा उल्लेख 'गोलमेजाचे सरदार' असा करत. जर्मनीमधील युद्धधार्जिण्या ग्रूपचा या सरदारांवर खुन्नस होता. केवळ त्यांच्या नैतिक मूल्यांमुळे नव्हे तर त्यांचे युद्धविरोधी धोरण आणि फ्रांसबरोबरच्या मैत्रीचे ते करत असलेले समर्थन. यामुळे ते त्यांच्यावर तोंडसुख घेत होते. या सरदारांचा म्होरक्या होता प्रिन्स फिलीप फॉं एयुलेनबुर्ग. वय वर्ष साठ. विवाहित. आठ मुलांचा बाप. १९०७ च्या ऑक्टोबरमध्ये तो आणि त्याच जिवलग मित्र कूनो फॉं मोल्ट या दोघांवर मॅक्समिलीअन हार्डेन या 'राइट्ट विंग' पत्रकारानं हल्ला चढवला वाइल्ड खटल्याप्रमाणेच इथं फिर्यादीवर अब्रुनुकसानाची दावा करण्यात आला. परंतु फिर्यादीनं पुरावा सादर केल्यानं आरोपीवर फौजदारी खटला भरण्यात आला. फार वर्षांपूर्वी, १८८० मध्ये एयुलेनबुर्ग यांचे दोघांशी अनैनिक संबंध होते. त्यांपैकी एक नावाडी आणि दुसरा गवळी.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

सांप्रत दोघंही मध्यमवयीन. प्रिन्सवरील आरोप सिद्ध होऊ शकला नाही. परंतु त्याची राजकीय कारकीर्द मात्र कायमंची संपुष्टात आली. या प्रकरणामुळे कैसरनं आपल्या मित्रांना दूर सारलं आणि युद्धघार्जिण्यांना आपले प्रमुख सल्लागार म्हणून नियुक्त केले. परिणामी या खटल्यानं पहिल्या महायुद्धाची बीजे रोवली गेली.

एयुलेनबुर्ग प्रकरणात प्रूस्त अतिशय बारकाईनं रस घेत होता. बऱ्याच समलिंगरतींप्रमाणं आणि त्याच्या कादंबरीमधील चार्ल्सप्रमाणं, युरोपच्या समस्त प्रमुख आणि अज्ञात समलिंग-रतींची माहिती आपल्याला असल्याची प्रौढी तो मिरवत होता. रॉबेर द बिल्ली सांगतो, 'त्याचा दस्तऐवज लक्षणीय होता.' या कामी बिल्लीनं त्याला सहाय्य केलं होतं. राजनैतिक अधिकारी या नात्यानं त्याचा सर्वत्र संचार होता त्यामुळं अशी माहिती गोळा करून ती प्रूस्तला पुरवणं त्याला सहज शक्य होत होतं. ९ नोव्हेंबर १९०७ रोजी प्रूस्तनं बिल्लीला लिहिलं होतं,'या समलिंगरतीच्या खटल्याबद्दल तुला काय वाटतं? मला वाटतं, त्यांनी काहीसा यादृच्छिक मारा केला आहे. अर्थात त्यापैकी काहीजणांबाबत, विशेषत: प्रिन्स, तो पूर्णपणे संयुक्तिक आहे. परंतु काही तपशील अत्यंत विनोदी आहे.' या प्रकरणाकडे फ्रेंच जनता हर्षभरे पाहात होती. एयुलेनबुर्ग आपला मित्र आहे. समलिंगसंभोगी प्रवृत्तीचं अस्तित्व शत्रू-राष्ट्राचा लढाऊ बाणा खच्ची करू शकत नाही याचाही त्यांना विसर पडला होता. प्रिन्सला टोपण नाव देण्यात आलं होतं. Eulenbougre आणि बर्लिनचा उल्लेख केला जात होता, Sodom-on-Spree 'धिंगामस्ती करणारे सोडम.' आणि बिल्लीनं प्रूस्तला कळवलं होतं की, पॅरिसवासी आपापसात विचारणा करता : 'तू जर्मन बोलतोस का?' या प्रकरणाबाबत प्रूस्तच्या भावना संमिश्र होत्या – दु:खद करमणूक, वैज्ञानिक स्वारस्य आणि मानवी व्यक्तिगत पातळीवरील सहानुभूती. कारण एयुलेनबुर्गसाठी वाजलेली मृत्यूघंटा त्याच्यासाठीही वाजली होती.

एयुलेनबुर्गला अटक झाल्यानंतर आठवड्यानं, १४ मे १९०८ रोजी रॉबेट ड्रायफस-पाशी एक प्रासंगिक लेख लिहिण्याचा मनोदय प्रूस्तनं व्यक्त केला होता. यात यात समलिंग संभोगी प्रवृत्तीच्या सर्वसाधारण चर्चेसाठी एक बहाणा म्हणून एयुलेनबुर्ग प्रकरणाचा वापर करण्याची त्याची इच्छा होती. परंतु या लेखाचं काही दिवसांनी एका लघुकथेत रूपांतर झालं होतं. कथेचा प्रकरणाशी तसा काही संबंध नव्हता. कारण 'जीवनाची हुबेहूब नक्कल करण्यात कलेला समाधान नसतं, ती जीवनाहून कितीतरी उच्च असते.' 'प्रत्यक्ष प्रसंगातील आगंतुक घटना आणि अ-वास्तवता यात समाविष्ट' होण्यास त्याच्या कथेत अवसर दिला असता तर ती 'अतिसामान्य आणि खोटी ठरली असती, संतप्त अस्तित्वाकडून मुखभंग होण्याच्या लायकीची झाली असती. खटल्यामधील ज्ञात दु:खाहून अधिक खरीखुरी दु:खं असतात. परंतु कथा लिहिण्याचा बेतही बारगळला. मात्र या कामी जमवलेल्या सामग्रीचा वापर त्यानं 'सोदॉम ए गॉमॉर'मध्ये केला असल्याचं आढळून येतं.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

जूनमध्ये अशाच एका कधीच प्रकाशित न होणाऱ्या एका लेखाच्या कामी प्रूस्त लागला. यावेळी निमित्त झालं. बायझन्टाईन इतिहासकार गुस्ताव श्लूम्बर्गर याची 'अकादमी फ्रान्सेज' च्या सदस्यत्वासाठी उमेदवारी. गुस्ताव हा मादम स्ट्रॉसचा जुना वैरी. प्रूस्तला सुद्धा त्याचा मनस्वी तिटकारा. त्यानं ठरवलं, गुस्तावची बदनामी होऊ शकेल असा लेख 'ल फिगरो' साठी लिहायचा. त्यानं मादम स्ट्रॉसला विश्वासात घेतलं. तिनंही संमती दर्शवली. त्याच्या लेखासाठी उपयुक्त ठरू शकतील अशी कागदपत्रं देण्याचंही तिनं मान्य केलं. या अनुषंगानं त्यानं विचारणा केली : श्लूम्बर्गरची पुस्तकं त्यानं स्वत: लिहिलेली नव्हती हे खरं आहे का? तो 'अकॅडमी ऑफ इन्स्क्रीप्शन'वर (दुर्दैवानं तो स्वत: त्या अॅकडमीचा सदस्य होता) लांडीलबाडी करून निवडून आला होता का? या प्रश्नांची उत्तरं मादाम स्ट्रॉसला रिनाक-कडून मिळू शकतील असं त्याला वाटलं. त्या लेखाविषयी तो बोलत असे. बहुधा त्यानं तो लिहिला असावा दरम्यान त्याच्या कादंबरीकार तो गंभीरपणे विचार करत होता. त्यानं लेखणी कागदावर टेकवली नसली तरी तिची आखणी चालू होती. जुलैमध्ये त्यानं मॉन्तेस्क्युइउला लिहिलं की, त्याची प्रकृती फारशी बिघडलेली नसते, तेव्हा एका कादंबरीशी त्याची झटापट चालू असते. परंतु प्रगती काही नाही. 'ही वाचण्याइतपत तुम्हाला धीर असला तर माझ्या-विषयीचा तुमचा आदर बहुधा वाढेल.' पत्रात त्यानं कादंबरीविषयी चर्चाही केली आणि काबुर्गला जाऊन कादंबरीवर काम करण्याचा मनोदयही व्यक्त केला. २० जुलै रोजी तो काबुर्गला पोहोचला आणि 'ग्राँ हॉटेल'मध्ये त्यानं मुक्काम केला. इथल्या मुक्कामात त्यानं थोडंफार काम केलंही असेल. फेरफटका मारायला तो क्वचितच बाहेर पडत असे. मात्र लोकांच्या गाठीभेटी तो घ्यायचा. त्याच्या फारशा उत्सुकता नसलेल्या त्याच्या जुन्या मित्रांनाही तो भेटायचा. सप्टेंबरमध्ये मौसम संपत आला. हॉटेल बंद करण्याची घडी आली. हॉटेल बंद असलं तरी आपल्याला तिथं राहायला द्यावं अशी विनंती केली. पण ती विनंती अव्हेरली गेली. त्यामुळं तिथून व्हेनिसला पुन्हा एकदा भेट देण्याचा त्याचा बेत बारगळला. योगायोगानं त्याचा मित्र जॉर्जेस द लुई याला मोटर अपघात झाल्याची वार्ता त्याच्या कानी आली. तो त्याच्या जायबंदी मित्राला सोबत देण्यासाठी लागलीच व्हर्साइलला निघाला. टॅक्सी भाड्यानं घेतली. ती चालवण्यासाठी ॲगोस्तिनेल्लीला खास बोलावून घेतलं. व्हर्साइलला 'हॉटेल द रेसरवूआर' मध्ये तो उतरला. आल्या आल्या दम्यानं त्याला अंथरुणाला खिळवून ठेवलं. बरं वाटलं तेव्हा तो लुईला जाऊन भेटला. त्यासाठी तीन मजले चढून गेला. धापा टाकत त्यानंतर मात्र तो पुन्हा म्हणून ते तीन मजले चढला नाही. पत्र लिहून त्याची चौकशी अगत्यानं करत राहिला. काबुर्गच्या मित्रांना भेटण्यासाठी त्यानं दोनदा पॅरिसची वारी केली. ही मित्रमंडळी नवी होती, तरुण होती. या मंडळीत एक पोरगीसुद्धा होती. त्याला प्रिय झालेली. ह्या तरुणांबरोबर तिच्या सहवासाचं थोडंफार सौख्य त्यानं अनुभवलं. शिवाय रेनाल्डो हान त्याच्याकडे राहायला आला. त्याचाही सुखद सहवास त्याला लागला. रेनाल्डो त्याच्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

बिछान्याशेजारी बसून 'ल फेट शे थेरेस' हा नवा बॅले रचत होता आणि प्रूस्त ॲगोस्तिनेल्ली आणि निकोलस यांच्याबरोबर पत्ते खेळत होता. रात्रौ त्याचे नोकर झोपी गेल्यावर तो काम करत होता. 'पुन:प्राप्त काळा'चा साक्षात्कार त्याला आता धीमेधीमे होणार होता.

प्रूस्तची तब्येत तशी बरी नव्हतीच. तो त्याच्या खोलीबाहेर पडत नव्हता. त्याला असंख्य काळज्यांनी घेरलं होतं : त्याचा स्वत:चा दमा, जायबंदी लुई. त्यात भर पडली बिल्लीच्या बायकोच्या टायफॉडची. त्यानं बिल्लीला तातडीनं तार केली,'तुझ्या पत्रानं पुरता हादरून गेला. वृत्त आणि प्रगतीची आतुरतेनं वाट पाहात आहे. . . माझा तुला काही उपयोग होऊ शकत असल्यास, मी तत्काळ निघेन, एखादा दिवस वाटेल थांबेन.' तथापि, तशी आवश्यकता नसल्याचं बिल्लीचं पत्र आल्यानं प्रूस्त व्हर्साईललाच राहिला, जवळजवळ अंथरुणाला खिळून. त्याच्या सांगण्यानुसार, त्यानं काम करण्याचा दोन वेळा प्रयत्न केला पण वीस मिनिटांनी त्याला ते बाजूला सारावं लागलं. त्यानं मादम स्ट्रॉसला लिहिलं, 'एवढ्या कल्पना असणं आणि त्यांच्याबद्दल कुणाला काहीच कळू न देता, जिथं त्या बंदिस्त आहेत ते मन नष्ट होणार आहे ही जाणीव असणं. हे उत्साह खच्ची करणारं आहे. हे खरं आहे की, कल्पना एवढ्या काही अभिज्ञ नाहीत आणि दुसरा कुणी लेखक त्या अधिक चांगल्या रीतीनं व्यक्त करील.

नोव्हेंबरच्या अखेरीस त्याच्या खिडकीबाहेरील गोंगाटानं त्याला व्हर्साईलमधून बाहेर पडणं भाग पडलं. तो पॅरिसला त्याच्या राहात्या घरी परतला. परंतु तिथंही तिथल्या आवाजांनी त्याला पुरतं भंडावलं. इमारतीचं नतूनीकरण अद्याप संपलेलं नव्हतं. त्याच्या बेडरूममधील गरम पाण्याच्या रेडिएटरच्या गळतीनं त्याला गुदमरवून टाकलं आणि हिवाळा असूनही रात्रौ खिडक्या उघड्या टाकण्यावाचून गत्यंतरच राहिलं नाही. त्यानं स्वत:ची समजावणी केली की, बरं वाटू लागताच इथून तो बाहेर पडेल. पण तसा प्रयत्न मात्र त्यानं केला नाही. पडल्या पडल्या तो वाचयचा, विडंबन लिहायचा आणि एखादं गंभीर लिखाण करण्याचा विचार मनात घोळवायचा. सांप्रत कादंबरीलेखन त्याच्या नजरेसमोर नव्हतं. त्याला सॅन्ते बव्हवर नियतकालिकाला साजेसा एक लेख लिहायचा होता. डिसेंबरच्या मध्यावर त्यानं मादम द नोआइल्लेला लिहिलं,'मी अतिशय आजारी असलो तरी, सॅन्त बव्हवर लिहिण्याची माझी इच्छा आहे. हा विचार माझ्या मनात दोन भिन्न मार्गांनी साकारला आहे, त्यातून मी निवड करायला हवी. पहिला आहे – एक अभिजात निबंध, तेनच्या पद्धतीचा निबंध. अर्थात हजार पटीनं उणा. (अपवाद आशयाचा, जो मला वाटतो नवीन आहे) दुसऱ्याची सुरुवात होते वृत्तातान: मला जाग येते आणि मम्मा माझ्या बिछान्याशेजारी. मी तिला सांगतो, सॅन्त बव्हच्या अभ्यासासाठी माझी एक कल्पना आहे. ती मी तिला सांगतो



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

आणि तिचा विकास करतो. यातील उत्तम कुठला तुम्ही सांगू शकाल?' त्यानं निवडलेला हा विषय एका विस्तृत आशयसूत्रासाठीची केवळ एक सबब होती. फ्रेंच समीक्षकांमधील एक अत्यंत अप्रमादशील समीक्षक म्हणून सॅन्त बव्ह मान्यता पावला होता. त्याच्या तथाकथित अभिजाततेचा बुरखा फाडून साहित्याच्या चुकीच्या दृष्टीकोनावर त्याला हल्ला चढवायचा होता. या चुकीच्या दृष्टीकोनात थोर लेखक वगळता समीक्षक, वाचकवर्ग सर्वजण आंधळे झाले होते. सर्जनशील कलेचा जातीवंत, अस्सल गुणधर्म दाखवून एकाच वेळी त्याच्या स्वत:च्या आगामी कादंबरीसाठी वाङ्मयीन जगाची मनोभूमिका तयार करणं आणि ज्या आधारे ती लिहिणं त्याला शक्य होईल असे नवनवीन साहित्यिक शोध लावणं, निदान त्या दृष्टीनं प्रयत्न करणं यायोगे आजमावून पाहाणचा त्याचा विचार होता.

'सॅन्त बव्ह'चं लिखाण कूर्म गतीनं चाल असल्याचं प्रूस्त भासवत होता. लॉरीला तो पुन: पुन्हा कळवत होता की, पेन कागदावर चालवण्यास तो असमर्थ आहे. डिसेंबर अखेरीस त्यानं लिहिलं,'मी अद्याप कामाला सुरुवात केलेली नाही आणि सॅन्त बव्हबद्दल मी वाचलं होतं ते सारं काही एव्हाना विसरून गेलो आहे. परंतु जर का मला शक्ती लाभली, माझा विश्वास आहे ती लाभेल, नाहीतरी तसा मी थोडा बरा आहे, मी ते लिहीन. तू ते वाचल्यानंतर त्यासंबंधीचं तुझं मत जाणून घेण्याची जिज्ञासा आहे. बाहेर पडणं मला शक्य झालं तर मी जाईन आणि ते लिहिण्यासाठी कूठंतरी स्वत:ला कोंडून घेईन. परंतु तसं काही दृष्टिपथात नसल्यानं इथंच बंदिस्त आहे.' जानेवारीच्या मध्यावर लिहिलं,'ह्या दिवसात एखाद वेळी मला थोडसं बरं वाटू लागताच मी 'सॅंत बव्ह'वर काम करीन आणि अखेरची ओळ लिहून होता क्षणी मी ते तुला पाठवून देईन. त्यानंतर मी म्हणू (किंबहुना विचार करू) शकेन, क्वचितच विचार करतो, पण जोबेरसारखा विचार केलाच तर : "बऱ्याच पुरुषांच्या शक्तीमागे दुबळेपणा असतो, पण माझ्या दुबळेपणामागे शक्ती आहे". 'परंतु वस्तुस्थिती अशी होती; या हिवाळ्यात आणि वसंतात त्यानं 'काँत्र (Contre) सॅन्त बव्ह'चा प्रारंभीचा दोन तृतीयांश भाग लिहिलेला होता. जूनच्या मध्यावर त्यानं अखेर लॉरीला जेव्हा लिहिलं,"सॅंत बव्ह" सुरुवात केल्यानं मी पार गळून गेलो आहे.' तेव्हा ते लिखाण जवळजवळ पूर्ण होत आलं होतं.

दरम्यानच्या काळात प्रूस्तनं 'लेमॉईन प्रकरणा'च्या अनुषंगानं विडंबनपर लेख लिहायला सुरुवात केलीच होती. नियतकालिकामधून ते प्रसिद्धही होत होते. तथापि,'काँत्र सॅन्त बव्ह' या कामात त्यानं खंड पडू दिला नव्हता. ऑगस्टच्या मध्यावर लॉरीनं जेव्हा विचारणा केली की 'सॅन्त बव्ह' संपवलं का? त्यावर प्रूस्तनं उत्तर दिलं,'घाई, कशाला तुला एवढी? मला शक्य होईल तेव्हा मी सुरुवात करीन.' तथापि, एव्हाना ते लिहून पूर्णही झालं असावं. त्यानंतर एकदोन आठवड्यांनी त्यानं लुईला लिहिलं,'ते बरंच लांबलचक, चारशे आणि पाचशे पृष्ठांच्या दरम्यान आहे.' यात भर पडल्याची नोंद पुढं कुठं आढळत नाही आणि या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दरम्यानच्या काळातच त्यानं 'आ ला रशार्श द्युतां पेर्दू'ला सुरुवात केली होती.

फेब्रुवारी १९०८ ते ऑगस्ट १९०८ या काळातील प्रूस्तच्या कामाचा कालक्रमानुसार आढावा घेता येणं शक्य आहे. त्यानं कादंबरीच्या नव्या खर्ड्याला फेब्रुवारीमध्ये सुरुवात झाली होती आणि नोव्हेंबर १९०८ मध्ये ती बाजूला सारण्यात आली होती. एकूण ७५ सुटी पानं. यात घटना वा घटनांचे तुकडे शब्दबद्ध केले आहेत : व्हेनिसला दिलेली भेट, बाल्बेक (अर्थात या नावाने ते उल्लेखिलेले गेलेले नाही) येथील समुद्रकिनाऱ्यावरील सफर आणि निवेदकाची दोन तरुणांशी झालेली भेट, कॉम्ब्रे येथील 'गुड नाईट किस'चा दीर्घ प्रसंग आणि 'दोन मार्गां'चं प्रतिक. त्यापैकी एक 'मेसेग्लिस' आणि दुसरा 'व्हीलबॉं' (याचंच रूपांतर पुढं 'गॅर्मांत'मध्ये झालं आहे) याशिवाय 'कॉंत्र सॅन्त बव्ह'चे प्रारंभीचे तीन विभाग आहेत : दोन प्रास्ताविक (एक 'अभिजात निबंधा'चं आणि दुसरं आईबरोबरच्या काल्पनिक संभाषणाचं) आणि 'स्यूर ला मेथोड द सॅन्त-बव्ह.' म्हणजेच प्रूस्तनं आपलं कादंबरीलेखन बाजूला सारून 'सॅन्त बव्ह'ला सुरुवात केली ती १९०८ च्या नोव्हेंबरच्या प्रारंभी, जून १९०९ मध्ये आपल्या निबंधावर काम सुरू केलं असल्याची त्यानं लॉरीपाशी कबुली दिली त्याआधी सातेक महिने.

सॅन्त बव्हवरील प्रूस्तनं केलेले दोषारोप म्हणजे वर्षाआधी त्यानं लिहिलेल्या विडंबनपर लिखाणाचा विकास होता. सॅन्त बव्हचं म्हणणं, टीकात्मक मर्मदृष्टीची अत्युच्च कसोटी आपल्या समकालिनांमधील प्रतिभा हुडकून काढण्याच्या एखाद्याच्या क्षमतेत असते. तरीही त्याचे समकालीन स्तान्धाल, बाल्झाक, बॉदलेअर आणि फ्लॉबेर या खरोखरीच 'ओरिजिनल' असलेल्या प्रतिभावंत लेखकांना तो सतत कमी लेखत होता. प्रूस्तच्या मते, सॅन्त बव्हचा साहित्यविषयक दृष्टीकोन चुकीचा बनला. याचं कारण साहित्य हे त्याच्या लेखी घरंदाज व्यक्तीसाठी एक सुखदायी सांस्कृतिक मनोरंजन होतं. त्याच्या लिखाणाची जात वृत्तपत्रीय, त्याची नजर स्वतःच्या काळजाकडे न वळवता सामान्य बुद्धीच्या वाचकावर सर्वात विशेष म्हणजे, लेखकाची कृती विशद करण्यासाठी त्याचं आयुष्य आणि व्यक्तिमत्व यांच्या बाह्य रूपरेखांचा वापर करणं ही त्याची ख्यातनाम पद्धती. शातोब्रिआन्द, बाल्झाक, व्हिग्नी आणि ह्युगो यांच्या संदर्भातील सॅन्त बव्हच्या या पद्धतीचा प्रूस्तनं उपरोधिक परामर्श घेतला आहे. बाल्बेक येथे मादम द व्हिलपारिसी निवेदकाला सांगते, 'त्यांच्यासंबंधी बोलण्याचा मला अधिकार आहे, कारण ते माझ्या वडीलांच्या घरी येत असत; आणि थोर बुद्धीचा मॉसिएँ सॅन्त बव्हसारखा माणूस म्हणत असतो, त्यानुसार त्यांच्यामध्ये जे वावरलेले आहेत आणि त्यांच्या अस्सल पात्रतेचं अचूक मत बनवण्याची संधी ज्यांना मिळालेली आहे अशाच लोकांचा शब्द एखाद्यानं प्रमाण मानला पाहिजे.' दुसऱ्याची कलाकृती जाणून घेण्याच्या दृष्टीनं प्रूस्त सॅन्त बव्हचा फॉर्म्युला अयोग्य ठरवतो. आपल्या सवयी, सोसायटी, आपले सद्गुणदुर्गुण यामधून आपण व्यक्त होतो त्याहून एका भिन्न व्यक्तित्वाची निर्मिती



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

साहित्यकृती करते. लेखक आणि त्यानं निर्माण केलेली साहित्यकृती याचं नातं अतूट आहे. हे सॅन्त बव्हचं सांगणं प्रूस्तला अमान्य आहे. साहित्यकृतीचा असा चारित्र्याचा अंगानं शोध घेणं, त्याचे साहित्यगुण जोखणं हे गैर आहे. तो सांगतो 'The biographer must discover, beneath the mask of the artists every-day, objective life, the secret life from which he extracted his work; show how, in the apparently sterile persons and places of the external life, he found the hidden, universal meanings which are the themes of his book; and reveal the drama of the contrast and interaction between his daily existence and his incommensurably deeper life as a creator.' एखादा लेखक प्रूस्त कसा वाचतो? 'as ssoon as I began to read an author, I detected under the words the tune of the song, which in each author is different from that of every other; and this enabled me to produce paradies, because once a writer's tune is heard, the words soon follow.'

प्रूस्त आता योग्य वाटेला लागला होता. परंतु 'तेनच्या पद्धतीनं लिहिलेल्या त्याचा वस्तुनिष्ठ निबंध त्याला पुढं नेण्यास असमर्थ ठरला. लवकरच त्याची स्फूर्ती ओसरली आणि त्याचं गद्यही घसरलं. त्याच्या हस्तलिखिताच्या समासात त्यानं लिहिलं, 'ही भयानक शैली बदलल्याशिवाय राहू नये !' १९०८ च्या डिसेंबरच्या अखेरीस त्याच्या ध्यानी जेव्हा आलं की, सर्जनशील कल्पनाशक्तीच्या समस्या ह्या अशा अमूर्त रूपात समाधानकारकरित्या हाताळता येणं शक्य नाही. तेव्हा एक पर्यायी विचार त्याला प्रथमच सुचला आणि त्या संदर्भात लॉरी आणि मादम द नोआइल्ले यांचा सल्ला विचारला. सॅन्त बव्हच्या पद्धतीवरील निबंधामधील एका विषयांतरानं त्याच्यामध्ये एका नवा विचार रुजवला. इथं सोमवरच्या सकाळच्या 'ला कॉन्स्टिट्यूशनल' या साप्ताहिकामध्ये छापून आलेला आपला लेख छापून आलेला पाहून थोर समीक्षकाला झालेले समाधान आणि एखाद्या नवोदित लेखकाला – बऱ्याच वर्षांपूर्वीच्या प्रूस्तसारखा – त्याच्या आईनं त्याच्या बिछान्यापाशी आणून दिलेला त्याचा पहिला लेख पाहिल्यावर झालेला निरागस आनंद या दोहोंमधील विभिन्नता त्यानं दर्शवलेली होती. आता त्यानं निर्णय घेतला. अशी एखादी सकाळी वर्णन करायची आणि संभाषण करण्यासाठी मृत मादम प्रूस्त्ला जिवंत करायचं. या संभाषणामधून पारंपारिक समीक्षेच्या नियमांपासून मुक्त होऊन, तो त्याच्या स्वत:च्या गतकालाच्या आरशामध्ये त्याचा निबंध तिला उलगडत जाईल. त्याच्या स्वत:च्या गाभ्यातील मूलस्त्रोतामधून उसळून वर आलेला कलेसंबंधीचा त्या दृष्टीकोन विशद करण्यासाठी त्यासाठी त्याचं पूर्वीचं आणि सध्याचं व्यक्तित्व यांची सम्यकपणे पुनर्निर्मिती करायला पाहिजे.

१ जानेवारी १९०९ किंवा त्या आसपास प्रूस्त रात्रौ उशिरा आपल्या अपार्टमेंटमध्ये



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

परततो. बाहेर प्रथमच बर्फवृष्टी होत आहे. प्रूस्त दिव्याच्या उजेडात वाचत बसतो. अजूनही कुडकुडत आहे. सेलीन तिच्या धन्याला चहा घेण्याच्या आग्रह करते. कॉफीचं व्यसन असलेल्या त्याच्यासारख्याला हे पेय तसं अपरिचितच. गरमागरम चहा त्याच्यासमोर ठेवला जातो. तो टोस्टची एक कांडी त्यात बुडवतो, सहजच. स्वतःच्या तोंडात ती घालतो. एक गूढ आनंद त्याला पुन्हा एकवार बेहोष करतो. अबोध स्मृती चाळवल्या जातात. जरेनियम आणि संत्र्यांचा फुलोरा यांचं मंद सुगंध त्याच्याभोवती दरवळतो. अत्यंत सुखद संवेदना. तो निश्चल. चव जीभेवर घोळवत. विचारमग्न. अकस्मात आठवणींचे दरवाजे उघडले जातात : ओतय्य येथील लुई वईलची बाग. १८८० मधील उन्हाळ्यातील सकाळ. छोटा प्रूस्त त्याचे आजोबा नाये वईलच्या खोलीत जातो. आजोबा त्याला चहा देतात. लहान मुलाला देतात तसलं बिस्किट तो चहात बुडवतो, तोंडात टाकतो. तो स्वाद तोच, तसाच स्वाद आजही आश्चर्यकारकरित्या जपून ठेवलेला. हा अनुभव प्रूस्तप्रमाणेच निवेदकाच्याही परिचयाचा, आयुष्यभर तो अधूनमधून अनुभवत असलेला. परंतु त्या क्षणी, त्याच्या सांप्रतच्या विषयाचं केवळ एक प्रतिक म्हणून, सर्जनशील निर्मितीचा लक्ष्यणीय गुणधर्म म्हणून त्यानं तो पाहिला. कारण, अबोध स्मृतीच्या कृतीनं कलेच्या दोन्ही पैलूंचा संयोग घडवून आणला होता. या दोन पैलूंविषयी काही दिवसांपूर्वीच त्यानं लिहिलं होतं : अस्सल वास्तवाच्या 'स्व'च्या गाभ्यामधील संवेदना, आणि दोन भावनामधील घनिष्ट संबंधाचा शोध. १८९५ मध्ये त्यानं 'झाँ सान्तेय' लिहिली. तेव्हापासून ज्या शोधात तो होता ती चावी त्याच्या कादंबरी-निर्मितीसाठी आपल्या हाती लागली असल्याची जाणीव मात्र त्याला अद्याप झाली नव्हती.

सांप्रत, 'काँत्र सॅन्त बव्ह'च्या नव्या तर्जुम्याचं प्रास्ताविक त्यानं लिहिलं. त्यात प्रारंभीचं त्यानं नमूद केलं, 'प्रत्येक दिवशी मी बुद्धीला कमी कमी महत्त्व देत आहे. लेखक काही प्रमाणात तरी स्वतःची "इम्प्रेशन्स" पुन्हा मिळवू शकतो, स्वतःच्या एखाद्या अंशापायी, म्हणजेच कलेच्या एकमेव सामग्रीपाशी पोहोचू शकतो, केवळ अन्य साधनांनी, हे दर दिवशी माझ्या अधिकाधिक ध्यानी येऊ लागलं आहे. गतकाल म्हणून बुद्धी आपल्यासाठी जे जतन करते, तो गतकाल नसतोच मुळी. . . ' आणि पुढे उदाहरणादाखल अहेतूक स्मृतीचे चार प्रसंग त्यानं वर्णन केले..त्यापैकी पहिले तीन हे बहुधा अलिकडच्या काळातील होते. ते प्रसंग येणेप्रमाणं : पाण्यात टाकल्यानंतर उमलत जाणाऱ्या जपानी कागदी फुलांसारखी त्याच्या चहाच्या प्याल्यात उमलत जाणारी ओत्तयची बाग. 'गेल्या वर्षी मी आवार ओलांडताना खडबडीत फरशीच्या दगडावर' ठेचकाळलो होतो, त्या ठेचकाळण्यानं जतन केलेलं व्हेनिस; बशीवरील चमच्याच्या किणकिणाटानं पुनर्जागृत केलेले रेल्वे लाईनीजवळील वृक्ष; आणि मादम द हिव्लपारिंसिसच्या बग्गीमधून जात असताना बाल्बेकजवळ निवेदकाच्या दृष्टीसमोर पुन्हा आलेल्या वृक्षराजीचं कधीच न सुटलेलं कोडं. आता, अखेरीस अबोध स्मृतीच्या कोड्याचं प्रूस्तनं अचूक अर्थ लावला होता : हेच काळ आणि सवय यांच्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मुखवट्यापासून मुक्त झालेलं मूर्तिमंत वास्तव आहे. 'A fragment of pure life preserved in its purity, which we can only know when it is so preserved, because, in the moment when we live it, it is not present to our memory, but surrounded by sensations which we suppress it.' प्रूस्तच्या प्रास्ताविकाच्या या पहिल्या सात पानांमध्ये 'आ ला रशार्श'ची संपूर्ण संरचना समाविष्ट आहे. 'गमावलेला काळ' आणि 'पुन:प्राप्त काळा'मध्ये झालेली त्याची अखेर याविषयीच्या त्याच्या कादंबरीचा प्रारंभ रेखाटला गेला. प्रूस्तनं नव्या प्रास्ताविकात म्हटलं की, अबोध स्मृतीची ओळख पटण्याआधी तिनं एवढं संभ्रमित केलं की,'क्षणभर निद्रिस्त असल्यागत मी होतो, ज्याला रात्री जाग येते आणि त्याला सांगता येत नाही की, तो कुठं आहे, किंवा कुठल्या बिछान्यात, कुठल्या घरात, कुठल्या ठिकाणी, त्याच्या आयुष्यातील कुठल्या वर्षी.' पुन्हा एकदा त्याच्या निबंधातील एका भागामध्ये योगायोगानं आलेल्या एका उपमेनं पुढील आखणी सूचित केली होती आणि 'आ ला रशार्श'मध्ये पुढं तिचा विस्तार व्हायचा होता. त्याच्या आईबरोबरच्या त्याच्या प्रभातकालीन संभाषणाला एक प्रास्ताविक म्हणून इतर प्रभातीची त्याची निद्रितावस्था आणि जागृतावस्था यासंबंधीची गूढ वर्णन करायची. असा निश्चय त्यानं आता केला. सुरुवातीलाच त्याच्या अबोध मनाच्या प्रदेशाचा आराखडा तो काढेल, त्यात नंतर समीक्षेची कृती आणि निर्मिती कृती बसवेल.

१९०९ च्या जानेवारीच्या सुरुवातीस प्रूस्तनं आतापावेतो केलेल्या कामाचे सुटे कागद बाजूला सारले आणि त्याच्या निबंधाचा नवा खर्डा लिहायला सुरुवात केली. सात नोंदवह्या भरून गेल्या. यात काही अस्सल अशी समीक्षात्मक सामग्री आहे. सॅन्त बव्ह आणि त्याचे अत्यंत लक्षणीय समकालीन बाल्झाक, बोदलेअर आणि जेरार्ड द नरवाल (Nerval) यांच्यावरील निबंध. या निबंधांमध्ये निवेदनात्मक सामग्रीही आहे. त्यातील काही सॅन्त बव्हशी एवढ्या दूरान्वयानं संबंधीत आहे की, कुणालाही आश्चर्य वाटेल की, प्रूस्तनं आपल्या समीक्षणात्मक लिखाणात तिचा वापर केलाच कशाला. प्रिन्स आणि प्रिन्सेस्स गॅर्मांत यांनी दिलेल्या एका पार्टीसंबंधी एक परिच्छेद आहे. या पार्टीला निवेदकाला बोलावणं असतं आणि तो जातोही. तिथं त्याला संशय येतो की, तो एकूण खिल्ली उडवण्याचाच प्रकार आहे. अर्थात् या संशयाला तसा आधार नसतो. पार्टीमध्ये तो मार्क्विस द क्वेरसीला (कादंबरीमधला चार्ल्स हे उघड आहे) अभिवादन करतो, हस्तांदोलन करतो. तथापि, मार्क्विस नजर अन्यत्र वळवतो व त्याला न पाहिल्याचा बहाणा करतो. निवेदकाच्या ध्यानी येतं की, हा दु:खी उमराव केवळ बायकीच दिसत नाही तर तो तसा असतो. कारण तो अशा पुरूषांच्या जातीचा आहे जे इतर पुरुषांवर प्रेम करतात. प्रूस्त लिहितो,'एक शापित जमात.' आणि या जमातीविषयी तो पोटतिकडीनं लिहितो. सलग एका वाक्यात. हे एक वाक्य पाच पानी. हे प्रूस्तचं निष्ठुर आरोपपत्र आहे, त्या संतप्त सहानुभूतीमध्ये त्याचा बचाव आहे,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

तिच्या शोकात्म सौंदर्यात समलिंग संभोगीवृत्तीचा त्याचा कबुलीजबाब आहे. इथं समलिंगरती आणि ज्यू यांच्यामधील साम्य त्यानं ठळकपणे निर्देशिलेलं आहे, पण त्यांची तो एकमेकांशी तुलना मात्र करत नाही, जशी 'सोदॉम ए गॉमॉर' मध्ये त्यानं केलेली आहे. या कादंबरीत त्यानं समलिंगरती, ज्यू आणि ड्रायफसार्ड यांना एकाच मालिकेत गोवलेलं आहे. 'सॅन्त-बव्ह'मध्ये त्याच्या अपराधाविषयीचं अखेरचं गुपित सांगण्याइतपत तो धीट झाला आहे. त्यानं लिहिलं आहे की, सोदॉमची शापित जमात 'आई नसलेली लेकरं आहेत, ती जिवंत असेपर्यंत तिला खोटं सांगणं त्यांना प्राप्त असतं. अगदी मेल्यानंतर तिचे ते डोळे मिटतात त्या क्षणापर्यंत ! आपल्या आईला कष्टी करायला नको म्हणून तो खोटं बोलला होता की, एका असत्यावर त्यांच्या प्रेमाची उभारणी करून तिला सजा दिली होती? असत्याची त्यानं निवड केली नव्हती का? आणि पापाचा स्वीकार केला होता. ज्या पापानं त्याला असत्याचा आश्रय घ्यायला भाग पाडलं होतं? असे प्रश्न त्याच्यासमोर उभे ठाकळे की, तो सोदॉमच्या विवरात डोकावत होता, आणि तिथं त्याचं स्वत:चं विव्हळणं, स्वत:चा तडफडाट बंदिस्त झालेलं पाहात होता.

'सॅन्त-बव्ह'वरील निबंधात प्रूस्तचा भाऊ रॉबेर याच्या विषयीचा मजकूर आहे. लहान असताना कॉम्ब्रेचा निरोप घेताना त्याला त्याची शेळी सोडून द्यावी लागली होती. यासारखी काही मासलेवाईक उदाहरणं लक्षात घेता ध्यानी येतं की, प्रूस्त त्याच्या मूळ विषयापासून किती बाजूला जात होता. निवेदनाच्या चौकटीत बसेल अशा सॅन्त-बव्हवरील नियत-कालिक योग्य लेखाला त्यानं सुरुवात केली. खरी पण प्रत्यक्षात अर्धा डझनभर नवे लेख होतील एवढा मजकूर त्याच्या हातून लिहून झाला होता. वस्तुत: तो त्याची कादंबरी लिहित होता. त्या क्षणी ही बाब त्याच्या ध्यानी आली असेल वा नसेल, परंतु एक गोष्ट खरी, जिनं त्या वर्षीचा त्याचा बराचसा काळ व्यापलेला होता, तो सॅन्त-बव्हवरील त्याचा संकल्प म्हणजे कादंबरीरचनेमधील अत्यंत महत्त्वपूर्ण असा रंगमंच होता.

सॅन्त-बव्ह आणि प्रूस्तचे समकालीन लेखक यांच्यावरील समीक्षात्मक उताऱ्यांचा सुद्धा त्याच्या कादंबरीशी संबंध जोडता येणं शक्य आहे. आज कोणी जेव्हा ते वाचतो तेव्हा त्याच्या मनावर सर्वप्रथम ठसा उमटतो. तो हा की, कादंबरीच्या केंद्रस्थानी असलेल्या एका सिद्धांताशी ते निगडीत आहेत. तो सिद्धांत असा : अनुभूतीच्या इतर घाटांहून सर्वस्वी भिन्न असं स्वत:चं रूप कलेला असतं. 'झाँ सान्तेय' मधील बऱ्याच उताऱ्यांप्रमाणंच इथंही प्रूस्त, कलावंत आणि त्याची कलाकृती यामध्ये भिन्नता असल्याचं आग्रहानं मांडतो. प्रत्येक कलावंत हा माणूस असतो, कैकदा सामान्य आणि गर्हणीय, तद्वतच तो प्रतिभावंतही असतो. बोद-लेअर दोन्ही होता आणि तो स्वत:ही तसाच आहे. हे प्रूस्त पूर्णपणे जाणून होता. दैनंदिन जीवनात तो स्वार्थी होता. शिष्टमन्य होता, भंपक होता, परंतु त्याच्या लिखाणात तो सर्वस्वी वेगळा होता. कारण त्याच्या व्यक्तिमत्त्वाच्या एका वेगळ्या पैलूमधून तो त्या लिखाणाची



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

निर्मिती करत होता. त्याला अस्पष्टपणे जाणवत होतं की, हा दुसरा 'स्व' सर्व कलावंतांमध्ये सारखाच असतो. सॅन्त बव्हची गोची झाली होती, ती अशी, एक – समीक्षक म्हणून त्याची ख्याती असूनही, दोन – 'स्व' मधला भेद जाणण्यात तो अपेशी ठरला होता. प्रतिभावंत असलेल्या माणसाचा विचार करतेसमयी त्यानं त्याच्याकडे एक माणूस म्हणून पाहिलं होतं, त्याच्या दुज्या 'स्व'कडे दुर्लक्ष केलं होतं. कलेमध्ये जी यत्किंचितही उपयुक्त नसते, त्या आपल्या बुद्धीवर तो विसंबून राहिला होता आणि स्वतःच्या अंतस्फूर्त मर्मभेदाकडे दुर्लक्ष केलं होतं.

'काँत्र सॅन्त-बव्ह' मध्ये रसाळ आणि उद्बोधक अशी बरीच पृष्ठं आहेत. परंतु कादंबरीची पूर्वसूचना ज्यात ध्वनित होते त्या निवेदनात्मक उताऱ्यांमुळे ते अधिक लक्षणीय झाले आहे. हे उतारे मनोवेधक आहेत. त्यातील बरेचसे प्रूस्तच्या लिखाणात पूर्णपणे नवीन असे आहेत. 'झाँ सान्तेय'च्या नोंदवह्या उघडून तो लिहित नव्हता, त्यावर तो परिष्करणही तो करत नव्हता. (अर्थात् ही जुनी सामग्री तो नजरेखालून घालत होता.) तर नव्यानंच प्रारंभ करत होता. या क्षणी त्याला जे लक्षणीय आणि उपयुक्त असं वाटत होतं. ते कागदावर उतरवण्याचा त्याचा प्रयत्न होता. काही वेळेला स्वैर कल्पना, काही वेळेला पात्र आणि प्रसंग यांची रेखाटणं, काही वेळेला फक्त इम्प्रेशन्स. एक नव्या निवेदनशैलीचा प्रयोग तो करत होता. आधीच्या त्याच्या लिखाणाहून सर्वस्वी भिन्न. आपल्या कादंबरीसाठी त्यानं पुढं अंगिकारलेल्या जवळची अशी. निवेदन सरळ रेषीय नव्हतं, चक्राकार होतं. त्याच्या हातापाशी असेलल्या प्रसंगामधून त्याला मिळू शकेल त्याहून अधिक त्याच्या कथानकात अंतर्भूत केल्यानंतरच लेखक पुढं सरकत होता. कल्पनांचं साहचर्य सातत्यानं उपयोगात आणलं जात होतं : एका स्त्रीचं स्वप्न त्याला स्मरण करून देतं, त्याला त्याचं बालपण आणि हस्तमैथुनाचं त्याचं पहिलं साहस; लाइलकचं झुडूप, गावच्या नदीकाठानं फिरणं, छोटे मासे पकडण्यासाठी मुलं वापरतात ती काचपात्र, पुलावरील अनोळखी कोळी, ट्रेनच्या खिडकीमधून अधूनमधून दिसणारं प्रभातकालीन जांभळं आभाळ, एका सहलीच्या वेळी जिवाचा ठोका चुकवणाऱ्या एका डोंगरातील कपारीपाशी तो थांबला असता त्याच्या दृष्टीला पडलेला कॉफी विकणारी एक देखणी शेतकरीकन्या – तुकड्या तुकड्यांच्या या मालिकेवरून ध्यानी येतं की, ही पद्धती नेहमीच पूर्णपणे यशस्वी ठरलेली नाही. काही वेळेला हे संक्रमण कारणाविना आकस्मिक असतं. तंत्राच्या दृष्टीकोनामधून 'काँत्र सॅन्त-बव्ह' मुख्यत्वे संक्रमणकालीन अभ्यास आहे आणि त्या दृष्टीनं ती एक महत्त्वपूर्ण कृती आहे.

'काँत्र सॅन्त-बव्ह'च्या कामात बुडालेला असतानाही प्रूस्त त्याच्या मित्रांशी संपर्क साधून होता. मेमध्ये त्यानं ऐकलेल्या एका आकर्षक नावाच्या संदर्भात लुईकडे पृच्छा केली होती. नाव होतं गॅर्मांत. कुठल्यातरी एका कुटुंबाचं हे नाव होतं हे निश्चितच. परंतु कॉम्प्ते वा



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मार्क्विस द गॅर्मांत यांचा मार्क्विस द पारी यांच्याशी संबंध होता? ही किताबत सांप्रत अस्तित्वात नव्हती आणि म्हणून एका साहित्यिकाला ती उपलब्ध झाली होती? खरं म्हणजे प्रूस्तला नावाची आत्यंतिक गरज होती. हस्तलिखितांमध्ये पात्रांची भाऊगर्दी झाली होती, खास करून त्याची एक काऊंटेस्स आणि तिचं कुटुंब यांच्यासाठी त्याला एका नावाची गरज भासली होती. एव्हाना या कुटुंबामध्ये एक काउंट, एक राजकुमार, एक राजकुमारी आणि मार्क्विस द व्हिलपारिस यासारखे सगेसोयरे दाखल झाले होते. जुलैमध्ये सालाबादप्रमाणे काबुर्गला जाण्याचा बेत त्याला कळवला होता आणि विश्वासात घेऊन त्याला सांगितलं होतं,'जॉर्जेस, पॅरिस सोडेन तेव्हा माझ्याबरोबर बहुधा एक स्त्री असेल.'

जुलै महिना तसा लक्षणीय. या महिन्याच्या ६ तारखेला प्रूस्तच्या बेडरूममधील दिवा सतत साठ तास पेटत होता. त्याचा नोकर निकोलस त्र्याग्यानं म्हणालादेखील होता,'मॉसिए वृद्ध "ब्राम्हण" असणार, शंकाच नाही.' या महिन्याच्या पहिल्या तीन आठवड्यामध्येच प्रूस्तनं 'आ ला रशार्श' ला सुरुवात केली होती. शक्यता आहे. ४ ते ६ जुलै या काळात सतत साठ तास त्यानं जाग्रण केलं होतं. ते 'सॅन्त बव्ह'च्या कामाचा समारोप करण्याच्या कामी नसून कादंबरी लेखनाच्या स्फूर्तीनं. १८९९च्या शरदामध्ये वांझोटी 'झाँ सान्तेय' बाजूला टाकून हर्षभरित होत्साता तो रस्किनकडे वळला होता. त्याचप्रमाणे आता शेवटाल्या आलेल्या 'काँत्र सॅन्त बव्ह'ला त्यानं बाजूला सारलं होतं. परंतु यावेळी तो आतून उजळून निघाला होता. त्याच्या आयुष्यातील ही सर्वात महत्त्वपूर्ण अशी घटना, त्याच्यासाठी आणि भावी पिढीसाठीही.

कादंबरी लेखनाला प्रारंभ केल्यानं त्यानं काबुर्गला जाणं लांबणीवर टाकलं. पण दमा आणि दातदुखी यांनी त्याला त्रस्त केलं. त्यात एका गूढ आजाराची भर पडली. डॉ. बिझनं त्याला सल्ला दिला, मोकळी हवा त्याला मिळेल अशा ठिकाणी त्यानं जावं. २० ऑगस्टच्या सुमारास त्यानं पॅरिस सोडलं आणि निकोलससंगे तो काबुर्गला दाखल झाला. 'ग्रां हॉटेल'मध्ये नित्याप्रमाणं त्यानं मुक्काम ठोकला. चौथ्या मजल्यावरील एक खोली त्यानं घेतली. खोली तशी कोंदटच पण तिथं शेजाऱ्यापाजाऱ्यांचा आवाज नव्हता. शेकोटी होती. काही दिवसांनी सेक्रेटरी म्हणून उलरिच (Ulrich) त्याच्या दिमतीला आला. गेल्या वर्षी भोजनापूर्वी समुद्रकिनाऱ्यावर फिरण्यासाठी तो लवकर उठत होता. पण आता दिवस उजाडल्यानंतरही काम करत होता. साडे नवाच्या सुमारास तो डायनिंग हॉलमध्ये जायचा तोवर भोजन आटोपून बरेचजण निघून गेलेले असायचे. एका संध्याकाळी त्यानं तिथल्या जिप्सी ऑर्केस्ट्राला विचारलं की, त्यांना रेनाल्डो हानची एखादी संगीत रचना ठाऊक आहे का? त्यांनी 'रेव्हरी' (R'everie) ही धून वाजवली आणि त्याच्या डोळ्यांतून घळाघळा अश्रू वाहू लागले. आजूबाजूचे रिकामटेकडे वेटर त्याच्याकडे बघत राहिले आणि मुख्य वेटरनं लगबगीनं त्याला पाण्याचा ग्लास नेऊन दिला. नंतर बाजूच्या हॉलमधील कॅसिनोमध्ये



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

जाऊन काबुर्ग येथील त्याच्या मित्रांच्या तरुण मुलांमध्ये सामील झाला. मादम द नोआइल्लेच्या काव्याची भलामण करणं ही त्याची इथली रिकामपणाची कामगिरी. अर्थात, त्याच्या सोबत्यांमध्ये सर्व पुरुषच होते असं नाही. व्हायकॉम्प्त दोल्त्ॉं याच्या तरुण देखण्या मुली हेलन आणि कोलेट्ट यांना तो भेटत होता. कालेट्टच्या लावण्यानं तर तो मोहून गेला होता. आल्बेर्टाइनची व्यक्तीरेखा बव्हंशी तिच्यावर बेतलेली आहे असा तर्क केला जातो. यात तथ्य असेल नसेल. परंतु, एवढं बारीक खरं की, कोलेट्ट आणि प्रूस्त एवढे जवळ आले होते की, 'त्यांच्या लग्नाची शक्यता वर्तवली जात होती. यांच्याशिवाय कॉम्प्तेस्स बर्थिए आणि तिच्या जरमेन आणि यूव्हेत्र या सुंदर मुली, यांनाही तो भेटत होता. पुढं बऱ्याच वर्षांनी प्रूस्त हा थोर लेखक असल्याचं सांगून त्याच्यासंबंधी त्यांना विचारलं असता उत्तर मिळालं, 'तोच प्रूस्त ! अशक्यच ! कसा असेल ! तो साहित्याबद्दल चकार शब्द कधी बोलत नसे. अशा गमतीदार गोष्टी सांगायचा की, आमची हसून हसून मुरकुंडी वळायची.'

दरम्यानच्या काळात 'काँत्र सॅन्त-बव्ह' प्रकाशित करण्यास नकार दिल्याचं 'मरक्यूर द फ्रॉंस'चं पत्र त्याच्या हाती पडलं होतं. सुदैवानं कालमेट्ट यावेळी जवळपासच्या गावात मुक्कामाला होता. प्रकाशक शोधण्यास त्याला विनंती करायची असं ठरवून २७ ऑगस्टच्या सुमारास शोधण्यास त्याला विनंती करायची असं ठरवून २७ ऑगस्टच्या सुमारास प्रूस्त त्याला जाऊन भेटला होता. तथापि, प्रत्यक्ष भेटीत त्यानं 'काँत्र सॅन्त-बव्ह'चा विषय काढलाच नव्हता. तो बोलला होता, तो लिहित असलेल्या कादंबरीवर. ती 'ल फिगरो' मधून क्रमशः प्रकाशित करण्याची तयारी कालमेट्टनं दर्शवली होती. आता सॅन्त-बव्हवरील पुस्तकाविषयी गुप्तता राखणं समजंपणाचं होतं. कारण त्यासंबंधी बोनिअरपाशीही तो बोलला होता. त्यानं रोबेर ड्रायफसला पत्र लिहून विनंती केली, की कालमेट्टनं त्याचा समीक्षात्मक ग्रंथ स्वीकारलेला नसून कादंबरी स्वीकारली आहे असं त्यानं बोनिअरला कळवावं. परंतु, ड्रायफसनं तशी काही आवश्यकता नसल्याचं त्याला कळवलं आणि त्यानं ते मान्य केलं. तत्पूर्वी त्यानं मादम स्ट्रॉसला पत्र लिहून कळवलं होतं की, एक प्रदीर्घ पुस्तक त्यानं लिहून पूर्ण केलं आहे. त्यातला काही भाग 'ल फिगरो'मधून क्रमशः प्रसिद्ध होणार आहे. संपूर्ण प्रसिद्ध करणं उचित ठरणार नाही.' परंतु ते पूर्ण करण्याची माझी फार इच्छा आहे. संपूर्ण जरी लिहून झालेलं असलं तरी बऱ्याच गोष्टींवर परीष्करण करण्याची गरज आहे. 'हे कामपूर्ण होण्यास काही महिन्यांच्या अवधी लागेल असं आता तो समजून चालला असला तरी त्या कामाला तेरा वर्षं लागणार होती.'

मोसम संपला. प्रूस्तचे मित्र निघून गेले. सूनसान हॉटेलमध्ये ऑक्ओबर-नोव्हेंबरमध्ये निवांतपणे काम करण्याचा विचार त्याच्या मनात बळावला. आपल्याला दोन महिने राहू देण्यात यावं अशी इच्छा त्यानं हॉटेलच्या मालकापाशी व्यक्त केली. हॉटेलची डागडुजी करायची आहे या सबबीवर मालकानं त्याला नकार दिला. हिरमुसला होत्सात सप्टेंबर अखेर



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

तो पॅरिसला स्वगृही परतला. 'आ ला रशार्श'च्या प्रारंभाची सुवाच्च अक्षरात प्रत करवून घेतली आणि लॉरीनं तो भाग वाचावा म्हणून त्यानं लॉरीला पाचारण केलं. परंतु, त्याच्यापाशी आपल्या कादंबरीचं गुपित उघड केलं नाही. सांगितलं की, हस्तलिखित म्हणजे 'काँत्र सॅन्त-बव्ह'च्या पहिल्या प्रकरणाचा पहिला भाग, जो जवळजवळ खंडसदृश आहे नोव्हेंबरच्या मध्यावर त्यानं तो भाग प्रथम रेनाल्डोला वाचून दाखवला. त्यानं भरभरून त्याला दाद दिली. हस्तलिखिताची एव्हाना दोनशे पानं झाली असल्याचं उत्साहवर्धक वृत्त त्यानं २७ नोव्हेंबर रोजी लॉरीला कळवलं आणि पुढं लिहिलं,'तू म्हणशील त्या संध्याकाळी मी ते तुझ्याकडे पाठवून देईन. मला वाटतं, ते पूर्ण करण्यासाठी इतर गोष्टी दुय्यम मानणं हे माझं कर्तव्य आहे.' हस्तलिखित त्यानं लॉरीला पाठवून दिलं. डिसेंबरच्या सुरुवातीला लॉरीचं स्तुतीपर पत्र आलं. उत्तरादाखल प्रूस्तनं त्याला लिहिलं,'हे डिव्हाइन पत्र म्हणजे तुझी आंधळी मैत्री, याची जाणीव मला आहे. माझ्यापाशी काही टॅलंट आहे, यापेक्षा माझ्यावर तुझी माया आहे हे पाहून मला अत्यानंद झाला' आणि दुसरी आणि तिसरी अशा दोन नोंदवह्या पाठवल्या. लॉरीनं त्यावरील प्रतिक्रिया कळवताना लिहिलं की, हस्तलिखित वाचत असताना 'एक संपूर्ण नवीन विश्व' त्याच्यासमोर आकाराला आलं होतं. तो मंत्रमुग्ध झाला होता.

या तिन्ही नोंदवह्यांमधील मजकूराबाबत निश्चितपणे पुढील अनुमान काढता येणं शक्य आहे : पहिलीमध्ये संपूर्ण प्रकरण (कॉम्ब्रे-१) असावं आणि दुसऱ्या-तिसऱ्यांमध्ये संपूर्ण किंवा बरंचसं (कॉम्ब्रे-२) असावं. डिसेंबरच्या मध्यावर प्रूस्तनं लॉरीपाशी जी विचारणा केली होती, त्यावरून आपल्या अनुमानाला दुजोरा मिळतो. त्यानं विचारलं होतं की, आत्ताच त्यानं वाचलेला भाग वेगळा काढून प्रकाशित करता येईल का? आणि जर का तो त्याच काम पूर्ण करायच्या आधी मृत्यू पावला तर तशी व्यवस्था करण्याचं आश्वासन तो देईल का, कारण 'कॉम्ब्रे' हा तसा एक स्वतंत्र भाग होता.

प्रूस्त कादंबरीलेखनात पूर्ण गढून गेला होता. मित्रांच्या भेटीगाठीही विरळ्या झाल्या होत्या. लेखनासाठी एकांतवासात जाण्याचा निर्णय त्यानं घेतला. निर्णय अंमलात आणण्या-आधी त्यानं एक 'थिएटर-पार्टी' आयोजित केली. त्याच्या काबुर्ग येथील दोन तरुण स्नेह्यां-बरोबर लॉरी, एमॅन्युएल बिबिस्को, रेनाल्डो हान, फेनेलाँ आदि जुन्या अविवाहित मित्रंना आमंत्रणे गेली. लॉरीला पाठवलेल्या पत्रात त्यानं एका गुप्त बेताची वाच्यता केली; लिहिलं की,'मला प्रिय असलेली एक व्यक्ती (काबुर्गची तरुणाशी) संबंधित आहे.' पुढं पुस्ती जोडली,'जॉर्जेस, तुझ्यासाठी एक खास वार्ता मी लवकरच देईन किंवा तुझा सल्ला विचारीन. एका अत्यंत तरुण आणि देखण्या मुलीला माझ्या किळसवाण्या आयुष्यात सहभागी व्हायला लावणं, असं करण्यास ती घाबरत नसली तरीही, गुन्हा ठरणार नाही का?'

'आ ला रशार्श'चा निवेदक आल्बेरटाईनला म्हणतो,'जवळजवळ लग्नच केलं होतं मी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

तिच्याशी. परंतु शेवटी मला धीर नाही झाला. अतिशय आजारी आणि अत्यंत वैतागवाण्या अशा एखाद्याबरोबर एका तरुण स्त्रीला दिवस कंठायला लावणं मला रुचलं नाही.' तान्साँव्हिल येथे गिल्बेर्त निवेदकाला लग्न करण्याविषयी आग्रह करते, त्यावर तो म्हणतो, 'नाही, माझा स्वभाव वाईट आहे, शिवाय एकदा माझा वाङ्‌निश्चय झाला होता. पण मला तो तडीस नेता नाही आला.' काबुर्ग येथील मुलीशी लग्न करण्याचा विचार प्रूस्तच्या मनात घोळत होता. घरसोडवृत्तीमुळे त्याबाबत ठाम निर्णय घेणं त्याला जमत नव्हतं. जिनं आन्तोईन बिबेस्कोला 'माझं नाव छापू नये' असं सांगितलं होतं. त्या तरुण मुलीच्या भावना काय असतील? तिचं प्रूस्तवर प्रेम होतं का? या अशक्यप्राय मिलनाची तिची इच्छा त्याच्याहून अधिक मनापासूनची होती का? हे प्रश्न अनुत्तरीच आहेत.

## प्रकरण चौदा

१९१०च्या प्रारंभी थॉमस हार्डीची 'द वेल-बिलव्हेड' चा फ्रेंच अनुवाद प्रूस्तच्या वाचनात आला. त्यानं रॉबेर द बिल्लीला सांगितलं की, तो जे आता लिहित आहे त्याच्याशी या कादंबरीचं थोडं बहुत साम्य आहे. अर्थात, ती शतपटीनं चांगली आहे. हार्डीच्या कथानकामध्ये त्याला स्वत:चा आप्तभाव आढळून आला. हार्डीच्या कादंबरीमध्ये नायक त्याच्या आयुष्याच्या तीन वेगवेगळ्या काळात मुलगी, तिची कन्या आणि तिच्या कन्येची लेक यांच्यावर प्रेम करतो. 'आ ला रशार्शसुद्धा तीन भिन्न भिन्न काळातील तीन प्रेमाची कथा होती. स्वानचं ऑडेट्टवरील प्रेम आणि निवेदकाचं गिल्बर्ट आणि आल्बेर टाईनवरील. हार्डीच्या दृष्टीकोनानुसार आपण एका हाडामासाच्या व्यक्तीच्या पाठपुरावा करत नसतो तर आपल्या क्षणभरच्या प्रतिमेचा, जी आपण वांछिलेल्या सर्व गोष्टींमध्ये एकच असते. असा दृष्टीकोन प्रूस्तचाही होता आणि ही बाब सोळा वर्षांनंतर हार्डीच्याही ध्यानी आली होती. 'द वेल-बिहेव्ड','ज्यूड द ऑब्स्कूअर' आणि 'अ पेअर ऑफ ब्ल्यू आइज' या हार्डीच्या कादंबऱ्या आणि प्रूस्तची 'आ ला रशार्श' यामधील साम्यस्थळं पाहाता हार्डीच्या कादंबऱ्या प्रूस्तचं कादंबरीलेखन चालू असेस्तोवर त्याच्या मनात घर करून होत्या हे निर्विवाद.

प्रूस्तचं लेखन त्याच्या सवयीनुसार संथ गतीनं पुढं सरकत होतं. या काळात त्यानं स्वत:ला पूर्णपणे कोंडून घेतलेलं नव्हतं किंवा मेजवान्यांची आमंत्रणं तो नाकारतही नव्हता. कारण, लेखनाशिवाय अन्य विरंगुळ्याची त्याला गरज होती. अर्थात, अनावश्यक आमंत्रणं तो टाळत होता, त्यात वेळ वाया घालवण्याची त्याची इच्छा नव्हती. मादम द केइल्लावेच्या अंत्यसंस्कारालाही तो गेला नव्हता. त्याच्या लिखाणात व्यत्यय आणला, सीन नदीला आलेल्या पुरानं. जानेवारी-फेब्रुवारीमध्ये पावसानं कहर केला. अर्धं अधिक फ्रांस पुरात बुडाले. हजारो बेघर झाले. पुराचा फटका प्रूस्त राहात होता त्या बुलेव्हार हॉसमनलाही बसला.

पूर ओसरला आणि प्रूस्तच्या कटकटींना सुरुवात झाली. 'इतरांच्या वाट्याला एवढे



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

वाईट भोग आले असता माझ्याबद्दल कसं बोलायचं.' असं तो म्हणत असला तरी तो पुरता त्रासून गेला. त्याच्या इमारतीच्या तळघरातील पाणी उपसून काढावं लागलं. घाणीचा निचरा करण्यासाठी रोगप्रतिबंधक फवारे मारण्यात आले. त्यामुळे प्रूस्तचा दमा बळावला. तशात इमारतीच्या नासधूस झालेल्या भागाच्या डागडुजीला सुरुवात झाली. दिवसभरच्या ठाकठोकी-मुळे प्रूस्तला झोप मिळेनाशी झाली. अफू आणि व्हेरनोल यांचं सेवन करणं त्याला भाग पडलं. या गदारोळापासून दूर व्हेनिसला जाण्याचा विचार त्याच्या मनाला स्पर्शून गेला. मार्च ते जून या दरम्यान त्याचा पत्रव्यवहारही थंडावला. एप्रिलमध्ये त्यानं मादम स्ट्रॉसला कळवलं,('जणू काही मी तुम्हाला कैकदा पुरतं असं सांगितलेलं नाही') की "तो" एक प्रदीर्घ कृती पूर्ण करण्याच्या कामात आहे, ती बरीच महिने घेईल.' म्हणजे महापूरहूनही तो त्याच्या कामात पूर्ण बुडालेला होता. तो एकांतवात होता पण एकाकी नव्हता. त्यानं तिनदा घंटा वाजवल्यानंतर निकोलस त्याच्या पुढ्यात हजर होत होता. त्याच्या दिमतीला सेलीन होती. हे जोडपं तिशीकडे झुकलेलं होतं. आपल्या तऱ्हेवाईक धन्यासमोर ते अदबीन वागत पण त्यांच्याविषयीचा आदर एकूण कमीच. प्रूस्तच्या लिखाणाचे खोलीभर पसरलेले कागद एकत्र करून नीट लावणे, क्वचित प्रसंगी त्यानं सांगितलेला मजकूर उतरवून घेणं ही कामं निकोलस करत होता. सेलीनला तो म्हणाला होता,'त्याच्याप्रमाणेच त्याची वटवट म्हणजे भयंकर वैताग. पण मी सांगतो, ते लक्षात ठेव. मेल्यावर तो प्रसिद्धी पावेल.' या दाम्पत्याचा पगार महिना १५० फ्रँक. पण प्रूस्तच्या स्वभावानुसार त्या पगाराच्या दुप्पट रक्कम तो त्यांच्या हाती ठेवत होता. धन्याचा दिनक्रम सांभाळणं तसं दमछाक करणारा. धन्याला पहाटे कॉफी द्यायची असते म्हणून सेलीन ९. ३० वाजता झोपी जायची आणि निकोलस पहाटे चारपर्यंत जागृत असायचा. रात्रौ ९ वाजता प्रूस्तचं जेवण. जेवणातील पदार्थ ठरलेले. त्यात बदल नाही. रेनाल्डो हान, अल्बुफेरा, अब्तोइन बिबस्को, रॅडझिविल हे त्याचे मित्र त्याला भेटायला येत असत.

प्रूस्तचं लिखाण चालू होतं. एके दिवशी त्याला वाटलं. त्याच्या कादंबरीचा शेवट दृष्टी-पथात आला आहे. ती क्रमश: प्रसिद्ध झाल्यास तिची जाहिरातही होईल अशी आशा त्याच्या मनात पालवली. ती क्रमश: छापण्याचं भरघोस आश्वासन कालमेट्टनं त्याला गतवर्षी दिलं होतं, ते स्मरून 'कॉम्ब्रे' प्रकरण त्यानं 'ल फिगरो'कडे पाठवून दिलं. परंतु ते प्रकरण पुरवणी अंकात जाण्यायोग्य नसल्याचं कालमेट्टला वाटलं. त्यानं प्रूस्तला नकार कळवला. जून अखेर रात्रौ एक वाजता ते हस्तलिखित परत आणण्यासाठी प्रूस्त 'ल फिगरो'च्या ऑफिसमध्ये गेला. लॉरीला म्हणाला,'अत्यंत उदासवाणी फेरी. कालमेट्टशी माझे संबंध चांगले; तरी माझी संधी कुणी बरबाद केली, कल्पना नाही. मेहरबानी करून, यासंबंधी कुणापाशी वाच्यता करू नकोस. बरबाद होईन मी. सुदैवानं याबद्दल कुणाला 'माहिती नाही, अधिकृतरित्या कालमेट्टबरोबरचे संबंध मी तोडून टाकले नाहीत, माझ्या नोंदवह्या मी परत



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

आणल्या तेव्हा मी दिलगिरीही व्यक्त केली नव्हती.'

नकार प्रूस्तच्या जिव्हारी लागला. पण त्यानं लेखन थांबवलं नाही. पुढं लिहित राहिला. १७ जुलैला आपल्या लव्याजम्यासह प्रूस्तनं घर सोडलं आणि काबुर्गला 'ग्रां हॉटेल'मध्ये मध्यरात्री पोहोचला. सर्व स्थिरस्थावर झाल्यानंतर एक पवित्र कार्य पार पाडत असल्यागत अंगात झाल्यागत तो सतत लिहित राहिला. क्वचित प्रसंगी तृतीय पुरुषी निवेदन असलेले प्रसंग त्यानं नव्यानं लिहिलेल्या प्रसंगामधील नायकाला चार्ल्स स्वान असं संबोधण्यात यात Querqueville क्वेरक्यूविल (हे गाव पुढं बाल्बेक बनलं) या गावातील काही पोरींबरोबरचं स्वत:चं फ्लर्टिंग आलं. त्याच्या जोडीनं फ्रान्सोईस किंवा कारमेन, किंवा ऑडेट्ट यांच्या-बरोबरचं त्याची प्रेमप्रकरणंही वर्णिली गेली. काही वेळेला जुन्या घटनांची त्यानं फेरमांडणी केली, त्यावर परिष्कणं केली. विशेषत:, समलिंगरतीविषयींच्या संबंधातील या संदर्भात त्यानं त्यांची दोन गटात विभागणी केली. एक, स्त्रियांशी संभोग करताना शारीरिक अडचणी अनुभवणारे पुरुष; दोन, स्त्रियांचा वासवारा न आवडणारे पुरुष.

एव्हाना, आधी होत्या त्यांच्या तिप्पट चौपटीनं नोंदवह्यांची संख्या झाली. कालमेट्टनं नकार दिल्यामुळे दैनिक वृत्तपत्रात कादंबरी क्रमश: प्रसिद्ध होण्याची आशा मावळली असली तरी एखाद्या मासिकामध्ये तिला जागा मिळेल का याची शक्यता तो अजमावू लागला. १८ ऑगस्टला त्यानं व्हाडेयेरला विचारलं 'ग्रां रव्ह्यू'सारखं एखादं नियतकालिक माझ्या कादंबरीचा बराचसा भाग प्रसिद्ध करेल का? 'पण हा त्याचा विचारही बदलला.' ती एवढ्या लवकरच पूर्ण होईल की, मला वाटतं आता मासिकाचा विचार करण्यात अर्थ नाही, यात प्रदीर्घ विलंब संभवतो.

ऑक्टोबरच्या सुरुवातीला स्वगृही परतल्यानंतरही त्यानं लिहिण्याची बैठक मोडली नाही, लिहित राहिला. असमाधानकारक मजकूर टरकावत राहिला. समाधानकारक मजकूर कागदावर उकवत राहिला. परिष्करण जारी ठेवलं. अहेतूक स्मृतीवर आपण विसंबून आहोत असा आव जरी त्यानं आणला तरी त्या पडताळून पाहाण्याची आवश्यकता त्याला भासत राहिली. त्याला खात्री करून घ्यावीशी वाटली : उमरावांची घराणी, काही विवक्षित फुलांच्या बहराचा मोसम, त्याच्या कहाणीला सुरुवात होते, त्या दूरवरच्या भूतकाळात स्त्रिया वापरत असलेल्या हॅटी वगैरे वगैरे. अलमानाक द गोथ त्यानं पालथा घातला. त्याच्या खोलीमधल्या छायाचित्रांचा बारकाईनं अभ्यास केला. प्रसिद्ध चित्रांच्या प्रतिकृती वा जुन्या फॅशन-मासिकांचे अंक विकत आणण्यासाठी नोकरांना पिटाळू लागला. वनस्पतिशास्त्र आणि वास्तुकला यावरील पुस्तकांची पानं चौकस नजरेखालून घालू लागला. त्या त्या विषयांतील माहीत-गारांशी विचारविनिमय करू लागला. या कामी ओडिलाँ आल्बरेट नामक एका टॅक्सी ड्रायव्हरला भाड्याच्या बोलीवर ठेवला. रात्रौ कुठल्याही प्रहरी कामगिरीवर पाठवलं तरी त्याला त्याची ना नव्हती, त्याबद्दल कुरबूर, तक्रार नव्हती. त्यामुळं प्रूस्तची शोधाशोध सुलभ



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

झाली. त्याला शक्य झाल्यास, प्रूस्त त्याच्याबरोबर बाहेर पडू लागला. काही वेळेला ज्यांना प्रश्न विचारायचे असत त्यांना घरी घेऊन येण्यासाठी अल्बरेटला पाठवू लागला. एक दिवस 'क्रिमिनल सायकॉलजी'चा इटालीमध्ये अभ्यास केलेला एक विद्यार्थी पॅरिसमध्ये आल्याचं प्रूस्तला कळलं. एका रात्री टॅक्सी पाठवून त्याला घरी आणलं. रोमन सोसायटीमधील बदनाम व्यक्तिंविषयी त्यानं खोदून खोदून विचारलं आणि त्यानं अभ्यासिलेल्या काही 'केस-हिस्टरिज' आपल्याला उतरवून द्याव्यात म्हणून त्याची मनधरणी केली. मनधरणी फलदायी झाली. त्यानं लिहून दिलेल्या 'केस-हिस्टरीज'मध्ये एका इटालियन काऊंटची केस होती. तो अतिशय सुसंस्कृत होता, अत्यंत चंचल आणि तरुण पोरांचा आत्यंतिक शौकीन. ती तरुण पोरं विवाहबद्ध होत असल्याचं कानी येताच मात्र तो खवळायचा, त्यांचं नरडं दाबून त्यांना नेस्तनाबूत करण्याचा प्रयत्न करायचा.

एक रात्री डब्यूस्सीची एक धून प्रूस्तच्या मनात घुमू लागली. त्याला वाटलं, या क्षणी ती प्रत्यक्षात ऐकायला हवीच. पहाटे तीनला प्रख्यात क्वार्टेरच्या सदस्यांना त्यांना फोन केला. त्यांना झोपून उठवलं आणि आपल्या बेडरूममध्ये त्यानं ती धून वाजवावी म्हणून त्यांना घेऊन येण्यासाठी आल्बरेटला टॅक्सी घेऊन पाठवलं. आपल्या लेखनातील तपशील अचूक असानेत, त्याबाबत संदिग्धता नको याविषयी तो विलक्षण जागरुक होता.

आपली कादंबरी त्याला लवकरात लवकर पूर्ण करायची होती. पण, ती लांबतच चालली होती. अखेरचा श्वास घेईपर्यंत तिचा विस्तार होतच जाणार होता. आता, पहाटे आधी आणि नंतर तो काम करत असता किंवा दुपारपासून संध्याकाळपर्यंत झोपी गेला असता. घराबाहेरील वर्दळीचा, त्याचे नोकर वा शेजारी यांच्या हालचालींचा, आदळआपटीचा त्रास त्याला फारसा होत नव्हता. कारण त्याच्या गैरहजेरीत त्याची बेडरुम शक्य तेवढी 'साऊंड प्रूफ' करून घेण्यात आली होती. या कामी बुचांचा वापर करण्यात आला होता. बऱ्याच लोकांच्या लेखी ती खोली म्हणजे हस्तिदंती मनोराच. त्यानं केलेली त्याच्या खोलीची ही खास रचना त्याच्या नावाशी पुढं कायमची जोडली जायची होती. लाकडी पट्ट्यांच्या तुकड्यांवर खिळे ठोकून बसवलेली बुचं, हे दृश्य अर्थातच प्रूस्तच्या नजरेलाही खुपत होतं, पण तिथं दुर्लक्ष करण्यावाचून गत्यंतर नव्हतं. तो दुर्लक्ष करू शकत नव्हता ती बाब होती. ती यावरील भरमसाट खर्च. तशात त्यानं काबुर्ग इथल्या दोन तरुण पोरींना घड्याळं देण्याचं त्यानं दिलेलं आश्वासन. कार्टीअरनं घड्याळाची किंमत चार हजार फ्रँक्स सांगताच त्याच्या छातीचा ठोका चुकला होता. त्यानं हानला पत्र लिहून किंमत कमी करता येईल का अशी विचारणा केली होती. भेटवस्तूंच्या किंमतीबाबत घासाघीस करणं त्याच्या स्वभावात नव्हतं. तरीही अन्यत्र १२०० फ्रँक्सपर्यंत चांगली घड्याळं मिळू शकतील असं त्याला वाटत होतं. शरदामध्ये त्याच्या दम्यानं उचल खाल्ली. तेव्हा त्याच्या मनात शंकेची पाल चुकचुकली : बुचाच्या वासानं दमा चाळवला नसेल ना? परंतु, पुढं स्पष्ट झालं की त्याची धास्ती



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

बिनबुडाची ठरली. त्यामुळे आपण केलेला खर्च तसा अनाठायी नव्हता, इच्छित परिणाम साधला गेला याचं समाधान त्याला लाभलं.

दिवसामागून दिवस पुढं सरकत होते. प्रूस्त आपल्या कादंबरीसाठी जगत होता. ध्वनि-रहित खोलीत कादंबरी लिहित होता. त्याला हवी असलेली माहिती पुरवू शकतील. अशा लोकांना पत्र पाठवून तो प्रश्न विचारत होता. चेहरे, वागणं-बोलणं यांचा अभ्यास करण्या-साठी त्याला शक्य असे तेव्हा घराबाहेर पडत होता. कादंबरीमध्ये या साऱ्यांचा वापर करण्याच्या उद्देशानं सर्व 'इम्प्रेशन्स' साठवत होता. या कामी मोठाल्या पार्ट्या त्याला अधिक पसंत असत. १९१०च्या ख्रिसमस इव्हला मादम एडवर्डनं दिलेली पार्टी अशीच महत्त्वाची होती. बरीच टेबलं मांडण्यात आली होती. सावळागोंधळ माजला होता. कारण काही लोकांना बसायला जागा मिळाली नव्हती. प्रूस्त यजमानिणीच्या शेजारी बसला होता. शिणलेल्या आवाजात संथपणे तिच्याशी बोलत होता. संभाषणाची सूत्रं त्याच्यापाशीच होती, तरीही त्याची चौकस नजर अवतीभवती फिरत होती, आलेल्या पाहुण्यांचे बारकाईनं निरीक्षण करत होती. इतरांच्या नजराही त्याला निरखत होत्या. काहींच्या ध्यानी आलं होतं की, त्याची दाढी बरीचशी वाढली होती. ती काळीभोर असूनही त्यावर निळसर झाक असल्याचं भासत होतं. या पार्टील आरनॉल्ड बेनेट हा इंग्रजी लेखक आला होता. त्याचं मत झालं होतं की, हा दाढीवाला माणूस सौंदर्योपासक असावा. तो पहात होता, हा माणूस सतत मिशीला पीळ भरत होता, तऱ्हेवाईकपणे 'पेशन्स'मधील बन्योर्न या पात्रासाठी प्रूस्तच्या रूपानं त्याला मॉडेल गवसलं होतं.

काही वेळेला अशा पार्ट्यांमध्ये प्रूस्त एकाच व्यक्तीवर आपलं लक्ष केंद्रित करत असे 'लीन ट्रान्सिजन्ट' या कट्टर लोकसत्तावादी वृत्तपत्रानं आयोजिलेल्या नृत्यसमारंभात तो प्रिन्सेस्स बिबेस्कोवर नजर खिळवून होता. प्रिन्सेस्स तरुण होती. गुणसपंन्न होती. त्याचे मित्र बिबेस्को यांची ती नातलग होती. १९०२ मध्ये वयाच्या सोळाव्या तिचं लग्न झालं होतं. तिचं 'ले ह्यूई पाराडीस' प्रूस्तच्या वाचनात आली होती. त्या पुस्तकांची स्तुती करणारं पत्र त्यानं तिला पाठवलं होतं : लिहिलं होतं की तिच्या मनात सतत घोळणाऱ्या विचाराचा भार सहन करण्याच्या कामी तिची बालसदृश निष्पाप उल्हास सहाय्यभूत होऊ शकेल. आता, या नृत्यसमारंभात त्याची उदास नजर टाळता यावी म्हणून दूर अंतरावर नृत्यात ती सामील झाली होती. परंतु फेनेलाँ तिला नाचवत नाचवत प्रूस्तजवळ घेऊन गेला. ओव्हरकोटची कॉलर वर करून बसलेल्या फिक्कट चेहऱ्याच्या दाढीवाल्या प्रूस्तनं विचारलं, "दुसरं एखादं लिहितेस काय?' ती म्हणाली, 'होय, सुखाबद्दलचं, आलेक्झांन्द्र आशिआटिक. अलेक्झांडर द ग्रेटची कथा.' तिच्या लेखी भूतलावर शक्य होऊ शकेल अशा परमानंदाचा तो प्रतिक होता. तिच्या बोलण्यानं प्रूस्त सर्द झाला. तो पुटपुटला, 'सौख्यासाठी नव्हे तर दुर्भाग्यासाठी !' प्रिन्सेन्सनं फेनेलाँला नजरेनं खुणावलं आणि तो नाचत नाचत तिथून तिला दूर घेऊन गेला.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

प्रूस्तनं एव्हाना तिला जोखलं होतं. तिनंही त्याला जोखलं होतं. पण काही काळ उलटून गेल्यानंतर त्याच्या निधनानंतर तिनं लिहिलं होतं,'ज्या जगाची किल्ली त्याच्यापाशी होती त्या जगात त्याच्या पाठोपाठ जाण्याचं त्या संध्याकाळी मी नाकारलं होतं.' ती आणि प्रूस्त एकाच भूतलावरील दोन रहिवासी होते.

२२ मे रोजी प्रूस्त डाभुनझिओच्या 'ल मार्टीर द सॅन्त सेबास्टीन' या नाटकचा रंगीत तालमीला गेला होता. इकडेतिकडे वावरत होता. मॉन्तेस्क्युइउसारख्या जुन्या मित्रांशी गप्पा मारत होता. सर्वांचे बारकाईनं निरीक्षण करत होता. त्याच्या आजारपणामुळे त्याच्या घरी जाऊन भेटता येत नाही म्हणून काहीजण खंत व्यक्त करत होते. यावेळची त्याची इम्प्रेशन्स वेगळी होती. त्याच्या कादंबरीच्या अखेरीस निवेदकाला आढळून येतं तसंच यावेळी त्याला आढळून आलं होतं की, या बड्या मंडळीत बदल झाला होता आणि तो बदल निश्चितच चांगला नव्हता, त्याच्या पसंतीचा नव्हता. त्यानं मादम स्ट्रॉसकडे तक्रार केली होती. 'अत्यंत चांगले म्हणता येण्याजोगे बुद्धीवादाकडे झुकले आहेत. परंतु, दुर्दैवानं सोसायटी जनांच्या बाबतीत ते हे कसं काय जमवतात. मला ठाऊक नाही. बुद्धीवादी कृती त्यांचा मूर्खपणा वृद्धिंगत करत जाते. अंतिमत: तो आजवर ज्ञात नसलेल्या बळाची पातळी गाठतो. मूर्ख राहाण्याचेच अवधान जे पाळतात ते सुसह्य असतात.'

या काळात आपल्या दैनंदिन वेळापत्रकात बदल करून पाहिला. अर्थात, हा बदल फार काळ टिकला नाही. या वेळापत्रकानुसार तो दुपारी लवकर घराबाहेर पडायचा. असाच एकदा तो चिनी चित्रांच्या प्रदर्शनाला एका तज्ज्ञासंगे गेला. शक्यता आहे, आपल्या कादंबरीसाठी त्याला सामग्री गोळा करायची होती आणि ती जाणकाराकडून मिळाली तर चोख असेल याविषयी तो नि:शंक होता. प्रदर्शनात योगायोगानं त्याची रोडीअर या जुन्या परिचिताशी गाठ पडली. ही व्यक्ती पक्की व्यसनी, आरपार दांभिक ल ग्रॅंडीन साठीचं एक उत्कृष्ट मॉडेल. त्यानं मान झुकवून प्रूस्तला अभिवादन केलं. दोघांच्या इकडच्यातिकडच्या गप्पागोष्टी झाल्या-नंतर रोडीअरची नजर त्या तज्ज्ञाकडे वळताच त्याच्या भंपकपणानं उचल खाल्ली. त्याच्यावर छाप टाकण्यासाठी रोडीअरची तोंडाची टकळी चालू राहिली. बोलण्याच्या ओघात कॉक्टॉचं नाव येताच ऋषीमुनीचा आव आणून त्यानं आपलं मत नोंदवलं,'त्याच्याबाबतीत मला भीती वाटते ती त्याच्या संगतीची. तो फारच हाताबाहेर जातोय. असाच वाहवत गेला तर तो बाराच्या भावात गेलाच.' ही मुक्ताफळं उधळणारा स्वत:ची शिष्टमन्यता मान्य करण्याला अजिबात तयार नव्हता. असल्या दुबळेपणापासून आपण कित्येक योजनं दूर असलेल्या मुनीवराचा आव त्यानं आणला होता. प्रूस्तनं या भेटीत त्याला पोषाखासंबंधी प्रश्न विचारले. त्यापैकी एक प्रश्न : जुन्या काळात प्रतिष्ठित वारांगना मादम क्लोमनसिल कोणत्या प्रकारची काळी हॅट घालत होती. सुदैवानं रोडीअरला आठवत होता : रेम्ब्राकडून ती उचलली होती. प्रूस्त खूश झाला. ऑडेट्टच्या वर्णनासाठी एक तपशील त्याला मिळाला.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

११ जुलैला प्रूस्त काबुर्गला गेला. 'ग्रां हॉटेल'मध्ये उतरला. कादंबरीलेखनात व्यस्त झाला. मध्येच त्याच्या मनात आलं. एका तरुण मित्राला आपला सेक्रेटरी म्हणून काम करतो का म्हणून विचारावं. एकदाच तो त्याला भेटला होता तरी त्यानं त्याला पत्र पाठवलं विचारलं, आपली कादंबरी तो सुवाच्च अक्षरात लिहून काढू शकेल वा टाइप करू शकेल का? खरंतर, निकोलस त्याचा मजकूर उतरून काढण्याचं काम करत होता. शिवाय शॉर्ट हॅण्ड-टायपिंग येणारी बाई त्याला हॉटेलमध्येच सापडली. ती इंग्रज होती. नाव, मिस हेवर्ड. तिच्या मदतीनं प्रूस्तची कादंबरी पुढं सरकू लागली. थोड्या दिवसानं त्यानं कालमेट्टला लिहिलं, 'कादंबरी जवळजवळ एक चतुर्थांश डिक्टेट करून झाली आहे. सुमारे एक चतुर्थांश, एक पंचमांश.' लवकरात लवकर कादंबरी हातावेगळी करण्याची आशा प्रूस्त बाळगून होता. परंतु नाना अडथळ्यांनी त्याच्या कामात व्यत्यय आणला. त्यापैकी महत्त्वाचे दोन : आजारपणे आणि कॅसिनोमध्ये जाऊन जुगार खेळण्याचं त्याला लागलेलं जबरदस्त व्यसन. शिवाय, सर्वच अनुभव, ताज्या घटना, ताजे तपशील कादंबरीत समाविष्ट करण्याची त्याची प्रबळ उत्सुकता.

सप्टेंबरच्या अखेरीस प्रूस्त पॅरिसला परतला. इथं अडचणींमध्ये भरच पडत गेली. पहिली: आल्फ्रेड ॲगोस्तिनेल्लीला त्यानं दिलेला आसरा. एव्हाना त्याच्या टॅक्सी ड्रायव्हरची गावची नोकरी सुटली होती. हा छुपा रुस्तूम सध्या बेकार होता. बाहेर जाऊन त्यानं आपले गुण उधळू नयेत म्हणून प्रूस्तनं त्याला कादंबरी टाइप करायच्या कामाला लावले. पण या कामात त्याला गती नव्हती. शिवाय अन्यत्र लक्ष गुंतलेले असल्यामुळे त्याला त्या कामात रसही नव्हता. दुसरी : प्रूस्तची स्टॉक-मार्केटवरील सट्टेबाजी. १९१२च्या जानेवारीमध्ये त्यानं खरेदिलेले मायनिंग स्टॉकचे दोनतीन हजार शेअर्स, त्यांचे भाव घसरत नीचांक गाठत असूनही, तो जवळ बाळगून होता. याबाबतीत त्यानं इतरांचे सल्ले घेतले. या कामी मदतनीस म्हणून आल्बेर नाहमिआस (यालाच त्यानं काबुर्गहून पत्र पाठवून कादंबरीच्या टाइपिंगविषयी विचारणा केली होती) याची नेमणूक केली. शिवाय, बिल्लीला पत्र पाठवून विचारलं, 'माझे रॅन्ड माइन्स आणि माझे क्राउन माइन्स यांचे शेअर आणखीन एखादा महिना जवळ ठेवणं मला फायदेशीर ठरेल असं तुला वाटतं का? ते पुन्हा चढण्याचा योग आहे का? आश्चर्यच आहे, चांगल्या स्थितीत असल्याचं सांगितलं जातं त्यांची एवढी दयनीय घसरण व्हावी, ती सुद्धा चांगले डिव्हिडंट देत असताना ! मी त्यात एवढी रक्कम गुंतवलेली आहे की, माझ्यापाशी ते राखून ठेवण्याची हिम्मत होत नाही.' त्याचा धीर सुटला. ४०,००० फ्रँक्सचा तोटा सोसून जवळजवळ ३,००,००० फ्रँक्सचे सोन्याचे शेअर्स त्यानं ४ मार्चला आणि दुसऱ्याच दिवशी सोन्याचे भाव वधारले.

दरम्यान, पॅरिसला मुक्कामाला आलेली मिस हेवर्ड आणि आल्बेर यांच्या मदतीनं आपल्या कादंबरीच्या पहिल्या अर्ध्या भागाची टंकलिखित प्रत तयार करवून घेतली. आपण



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दिलेल्या नकाराचं प्रायश्चित म्हणून की काय कालमेट्टनं त्याच्या कादंबरीची फास्केल या ख्यातनाम प्रकाशकाकडे शिफारस करण्याची आणि त्यातील योग्य तो भाग निवडून आगाऊ पब्लिसिटी म्हणून 'ल फिगरो'मध्ये प्रसिद्ध करण्याची तयारी दर्शवली. त्यानुसार २१ मार्चच्या अंकात हॉथॉर्नसंबंधीची मजकूर 'ओ सल (Seul) द्यु प्रान्ततेम्प' या मथळ्याखाली प्रसिद्ध झाला. हा मथळा प्रूस्तला अजिबात पसंत नव्हता. त्यासंबंधीची तीव्र नाराजी त्यानं आपल्या मित्रांकडे व्यक्तही केली. कादंबरी प्रकाशित करण्याच्या दृष्टीनं 'गिल ब्लास' चा संपादक रने ब्लॅम (प्रूस्तचा जुना मित्र लेऑं ब्लॅमचा भाऊ) आणि कादंबरीकार लुई द रॉबेर यांच्याशीही त्यानं संपर्क साधला. कादंबरी प्रसिद्ध करण्यात बऱ्याच समस्या होत्या. त्यातील महत्त्वाची, कादंबरीची प्रदीर्घ लांबी. जवळजवळ बाराशे ते चौदाशे पृष्ठं. कादंबरीत एकसंघ-पणा राहाण्याच्या दृष्टीनं ती एका खंडातच यावी अशी प्रूस्तची इच्छा असली तरी, प्रकाशकाला ही बाब व्यवहार्य वाटणार नाही ही गोष्ट त्याला नजरेआड करता येत नव्हती. दोन खंडात ती काढायची का? दोन्ही खंड एकाच वेळी प्रसिद्ध करायचे की त्यात काही काळ जाऊ द्यायचा? दोन्हीना एकच शीर्षक द्यावं की वेगवेगळी? हस्तलिखिताचे दोन समान भाग करावेत की, एखादी तर्कसंगत विभागणी करावी?– म्हणजे एका खंडात, पहिलं, दुसरं, तिसरं आणि पाचवं प्रकरण, दुसऱ्यात चौथं, सहावं आणि उरलेली प्रकरणं? नाना प्रश्नांनी त्याला भंडावून सोडलं.

मनात हा गुंता चालू असतानाच, टाइप केलेला मजकूर तो नजरेखालून घालत होता. पुनर्लेखन करण्याची आवश्यकता असलेल्या घटनांचे तपशील मिळवण्यासाठी आल्बेर-बरोबर बाहेर जात होता. असाच १९१२ च्या एप्रिलमध्ये एका दुपारी तो अंथरुणातून उठला. नाईटशर्टवरच फरकोट चढवला आणि सफरचंदाचे बहरलेले वृक्ष पाहाण्यासाठी रूएईल Rueil ला टॅक्सीनं निघाला. चिखलाच्या रस्त्यावर टॅक्सी थांबली तेव्हा सहा वाजले होते. पाऊस पडून गेला होता तरी आकाश करड्या ढगांनी व्यापलेलं होतं. सांज उतरत होती. बागवान त्याच्याकडे आणि शोफरकडे संशयानं पाहात होते. समोर सफरचंदाच्या वृक्षांच्या रांगा. बाल्बेकच्या दुसऱ्या भेटीत कादंबरीचा निवेदक पाहातो तशा : 'As far as the eye could reach, they were in full bloom, scandously luxurious, wearing ball-dresses with their feet in the mire, and taking no precautions against spoiling the most marvellous pink satin ever seen.'

मेमध्ये प्रूस्त 'ऑपेरा द मॉन्ते-कार्लो' बघायला गेला. अचंब्याची गोष्ट म्हणजे प्रमुख गायिकेचं नाव होतं मादम ॲगोस्तिनेल्ली. प्रूस्त मादम स्तान्दिश आणि मादम ग्रेफुल्ले या अत्यंत दिमाखदार यजमानिणीसंगे बॉक्समध्ये बसला. उत्तम मॉडेल्स म्हणून त्या दोघींचाही आपल्या कथानकात उपयोग हाऊ शकेल असा विचार त्याच्या मनात हळूच डोकावला. परंतु काही काळानंतर त्यांचे वर्णन करताना मात्र तो कमालीची गोंधळून गेला. या कामी त्याला



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मदत घ्यावीशी वाटल्यानं त्यानं मादम गास्ताँ द केइलावेतला लिहिलं,'माझी अशी धारणा झाली होती की, त्या पोषाख आणि स्टाइल या दोन संकल्पनांचं प्रतिनिधित्व करतात, पूर्णपणे विभिन्न, अगदी परस्परविरोधी संकल्पना. मला वाटत नाही, तुम्ही त्यांना त्या संध्याकाळी पाहिलं असेल. कारण, स्टेजजवळच्या बॉक्समध्ये त्या होत्या. तिथं अतिशय काळोख होता. (आजपासून जवळजवळ दोन महिन्यांपूर्वी) परंतु, तुम्ही त्यांना इतर कार्यक्रमाच्या वेळी एकएकट्या पाहिल्या असणार. मला त्यात स्वारस्य आहे ते त्यांच्यापैकी एकीलाही कळावं अशी माझी इच्छा नाही. (तसं असतं तर मादम जी (ग्रे फुल्ले) ला मला सहज विचारता आलं असतं, त्यानंतर मी त्यांना कैकदा भेटलोही होतो) कारण, दोन पात्रांना मी पेहराव चढवणार आहे. दोन मानवाकृती ठोकळ्यागत त्यांच्याशी संबंध नसलेल्या त्यांच्या कपड्यात... मी त्यांच्याशी बोललो आणि त्यानंतर माझ्या पात्रांनी कुणावर विषप्रयोग केला किंवा निषिद्ध शरीरसंबंध ठेवले किंवा त्या प्रकारचं काही केलं, त्यांना वाटेल या कृतींचा त्यांच्याशी संबंध जोडण्याचा माझा हेतू आहे? माझा तसा हेतू अजिबात नाही... गुरुवारी मला फार थकवा जाणवला नाही तर माझं मन ताजंतवानं करण्यासाठी वर्षाच्या अखेरच्या सायं-संगीत सभेला जाणं मला आवडेल (जर का माझ्या परिचयाच्या लोकांनी ती आयोजित केली असेल)

त्याच्या कादंबरीमधील दुसरा मजकूर 'ओ रा रायां द सोलइ स्यू ल बाकाँ' ४ जूनच्या 'ल फिगरो'च्या अंकात प्रसिद्ध झाला. ती कहाणी होती मारी द बर्नार्डकीवरील त्याच्या प्रेमाची, बरीचशी त्रोटक, अद्याप पूर्णपणे परिष्कृत न केलेली. गिल्बेर्त फक्त मारीच नव्हती जॉनही होती. तिला विश्वासात घेऊन त्यानं सांगितलं होतं,'माझ्या बालपणीच्या प्रेम-प्रकरणाची ती एक आठवण आहे. तुझ्यावरील माझ्या प्रेमाची नव्हे, त्या आधीची– पण तरीही माझ्या भावना काही प्रमाणात त्यामध्ये सम्मीलित झालेल्या तुला आढळतील. जेव्हा टेनिस-कोर्टवर तू होतीस की नव्हतीस याची खात्री मला देता येत नव्हती.' बावीस वर्षा-पूर्वीचा काळ. तेव्हा सॉ लूचं पहिलं मॉडेल गॉस्ताँ द केइल्लावेत यांच्याशी त्याचा स्नेह जुळून आला होता आणि त्याची वाग्दत्तवधू जॉन्न हिच्या प्रेमात तो पडला होता. 'हरवलेल्या काळा'च्या विहिरीमध्ये त्यानं डोकावून पाहिलं असेल तर त्याच्या स्वत:च्या चेहऱ्याच्या बरोबरीनं त्यांच्या तरुण चेहऱ्यांनी त्याच्याकडे पाहिलं होतं. यद्यपि, सांप्रतच्या जगात 'आव्हेन्यू होश'वरील मध्यमवयीन दाम्पत्यालाच तो फक्त भेटू शकत होता. परंतु 'काळ' नेहमीच काही चोर नसतो, विध्वंसक नसतो, त्यानं आता वयस्करपणात तारुण्य निर्माण करून, दोन प्रेमांमधून एक व्यक्तीची निर्मिती करून, दोन मार्गांचा चमत्कार घडूवन आणला होता.

एप्रिल अखेरच्या एका संध्याकाळी प्रूस्त बऱ्याच दिवसांनी केइल्लावर्तांच्या घरी गेला. रात्रौ आठच्या सुमारास त्यानं विचारलं,"मॉसिएँ आणि मादम झोपी गेलेत का? मला ते भेटू



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

शकतील का?'' त्याला नकार देणं त्यांना जमणारं नव्हतं. ते बाहेर आल्यावर तो म्हणाला, ''मादम, अत्यानंद मला तुम्ही देऊ शकाल का? बराच काळ लोटला, तुमच्या मुलीला मी भेटलेलो नाही. कदाचित्, मी इथं पुन्हा कधीही येणार नाही, आणि नृत्यसमारंभाना जाण्या-इतपत ती मोठी होईल तेव्हा बाहेर न पडण्याइतका मी फार आजारी असेन आणि म्हणून, मादम या मादमोइसेल सिमाँ हिला मला भेटू द्यावं.'' ''पण, मार्सेल, ती केव्हाचीच झोपी गेली आहे.'' ''मादम, माझी तुम्हाला कळकळीची विनंती आहे, जर का अद्याप जागी असली, तुम्ही तिला समजावून सांगू शकता.'' काही वेळानं सिमाँ खाली आली. षोडषवर्षा. डोळे तिच्या वडीलांचे. गाल 'एखाद्या अज्ञात फुलाच्या पाकळ्यांगत', आणि तो कधीही विसरू शकणार नाही असं हास्य. त्यानं नंतर जाँत्रला लिहिलं,'मी तुझ्या लेकीच्या प्रेमात पडलो आहे.' ही अतिशयोक्ती त्याच्या पुस्तकाच्या जगात सत्य बनली होती... 'how cruel she is to be kind.' कारण, तिच्या हास्यानं मला तिच्या प्रेमात पडायला लावलं, तिच्या संपूर्ण व्यक्तिमत्त्वाला तिच्या हास्यानं अर्थ दिला आहे आणि ती जर का फुरंगटलेली असती तर माझी शांती मी हरवून बसलो असतो.' 'सोळाच्या आसपासची तरुण मुलगी, जिच्या उंच्यापुऱ्या देहानं काळाच्या अवधीचं मोजमाप केलं होतं. जे पाहाण्याचं मी नाकारलं होतं.' ती साँ लूची मुलगी दुसरी तिसरी कोणी नसून सिमाँ होती. आपल्या आईवडीलांच्या ड्रॉईंग-रूममध्ये त्याच्या दिशेनं येणारी. निवेदक सांगतो,'मला ती खरोखरीच देखणी वाटली होती, प्रफुल्लित हास्य.'

जूनमध्ये प्रूस्त मोनेच्या चित्रप्रदर्शनाला गेला. त्याच्या चित्रांच्या इम्प्रेशन्सच्या आधारे एल्स्तिरच्या चित्रांचं वर्णन करता येणं त्याला शक्य येणार होतं. याच सुमारास त्याच्या घरी त्याला एक डायरी सापडली. या डायरीत त्याच्या आईनं कुटुंबियांच्या आजारासंबंधीचे तपशील लिहून ठेवले होते. या नोंदीच्या आधारे, त्याची आजी, त्याचे आजोबा आणि वडील यांच्या अखेरच्या दिवसांचं नव्यानं चित्रण करणं त्याला शक्य झालं. त्यानं मादम द नोआइल्लेला लिहिलं,'त्या वाचल्यानंतर जगत राहाणं कठीण आहे.'

उन्हाळ्याच्या प्रारंभी त्याला काबुर्गला जावंसं वाटत होतं आणि नव्हतंही. आपल्या खिशाला ही ट्रिप परवडणार नाही असं बहुधा त्याला वाटत असण्याची शक्यता आहे. पण एक दिवस त्याच्या स्वभावाला साजेसा त्यानं तडकाफडकी निर्णय घेतला. काबुर्गला दाखल झाला. 'ग्रां हॉटेल'च्या सर्वांत वरच्या मजल्यावरील एकमेकांना लागून असलेल्या पाच खोल्या घेतल्या, निवांतपणा लाभावा म्हणून आणि पाहुण्यांची नीट सरबराई करता यावी म्हणून.

पुन्हा एकदा, प्रूस्त मित्रांच्या गराड्यात सापडला. यावेळी मादम शईकेविच नामक नव्या मैत्रिणीची ओळख झाली. यजमानिणीच्या नव्या पिढीमधील एक अत्यंत बुद्धीमान आणि



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

प्रभावी स्त्री. पिअर कारोलूद्युरां हा तिचा एकेकाळची पती. 'ले ताम्प'चा (Temps) संपादक आड्रिअं हेब्रोर्ड यांच्याशी तिचा चांगला परिचय होता. त्याच्याकडे प्रूस्त लिहित असलेल्या कादंबरीसाठी शब्द टाकावा म्हणून रेनाल्डो हान यानं तिला अलिकडेच सांगितलं होतं. ऑगस्टच्या एका संध्याकाळी ती कालमेट्टबरोबर 'ग्रां हॉटेल'मध्ये आली होती. प्रूस्त त्यांना कॅसिनोमध्ये आढळला. त्याच्या हाती चोळामोळा झालेली हॅट. अंगावर थंडीचा ओव्हरकोट, जाडजूड डिनर जॅकेट, लोकरी वेस्ट कोट्स, लक्ष वेधून घेणारी काळी. कुळकुळीत दाढी 'गावच्या म्युझिक-हॉलमधील एखादा विनोदी नटासारखा तो दाढी मधूनच सफाचट करायचा, मधूनच वाढवायचा.'

त्या रात्री आणि त्यानंतरच्या काही रात्री मादम शईकेविच आणि प्रूस्त गच्चीवर नक्षत्रांकित आकाशाखाली गप्पागोष्टी करताना दिसून असत. अशाच एका रात्री तिनं त्याच्या कादंबरीचा विषय काढला. तेव्हा त्यानं दुर्लक्ष केलं. परंतु, तो विषय बदलून ती जेव्हा रशियन साहित्याविषयी बोलली तेव्हा मात्र तो तिचं बोलणं लक्षपूर्वक ऐकू लागला. प्रूस्त म्हणाला, "डोस्टोएवस्कीबद्दल मला आदर आहे." त्यानंतरच्या भेटीत तो बऱ्याच गोष्टींवर बोलू लागला. त्याचा दमा, धुरी घेणं, फुलाचा सुगंध घेता न येण्याचं कमनशीब, उच्च समाजातील लोकांचं अज्ञान. अशा वेळी त्यांची नक्कल करण्याची त्याची हातोटी थक्क करून सोडणारी. सूर लक्षात राहावा असा खोचक बोचक. विद्वेषानं चमकणारे त्यांचे भिरभिरते डोळे. अचानक फुटलेले त्याचे निर्दय, कर्कश सुरातील हास्य फुटू न देणं त्याला अवघड जात असे. अधूनमधून नोकर येत. ज्या कामासाठी त्यानं त्यांना पिटाळलेलं असे त्या संबंधीचा वृत्तांत द्यायला, कुणाची तरी पत्रं, आमंत्रणं सुपूर्द करायला. तो ती पाकिटं न उघडताच, न वाचलेली वृत्तपत्रं आणि औषधांच्या गोळ्यांची बॉक्सं यांनी भरलेल्या त्याच्या ओव्हरकोटच्या खिशात कोंबत असे. एकदा तिनं सांगितलं की, त्याचं प्रसिद्ध झालेलं सर्व लिखाण तिनं वाचलं आहे. प्रूस्त निरोप घेऊन उठला होता, तो पुन्हा बसला. तिच्याकडे अविश्वासानं पाहिलं. तिला काही प्रश्न विचारलं. तिच्या उत्तरांनी त्याची खात्री पटली की, तिनं त्याचं लिखाण वाचलेलं आहे. महिना अखेर ती निघून गेली.

या मोसमात प्रूस्त नृत्याचे धडे घेऊ लागला. त्याला नृत्यामध्ये रुची निर्माण झाली होती. याचं कारण, एका तरुणाशी त्याची जुळून आलेली गट्टी. तो तरुण नृत्य आणि गोल्फ यांचा शौकीन. तसा तो अतिशय चांगला पण बिनभरवशाचा. प्रूस्तशी तो भेटायचं असं ठरवायचा पण, त्या भेटीहून अधिक काही चांगलं असं काही आढळून आल्यास तो चक्क तिथं निघून जायचा. एका संध्याकाळी समुद्रकिनाऱ्यावर भेटायचं असं दोघांचं ठरलं पण, तो तिथं फिरकलाच नाही आणि त्यानंतर प्रूस्त बरेच तास तिथं कुढत राहिला. शेवटी न राहवून दुसऱ्या दिवशी त्यानं त्या तरुणाला खरमरीत पत्र लिहिलं. संबंध तोडून टाकत असल्याचा वरकरणी आव आणून ख्यातनाम लोकांच्या वर्तुळात आपण वावरत असतो, त्यांच्याकडूनही



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

आपणास अशी कधी वागणूक मिळाली नव्हती, वगैरे वगैरे. अशा थोरामोठ्यांच्या वर्तुळात तो तरुण अर्थातच वावरला नव्हता आणि आपल्या वागण्यात सुधारणा घडवून आणण्यात त्याला अजिबात स्वारस्य नव्हतं. तो जर का दगड असता तर शिल्पकारानं आणि प्रूस्तनंही त्याला काही आकार दिला असता, पण तो साक्षात् पाणी होता. 'नळाचे सामान्य पाणी, वाहून जाणारं, रंगहीन द्रव, चिरंतर भासमान.' त्यामुळे त्याच्याशी दिलजमाई करण्यात अर्थ नव्हता. परंतु प्रूस्तला त्याचा लळा लागला होता. त्याला भेटता येत नसल्याची खंत होती. कालांतरानं तो तरुण इतिहासजमा झाला.

१८ सप्टेंबरला प्रूस्त पॅरिसला परतला. मोठ्या आशेनं आणि उत्साहानं. त्याच्या आयुष्यातील एका महत्त्वपूर्ण निर्णायक क्षणाला सामोरं जाण्यासाठी. एव्हाना त्याच्या हस्त-लिखिताची सुमारे सातशे पानं टाइप करून, दुरुस्त्या करून तयार होती. बाल्बेकच्या पहिल्या भेटीहून निवेदक परतला होता. तिथं अखेर झाली होती. 'कॉम्ब्रे','उ आमूर द स्वान','नोम द पे : ल नॉम' ही आणखीन दोनेक प्रकरणं हस्तलिखितामध्ये असावीत.

१९१२ च्या शरदात प्रूस्त जय्यत तयारीनिशी प्रकाशकाच्या शोधार्थ बाहेर पडला. त्यानं आपल्या मित्रांना फक्त संकेत करायचा की, मोहीम सुरू करायची आहे. या मित्रांपैकी दोघे कालमेट्ट आणि रॉबेर फास्क्वेलच्या संस्थेकडे कादंबरीची शिफारस करण्यास दोघंही तयार होतं. यापैकी 'ल फिगरो'चा संपादक या नात्यानं कालमेट्टचं वजन अधिक, त्याच्या शब्दाला मान अधिक. शिवाय, एक आमिष म्हणून आणि काही प्रमाणात बक्षिसी म्हणून कादंबरी त्याला अर्पण करण्याची प्रूस्तनं तयारीही दर्शवली होती. अन्य दोघां मित्रांची अन्य प्रकाशकांची ओळख होती. जिद Gide आणि 'ल नूव्हेल रव्ह्यू फ्रान्सोइस' मध्ये काम करणारा एक लेखक अन्तोइन बिबेस्कोच्या परिचयाचे होते. या संस्थेनं नियतकालिकाबरोबर पुस्तकं प्रकाशित करण्यास सुरुवात केली होती. दुसरा मित्र रने ब्लम. त्याची ग्रासेशी ओळख होती. शिवाय् जरूर पडल्यास इतर मित्रांची मदत मिळणंही शक्य होतं. प्रूस्त कालमेट्टला स्वतः भेटायला गेला नाही. तरी, मादम स्ट्रॉस त्याच्या वतीनं कालमेट्टला भेटून प्रूस्तसाठी शब्द टाकू शकली असती. फास्क्वेलला राजी करण्यासाठी नाटककार एडमंड रोस्ताँ याच्यामार्फत कॉक्तो प्रयत्न करू शकत होता. इतर कामं हान करू शकत होता. ही मोहीम खडतर होती. दीर्घकालीन आणि गुंतागुंतीची. वस्तुतः, एवढी संभ्रमात टाकणारी की, अमक्या क्षणी प्रूस्तचं काम कुठल्या टप्प्यावर आहे हे कुणालाही सांगता येणं अशक्य. तरीही प्रूस्तच्या व्यूहरचनेच्या रूपरेषा पुरेशा स्पष्ट होत्या. शक्य होईल त्या मार्गानं प्रूस्त आपल्या पुस्तकासाठी प्रयत्न जारी ठेवत होता. स्वतः जातीनीशी किंवा आपल्या मित्रांकरवी. एकाच वेळी तो या मित्रांना वेगवेगळ्या कामगिरीवर पाठवत होता. मोहीम जरादेखील असफल होण्याची चिन्हं दिसताच आपली नजर तो एका प्रकाशकाकडून दुसऱ्या प्रकाशकाकडे वळवत होता आणि अपेक्षित उद्दिष्ट साध्य करण्यासाठी कठीण समयी स्वतःची अवकल



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

हुशारी वापरत होता.

खरंतर, या अवघड मोहिमेत पहिलं पाऊल टाकणं तेवढं सोपं नव्हतं. फास्क्वेलला भेटायची कालमेट्टला संधी मिळेस्तोवर प्रूस्तला प्रतिक्षा करण्यावाचून गत्यंतर नव्हतं. बुलेव्हार हॉसमानमधील प्रदीर्घ रात्री स्वत:च्या मनाशी एकूण परिस्थितीचा तो विचार करायचा तेव्हा त्याच्या मनात यायचं की, फास्क्वेल हा बहुधा योग्य प्रकाशक नाही. उपलब्ध असलेल्या माहितीवर विश्वास ठेवायचा तर, फास्क्वेल प्रकाशनासाठी आलेल्या कादंबऱ्या लक्षपूर्वक वाचत असे. त्याला जरूर वाटल्यास त्यात बदल करण्याचा आग्रह धरत असे. कथानकाच्या ओघामध्ये विघ्नं येणं, कथानकाची गती कमी होणं त्याला पूर्णपणे नामंजूर असे. प्रूस्तची कादंबरी तर संथ गतीनं पुढं सरकत होती. एवढा संथपणा त्याला रुचेल, चालवून घेईल तो एवढी संथगती? चीड येण्याजोगे बदल करण्याचा आग्रह तो धरणार नाही कशावरून? आपल्या या शंका त्यानं रॉबेरला पत्रामधून कळवल्या आणि सुचवलं की, फास्क्वेला नाद सोडणं आणि फारसा धंदेवाईक नसलेला प्रकाशक, उदाहरणार्थ 'ला नूव्हेल रव्ह्यू फ्रान्सोइस', गाठणं उचित ठरेल. तथापि, रॉबेरनं त्याला धीर दिला. फास्क्वेलला पत्र लिहिण्याचं आणि त्यात प्रूस्तचं साहित्यिक स्थान अधोरेखित करण्याचं आश्वासनही दिलं. आता आणखीन काही काळ वाट पाहाणं त्याच्या नशिबी आलं. दरम्यान कालमेट्टवर दबाव आणण्याचं त्यानं ठरवलं. त्यानं मादम स्ट्रॉसला लिहिलं, '(कालमेट्टला) जर का तुम्ही भेटलात (आणि असं करण्यास जर तुम्हाला पंचाईत वाटत नसेल, नाही तर त्याला आठवण करून देण्यास मी दुसऱ्या कुणाला तरी सहज सांगू शकेन) त्याला सांगा की, तुम्ही मला भेटलात किंवा आपला पत्रव्यवहार असतो आणि माझ्या पुस्तकासंबंधी त्याला आठवण करून द्यायची आणि (सांगायचं की) लवकरात लवकर तो फास्क्वेलशी बोलल्यास माझ्यावर फार उपकार होतील असं मी तुम्हाला सांगितलं आहे, जेणेकरून पहिला खंड (दुर्दैवानं यात तुमचा लाल पेहराव आणि लालबूट तुम्हाला आढळणार नाहीत, दुसऱ्या खंडापर्यंत ते येणार नाहीत, कारण डचेस्स द गॅर्मांत पहिल्या खंडात काही क्षणापुरती येऊन जाते) शक्यतो लागलीच प्रकाशित होऊ शकेल. नाहीतर तिसरा येण्याआधीच मी मेलेला असेन. (हे त्याला सांगणं निरर्थक आहे).'

परंतु, मादम स्ट्रॉसच्या उत्तराची वाट पाहाण्याइतपत त्याला धीर धरवला नाही. 'एन्. आर. एफ्.'चा विचार त्याच्या डोक्यातून जाता जात नव्हता. पहिल्या प्रकाशकानं आधीच पुस्तकं स्वीकारलेलं असताना वा ते स्वीकारणयच्या मन:स्थितीत असताना, दुसऱ्या प्रकाशकाकडे जाणं निश्चितच उचित नव्हतं. शिष्टाचाराला धरून नव्हतं. दुसऱ्या बाजूनं एन्. आर. एफ्.'नं खात्रीपूर्वक स्वारस्य दाखवेस्तोवर प्रश्न तेवढा तीव्र स्वरूपात उद्भवणारा नव्हता. निदान प्रारंभिक पूछताछ करण्यास काय हरकत आहे? त्यानं त्याचं हस्तलिखित बिबेस्कोला दाखवलं. प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष 'एन्. आर. एफ्.'च्या स्टाफवर असलेल्या Copean





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

कोपआनशी संपर्क साधला आणि सरतेशेवटी 'एन्. आर. एफ्'चा व्यवस्थापकीय संपादक गॉलीमार्ड याच्याशी पत्रव्यवहार सुरू केला. त्याला सांगितलं, 'माझ्या पुस्तकासाठी आधीच एक प्रकाशक आहे, ज्यानं मला चांगली वागणूक दिली आहे आणि त्यानं ते स्वीकारावं म्हणून पाठपुरावा चालवला आहे. त्या माझ्या प्रायोजकांशी प्रथम विचारविनिमय केल्याशिवाय मी ते काढून घेऊ शकत नाही. (मी तसं केल्यास बहुधा तो काहीही खळखळ करणार नसला तरीही)... ते करण्यासाठी मला बाहेर जावं लागेल आणि मला ते सापडू शकतील. त्यावेळेस बाहेर पडावं लागेल आणि तूर्त मला ते शक्य नाही.' त्याला वाटलं, गॉलीमार्ड सीध्या प्रश्नांना तरी उत्तर देईल? आपण सर्व खर्च दिला तर ५५० पृष्ठांचा खंड तो प्रकाशित करण्यास तयार होईल? खंड केव्हा तयार होऊ शकेल? दुसरा खंड केव्हा येऊ शकेल?

दरम्यान, कालमेट्टकडून आलेलं पत्र मादम स्ट्रॉसनं प्रूस्तकडे पाठवलं. त्यानुसार प्रूस्तनं हस्तलिखिताची एक प्रत फ्रास्क्विलकडे पाठवली आणि दुसरी 'एन्. आर. एफ्'कडे. नंतर या कामी त्यांनी त्वरा करावी म्हणून त्यांना निरोप पाठवून, टेलिफोन करून त्यांचा पिच्छा पुरवण्यास सुरुवात केली. अनिश्चितता इत:पर सहन करणं असह्य झाल्यानं एका संध्याकाळी तो स्वत: 'ल फिगरो'च्या ऑफिसमध्ये गेला. कालमेट्टचे आभार मानण्यासाठी आलो आहे असं वरकरणी भासवलं. त्याला सांगण्यात आलं की, संपादक नाही आहेत. त्यांच्या सांगण्यावर विश्वास ठेवावा की नाही हे त्याला समजेना. मनात विचार आला, शक्यता आहे काहीतरी घोटाळा झाल असावा. कालमेट्टचं फास्क्विलशी भांडण झालं असावं, कादंबरीचा हेतुपुरस्सर बळी घेतला जात असावा आणि हे दु:खद वृत्त सांगण्यास कालमेट्ट कचरत असावा. याहून 'एन्. आर. एफ्'ची निवड उत्तम. गालीमार्डनं पत्रामधून दाखवलेला स्पष्टपणा त्याला भावला होता. त्यानं म्हटलं होतं की, त्याचं पुस्तकं क्वचित प्रसंगात अश्लील, त्याचं एक पात्र समलिंगरती आहे आणि दुसऱ्या खंडामध्ये समलिंगरती एका दाखानाला भुलवतो आणि एका पियानोवादकाला पदरी ठेवतो. पण गोष्टींचा त्याल धक्का मात्र बसला नव्हता. उलट, वाटाघाटी सुरू झाल्या. 'एन्. आर. एफ्' साहित्यिक बाबींमध्ये फास्क्वेलपेक्षा अधिक चोखंदळ होती आणि म्हणून आश्वासकही.

प्रूस्तला तेव्हा कळलेलं नव्हतं आणि त्याला कळून आलं तेव्हा बराच काळ उलटून गेला होता. घडलं होतं ते थोडक्यात असं : 'एन्. आर. एफ्'शी संबंधित असलेल्या अत्यंत प्रभावशाली लेखक आन्द्रे जिद यानं हस्तलिखिताची पानं वरवर चाळली. समलिंगरती-विषयीच्या मजकुराबाबत त्याला अजिबात फिकीर नव्हती. त्याला खटकला होता, त्यातील उथळपणा. काही उत्कृष्ट लिखाणाचे नमुनेही त्याला आढळले होते, पण अभावानेच. अर्थात, ही संमिश्र वैशिष्ट्यं प्रूस्तसारख्या सोसायटी लेखकामध्ये आढळून यावीत हे त्याला अनपेक्षित नव्हतं. त्यानं दिलेल्या अभिप्रायानुसार हस्तलिखित प्रूस्तकडे परत पाठवण्यात



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

आलं.

ही मानहानी प्रूस्तनं आपल्या मित्रांपासून लपवून ठेवली. त्यानं ठरवलं, मित्रांना सांगायचं की, 'एन्. आर. एफ्'कडून तो कादंबरी काढून घेत आहे. कारण एवढं प्रदीर्घ पुस्तक हाताळण्याइतपत त्यांची यंत्रणा सुसज्ज नाही किंवा कालमेट्टला कादंबरी अर्पण केलेली असल्यानं त्यांची पंचाईत झाली. परंतु, आता तो फास्क्विलकडे अधिक नेट लावणार आहे आणि फास्क्विल त्याला कोणत्या दुरुस्त्या करायला लावतो याची चिंता त्याला लागून राहिली आहे, इत्यादी इत्यादी. दुरुस्त्या करणं कसं टाळता येईल या दृष्टीनं त्यानं आपल्या परीनं चाली खेळण्यास सुरुवात केली. रोस्तान्दला तो कधी भेटला नव्हता. पण आता कॉक्टूमार्फत त्याला पत्र पाठवण्याची त्यानं तजवीज केली. त्याला असं सूचित केलं की, हस्तलिखित आहे तसंच प्रकाशित करावं आणि तेही लवकरात लवकर.

दरम्यान, फास्क्विलला भेटण्याचा विचार त्याच्या मनात घर करून होताच आणि कालमेट्टलाही गाठण्याचे प्रयत्न त्यानं जारी ठेवले होते. तो भेटणार म्हणून मादम स्ट्रॉसनं दिलेलं आमंत्रण स्वीकारून प्रूस्त १७ डिसेंबर रोजी 'किस्मत'ला गेला. मादम स्ट्रॉसच्या बॉक्समध्ये बसलेल्या कालमेट्टला कळालं की, प्रूस्तनं फ्रास्क्विलला भेटण्यासाठी प्रयत्न केला होता. परंतु त्याला यश आलं नव्हतं. संध्याकाळची अपॉइटमेंट ठरली होती. पण प्रकाशकाकडून प्रतिसाद मिळाला नव्हता. प्रूस्त अखेर विषादानं लुई द रॉबेरला म्हणाला, "माझी कादंबरी लिहिणं सोपं होतं. पण ती प्रकाशित करंण किती अवघड?"

त्यानंतर त्याची शुद्ध हरपून जाईल असा जबरदस्त दणका प्रूस्तला बसला. फास्क्विल-कडून नकाराचे पत्र आले. पत्र समजूतदारपणे लिहिलं होतं. या संदर्भात फास्क्विलचं हान-बरोबर संभाषण झालं होतं. तेव्हा त्यानं प्रूस्तची प्रशंसाही केली होती. 'कॉम्ब्रे' आवडल्याचं तो म्हणाला होता. परंतु तेवढं एकच प्रकरण छापत येत नसल्याबद्दल दिलगिरी प्रदर्शित केली होती. आपली असमर्थता व्यक्त करताना त्यानं स्पष्ट केलं होतं की, इतर कादंबऱ्यांच्या तुलनेत प्रूस्तची कादंबरी बरीच मोठी होती आणि सर्वसामान्य वाचक ज्या कादंबऱ्यांशी परिचित आहेत त्याहून ती भिन्न होती. त्याचा सौजन्यपूर्वक नकार ठाम होता. त्यात बदल संभवत नव्हता.

प्रूस्त हवालदिल झाला. गेल्या तीन महिन्यात कादंबरी प्रकाशित करण्याबाबत तो काहीच करू शकला नव्हता. त्यानं ठरवलं, स्वखर्चानं कादंबरी प्रकाशित करायची आणि या कामी 'ग्रासेंसारख्या नव्या प्रकाशन-संस्थेचं सहकार्य घ्यायचं. तशीच आवश्यकता भासल्यास खाजगीरित्या. पण या प्रकरणाचा एकदाचा कायमचा सोक्षमोक्ष लावायचा. रॉबेरनं त्याला सुचवलं की, त्यानं त्याचं हस्तलिखित 'ओलेन डॉर्फ' या संस्थेकडे पाठवून द्यावं. प्रूस्त राजी झाला. पण तिथूनही ते साभार परत आलं. 'ओलेन डॉर्फ' चा संपादक हमब्लोटला ते अवाचनीय वाटलं. त्यानं रॉबेरला लिहिलं, 'माझ्या प्रिय दोस्ता, शक्यता आहे, मी बथ्थड



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

असेन, तरीही मला समजत नाही की, झोपी जाण्याआधी एक माणूस कूस कसा बदलत असतो हे वर्णन करण्यासाठी तीस पानं खर्ची का घालवायची ! त्यानं माझं माथं भंडावून टाकलं !'

आता, अवलंब करण्याजोगा एकमेव मार्ग प्रूस्तला उरला. रेने ब्लमला लिहिणं. अजून-पर्यंत त्याला तो भेटला नव्हता. तत्पूर्वी रॉबेर आणि कालमेट्ट यांच्या ऋणातून मुक्त होण्याचा निर्णय त्यानं घेतला. रॉबेरला त्यानं नक्षीकाम केलेली एक नीलमण्याची अंगठी भेट दिली आणि कालमेट्टला ४०० फ्रँकची एक किंमती सिगारेट केस आणि ब्लमला पत्र लिहिलं आणि आपल्याला नेमकं काय हवं आहे ते नेमकेपणानं विशद केले. – प्रत्येकी ६५० पृष्ठांचे दोन खंड. पहिल्यानंतर दहा महिन्यांनी दुसऱ्याचं प्रकाशन. जेणेकरून ग्रासेला एक फ्रँकही खर्चावा लागणार नाही अशा अटींची शिफारस. पुढं लिहिलं, 'मला सांगू नकोस, कारण मला ठाऊक आहे. मला दुसरी कुणीही सांगू शकेल. माझ्या प्रिय मित्रा, ग्रासे स्वखर्चानं तुझं पुस्तक राजीखुषीनं प्रकाशित करील आणि चांगल्या अटी तुला तो देऊ करेल. . . मी अतिशय आजारी आहे आणि (पुस्तकासंबंधी) मला खात्रीलायक समजायला हवं. जेणेकरून मी स्वस्थचित्त होऊ शकेन.' फास्क्विल, 'एन्. आर. एफ्.' आणि ओलेन डॉर्फ यांनी त्याची कादंबरी नाकारल्याचं उल्लेख त्यानं टाळला. त्याच्या मित्रांनी केलेल्या प्रयत्नांचा उल्लेखही केला नाही. एवढंच म्हटलं होतं की, तो मदत घेऊ शकेल असे नामवंत मित्र त्याला आहेत. उदाहरणार्थ, कालमेट्ट. परंतु दुर्दैवाची बाब म्हणजे कादंबरी स्वखर्चानं प्रकाशित करण्यापासून त्याला ते परावृत्त करण्याचीच शक्यता अधिक.

प्रूस्तनं पत्र पाठवून दिलं आणि नंतर ते पाठवलं म्हणून तो हळहळत राहिला. बहुधा त्याला वाटलं असावं की, ब्लम हा या कामाला लायक असा मध्यस्थ नाही वा ग्रासे हा योग्य प्रकाशक नाही. ब्लमनं उत्तर दिलं आणि प्रशस्तीपत्रही त्यासोबत जोडलं. प्रूस्तनं ग्रासेला पत्र लिहिलं आणि हस्तलिखित पाठवून दिलं. त्यानंतर दोघांच्या वाटाघाटीही सुरळीत पार पडल्या. एकच मतभेद उद्भवला. ग्रासेचं म्हणणं, पहिली आवृत्ती १२००ची काढायची आणि किंमत प्रत्येकी दहा फ्रँक ठेवायची. त्यापैकी चार प्रूस्तला द्यायचे. दहा फ्रँक किंमत प्रूस्तला फार वाटली. शेवटी दर प्रतीला ३.५० फ्रँक्स व प्रूस्तला मानधन १.५० फ्रँक्स द्यायचे असं उभयपक्षी मान्य झालं. 'कादंबरी लेखकाच्या खर्चानं छापायची.' या कलमानं प्रकाशकावर मोहिनी टाकली. पुढं प्रकाशकानं कबूल केलं की, कादंबरी त्यानं वाचलीही नव्हती. ११ मार्चला करारावर सह्या झाल्या. प्रूस्तनं छपाईसाठी १७३० फ्रँक्स दिले. पुस्तक हाती पडताच उरलेले द्यायचे असं ठरलं. छपाईचं काम सुरू झालं. एप्रिलच्या प्रारंभी पहिली प्रूफंही आली.

अशा रीतीनं, सहा महिन्यांच्या जीवघेण्या मोहिमेची यशस्वी सांगता झाली. खरंतर, आनंदाचे डोही त्यानं तरंगायला हवं, पण तसं घडू शकलं नाही. त्याच्या कादंबरीहून भारी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

भार तो वाहात होता आणि प्रकाशनाच्या मार्गापेक्षाही अधिक बिकट मार्गानं तो जात होता. जानेवारी १९१३ ते जून १९१४ या अठरा महिन्यांच्या काळात त्यानं मरणयातना भोगल्या होत्या. ओठ घट्ट मिटून. कुणाही मित्रापाशी त्याची वाच्यता न करता. त्याच्या अपार्टमेंटमध्ये ज्या नररूपातील 'आल्बेरटाईन'नं त्याला अंकित केलं होतं, तो पळून गेला होता, मृत्यूही पावला होता.

बरीच वर्षं विकारवश प्रेमाचा परमानंद आणि घोर या बाधांपासून मुक्त होता. सोसायटी-मध्ये त्याचा वावर असस्तोवर तो नेहमीच प्रेमात पडलेला असायचा. तो काळ, ड्रायफस-केसच्या धक्क्यानं, त्याच्या तारुण्य समाप्तीनंतर, रस्किनच्या शोधानंतर आणि शतकाच्या अखेरीनं, संपुष्टात आला होता. १८९९ च्या जुलैमध्ये त्यानं एका मित्राला छातीठोकपणे लिहिलं होतं की, अशी वादळं इत:पर उद्भवणार नाहीत. फेनेलाँ आणि आन्तोइन बिबेस्को यांच्यावरील त्याच्या १९०२ मधील प्लॅटॉनिक प्रेमाच्या संदर्भात त्यानं शोक Chagrin, उद्वीग्नता tristesse, वेदना peine यासारखे शब्दप्रयोग केले होते. त्यानंतरच्या काळात त्याच्या मायेची आणि शारीरिक सुखाची गरज लुईसा आणि काबुर्गची तरुण मुलगी यांसारख्या स्त्रियांबरोबरची असो वा कामगार वर्गातील तरुण पोट्ट्यांबरोबरची असो-भागवली जात होती. त्यात भावनावेग नव्हता, फारशा यातनाही नव्हत्या. या कालावधीत त्याच्या व्यक्तित्वाचा ठाव प्रथम त्याच्या आईच्या मृत्यूच्या दु:खानं आणि त्यानंतर कादंबरी निर्मिती प्रक्रियेनं घेतला होता. पण, मादाम प्रूस्तचं भूत तात्पुरतं शांत झालं होतं आणि त्याची कादंबरी पूर्ण होण्याच्या मार्गावर होती. या टप्प्यावर तो नकळत प्रेमाबद्दल पुन्हा हळवा बनला होता.

१९१३ च्या जानेवारीत एके दिवशी आल्फ्रेड आगोस्तिनेल्ली प्रूस्तच्या दारात हजर झाला. म्हणाला,"मॉसिए प्रूस्त, माझी नोकरी सुटली आहे आणि तुमचा शोफर म्हणून तुम्ही मला कामावर ठेवावं हे सांगण्यासाठी मी आलो आहे." त्याला कामावर ठेवल्यानं आल्बेरवर अन्याय होणार ही बाब प्रूस्त नजरेआड करू शकत नव्हता. तरी त्याला आतून कुठूनतरी वाटलं, या तरुण माणसाला आपला सेक्रेटरी नेमावं आणि आपल्या कादंबरीच्या दुसऱ्या भागाचं हस्तलिखित त्याच्याकडून टाइप करून घ्यावं. उभयतांनी ते मान्य केलं. त्याच्या पाठोपाठ त्याची बायको– किंवा नंतर उघडकीस आलं, त्यानुसार बायको म्हणून मिरवत असलेली रखेल – आली. तिचं नाव ॲना. कुरूप आणि वैतागवाणी. 'तिच्यात त्यानं काय पाहिलं समजू शकत नाही मी', इति प्रूस्त. त्याच्याच अपार्टमेंटमध्ये दोघं राहू लागली. प्रूस्त त्याच्या स्वभावानुसार सढळ हातानं त्यांना मदत करू लागली आणि हाती आलेला पैसा ते दिवसभरात उधळू लागले. 'ते कसे जगतात हे तुला मी सांगितलं तर *तू विश्वास नाहीस माझ्यावर*', असे उद्‌गार पुढं प्रूस्तनं एमिल स्ट्रॉसपाशी काढले. ॲना अतिशय मत्सरी आणि आगोस्तिनेल्ली तिच्याशी अप्रामाणिक. 'त्याच्या सुदैवानं ते तिला कधीच कळून आलं नाही,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

नाहीतर तिनं त्याचा जीव घेतला असता' आणि तरीही 'एवढ्या जिव्हाळ्यानं एकरूप झालेलं, एकमेकांसाठी सच्चेपणानं जगणारं जोडपं, मी आयुष्यात दुसरं कधी पाहिलं नाही', असं मत प्रूस्तनं नोंदवलेलं असलं तरी ॲनाबद्दल त्याच्या मनात मनस्वी तिटकारा आणि तिलाही त्याच्याबद्दल. ही गोष्ट दोघांनीही लपवून ठेवलेली नव्हती. आगोस्तिनेल्ली मात्र त्याला गुणी वाटला. टॅलेन्टेड. एखाद्या श्रेष्ठ लेखकानं लिहावीत अशी वाक्य त्याच्या लेखणीतून उतरत असल्याचं त्याला आढळून आलं.

काही आठवड्यांनी घरचं वातावरण तंग झालं. परिस्थिती असह्य बनली. ताणतणाव जाणवू लागले. १२ फेब्रुवारीच्या आसपास त्यानं 'आता मला नाऊमेद करणाऱ्या दु:खाची वाच्यता केली. आपल्या मित्रांपाशी स्पष्टपणे उघड करू न शकणाऱ्या यातनांचा आक्रोश अंतिम भयानक घटकेपर्यंत चालूच राहणार होता. प्रयत्क्षातील त्याच्या आयुष्याची बांधणी त्याच्या कादंबरीहून कच्ची झाली. बंदिवासाचा अनुभव त्याच्या वाट्याला आला. आगोस्ति-नेल्लीवर नजर ठेवता यावी म्हणून घरी राहाण्याच्या वेळेत बदल केला आणि दिवसा जागा राहू लागला. हा बदल रात्रौ झोपी जाण्याला सहाय्यभूत ठरत नसल्याचं त्याला आढळून आलं. मार्चच्या सुरुवातीला त्यानं मादम स्ट्रॉसला लिहिलं,'मला वाटतं, आता मी भोगत असलेल्या साऱ्या यातना, तुम्हाला जर का मी सांगितल्या तर थोड्या कमी निष्ठुर होतील.' तो भोगत असलेल्या यातना, कटकटी तो मित्रांना पत्रांमधून कळवत होता. परंतु या दु:खाचं खरं मूळ मात्र तो त्यांच्यापाशी उघड करत नव्हता. पुसटता उल्लेख आढळतो, त्यानं मार्चमध्ये रॉबेरला लिहिलेल्या एका पत्रात : 'माझी प्रकृती *अत्यंत खराब* आहे, आणि मी अतिशय दु:खीकष्टी आहे. परंतु बहुधा आहे ते तसं उत्तम आहे. कारण सुखाला सामोरं जाण्याचं बळ माझ्यापाशी नाही. (अर्थात, तुला कल्पना आहे की, मी बोलत आहे प्रेमा-मधील क्लेश आणि सौख्य यासंबंधी. माझ्या कामासंबंधी असं तू समजणार नाहीस याची मला खात्री आहे. माझ्या लेखी ती नेहमीच काणाडोळा करण्याची बाब आहे, आणि विशेष करून आत्ता) 'प्रेमामधील क्लेश' : इतकंच, अधिक काही नाही. बुलेव्हार हॉसमानचा दरवाजा किंचित किलकिला होऊन बंद झाला. याहून अधिक उघड होण्यापासून प्रूस्तनं स्वत:ला सावरलं.

शारीरिक आणि मानसिक क्लेश असूनही प्रूस्त कादंबरीवर काम करून राहिला. प्रूफं तपासण्यात व्यस्त झाला. आलेली सर्व प्रूफं लक्षात घेता, कादंबरीची पृष्ठं सुमारे ८०० होतील हा अंदाज त्याला आला. एवढ्या मोठ्या आकाराची कादंबरी प्रकाशित करणं तांत्रिक आणि आर्थिक दृष्टीनं प्रकाशकाला परवडण्याजोगं नव्हतं. त्याच्या नफ्यात घट होणार हे उघड होतं. लुई द रॉबेरनंही त्याला इशारा दिला की, कादंबरीची लांबी कमी केली नाही तर वाचक ती वाचण्यास धजावणार नाहीत. प्रूस्तनं प्रकाशकाला विनंती केली की, कादंबरी दोन



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

भागामध्ये प्रकाशित करावी. दोन्ही भाग पुठ्ठ्यांच्या बॉक्समध्ये एकत्रित वाचकांना द्यावेत. पण प्रकाशकानं त्याच्या विनंती नकार दिला. त्याचा आग्रह, कादंबरी ५०० पृष्ठांमध्ये संपायला पाहिले. म्हणजे कादंबरीचा एक तृतीयांश भागच त्यात समाविष्ट होणार. निवेदकाची गिल्बेर्त हिच्याशी झालेल्या पहिल्या भेटीनंतर लगेच 'द सनलाइट ऑन द बाल्कनी' हा बाजूला सारलेला पुन्हा समाविष्ट केला आणि १९१२च्या नोव्हेंबरमधल्या निवेदकाच्या 'बॉइ द बुलोग्यू Boulogue' इथल्या भेटीच्या वर्णनानंतर खंडाची समाप्ती करण्यात आली.

कादंबरी कितीही खंडात असली तरी तिचा एकसंघपणा अधोरेखित करण्यासाठी सर्व खंडांना मिळून एक शीर्षक असणं आवश्यक होतं. ग्रासेचा आग्रह, प्रत्येक खंडाला वेगवेगळं शीर्षक पाहिजे. आपली अडचण प्रूस्तनं ज्याँ लुई व्हॉदोए या प्रख्यात कादंबरीकार समीक्षकाला तातडीनं पत्र लिहून कळवली; त्याचा सल्ला विचारला : 'Les Intermittences du passe' हे दोन्ही खंडांना मिळून एक शीर्षक व पहिल्याला 'Le Temps perdu' व दुसऱ्याला Le Temps retrouve ही शीर्षक द्यायची का? परंतु प्रूस्तचा विचार बदलला. कादंबरी दोन खंडाऐवजी तीन खंडात प्रकाशित व्हावी. 'Le Intermittences du passe.' ऐवजी A la Recherche du temps perdu हे नाव त्यानं मुक्रर केलं. परंतु प्रत्येक खंडाला वेगवेगळे शीर्षक ठेवावं की नाही याबाबत मात्र त्याला ठाम निर्णय घेता येईना.

त्यानं एका मित्राला विचारलं,'दोन भागातील पहिल्या खंडाला "चार्ल्स स्वान" हे नाव देणं तुला योग्य वाटतं का? (दोन भाग एका बॉक्समध्ये देण्यास ग्रासेनं मान्यता दिली तर. परंतु पुन्हा पृष्ठांचा एकच खंड जर का मला काढावा लागला तर हे शीर्षक द्यावं असं मला वाटत नाही. कारण, स्वानचं सांगोपांग दर्शन यात घडणार नाही आणि शीर्षकानं सूचित केलेलं माझ्या पुस्तकात आढळणार नाही. शीर्षकानं ध्वनित केलेल्या आश्वासनाची पूर्वी माझ्या पुस्तकाकडून होणार नाही. Les Intermittences du coeur ले इनतरमितांन्से ड्यू कर (मूळ शीर्षक), Les Colombes poignardees, les Passe intermittent, L'Adoration perpe'tulle, Le septie'me ciel, A l'ombre des jeunes filles en fleur ही नावं मला बाजूला सारावी लागली. तथापि, तिसऱ्या खंडामधील प्रकरणांसाठी त्यांचा वापर करता येणं शक्य आहे. मी म्हणालो नव्हतो का तुला 'Du cote de chez Swann हे दोन मार्गांसाठी एक श्रुतयोजन आहे. . . ता. क. पहिल्यासाठी Jardins dons une tasse de the किंवा L'Age des noms शीर्षक तुला आवडेल का? दुसऱ्यासाठी L'Age des Mots?, तिसऱ्यासाठी L'Age de choses? माझी पसंती असेल "चार्ल्स स्वान", परंतु, स्वानचं संपूर्ण दर्शन इथं होत नसल्याचा निर्देश करावा : Premiers crayons de Charles Swann.' ही शीर्षकांची समस्या अत्यंत नाजूक होती. 'द्यू कोते द शे स्वान','ल कोते द् गॅर्मांत' आणि 'ल तां स्त्रुव्हे' या शीर्षकांवर पसंतीचा शिक्कामोर्तब



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

व्हायला बरेच महिने उलटून जावे लागले.

प्रूफं ही शीर्षकाहूनही गंभीर समस्या बनली. अत्यंत जिकरीचं काम. कित्येक तासांचं. शिवाय, त्यावरून पृष्ठांचा अंदाज करणं. प्रूफं हाती येताच प्रूस्त ती तपासायचा पण पाठवायचा नाही. त्याला न आवडलेली वाक्यं; उतारे तो बदलायचा; बाद करायचा; नव्यांची भर घालायचा; समासाचा जागा भरायचा; वर, तळाला, अवतीभवती जिथं कोरी जागा आढळेल तिथं नवीन मजकूर डकवायचा. आपल्या या कामाचा आढावा घेतल्यानंतर तो एकदम उद्गारला, "प्रूफांवर मी एक नवीन पुस्तक लिहिलं आहे." आणि यात अजिबात अतिशयोक्ती नव्हती. परंतु यामुळे ग्रासेवर अन्याय होणार नाही का? यासाठी त्यानं त्याला आणखीन पैसे द्यावयाला नकोत का? संपूर्ण प्रूफे तपासून होईपर्यंत तपासलेली प्रूफे स्वत: जवळच ठेवणं उचित आहे का? पुन्हा त्यानं वॉडोयेरला पुन्हा पत्र लिहून सल्ला विचारला.

प्रूफं तपासून परत करण्याच्या तारखा आणि दुरुस्त्यांचा दर निश्चित करण्यात आले. वॉडोयेरचा सल्ल्यानुसार व त्याविना. दरम्यान जादा काढून घेतलेली प्रूफं प्रूस्त आपल्या मित्रांकडे पाठवू लागला. प्रुफाचा एक संच त्यानं रॉबेरकडे पाठवला, विनंती केली की त्यातील रटाळ त्यानं निवडून काढून ते त्याला कळवावेत म्हणजे ते पुस्तकामधून काढून टाकायचे का त्यांचा तळटीपा म्हणून वापर करायचा ते ठरवता येईल. रॉबेरनं प्रूफं उत्साहानं वाचून काढली आणि कळवलं की, त्यात त्याला काहीही रटाळ आढळलेलं नाही. तथापि, त्यानं सुचवलं की परपीड वृत्तीचं चित्रण असलेल्या प्रसंगांमधील तीव्रता त्यानं कमी करावी आणि 'कॉम्ब्रे' खंड तिथंच संपला तर बरं. तेणेकरून तो अधिक एकसंघ व वाचकाला पचवता येण्यायोग्य होईल. त्याच्या सूचना प्रूस्तला स्वीकाराव्याशा वाटल्या नाहीत. त्याचं म्हणणं, परपीडकवृत्ती ही कादंबरीमध्ये पुढं येणाऱ्या तसल्याच प्रसंगासाठीची आवश्यक अशी पूर्वतयारी आहे. त्याल वाटलं, आपल्या टॅलेंटच वैविध्य त्याला दाखवायचं असेल आणि त्याच्या पुस्तकाचे अलग अलग प्रसंगाच्या मालिकामध्ये विघटन होण्याचं टाळायचं असेल तर आपल्या या खंडामध्ये भिन्न असलेली प्रकरणं अंतर्भूत करायला हवीत. तरीही, एक समझोता शक्य आहे आणि त्या दृष्टीनं त्यानं कामाला सुरुवात केली. कादंबरी दोन खंडात न विभागता तीन खंडात विभागण्याचं त्यानं निश्चित केलं. यामुळे पहिल्या खंडामधील दोनएकशे पानं कमी करणं त्याला शक्य होणार होतं. (दरम्यान, दुसऱ्या खंडातील मध्य भागातील काही पानांची, एक निष्कर्ष म्हणून त्यात भर घालावी) दुर्दैवानं, हा समझोता काही दृष्टीनं पूर्णपणे अयोग्य असल्याचं प्रूस्तच्या आणि रॉबेरच्या ध्यानी आलं.

लुसिएँ दॉदे यानंही प्रूफं वाचली. रॉबेरप्रमाणंच प्रूफं वाचून तोही प्रभावित झाला. त्याच्या सूचना केवळ तपशीलाबाबत होत्या. त्याला आढळून आलं होतं की, हॉथॉर्न उताऱ्यांमधील काही फुलं त्यांचा मोसम नसताना तिथं आलेली होती आणि फ्रान्सोईस ज्या दिवशी कोंबडी मारायची त्याच दिवशी ती शिजवायची. प्रूस्तनं उत्तरादाखल लिहिलं, 'फुलांच्या बाबतीत मी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

तुला भरवसा देतो, मला बऱ्याच शंका आहेत, म्हणून हॉथॉर्न उताऱ्याच्या पहिल्या खर्ड्यामध्ये (तो ''ल फिगरो''मध्ये छापून आला आहे) त्याच रस्त्याच्या कडेकडेनं रानटी गुलाब होते असं आहे. ब्रोन्निएच्या ''बॉटनी'' मध्ये रानटी गुलाब त्यानंतरच्या काळात फुलतात, असं आढळल्यानं मी तो उतारा सुधारला तो असा : ''काही आठवड्यानंतर कुणी एखादा पाहू शकेल, इ.'' व्हेरबेना आणि हेलिओट्रोप यांच्याबाबतीत हे खरं आहे की, जून ते ऑक्टोबर हा पहिल्याच्या बहराचा मोसम असं बोन्निएनं दिलेलं आहे आणि जून ते ऑगस्ट दुसऱ्याचा. परंतु बोन्निएनं रानटी फुलं विचारात घेतली असल्यामुळे (आणि मी ज्याला लिहिलं होतं त्या फुलवाल्यानं माझंबरोबर असल्याचं खात्रीपूर्वक सांगितलं होतं) की बागेमध्ये (हॉ आणि रानटी गुलाब याच्यासारख्या आवारामध्ये नव्हे) जेव्हा मेमध्ये हॉथॉर्न बहरंले असतानाच त्यांना त्यांना फुलवता येणं शक्य आहे. ते शक्य नसल्यास त्यांच्याऐवजी काय घालू शकतो? मिम्योनेट आणि जाई ठीक होतील की दुसरी कुठलीतरी मी घालू?' दुसऱ्या एका पत्रात त्यानं लिहिलं,'कोंबडीसंबंधीचा उतारा मला सापडला आणि तुझंबरोबर आहे. त्यातही त्याच दिवशी असं म्हटलं आहे. पण त्यासंबंधी मी काय करू शकतो, मला कल्पना नाही, कारण माझ्या आजाराचं स्वरूप.'

कामाच्या भारी वेळापत्रकानं शारीरिक-मानसिकदृष्ट्या प्रूस्तवर परिणाम केला. त्याचं वजन घटलं, घरच्या विवंचना सहन करणं त्याला शक्य होईनासं झालं. त्यानं रॉबेरला लिहिलं, 'मला वाटतं की मी तुला सांगितलं आहे की, गेल्या काही महिन्यात माझ्या प्रकृतीत आमूलाग्र फरक पडला आहे आणि त्याच वेळी ते सहन करण्याच्या स्थितीत नसताना, नित्य नवं स्वरूप धारण करणाऱ्या एका मोठ्या दुःखानं मी खचून गेलो आहे.' आजार आणि मानसिक क्लेश यांनी त्याला ऑगस्टपर्यंत त्याच्या घरीच राहाणं भाग पाडलं. काही प्रमाणात, कादंबरी, काही प्रमाणात त्याचं सांप्रतचं जीवन. जीवनातील घटना त्याला कादंबरीसाठी विषय पुरवत होत्या आणि अस्वस्थही करत होत्या. स्वान ऑडेट्टच्या प्रेमात असतो त्या प्रकरणाची प्रूफं दुरुस्त करणं त्याला अशक्य होऊन बसलं. ग्रासेनं तर काम लवकर संपवावं म्हणून त्याचा पिच्छा पुरवला होता. एका दुपारी बापुडा उल्‌रिश त्याच्या दारात उभा ठाकला. बेकार आणि भुकेजला. प्रूस्तनं जाकबिझेच्या बायकोला फोन केला आणि सांगितलं की, उल्‌रिशसाठी शोफरची नोकरी तिनं शोधावी आणि म्हणाला,''या वर्षी पॅरिस सोडून मी जाणार नाही'' पण त्यानंतर तासाभरातच त्यानं निर्णय घेतला आणि ऑगोस्तिनेल्लीला बरोबर घेऊन त्यानं मोटारनं काबुर्गची वाट धरली. दुसऱ्या दिवशी निकोलस व ॲना यांनी निघायचं असं त्यांना सांगण्यात आलं. प्रवासात ऑगोस्तिनेल्ली वाट चुकला. चूक ध्यानी येऊन योग्य वाटेनं 'ग्रां हॉटेल'ला पोहोचायला सकाळचे पाच वाजले.

काही दिवस प्रूस्तला स्वास्थ्य लागलं. डोळ्यात तेल घालून तो प्रूफं तपासू लागला अचानक एके दिवशी त्यानं पॅरिसला भेट देण्याचा विचार बोलून दाखवला. परंतु, तो बेत



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दर दिवशी पुढं ढकलत राहिला आणि एका सोमवारी दुपारी ऑगोस्तिनेल्लीला बरोबर घेऊन हूलगाटेला निघाला असताना त्यानं निकोलसला सांगितलं की, त्यानं ठरवलं आहे, आठवडा अखेरपर्यंत काबुर्ग सोडायचं नाही. परंतु, तो आणि ऑगोस्तिनेल्ली जेव्हा हूलगाटेला पोहोचले. त्यानंतर आठवड्यानं लॉरीला पाठवलेल्या पत्रानुसार, ऑगोस्तिनेल्ली म्हणाला,"तुम्हाला एवढं दु:खी कष्टी पाहाणं माझ्याच्यानं सहन नाही होत. तुम्ही घाई करा आणि माघारी हॉटेलवर न जाता यूव्हिलला पॅरिसची ट्रेन पकडा." त्यानुसार प्रूस्तनं निकोलसला निरोप धाडला आणि बांधाबांध करून करून तडक परतण्याचं फर्मान सोडलं. ऑगोस्तिनेल्लीनं ॲनाला पाठवलेल्या चिठ्ठीत लिहिलं की, तिनं निकोलससंगे जावं आणि लग्न करण्यासाठी गुपचूप पळून जाणाऱ्या जोडप्यागत दोघांनी पॅरिसला पलायन केलं. या रहस्यपूर्ण पलायनामागची खरी वस्तुस्थिती काय होती? त्याबाबत अनुमान करता येणं शक्य आहे. कादंबरीची निवेदक आल्बेर टाईनसंगे एकांतवासात जातो त्याला साजेसा प्रूस्त आणि ऑगोस्तिनेल्ली यांचा सांप्रतचा एकांतवास. बहुधा, हा एकांतवास एक गोष्ट अधोरेखित करतो, ती म्हणजे, प्रियकरानं प्रेयसीला त्याच्या घरामध्ये बंदिवान करण्याचा प्रथमच घेतलेला निर्णय. असंही असू शकेल, ऑगोस्तिनेल्लीचं प्रेम संपादन करण्यासाठी आणि त्याचं स्वत:चं प्रेम लपवण्यासाठी, त्या प्रेमाला आवर घालण्यासाठी प्रूस्तचा जो प्रयत्न चालू होता तोच परिणामी त्याच्या क्लेशाला कारणीभूत ठरला. बाल्बेकमध्ये आल्बेरटाईनची जशी वर्तणूक होती. तशीच ऑगोस्तिनेल्लीची काबुर्ग इथली व्रर्तणूक होती. ज्यापायी असूयेच्या प्रारंभीच्या वेदना भोग्याची पाळी आली आणि प्रलोभनापासून त्याला दूर करण्याची गरज निर्माण झाली. परंतु, काही दिवसासाठीच पॅरिसला भेट द्यावी असं प्रूस्तला का वाटलं? आपल्या पाठोपाठ निकोलस आणि ॲना यांनी पॅरिसला निघावं अशा सूचना का दिल्या? याचं स्पष्टीकरण वरील शक्यता करत नाहीत.

मादमोइसेल Vinteuil व्हिनतूईलच्या मित्राशी आल्बेरटाईनची जवळीक असते ही भयानक गोष्ट रेल्वेच्या प्रवासात उघड होते. त्यानंतरच्या प्रभावी निवेदक स्वत:चं दु:ख तिच्यापाशी व्यक्त करतो आणि पॅरिसला आपल्याबरोबर घेऊन जाण्याची स्वत:ची इच्छा व्यक्त करतो. तो तिला सांगतो,"मी बाल्बेकला जेव्हा आलो तेव्हा जिच्याशी मी विवाह करणार आहे आणि माझ्यासाठी जी साऱ्या गोष्टींवर तिलांजली द्यायला तयार आहे त्या स्त्रीला मी मागं सोडून आलो आहे. गेला आठवडाभर दर दिवशी मी स्वत:ला विचारत आहे, मी माघारी परत येणार आहे अशी तार तिला न पाठवण्याचं धैर्य माझ्यापाशी आहे का? परंतु त्यामुळं मी एवढा दु:खी झालो आहे, मला वाटतं मी माझाच जीव घेईन." लॉरीला पाठवलेल्या पत्रांमध्ये स्वत:च्या परतीची हीच कारणं प्रूस्तनं दिली आहेत; लिहिलं आहे, 'मी काबुर्गला निघालो तेव्हा मी एका स्त्रीला माघारी सोडून आलो होतो, जिला मी पॅरिसमध्ये क्वचितच भेटतो, परंतु मला निदान ठाऊक असं की, ती तिथं आहे आणि



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

काबुर्गला दुरावा जाणवतो आणि घोर लागतो म्हणून पॅरिसमध्ये काही दिवस मुक्काम करायचा असं मी ठरवलं आहे.' शक्यता आहे की, निवेदक जी गोष्ट शाप म्हणून आल्बेरटाईनला सांगतो ती निदान काही प्रमाणात प्रूस्तच्या वास्तव आयुष्यातली असावी, ही बाब विलक्षण आहेक़ारण अशी स्त्री अस्तित्वात होती आणि हे गुपित ज्यांच्यापाशी प्रूस्तनं उघड केलं होतं. त्यापैकी लॉरी हा एक होता. चार वर्षांपूर्वी. जेव्हा काबुर्गच्या एका गूढ पोरीशी लग्न करण्याचा विचार त्याच्या डोक्यात होता. तेव्हा त्यानं लॉरीला विचारलं होतं,'माझ्या भयानक आयुष्यात एका देखण्या तरुण पोरीला सहभागी करून घेतलं तर तो गुन्हा नाही का ठरणार?' आणि नेमक्या याच शब्दात आल्बेरटाईनला सांगतो,"मी तिच्याशी जवळजवळ लग्न केल्यातच जमा होतं. परंतु, अशा आजारी आणि तापदायक असलेल्या एखाद्याबरोबर एका तरुण स्त्रीला कंढायला लावावं अशी माझी इच्छा नाही." शक्यता आहे, प्रूस्तनं लॉरीला जे लिहिलं होतं आणि निवेदक कादंबरीत जे बोलला आहे, तेच काबुर्ग येथे तो ऑगोस्तिनेल्लीला बोलला असेल. तरुण पोरीबरोबरचं आपलं जुनं प्रेम पुनरुज्जिवित करून किंवा ऑगोस्तिनेल्लीला अंकीत होण्यास भाग पाडण्याची क्लृप्ती म्हणून तिचा वापर त्यानं केला असावा. त्यायोगे ऑगोस्तिनेल्लीवरील स्वत:च्या नव्या प्रेमाची रुजवात करता यावी अशी त्याची सुप्त इच्छा असावी आणि म्हणून त्यानं पॅरिसला पलायन केलं असावं. त्याच्या कादंबरीप्रमाणंच त्याच्या आयुष्यातही माघारी फिरणं अशक्य आहे अशा वळणावर तो पोहोचला होता आणि या क्षणीच काबुर्ग इथल्या मुलीचा ऑगोस्तिनेल्लीचा संयोग होऊन आल्बेरटाईनची निर्मिती झाली होती.

प्रूस्त सामानसुमानाविना पॅरिसला पोहोचला. अंगावरील नाईटशर्टावरच झोपी गेला. त्यानंतर प्रूफं तपासण्याच्या कामात गढून गेला. दु:चिन्हांची पूर्वसूचना 'अत्यंत महत्त्वपूर्ण असे छोटेसे तपशील' त्यानं आता प्रुफात अंतर्भूत केले. 'ज्यांनी बिचाऱ्या स्वानभोवती असूयेच्या गाठी करकचून आवळल्या.' दरम्यान आपली दाढी काढून टाकली आणि ज्याच्यावर त्यानं लिहिलेलं होतं त्या हरवून बसलेल्या तरुण पुरुषाच्या मूछवाला आणि कालातीत चेहरा उर्वरित आयुष्यभरासाठी प्रकट केला.

सप्टेंबरच्या प्रारंभी त्यानं प्रुफाच्या संपूर्ण संच लुसिएँ दॉदेकडे पाठवून दिला. लुई द रॉबेरनंतर संपूर्ण कादंबरी वाचणारा तो दुसरा वाचक ठरला. रॉबेरनं सदिच्छेपोटी कादंबरी-मधील काही चुका (प्रूस्तच्या मते बिनडोक) दाखवल्या होत्या आणि त्यामुळे तो फार वैतागून गेला होता. रॉबेरनं लिहिलं होतं : पुस्तक बरंचसं भरकटत गेलं आहे. शीर्षकसुद्धा रटाळ. मादमोइसेल Vinteuil व्हिनतुईल आणि तिचा मित्र यांच्यामधील एक प्रसंग फार अनुचित आहे. 'कॉम्ब्रे' प्रकरणच फक्त वेगळं का छापू नये? परंतु दॉदेनं रात्रभर जागून कादंबरी उत्साहानं वाचली आणि त्यानं कादंबरीविषयीचं आपलं मत कळवलं. त्यांचं मत



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

केवळ कौतुक करणारं नव्हतं तर त्यातून त्याची साहित्यविषयक प्रगल्भ जाणकारी व्यक्त झाली होती. प्रूस्तनं सुटकेचा श्वास सोडला. दॉदेनं कादंबरीवर परीक्षण लिहायची तयारी दर्शवली होती त्याचंही प्रूस्तनं उत्साहानं स्वागत केलं. त्यानंतर दोनेक दिवसांनी त्यानं प्रूफं झॉं कॉक्टूला पाठवली. ती वाचून तोही प्रभावित झाल.परीक्षण लिहिण्याचं त्यानंही आश्वासन दिलं. अंतिम प्रूफं सप्टेंबरअखेर प्रूस्तच्या हाती पडली आणि ती तपासण्याच्या कामी तो व्यग्र झाला.

प्रुफाचं काम जवळजवळ संपत आलं. परंतु आगाऊ पब्लिसिटी करायचं राहून गेलं होतं. शक्य होईल तेवढा जास्तीत जास्त गाजावाजा करणं आवश्यक आहे ही प्रूस्तची धारणा. त्यानं त्याखातीर छोटी 'पफ्स' – स्तुतीपर स्फुटं बऱ्याचशा वृत्तपत्रांकडे पाठवून देण्याचं जुळवून आणलं. लवकरच एक महत्त्वाचं पुस्तक बाजारात येत असल्याची नोंद साहित्य-जगतात घेतली जावी म्हणून त्याच्या हालचाली सुरू झाल्या. एका रात्री ब्लमला भेटण्यासाठी तो 'गिल ब्लास'च्या संपादकीय कचेरीत जाऊन थडकला. त्यानंतर काही दिवसांनी त्याला एक विनंतीवजा पत्र लिहिलं,'माझ्या प्रिय मित्रा, तुला हे सांगायचं म्हणजे मला फार अवघडल्यासारखं होत आहे. माझ्यासाठी कोणी शब्द टाकू नये, कुणापाशी बोलू नये म्हणून लोकांच्या पाया पडण्यात माझी हयात गेली... आणि आता माझ्या प्रकाशकाशी जुळत नसतानाही एका ''साहित्यिक विवेकशून्यकृती'' खातीर मी या सूचना करत आहे. . . त्या दिवशी संध्याकाळी मी ''गिल ब्लास''मध्ये आलो होतो. तेव्हा मला खरोखरीच कल्पना नव्हती की, मला या संबंधात तुझ्याशी बोलायचं होतं. मी ग्रासेला भेटलो. त्यानंतर दोन दिवसांनी. 'त्यानंतर ब्लमला त्यानं आपल्या अपार्टमेंटमध्ये बोलावलं. तो आला. त्याला कादंबरीची थोडक्यात रूपरेखा सांगितली आणि वानगीदाखल काही पानं वाचून दाखवली. वाचण्याचा ताण त्याच्या आवाजाला झेपेनासा झाला. तेव्हा त्यानं ब्लमला पुढं वाचायची विनंती केली. तो वाचत असताना त्यातील गंभीर उतारे तो लक्षपूर्वक, गंभीर चेहऱ्यानं ऐकत राहिला आणि विनोदी उताऱ्यांना खदखदून हसत राहिला. त्याचं सर्वांग थरथरू लागलं आणि चेहरा उजळून निघाला. ब्लमनं 'पफ' छापला. प्रूस्त आता पाठवत असलेल्या कादंबरीमधील वेचक उताऱ्यांपैकी एक प्रसिद्ध केला. सेंत यूवेर्तच्या सायंसमारंभासंबंधीचा हा उतारा दीर्घ वाटल्यानं मागं 'ल फिगरो'नं छापण्यास नकार दिला होता.

तथापि,'पफ्स' आणि वेचक उतारे छापवून आणणं हा जाहिरातबाजीचा एक भाग होता. त्यायोगे कादंबरीला बरेच वाचक मिळण्याची शक्यता होती. याशिवाय, मादम शइकेविच हिच्यामार्फत प्रूस्तनं एक दीर्घ मुलाखत 'ल तां'मध्ये १२ नोव्हेंबर रोजी छापवून आणली. मुलाखत घेतली एली जोसफ बॉई यानं. त्याच्या अपार्टमेंटमध्ये जाऊन. मुलाखतीप्रारंभी, शटर्स नेहमीच बंद असलेली त्याची बेडरूम, त्याचा फिक्कट चेहरा आणि त्याचे धारदार



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

पण तापाचा शीण असलेले त्याचे डोळे यांचं त्यानं वर्णन केलं. पॅरिसवासियांना प्रूस्तचा परिसर आणि त्याचं बाह्य व्यक्तिमत्त्व यांचं प्रथमच शाब्दिक दर्शन घडून आलं. कादंबरी-विषयी लिहिताना त्यानं सांगितलं की एका बैठकीत त्यानं ती वाचून संपवली. लिहिलं, 'क्वचित प्रसंगी "पुरे !" असं म्हणण्यात एखादा तयार असतो. जणू काही शस्त्रक्रियेचा एकही तपशील सांगण्यास नकार देणाऱ्या सर्जनशी तो बोलत आहे; परंतु तो "पुरे !" म्हणत नाही.' प्रत्यक्ष मुलाखतीमध्ये प्रूस्तचं भाष्य आलं. जवळजवळ प्रत्येक भाष्य दुर्दैवी. आपल्या कृतीच्या दुर्बोध, गहन स्वरूपावरच त्यानं अधिक भर दिला होता. त्यानं हाताळलेली 'काळ' ही संकल्पना आणि पात्रांशी असलेला तिचा संबंध,'अहेतूक स्मृती' बद्दलच्या त्याच्या संकल्पनेविषयी तो बोलला होता. वस्तुत: अध्यात्मशास्त्रावरील एखाद्या पुस्तकाचा जणू काही तो परिचय करून देत असल्यासारखा तो बोलला होत.

मुलाखत प्रूस्तला पुरेशी परिपूर्ण वाटली नव्हती, तरी ती इतर वृत्तपत्रांमधून छापवून आणण्याच्या खटपटीला तो लागला. त्यानं ब्लमला लिहिलं, कालमेट्टला एक तातडीचं पत्र पाठवलं, लिहिलं,'साहित्याशी अंशत: का होईना संबंधित असलेले 'ल फिगरो' हे एकमेव वृत्तपत्र, त्यात माझ्या पुस्तकाची आगाऊ बातमी प्रसिद्ध न झाल्याचं आढळून आल्यामुळे मी थोडासा बेचैन झालो आहे. शक्यता आहे, प्रतिसाद म्हणून 'ताँ' मुलाखतीची दखल ते घेऊ शकले असते. तुम्हाला कल्पना आहे, माझी कृती गंभीर स्वरूपाची नसती तर त्यावर चर्चा व्हावी यासाठी मी बिलकुल उत्सुकता दाखवली नसती. परंतु हे पुस्तक खरोखरीच महत्त्वपूर्ण आहे. तुमच्या इथं लिखाण करणाऱ्यांवर काट मारून आणि त्यांना त्यांचं स्थान (मला म्हणायचं आहे,"साहित्यिक" स्थान), जे त्यांना अन्यत्र दिलं जातं, ते नाकारून "ल फिगरो" स्वत:चं हित साधत आहे का? मला प्रतिसाद देण्याचं ठरवलंत, तर मला आशा आहे की "तरल" आणि "नाजूक" ही विशेषणं त्यात येणार नाहीत आणि 'ले प्लेझिर ए ले जूर'चा उल्लेख तुम्ही करणार नाही.' कालमेट्टने हे आज्ञापत्र रॉबेर ड्रायफरच्या हाती दिलं आणि तो म्हणाला,"मला खात्री आहे. मार्सेल प्रूस्तकडे विशेष लक्ष वेधलं जाईल असं करायला तुला आवडेल !" ड्रायफसनं १६ नोव्हेंबरच्या अंकात प्रूस्तची योग्य ती दखल घेतली. त्या आधी दोन दिवस, १४ नोव्हेंबर १९१३ रोजी 'द्यु कोते द शे स्वान' प्रकाशित झाली. परंतु याचा आनंद निर्भेळपण भोगणं प्रूस्तला शक्य नव्हतं. एवढी घरची परिस्थिती तेढी बनली होती. त्याला वाटलं, या क्लेशांपासून सुटका करून घेण्याचा एकच मार्ग म्हणजे प्रवासाला निघणं किंवा दूर कुठंतरी एकांत स्थळी जाऊन राहाणं. त्याला आठवलं की, इटालीमध्ये काप्रारोला नावाचं एक असं स्थळ आहे. नावाबाबत त्याला खात्री नव्हती. पण त्या ठिकाणी कार्डिनल फार्नेसचा प्रासाद भाड्यानं मिळण्याजोगा आहे, याची त्याला पक्की खात्री होती. त्यानं अधिक माहिती मिळवण्यासाठी पाडोयेरला पाठवलं लिहिलं,'अरेरे! माझं पुस्तक आलं न आलं तोच अगदी वेगळे विचार माझ्या मनात यावेत.'



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

**प्रकरण : पंधरा**

'द्यु कोते द शे स्वान' ही एका तरुण नायकाची कहाणी आहे. हा तरुण विचारी आहे, स्वत:चे अनुभव जाणून घेण्याचा, त्यांचे मूल्यमापन करण्याचा, परिणामी, आपला जन्मच ज्यासाठी आहे असं तो मानतो अशा पेशा शोधण्याचा त्याचा प्रयत्न असतो. अंतीमत: त्याला अनाहूत स्मृतीप्रत घेऊन जाण्याच्या शोधाची ही कहाणी आहे. परंतु, या कादंबरीमध्ये एकूण ग्रंथाचा केवळ एक तृतीयांश भागच असल्यानं, नायकानं फारशी प्रगती केली आहे असं म्हणता यायचं नाही. 'कॉम्ब्रे' या प्रारंभीच्या प्रकरणात त्याचा प्रवास सुरु होतो. त्याच्या भोवतालच्या परिसराविषयी तो थोडंबहुत शिकतो आणि प्रेम, सोसायटी आणि साहित्यिक 'करिअर' यांसारख्या गोष्टींविषयी विचार करू लागतो. परंतु, 'द आमूर द स्वान' या दुसऱ्या प्रकरणात तो दृष्टीलाही पडत नाही आणि 'नोम द पे : ल ना नॉम' या तिसऱ्या प्रकरणात त्याचे अनुभव एवढे विस्कळीत आहेत की त्याला काय साध्य करावयाचं आहे हे नीट ध्यानी येत नाही. त्यामुळं प्रसिद्ध व्हायच्या भागांविना प्रस्तुत भाग वाचला असता तो प्रत्यक्षात आहे त्याहून अधिक घटनाप्रधान वाटण्याचीच शक्यत आहे. प्रूस्तला हीच धास्ती होती, म्हणूनच सुरुवातीच्या पानांमध्ये काहीशी अगांतुकपणे, अनाहुत स्मृतीची घटना त्यानं, बहुधा, बळेबळेच आणली असावी.

ही सुरुवीची पानं - जी हम्बोल्टला अतिशय नापसंत होती - कादंबरीचं एक सर्वसाधारण प्रास्ताविक म्हणून लिहिली आहेत. निवेदक - नायक - किंवा मार्सेल. (या नावाचा उल्लेख पुढं दोन वेळा केलेला आहे) काही वेळेला झोपी गेल्यानंतर लगेच जागा होतो आणि तत्क्षणी समज करून घेतो की, कॉम्ब्रे किंवा बाल्बक, किंवा पॅरीस, किंवा डाँसिएर किंवा व्हेनिस या ठिकाणी तो आधी ज्या अंथरुणावर झोपला होता त्यापैकीच एकावर तो आता झोपलेला आहे. त्याच्याकडून ही चूक घडते आणि रात्रीचा बराच काळ तो जागा राहातो. त्या अन्य बेडरुमशी संबंधित असलेले अनुभव त्याला पुन्हा आठवू लागतात. उदाहरणार्थ, कॉम्ब्रे इथल्या बेडरुममध्ये त्याच्या आईनं दिलेलं वा देण्याचे राहून गेलेलं 'गुड-नाईट' चुंबन. 'झाँ सान्तेय' मध्ये आलेल्या चुंबनाची कथाच इथं थोड्याफार फरकानं इथं आली आली आहे. परंतु, यावेळी कुटुंबाचा मित्र स्वान आहे आणि नोकर फ्रान्सोइस. एथरवरचा प्रास्ताविक भाग समाधानकारक आहे, सुखद आहे. कादंबरीचे प्रमुख प्रसंग आणि प्रारंभी येणारी पात्रं यासंबंधी वाचकाला जे माहीत असण्याची आवश्यकता असते त्यापैकी बऱ्याच गोष्टी त्याला समजतात. काय घडत आहे ते नीट उमजून येण्याआधीच नायकाच्या 'बाळपणी' कथेमध्ये त्याला खेचलं जातं. 'कॉम्ब्रे' एव्हाना मार्गी लागलेलं असतं. परंतु, जिथून सुरुवात केली आहे तिथंच आपण माघारी आल्याचं वाचकाला अचानक आढळून येतं. या ठिकाणी, अगदी अनावश्यक अशा दुसऱ्या प्रास्ताविकानं प्रूस्त कहाणीत खंड पाडतो.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

कादंबरीमधील अत्यंत प्रसिद्ध उतारापैकी एक असा हा उतारा पूर्णपणे अस्थानी वाटतो.

गतकाळाविषयी काहीच महत्त्वपूर्ण असं उघड करत नसलेली बुद्धिगम्य स्मृती आणि गतकाळ जसा अस्तित्वात होता त्या स्वरूपात उघड करणारी, एखादी दिव्यदृष्टी असलेली अनाहूत स्मृती यांमधील भेद स्पष्ट करून प्रूस्त दुसऱ्या प्रास्ताविकाला प्रारंभ करतो. त्यानंतर तो एक लंबचौडं उदाहरण देतो : चुंबनाच्या घटनेनंतर बऱ्याच वर्षांनी, मार्सेल आपल्या आईबरोबर चहा घेत आहे आणि मॅडेलीननामक केककचे तुकडे चहात बुडवत आहे. त्या चवीशी निगडीत असलेली एक प्रतिमा अबोधामधून वर येते - चहात भिजलेल्या मॅडेलीनची प्रतिमा. हा केक तो क्रॉम्बेला ल ओनी याला भेटायला जात असे तेव्हा ती त्याला देत असे. क्षणार्धात गतकाळ - त्याचं बालपण, कॉम्ब्रे इथलं त्याचं जीवन - त्याच्यासाठी पुन्हा साक्षात होतो. ले ओनी-आत्याची बेडरूम आणि गावचे रस्ते त्याच्या मनश्चक्षूसमोर येतात. कायमचा मृतावस्थेत गेलेला गतकाळ पुन्हा एकदा अचानक जिवंत होतो. परंतु, एखाद्याच्या मनात इथं प्रश्न उद्‌भवेल, जर का मार्सेल त्याच्या स्मृतीसाठी अशा अनुभवांवर अवलंबून आहे, तर मग, त्याला त्याच्या आईचं चुंबन एवढ्या सविस्तरपणे या आधीच आठवतं ते कसं? त्याच्याशी निगडीत असलेला अनुभव न येताही? तो जन्माला येण्याआधी स्वानच्या आयुष्यात घडून आलेल्या प्रसंगांची पुनर्निर्मिती तो पुढील काळात कसा काय करू शकतो? या प्रश्नांना समाधानकारक उत्तरं देता येणं शक्य नाही. सत्य एवढंच की अनाहूत स्मृती ही एक शंकास्पद संकल्पना आहे आणि कादंबरीमध्ये या स्थळी ती येणं हे कुठल्याही प्रकारे निरंकुश आहे हे निःसंशय.

प्रूस्त जेव्हा सिद्धांतापासून दूर होऊन माघारी 'कॉम्ब्रे'च्या कथेकडे वळतो तेव्हा कादंबरीची, किंवा निदान तिच्या काही भागांची संरचना स्पष्ट होऊ लागते. त्याच्या नायकाच्या बाळपणीच्या जगाची रूपरेषा तो आखू लागतो, जी त्याच्या प्रौढपणीच्या जगाचीही रूपरेषा असल्याचं पुढं आढळून येणार असतं. पुढील काळात ज्यांच्याशी संबंध यावयाचा असतो त्या गोष्टी आणि ती माणसं यांचा तो पद्धतशीरपणे आणि सराईतपणे त्याच्या नायकाशी परिचय करून देतो. अशा प्रकारे, प्रसंग गावाकडील असला तरी, शिष्टमान्यता, परपीडकवृत्ती, साहित्यिक, थिएटर, ज्यू आणि चार्लस् बर्गो लेग्रान्दीं आणि ब्लोक यांच्याविषयी मार्सेल शिकता येईल हे सुद्धा तो पाहातो. ज्या प्रकारचं आयुष्य त्याच्या वाट्याला पुढं येणार आहे त्याची निदान एखादी तरी झलक मार्सेलला प्रकरण संपेस्तोवर मिळालेली असते. आतापावेत जे अनुभव तो आत्मसात करू शकत होता ते एव्हाना पूर्णत्व पावतात.

वस्तुतः 'कॉम्ब्रे' हे घटनाचक्रांमधील पहिलं घटनाचक्र आहे, त्यामुळे त्यानंतर येणाऱ्या प्रकरणांचे सर्व घटक त्यात आढळून येतात. 'कॉम्ब्रे' मध्येही गती चक्राकार आहे. प्रकरणाच्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

प्रत्येक भागात असे घटक आहेत जे प्रकरणाला परिपूर्णता आणतात. स्वान, व्हिन्तइल, ओडेट्ट आणि डचेस्स द गॅर्मांत यासारख्या पात्रांच्या प्रारंभीच परिचय करून दिलेला आहे. त्यानंतर ही पात्रं आलटून पालटून कमी अधिक अवधीनंतर अवतीर्ण होत असतात आणि त्या त्या वेळी नायकाला त्यांच्यासंबंधी थोडी अधिक माहिती मिळत जाते. प्रारंभी त्याच्या लेखी ती फक्त नावं असतात. डचेस्स द गॅर्मांत तिच्या खानदानी घराण्याच्या इतर सदस्यांहून क्वचित वेगळी दिसते. व्हिन्तइल तर केवळ एक शेजारी. पुन:पुन्हा भेटत राहिल्यानं पात्रं काही काळानं अधिकाधिक स्पष्ट होऊ लागतात. डचेस्स द गॅर्मांत गावातील चर्चमध्ये विवाह सोहळ्याला आली असता तिचं जवळून दर्शन होतं. व्हिन्तईल वर्षानुवर्ष बऱ्याचदा दृष्टीला पडतो - जेव्हा तो स्वत:च्या रचना वाजवण्यास नकार देतो, त्याच्या मुलीनं समलिंगरतींशी संबंध जोडल्याचं कळून येताच आपल्या मित्रांपासून तो दूर होतो आणि अखेरीस शरमेनं मृत्यू पावतो. तथापि, या दोन्ही व्यक्तीसंबंधीचं मार्सेलचं ज्ञान तुटपुंजं असतं. अद्यापि तो डचेस्सशी बोललेलाही नसतो. ज्या 'लिटल फेज'नं तो एकेकाळी भारावून गेला होता त्या सोनाटाचा रचयेता व्हिन्तइल आहे याचा शोधही त्याला लागलेला नसतो. हा शोधही इतर शोधांप्रमाणेच मार्सेलच्या अनुभवाच्या पुढील चक्रांसाठी राखून ठेवलेला असतो.

तथापि, प्रकरणाचा मुख्य घटक प्रत्यक्षात 'कॉम्ब्रे' आहे. सुरुवातीलाच यावर भर दिलेला आहे आणि त्यापुढील कथा-चक्रांमधून ते बराच काळ दृष्टीआड होऊ दिलेलं नाही. कॉम्ब्रे हे एक 'सेटिंग' आहे आणि एक जनसमूहही आहे, जे प्रूस्तच्या बालपणीचं इल्लीअर किंवा तत्सदृश एक गाव आहे - त्याच्या भौगोलिक परिसरातील मुख्य स्थळं आहेत, एक घर, एक चर्च, एक पार्क आणि एक नदी. या परिसराला साजेसा एक जनसमुदाय आहे. त्यातील महत्त्वाच्या व्यक्ती लेओनी आत्या आणि फ्रान्सोइस, एउलाली, मादम गुपिल, मायकाचे आजोबा, स्वयंपाकघरातील मोलकरीण, दाणेवाल्याचा पोरगा यांसारखी दुय्यम पात्रंही आहेत. या यादीत मादम साझरातचा कुत्राही समाविष्ट करण्याचा मोह एखाद्याला होईल.

प्रकरणभर काळजीपूर्वक अंतराअंतरानं लिहिलेल्या उताऱ्यांमधून ग्रामीण वातावरण वर्णिलेले आहे. पहिल्यांदा (कारण मॅडेलीनच्या घटनेनं तसं सूचित करण्यात आलेलं आहे.) लेसोनी आत्याच्या खोलीवरील उतारा येतो. यामध्ये नायक वातावरण, भिन्न भिन्न वासांची वैशिष्ट्यं यांचंच केवळ वर्णन करतो असं नाही तर लेओनी tisane (एक प्रकारचा वनस्पती चहा) बनवण्यासाठी ज्या कागदी लिंबाचा वापर करते त्या लिंबाच्या मोहराचंही वर्णन करतो:

The drying of the stems had twisted them into a fantastic trellis, in whose intervals the pale flowers opened, as though a painter had arranged them there, grouping them in the most decorative poses. The leaves, which had lost or altered their own appearance, assumed those



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

instead of the most incongruous things imaginable, as though the transparent wings of flies or the blank sides of labels the petals of roses had been collected and pounded, or interwoven as birds weave the material for their nests. A thousand trifling little details--the charming prodiglity of the chemist--details which would have been eliminated from an artificial preparation, gave me, like a book in which one is astonished to read the name of a person whom one knows, the pleasure of finding that these were indeed real lime-blossoms, like those I had seen, when coming from the train, in the Avenue de la Gare, altered, but only because they were not imitations but the very same blossoms, which had grown old. And as each new character is merely a metamorphosis from something older, in these little grey balls I recognized green buds plucked before their time; but beyond all else the rosy, moony, tender glow which lit up the blossoms among the frail forest of stems from which they hung like little golden roses--marking, as the radiance upon an old wall still marks the place of a vanished fresco, the difference between those parts of the tree. which had and those which had not been "in bloom"--showed me that these were petals which, before their flowering-time, the chemist's package had embalmed on warm evernings of spring. That rosy candle-light was still their color, but halfextinguished and deadened in the diminished life which was now theirs, and which may be called the twilight of a flower.

हे वर्णन अत्यंत अलंकारिक वाटण्याची शक्यता आहे आणि अशा प्रकारचा बाज कादंबरीमधील जवळजवळ सर्व वर्णनात्मक उताऱ्यांमध्ये निश्चितच आढळून येतो. आपल्याला कैकदा जाणवतं की प्रूस्त उत्साहाच्या भरात वाहवत तरी गेला असावा किंवा त्याच्या लेखनकलेमध्ये 'बरोक' व्यामिश्रतेचा परिचय करून देण्याचा निर्धार त्यानं केला असावा. तो व्यामिश्र आहे हे निर्विवाद -आश्चर्य वाटावा एवढा व्यामिश्र, त्याच्या निरीक्षणामध्ये अत्यंत काटेकोरही आणि अत्यंत बारीकसारीक तपशील टिपणाराही. छोट्या छोट्या गोष्टी दाखवून तो आपल्यात स्वारस्य निर्माण करतो. या गोष्टी सर्वसामान्यांच्या नजरेतून निसटलेल्या असतात. आणि प्रूस्तनं त्याआपल्या नजरेला आणून दिल्या नसल्या तर आपल्याला त्या दिसल्याही नसत्या. त्याच्या तपशीलवार वर्णनानं आपल्याला तो भारावून टाकतो. चर्चवरील



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

उताऱ्यामध्ये टॅपेस्ट्रीमधील भन्नाट रंगांचं दर्शन तो आपल्याला घडवतो--ईस्थरच्या ओठांवरील लाल रंगाचं लेपन, तेही ओठांच्या रेषांबाहेर गेलेलं--फरसबंदी मधील कबरींच्या दगडावर कोरलेली भन्नाट अक्षरं. रुसेनव्हिल जवळील वादळाच्या उताऱ्यात एकमेकांशी समांतरपणे पडणाऱ्या पावसाच्या धारा, व्हिओन्नवरील उताऱ्यात यांत्रिकपणानं डोलणारी पाणलिली-प्रूस्त हे सारं साक्षात आपल्यासमोर उभं करतो.

हे वर्णन नेटकं आणि नेमकं असलं तरी, प्रूस्तचं निरीक्षण कधीही निखळ वास्तवदर्शी नसतं किंवा ओकंबोकही, कारण तो त्याची नोंद करतो ती रूपकामध्ये आणि त्याच्या काव्याच्या नजाकतीनं ती अवगुंठित करतो. एका पाठोपाठ रूपकं येत जातात, अंती कागदी लिंबाच्या मोहराच्या देठांगत ती एक विलक्षण जाळी. 'इमेजरी'चं एम ट्रॉपिकल अरण्य तयार करतात. जवळ जवळ प्रत्येक रूपक अफलातून आणि चुस्त असतं. चर्चमधील रंगीत तावदानावरील एकाकी आकृती ही पत्त्यावरील एक राजा असतो; फरसबंदीवरील लॅटिन कोरीव अक्षरांची पुनर्मांडणी करणारा जोमदार उत्साह एक भरती-ओहोटी असते; प्रवाहात डोलणारी पाणलिलि यांत्रिकपणे भिरभिरणारी एक नाव असते. बऱ्याचदा ललितकलेमधून घेतलेल्या 'इमेजरी'वर प्रूस्त भिस्त ठेवतो. वर उद्घृत केलेल्या उताऱ्यामध्ये अशी उदाहरणं सापडतात- पुष्परचना करणारा चित्रकार, प्रत्यक्षातील कुण्या एकाचा उल्लेख करणारं पुस्तक, नाहिशा झालेल्या भित्तीचित्राच्या झळाळीनं उजळून निघालेली जुनी भिंत. 'कॉम्ब्रे'मध्ये अन्यत्र, माशांच गुंजन उन्हाळ्यातील 'चेंबर-म्युझिक' आहे, लायलक फुलांचे रंग पर्शियन मिनिएचरचे आहेत, रुसेनव्हिलवर कोसळणाऱ्या पर्जन्यधारा 'जुन्या करारा'मधील एका गावाला ताडन करणारे शासने आहे. पाण-लिलि पहिल्यांदा नाव असते, पण नंतर ती अर्थपूर्णरित्या 'इन्फर्नो'मधील दुर्दैवी माणसांपैकी एक माणूस बनते', ज्यांना अनंतकाळपर्यंत पुनरावृत्त होणाऱ्या विवक्षित यातनांनी डान्टेची जिज्ञासा जागृत केली होती, पुढं पावलं उचलणाऱ्या व्हर्जिलनं आपल्या मागून त्वरेनं येण्यास त्याला भाग पाडलं नसतं तर, त्यानं त्या दुर्दैवी जीवांची विस्तारानं आणि तपशीलवार पूछताछ केली असती.' सातत्यानं वापरल्या गेलेल्या या 'इमेजरी'चा अंतीम परिणाम : ज्यांचं प्रूस्तनं वर्णन केलेलं असतं त्यांचं सौंदर्य वृद्धिंगत होणं, त्यांना एक खास 'प्लास्टिक' परिपूर्णता येणं, आजवरच्या अभिजात वाङ्मयकृतीशी अनुबंध जोडला जाणं. 'कॉम्ब्रे' - आणि कादंबरीचा बराचसा भाग - वस्तुतः, अन्य अभिजात वाङ्मय कृतींशी तुलना करता एक अभिजात वाङ्मयकृती आहे.

परिसराची मांडणी सुंदर आहे आणि कॉम्ब्रे हे एक सुंदर छोटसं जग आहे, कादंबरीच्या अधिक औदास्यपूर्ण आणि अधिक गांभिर्य असलेल्या जगामधील एक प्रसन्न असा विष्कंभक आहे. एखाद्याला वाटेल, नायकाच्या शोधामधील हा एक टप्पा आहे, प्रारंभी आश्वासक



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

वाटणारा पण पुढं भ्रमनिरास करणारा जीवन मार्ग आहे. परंतु, तसं नाही आहे. उलट, अखेरपर्यंत ते सुंदरच राहाते. गतकाळातील ते एक नंदनवन आहे, सर्वार्थानं प्रसन्न आणि प्रसन्न माणसांची वस्ती असलेलं. ही माणसं, त्यांना त्यांचं स्वत:चं असं विनोदी वैशिष्ट्य आहे. ती सारी काहीशी तऱ्हेवाईक आहेत आणि म्हणून त्यांना प्रसन्नरित्या हास्यास्पद बनवता येतं, परंतु ती त्यांचा प्रसन्नपणा क्षणभरही हरवून बसत नाहीत, तो हिरावलाही जात नाही. लेओनी आत्या पंगू वा रोगभ्रमी आहे, तिचं पेप्सिन आणि तिच्या प्रार्थना यातच ती बरीचशी गुंतलेली असते, तरी उत्साहित होण्याची एक नैसर्गिक उर्मीही तिच्यात असते. 'एक्साइटमेंट' तिला हवीच असते. जरूर पडल्यास आत्या ती निर्माण करते. या कामी, तिची नोकराणी फ्रान्सोइस आणि तिची अत्यंत लाडकी पाहुणी इउलाली तिच्या उपयोगी पडतात. त्यांच्याबद्दलच्या अत्यंत अतिरंजित आणि अत्यंत गर्हणीय अशा कहाण्या ती सतत रचत असते. तिचं संपूर्ण कुटुंब नामशेष करील अशा एखाद्या नाट्यपूर्ण दुर्घटनेकडेही अगदी समाधानी वृत्तीनं डोळं लावून पाहू शकणारी आहे. हा विक्षिप्तपणा निश्चितच विचित्र असला तरी तो स्नेहशीलतेत यत्किंचितही उणा नाही. असाच विक्षिप्तपणा फ्रान्सोईसच्या अंगीही आहे. परंतु सर्व नोकरांमध्ये जिचं कौतुक करावं अशी ती आहे, अतिशय कामसू आहे. ती दानधर्माच्या विरोधात आहे, किंवा इतर नोकरांविषयी तिला आत्यंतिक असूया आहे, किंवा इउलाली आणि ज्यांच्या मुंड्या तिला कापाव्या लागतात त्या कोंबड्या, या दोषांविषयीच्या तिरस्कारानं ती धुमसते म्हणून तिचा राग करावासा वाटत नाही.

दुसऱ्या प्रकरणात प्रूस्त त्याच्या नायकाच्या अनुभवाच्या दुसऱ्या चक्राकडे वळतो. परंतु, इथं, नायक स्वत: कुठंही प्रत्यक्षपणे गुंतला असल्याचं आढळून येत नाही. ही बाब काहीशी विचित्र दिसते. इथं, तो केवळ निवेदक आहे - त्याला निरीक्षक म्हणता येणार नाही - घटना घडून गेल्यानंतर बऱ्याच कालावधीनंतर 'उ आमूर द स्वान'ची कथा सांगतो. एखाद्याला गृहित धरायला हवं की या घटनांचं स्मरण करून तो प्रेम आणि सोसायटी या संबंधी काही शिकला असल्याचं सांगतो, जसा तो सॉ लू आणि चार्ल्स यांच्या संदर्भात जे घडतं ते पाहून शिकतो. परंतु, गृहित धरून चालणंही कादंबरीच्या या टप्प्यावर तेवढं सुलभ नाही. बऱ्याच वाचकांना हे प्रकरण म्हणजे विषयांतर वाटेल आणि प्रत्यक्षात प्रूस्तच्या हस्तलिखिताच्या निर्मितीप्रक्रियेमधील कुठल्यातरी टप्प्यावर, जेव्हा त्याच्या नायकाला तो चार्ल्स स्वप्न असे संबोधत होता, ते तग धरून राहिलं आहे, असं समजलं तर ते वावगं ठरू नये. एवम् अन्य गोष्टींमधील ती, निदान एक प्रकारची भूशास्त्रीय जिज्ञासा आहे, आधीच्या कामाचा पुढं आलेला एक स्तर आहे.

मूळात असं दिसतं, स्वान हा प्रूस्तचा आणखीन एक 'सेल्फ पोर्टेट' आहे आणि 'उ आमूर द स्वान' मध्ये तो खरोखरीच तसा आहेही. प्रूस्त प्रमाणेच त्याचा स्वत:चा पैसाअडका



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

आहे, खानदानी सोसायट्यांमध्ये त्याला आदरानं स्वीकारलं जातं, एक्झिमाचं त्याला कायमचं दुखणं आहे. प्रूस्तनं निष्क्रीयतेच्या काळानंतर वास्तुकलेच्या अभ्यासाला सुरुवात केली होती तसाच तो संगीताच्या अभ्यासाला सुरुवात करतो. प्रूस्तनं जसं स्वत:ला रस्किनवर झोकून काम केलं होतं तसाच तो व्हेरमिअर काम करतो. शिवाय, स्वानच्या सवयी विचित्ररित्या निशाचराला साजेशा आहेत. झाँ सान्तेयप्रमाणे काळोख दाटून येण्याआधी तो क्वचितच त्याच्या मिस्ट्रेसला भेटतो, किंवा, भोजनानंतर तिची भेट घेतो. प्रूस्त सांगतो, 'तो तिच्याकडे दिवस मावळल्यानंतरच गेला आणि दिवसा आपला वेळ तिनं कसा घालवला याबद्दल त्याला काहीच माहीत नव्हतं.' तरीही तिच्या घरी तो रात्र घालवत नाही हे उघड आहे. प्रूस्त इथं स्वत:चा विचार करत आहे, हे लक्षात घेतलं नाही तर हे विचित्र वाटण्याचा संभव अधिक. प्रूस्त दिवसा झोपत होता, त्याच्या आईबरोबर भोजन करत होता आणि नंतर रात्रौ त्याच्या मित्रांना भेटत होता.

तथापि, प्रत्यक्ष कादंबरीमधील संकेतावरून आणि प्रूस्तच्या पत्रव्यवहारातील मजकुरावरून ध्यानी येतं, एकेकाळी ज्याच्याशी प्रूस्तचा दुरान्वयानं परिचय आला होता त्याचा आदर्श असा बनवण्यात आलेला चार्ल्स हास हा पोर्ट्रेट आहे. त्या माणसाविषयी जे ज्ञात आहे ते आणि ती व्यक्तिरेखा यांच्यामध्ये फार निकटचं साम्य नसलं तरी, निदान साधर्म्य आहे. हासचं वर्णन करण्यात आलं आहे ते असं : यशस्वीरित्या सामाजिक प्रतिष्ठा मिळवणारा एक ज्यू. त्याची वंशपरंपरा स्पष्ट नाही आणि सामान्य आर्थिक परिस्थितीमधून मार्ग काढून खानदानी सोसायटीत त्यानं स्थान मिळवलेलं आहे. त्याच्यासमोर आलेल्या प्रत्येक संधीचा त्यानं पुरेपूर लाभ उठवलेला आहे. उदाहरणार्थ, पॅरिसच्या वेढ्यानं निर्माण झालेल्या अंधाधुंदीमध्ये त्यानं 'जॉकी क्लब' - मध्ये स्वत:ला निवडून आणलं होतं. त्यानं स्वत:ला काळजीपूर्वक घडवलं होतं. प्रिन्स द सागां वापरत असे तश्शीच हिरव्या चामड्याचं लाईनिंग असलेली राखाडी पँट तो वापरत होता. संध्याकाळच्या पार्टीची दुपारी आरशासमोर रंगीत तालीम करत होता. प्रयत्नांती, खानदानी रुबाब त्यानं एवढा आत्मसात केला होता की त्याचं वागणं-बोलणं नैसर्गिक वाटत होतं. त्याच्या स्वभावात अलिप्तता होती, सूर उपरोधिक होता. काही वेळेला त्याची वागणूक निर्विकार जेवढ्यास तेवढी. सामाजिक प्रतिष्ठेहून अन्य कुठल्याही गोष्टीत त्याला स्वारस्य नव्हतं. ह्या सगळ्या गोष्टी जरी नसल्या तरी त्या थोड्याफार प्रमाणात स्वानमध्येही आढळून येतात.

'कॉम्ब्रे'पेक्षा या प्रकरणात कथानकाकडे अधिक लक्ष पुरवलं असल्याकारणानं या प्रकरणाची संरचना सुलभ झाली आहे. यात दोन प्रमुख विषय आहेत : प्रेम आणि सोसायटी. या दोहोत विभिन्नता आहे, कारण प्रेमाची प्रकृती गंभीर आहे आणि सोसायटीची विनोदी. तरीही हे विषय परस्परपूरक आहेत. कारण, प्रेमाची कथा अभिनयांकित केली जाते,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

त्यासाठीच सेटिंग काही प्रमाणात सोसायटी पुरवते. बरोक संगीत-रचनाकारांच्या 'कम्पोझिशन'सारखे द्रूत आणि धीम्या गतीसदृश्य भिन्न प्रसंग आलटून पालटून येतात.

स्वान आणि ओडेट्ट यांची कथा 'ले प्लेझिर ए ले जूर' आणि 'झाँ सान्तेय' यांच्यामधील प्रेमकहाण्यांशी मिळतीजुळती आहे. परंतु, यात असे विवक्षित घटक आहेत जे प्रूस्तच्या लिखाणात नवीन होते. एक म्हणजे, प्रेमिक आता अगदी भिन्न जगातील होते. स्वान हा त्याच्या मिस्ट्रेसहून सामाजिक आणि बौद्धिकदृष्ट्या वरचढ असल्याचं दाखवलं आहे. कारण, कादंबरीतील या भागात आणि अन्यत्रही, प्रूस्त प्रेमाचा संबंध, अहंपणा दाखवत उपकार केल्याचा आणलेला आव याच्याशी जोडतो. उलटपक्षी, प्रेमिकामध्ये एक गोष्ट समान आहे आणि ती म्हणजे दोघांचीही कामप्रेरित करिअर सनसनाटी आहे. स्वाननं त्याच्या आयुष्याचा बराचसा काळ स्त्रियांच्या मागं लागण्यात घालवलेला आहे, बऱ्याचदा कनिष्ट वर्गातील स्त्रियांच्या या कामी, त्यानं स्वत:ची सामाजिक इभ्रत उधळलेली आहे आणि त्याच्या मैत्रिणींची हीन अभिरूची पोसलेली आहे वा तसा प्रयत्न केलेला आहे. ओडेट्टबरोबरच्या संबंधाच्या प्रारंभीच्या दिवसातही तो 'एखाद्या गुलाबाप्रमाणे टवटवीत आणि गुबगुबीत असलेल्या कामगारवर्गातल्या एका छोट्या मुलीला कैकदा भेटत असतो. त्याच्या बग्गीमध्ये ती त्याला सोबत करते आणि त्याच्या मुक्कामाचं ठिकाण येईपर्यंत त्याला आपल्या बाहुपाशात कवटाळून धरते. ओडेट्ट ही वारांगना आहे. स्वानसारख्या अनुभवी माणसाच्याही ही गोष्ट पटकन लक्षात येत नाही याचं आश्चर्य वाटतं. सर्वसाधारणपणे स्त्रियांना मज्जाव असलेल्या सॅलाँची ती सदस्य असते हे सुद्धा आश्चर्यच !

'मेलान्कोलीक व्हिलेजिआतूर'ची ठळकपणे आठवण करून देणारा कथेचा प्रारंभीचा टप्पा प्रेमाच्या विकासाला वाहिलेला आहे. ओडेट्टचं आपल्याकडे लक्ष गेलं असल्याचं पाहून स्वान मनोमन सुखावतो. पण, तिच्याबरोबरचं त्याचं वागणं मात्र बेपर्वाईचं आहे. तिचा देखणेपणाही त्याच्यामध्ये उद्वेगाची भावना जागवतो.' तिचे प्रोफाइल अतिशय रेखीव होते, तिची त्वचा अतिशय नाजूक होती, तिच्या गालाची हाडंही अत्यंत ठसठशीत, तिची चेहरापट्टी अगदी आवळ. तिचे डोळे सुरेख होते, पण ते एवढे मोठे होते की वाटायचं त्यांच्या स्वत:च्या भाराखाली ते वाकून गेलेत, मुखड्याचा इतर भाग त्यांनी ताणला होता आणि वाटायचं तिला बरं नसावं वा ती नाराज आहे.' तथापि, लौकरच कलाकृतींशी तिची सांगड त्यानं घातल्यानं आपल्या उद्वेगावर तो मात घालू शकतो - प्रथम तो सांगड घालतो व्हिन्हयूईमच्या सोनाट्याच्या तुकड्याशी, जो इतर तुकड्यांहून वेगळा असतो. 'नाचणारा, जानपदसदृश, आडकथेगत, वेगळ्या विश्वाशी नातं सांगणारा. हा छोटा तुकडा, हा छोटा पदबंध त्याच्यामध्ये प्रेम जागवतो, जसं राष्ट्रगीत एखाद्याच्या मनात राष्ट्रप्रेम जागवतं. पुढं बोत्तिसेल्लीच्या चित्रांतील आकृतींशी तिचं असलेलं साम्य त्याच्या नजरेत भरतं. ज्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

कलाकृतींविषयी त्याला कौतुक असतं तिच्याशी आता तो साधर्म्य जुळवतो, ती त्याला आता एक 'मास्टरपिस' वाटते, 'एका नवीन, भिन्न, विशेष देखणा असलेल्या धातुमध्ये घडवलेला.' आता त्याच्या स्वप्नाच्या जगात तो तिला प्रवेश देतो. परंतु, अद्याप तो प्रेमात पडलेला नसतो तरीही एका संध्याकाळी तिची अनुपस्थिती त्याला जाणवू लागते तेव्हा बराच वेळ बुलेव्हारवरील रेस्टॉरंट्मधून तो आतुरतेनं तिचा शोध घेतो, तिला आपण गमावून तर बसलो नाही ना या विचारानं भयभीत होतो. या मनस्तापाचा अनुभव घेतल्यानंतरच त्याचा पूर्णपणे कब्जा घेतं. 'ले प्लेझिर ए ले जूर' प्रमाणेच इथंही हे प्राय: मनस्तापाचाच एक प्रकार आहे. मिस्ट्रेसला आपण गमावून बसलो आहोत या प्रेमिकाच्या भीतीनं जागं केलेलं प्रेम, भले इतर प्रसंगी तो तिच्याशी बेपवाईइनं वागेना का !

कथेचा या पुढील भाग स्वानच्या जीवाला जो घोर लागलेला असतो त्यावर केंद्रित आहे. इथं, त्याच्या प्रेमाला प्रतिसाद देणाऱ्या त्याच्या मिस्ट्रेसचं त्याच्यावरोवरचं वागणं थंड होतं आणि ती आपल्या हातून निसटत चालली असल्याची त्याची भीती बळावत जाते. प्रूस्त सांगतो, हा घोर सरळसाधा नसतो, प्रेम आणि असूया कधीच अलग नसतात, त्यात सातत्य नसत आणि व्यक्तिगत भावना नसतात. 'They are composed of an infinity of successive loves, of different jealousies, each of which is ephemeral, although by their uninterupted multitude they give us the impreseion of continuity, the illusion of unity.'

स्वानवर एका पाठोपाठ आपत्या कोसळतात. प्रत्येकाची जात एकच. ओडेट्ट एका संध्याकाळी त्याला सोडून 'ऑपेरा कॉमिक'ला जाते, दिवसांसाठी पिअरफॉन्डला जाते, एका मोसमात बेरुथला जाते आणि एका वर्षासाठी 'निअर इस्टला जाते. वेगवेगळ्या काळात आणि भिन्न भिन्न मार्गांनी ती त्याच्या असूयाग्नीत तेल ओतत असते. आता, असूया, हे त्याला लागलेल्या घोराचं प्रमुख स्वरूप बनलेलं असतं. काही प्रसंग 'झाँ सान्तेय' मधील मादम एस् आणि फ्रान्सोइस यांच्यावरील कथांमधून आलेले आहेत. ओडेट्टच कथेची ती प्रथमिक रेखाटणं आहेत असं समजायला हरकत नाही. झाँप्रमाणेच स्वान काही वेळेला प्रेमिक वाटत नाही, निदान त्या शब्दाच्या मान्यताप्राप्त अर्थानं. तो भासतो, कासावीस झालेला एक डिटेक्टिव्ह. त्याची मिस्ट्रेस जेव्हा त्याच्या सान्निध्य नसते तेव्हा ती काय करत असते, वस्तुत: तिनं काय केलेलं असतं, हे शोधून काढण्याचा त्याचा निश्चय असतो. कथेच्या प्रारंभी त्याच्या हाती लागलेल्या पुराव्याची तो छाननी करतो, परंतु, निश्चित निष्कर्षाप्रत पोचणं मात्र त्याला जमत नाही. पुरावा तेवढा बळकट नसतो - त्याची मिस्ट्रेस निष्पाप असेल, निदान काही प्रमाणात मादम एस्. नं झाँ सान्तेयला पोस्टात टाकायला दिलेल्या पत्राच्या पारदर्शक लिफाफ्यामधून तो पत्रं वाचतो, तसंच ओडेट्टचं पत्र स्वान



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

वाचतो. त्यातील मजकुरावरून त्याला आढळून येतं की ओडेट्टनं त्याची फसवणूक केली आहे आणि फोरचेव्हील नामक एका पुरुषाची तिनं चोरून भेट घेतलेली. हा शोध यातनादायी आहे. परंतु हा यार तिचा प्रेमिक आहे असं तो खात्रीपूर्वक म्हणू शकत नव्हता. आणखीन पुरावा उपलब्ध होईपर्यंत वाट पाहाणं त्याला भाग आहे, तेवढंच त्याच्या हाती आहे.

ओडेट्ट सांगते, 'संशय एकदा आला की त्याचं कायमचं निरसन करायला हवं.' परंतु, स्वानला ते जमणारं असतं. कारण, प्रूस्तच्या साऱ्या प्रेमिकाप्रमाणेच त्याचं व्यक्तिमत्वही प्रामुख्यानं एका 'न्युराटिका'चं असतं. अखेरच्या पानांमध्ये निर्विवाद हानीकारक असा पुरावा त्याला मिळाल्यानंतरही त्याच्या शंकांचं निरसन होत नाही. त्याचे क्लेश निश्चितपणे तीव्र करू शकतील अशा माहितीसाठी, वस्तुतः तो फक्त शोध घेऊ शकतो. परिणामी, त्यापायी तो क्लेश भोगत राहू शकतो. शेवटच्या प्रसंगामध्ये त्याचा घोर शारीरिक पीडेच्या प्रतिमांमधून वर्णिलेला आहे. ओडेट्ट मान्य करते की तिनं समलिंग संभोगानुभव घेतले आहेत, 'बहुधा दोनदा किंवा तिनदा.' आणि तिच्या शब्दांनी 'त्याच्या काळजाच्या जित्या पेशींवर क्रॉस' कोरल्यागत वाटतं. त्यानंतरचे कबुलीजबाब ठोश्यांगत किंवा तलवारीच्या घावागत आहेत, त्या समयीच नव्हे तर त्यानंतरही बराच काळ तीव्र यातना देत राहाणारे. प्रूस्त सांगतो, 'He marveled at the terrible recreative power of his memory. It was only by the weakening of that generative force, whose fecundity diminishes as age creeps over one, that he could hope for a relaxation of his torments. But, as soon as the power that any one of Odette's Sentences had to make Swann suffer seemed to be nearly exhausted, to and behold another, one of those to which he had hither to paid least attention, almost a new sentence came to relieve the first, and to strike at him with undiminished force.'

कहाणी अत्यंत निष्णात, सराईत हातानं लिहिलेली आहे. त्यातील मनोविश्लेषण लक्ष्यवेधी आहे. विशेषतः स्वानच्या अंतीम यातनेशी संबंधित असलेले उतारे प्रूस्तला स्वतःला अतिशय आवडत. शिवाय प्रेम हा 'न्यूरॉसिस'चा एक प्रकार आहे या प्रूस्तच्या दृष्टिकोणाचं एक विध्वंसक उदाहरण म्हणून ते खास लक्षात राहातं. नायक विक्षिप्त मानसिक सवयी असलेला एक माणूस आहे, 'न्यूरॉटिक' आहे. जे गमावल्याचा धोका निर्माण झाला आहे असं त्याला वाटतं त्यालाच तो घट्ट पकडून राहातो. म्हणूनच ओडेट्ट फसवत असूनही तिच्याविषयी त्याला आकर्षण आहे आणि त्याची असूया आणि त्याचे क्लेश हे त्याच्या या आकर्षणाचे आवश्यक असे घटक आहेत. प्रकृतिवैज्ञानिक प्रेमाला कामोपभोगाच्या पातळीवर



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

नेतात, प्रूस्त प्रेमाला सुसंस्कृत परिस्थितीमध्ये जेवढं मूलभूत असायला हवं अशा अगदी वेगळ्या स्तरावर घेऊन जातो. आधुनिक प्रेमिकाचा स्वान हा एक आदिबंध आहे आणि 'न्युरॉसिस' ही एक आधुनिक व्याधी आहे.

प्रेमकहाणीच्या बरोबरीनं येणारे सोसायटीचे प्रसंगही बहारदार आहेत. परंतु, त्यांचा सूर सर्वस्वी भिन्न आहे. त्यांचं स्वरूप उपहासात्मक सुखांतिकेचं आहे. प्रत्येक व्यक्तीला इथं स्वत:चं असं एक वैशिष्ट्य असूनही सर्वांमध्ये एक समान गुण आहे, तो म्हणजे शिष्टमन्यतेचा. त्यांचे चक्राकार फेरे साधेसरळ असोत वा व्यामिश्र, सर्व माणसं सामाजिक प्रतिष्ठा मिळवण्यासाठी सदैव धडपडत असतात आणि त्याच अनुषंगानं त्यांचे नित्याचे व्यवहार चालत असतात.

प्रकरणाच्या प्रारंभी, मादम व्हरद्यूरिनच्या मध्यमवर्गीय सॅलाँवर बरचसं लक्ष केंद्रित केलेलं आहे. या यजमानिणीच्या शिष्टमन्यतेला आत्मसंतुष्टचा घाट आहे. तिच्या वर्तुळातील, तिच्या 'छोट्या अंतर्भागा'तील सदस्य हे पृथ्वीतलावरील सुसंस्कृत आणि सर्वात बुद्धिमान आहेत असा बहाणा ती करते. अन्य बहाणा करणं तिला शक्य नसतं. त्यांच्या फालतू विनोदांना हसणं क्वचित प्रसंगी जड जात असल्यानं हास्याचं एक प्रतिकात्मक स्वरूप ती शोधून काढते. तिच्यावर संगीताचा परिणाम कोणत्या प्रकारे होतो हे पुन:पुन्हा वर्णन करणंही अवघड झाल्यानं त्यासाठीही एक प्रतिकात्मक प्रवेश ती शोधून काढते. तिचा पियानोवादक पियानो वाजवण्यासाठी त्याच्या बैठकीवर बसल्यानंतर प्रत्येक वेळी तो प्रवेश रंगवला जातो.

"नको, नको, नको. माझा सोनाटा नको", ती किंचाळली, "गेल्या खेपेप्रमाणं, डोक्याला गारठा येईपर्यंत, आणि माझा चेहरा ताणून जाईस्तोवर रडायला लागणं मला नको आहे; अत्यंत आभारी आहे, त्या प्रयोगाची पुनरावृत्ती करण्याची माझी इच्छा नाही; तुम्ही सारे अत्यंत दयाळू आणि समजुतदार आहात; तुमच्यापैकी कुणालाही आठवडाभर अंथरुणात पडून राहावं लागणार नाही हे बघणं सोपं आहे."

कादंबरीमधील सर्वात लक्षणीय अर्कचित्रांमध्ये मादम व्हरद्युरिन हे एक. तिच्या छोट्या अंतर्भागातील सदस्य-कोट्टार्ड, ब्रिशोत, सानिएट्टल आणि इतर -- यांचं चित्रणही बहारीचं आहे. कादंबरीच्या पुढील खंडांमध्ये, त्यांच्यासाठी अधिक जागा देणं जेव्हा प्रूस्तला शक्य होतं, तेव्हा त्या त्या ठिकाणी ते अधिकच उठून दिसतात. ललित कृतीमधील अत्यूत्तम 'ग्रूप-स्टडिज'पैकी एक असं त्याविषयी निश्चितच म्हणता येईल.

खानदानीपणाचं प्रदर्शन फक्त एकदा होते. प्रकरणाच्या शेवटी स्वान मादम साँ - Euverte एयुर्वेन च्या सायं-संगीत सभेला जातो तेव्हा. प्रसंग समयोचित वर्णनानं खुलवण्यात आला आहे. प्रतिमा, या प्रसंगीही मुख्यत्वे कलाविषयांमधून घेतलेल्या आहेत. इथं त्या विविधांगी, खेळकर आणि मौलिक आहेत. बग्गीचा दरवाजा उघडणारे झगझगीत पोशाखातील सेवक आहेत. एखाद्या विवक्षित रनेसाँ-चित्रातील मुखिये, किंवा मूर्ती वगैरे



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

ठेवल्या जातात त्या भिंतीच्या कोनाड्यातील साधूसंत, किंवा गोयानं चितारलेले कोठीचे रखवालदार, किंवा शत्रूची चाल टेहळण्यासाठी वा अंतिम न्यायदानाच्या घडीसाठी अंधारकोठडी वा कॅथिड्रल यांच्या मनोऱ्यांमधून बाहेर नजर लावून असलेले पहारेकरी वा देवदूत. थोरामोठ्या सद्‌गृहस्थांचे 'मोनोकल'-एक-नेत्री-चष्मे सूचित करतात चित्रविचित्र षौक आणि नाजूक 'स्टायलिस्टिक अरेबेस्क.' जनरल द फोबेरव्हिलचा चष्मा आहे, 'एक विद्रूप जखम, जी होणं कदाचित गौरवशाली असेल पण सभ्यतेला धरून निश्चितच प्रदर्शनीय नव्हे.' मार्क्विस द ब्रेऑतचा मोनोकूल म्हणजे सूक्ष्मदर्शक यंत्रांतून पाहाण्यासाठी वस्तू ठेवायची काचेची पट्टी, रोही माशाच्या डोकीशी साम्य असलेल्या मॉसिए द पालान्सी याचा मोनोकल असतो व 'purely symbolical fragment of the glass wall of his aquarium, a part intended to suggest the whole which recalled to Swann, a fervent admirer of Giotto's Vices and Virtues at Padua, that Injustice by whose side a leafy bough evokes the idea of the forests that enshroud his secret lair'

ही चित्रविचित्र वर्णनं आटोपल्यानंतर नजरेला येतं की खानदानी लोकांची शिष्टमन्यता आणि मध्यमवर्गीयांची शिष्टमन्यता यात फारसा फरक नाही. सामाजिक प्रतिष्ठा लाभलेल्या खानदानी स्त्रिया त्यांच्या खास वर्तुळामध्ये वावरत असतात आणि त्याबाहेर असलेल्यांकडे तुच्छतेनं पाहातात, त्यांना तुच्छतेनं वागवतात. या संदर्भात प्रिन्सेस्स द लोमस (भावी डचेस्स द गॅर्मांत) हिचं उदाहरण दिलं आहे. दुसऱ्या बाजूनं, फारशा खानदानी नसलेल्या स्त्रिया त्यांच्याहून उच्चवर्गीय असलेल्यांबरोबर जवळिक साधण्याचा सतत प्रयत्न करत असतात. उदाहरणार्थ, मार्क्विस द गालारद्यं. ती प्रिन्सेस्स द लोमस हिच्या मागंमागं घोटाळत राहाते आणि तिच्या अवतीभवती असणाऱ्यांना ताप आणते. आपण आहोत त्याहून उच्च स्तरावर जाण्याची मार्क्विसची धडपड असते आणि यासाठीच आपल्या 'कझिन'ला अगत्यान निमंत्रणं स्वीकारण्यास भाग पाडते.

'नोम द पे : ल नोम' या अखेरच्या प्रकरणात प्रूस्त त्याचा निवेदक-नायक मार्सेल याच्याकडे वळतो; मार्सेलच्या दुसऱ्या चक्राला प्रारंभ करतो. परंतु, प्रकरण अपूर्ण असल्यामुळे (अखेरच्या क्षणी त्यातील सुमारे २०० पृष्ठे बाजूला काढण्यात आली होती) ते विस्कळीत झालं आहे. त्यात वेगवेगळ्या गोष्टी गलथानपणे एकत्र केलेल्या आहेत : एक सिद्धांत, एक प्रेमकहाणी आणि बॉइ द बुलोग्यूला देण्यात आलेल्या भेटीगाठी. खंडामध्ये अन्यत्र निवेदन असं आणि एवढं गोंधळात टाकणारं नाही.

प्रूस्तच्या सर्व ललितकृतींमध्ये आढळून येतो तसा कल्पनाशक्तीचा लहरीपणा हा सिद्धांत कादंबरीमध्ये मध्यवर्ती आहे. अन्यत्र जसा तो वापरला गेला आहे तसाच तो इथंही वापरला गेला आहे. ज्याचा शोध नायक घेत असतो तो सापडण्यास त्याला अपयश का येतं हे सिद्ध



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

करण्यासाठी. तो अत्यंत कल्पक आहे, वास्तव त्याला पुरवू शकेल त्याहूनही अधिकाचा लाभ होईल असा स्वत:चा समज करून घेण्याकडे त्याचा कल आहे. तो प्रवासाला जाण्याचा विचार करतो, तेव्हा बाल्बेक, पर्मा आणि फ्लॉरेन्स या इच्छित स्थळाचं, आपल्या कल्पनाशक्तीला मोकाट सोडून तो मानसिक चित्रं तयार करतो, त्यांच्याशी निगडित असलेल्या नावांनी यदृच्छया सुलभ केलेली आणि रंगवलेली वास्तवातील जगाशी या स्थळांचं काहीही साधर्म्य नसतं. बाल्बेक हे इतर गावांप्रमाणे नसतं, तर ते असतं निर्जन समुद्रकिनाऱ्यावरील मच्छिमारांची एक वस्ती. पर्शियन पद्धतीनुसार बांधलेले इथल्या चर्चभोवती लाटा उचंबळत असतात. पर्मा असते 'आटोपशीर आणि झकपक, जांभळी छटा असलेले, मृदू' याचा थोडाफार संबंध त्याच्या नावातील तीन व्यंजनध्वनींशी आहे, काहीसा स्तान्धालच्या Chartreuse शारत्रसच्या आठवणींशी आहे. व्हेनिस हे दैवी शहर, 'मी समजून चाललो होतो त्या गिओत्तोच्या प्रतिभेचा स्पर्श झालेल्या विवक्षित वासंतिक दृश्यांनी जन्माला घातलेलं' तत्पूर्वी 'कॉम्ब्रे'मध्ये उचूक आणि डचेस्स द गॅर्मांत यांचं स्वप्न रंगवताना नायकानं अशाच प्रकारचं मानसिक चित्र केलेलं असतं. नायक सांगतो :

I knew that they were real personages who did actually exist, but whenever I thought about them I pictured them to myself either in tapestry, as was the "Coronation of Esther" which hung in our church, or else in changing, rainbow colors, as was Gilbert the Bad in his window, where he passed from cabbage green, when I was dipping my fingers in the holy water stoup, to plum blue when I had reached our row of chairs, or again altogether impalpable, like the image of Genervieve de Brababt, ancestress of the Guermantes family, which the magic lantern sent wandering over the curtains of my room or flung aloft upon the ceiling–in short, always wrapped in the mystery of the Merovingian age, and bathed, as in a sunset, in the orange light which glowed from the resounding syllable "antes."

प्रवासाचा 'एपिसोड' येतो कथेच्या बऱ्याच पुढील भागात; जेणे करून या एका बाबतीत नायकाची निराशा पुढं ढकलण्यात आली आहे. परंतु प्रस्तुत खंडामध्ये डचेस्स द गॅर्मांत त्याच्या स्वप्नातील स्त्रीप्रमाणे अजिबात नाही हे घ्यानी येण्याइतपत दीर्घकाळ तो तिला पाहात नाही. ती, अर्थातच, नारिंगी प्रकाशात न्हाऊन निघालेली नसते, तर लालबुंद चेहऱ्याची आणि मोठ्या नाकाची ती एक स्त्री असते.

'नोम द पे : ल नोम' मधील प्रेमकथा म्हणजे' झाँ सान्तेय मधील मारी कोस्सीशेफ या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

कथेचं अधिक रेखीव आणि अर्थपूर्ण रूप. मार्सेल आता पौगंडावस्थेतील स्वान आहे. प्रेमापायी उत्पन्न झालेल्या मनस्तापाचं आणि ते जोपासत असलेल्या आभासाचं दुसरं आणि काहीसं वेगळं उदाहरण, मार्सेलनं गिल्बेर्तला भेटलंच पाहिजे -- तिच्यापासून दूर असताना तो कधीच आनंदी नसतो. त्यानं तिच्याशी अधिक जवळीक साधायला पाहिजे, तिच्याकडून प्रेमाची कबुली वदवून घेतली पाहिजे. 'ल फिगरो' मध्ये यापूर्वी प्रसिद्ध झालेला प्रसंग अत्यंत संस्मरणीय आहे : पाऊस कोसळत असतो आणि मार्सेलला धास्ती वाटत असते की, पावसामुळे त्याला पार्कमध्ये जाता येणार नाही, गिल्बर्तची भेट होणार नाही. तो त्याच्या खिडकीबाहेरच्या बाल्कनीमध्ये अभ्यास करत बसतो. त्याच्या जीवाची तगमग होत असते. परंतु, सूर्यप्रकाश फाकतो. त्याच्या किरणांनी दगडांवर सुवर्णकांती झळाकते. त्या कांतीप्रमाणं त्याच्या आशाही झळाळतात. गिल्बर्तशी त्याची गाठ पडतेही. परंतु तिच्या सहवासा त्याची खिन्नता दूर होत नाही. कारण, जवळीक वाढत नाही, प्रेमाची कबुली तिच्या तोंडून उच्चारली जात नाही. काही वेळेला त्याला आढहून येतं की गिल्बर्त त्याबाबतीत उदासीन आहे. परंतु, बऱ्याचदा प्रेमाचे आभास बलवत्तर ठरत असल्यानं तो तिची उदासीनता झटकून टाकण्याचा सातत्यानं प्रयत्न करतो. प्रत्येक नवीन भेट, कितीही संदिग्ध का असेना, आश्वासक दिलासा देते : कबुली मिळणार आहे.

गिल्बर्तची कहाणी पूर्ण व्हायच्या आधीच, दृश्य Bois de Boulogne बो द बुलोग्नला पालटलं. जातं. नायक गिल्बर्तची आई, दिमाखदार मादम स्वान हिची प्रशस्ती करण्याच्या निमित्तानं तिथं जातो. नंतर काही वर्षं उलटली जातात. एव्हाना वृद्धत्वाकडे झुकलेला असतो. तो Bois ला पुन्हा भेट देतो. तारुण्यात त्या ठिकाणी त्याला आढहून आलेला नीटनेटकेपणाचा शोध घेण्याचा तो वृथा प्रयत्न करतो. गतकाळातल्या सुरेख व्हिक्टोरियांची जागा आता महागड्या मोटारींनी घेतलेली असते. स्त्रियांच्या हॅटी मध्येही बराच बदल झालेला असतो. आता त्या अधिक भपकेबाज दिसतात. 'फळं, फुलं आणि नाना तऱ्हेचे पक्षी यांच्या नक्षीकामानं त्या सुशोभित केलेल्या असतात.' हा उतारा दुसऱ्या खंडामधून उचलून इथं टाकला आहे, त्यामुळे त्याचं इथलं स्थान ठिगळा सारखं झालं आहे. तरीही त्यायोगे समाप्तीची सोय साधण्यात आली आहे. 'कॉम्ब्रे'ला काही प्रमाणात शोभून दिसेल एवढा तो 'नॉस्टॅल्जिक' आहे आणि नैराश्यजनकही. कारण, कल्पनाशक्तीची प्रूस्तची संकल्पना तो अधोरेखित करतो. या ठिकाणी नायक जे शोधू पाहात असतो ते त्याला आढळून येत नाही, ते मुळी अस्तित्वातच नसते, ते अस्तित्वात असते ते केवळ त्याच्या मनात. एखाद्याच्या स्मृतीत साठवून ठेवलेली चित्रं शोधणं किती विरोधाभासयुक्त असतं हे त्याच्या ध्यानी येऊ लागतं. स्मृतींकडून त्यांना लाभलेली रमणीयता फिकी पडणं अपरिहार्य असतं, कारण, त्यांचं आकलन संज्ञांकरवी झालेलं नसतं.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

'ग्यु कोते द् शे स्वान' ची ही ठिगळवजा अखेर कादंबरीच्या संरचनेच्या दृष्टीनं विजोड आहे, किंबहुना अन्य विजोड संरचनांपैकी एक परिणामी प्रूस्तच्या कादंबरी-मालिकेमधील एक अत्यंत अवांतर गोष्टींनी भरलेलं असं स्वरूप या खंडाला प्राप्त झालं आहे. म्हणून सर्वसामान्य वाचकाला तो बुचकळ्यात टाकतो. 'कॉम्ब्रे' हे प्रकरण बऱ्याच प्रमाणात कौतुकास पात्र असं प्रास्ताविक आहे. परंतु, त्याचा सूर त्या पुढील प्रकरणांहून भिन्न आहे. 'उ आमूर द स्वान' हे प्रकरण अतिशय सरस उतरलेलं आहे. परंतु, मुख्य कथेचा ओघ, वाचकाला अस्वस्थ वाटायला लावण्याइतपत, ते खंडित करतं. 'नोम द पे : ल नोम' हे प्रकरण म्हणजे तुकड्यातुकड्यांची जोडणी. स्वयंपूर्णरित्या ते उभंच राहू शकत नाही. शक्यता आहे, प्रूस्तला लेखनकलेतील हरहुन्नरीपणा दाखवायचा असावा. आणि यात त्यात यश संपादन केलं आहे. परंतु त्यासाठी देण्यात आलेली किंमत भारी होती हे परीक्षणं छापून येऊ लागताच त्याला समजून येणार होतं.

दुसऱ्या बाजूनं, खंडाला आकार देणारे वेगवेगळे 'एपिसोड' उत्कृष्ट आहेत. कादंबरीची ही जमेची बाजू आहे आणि लेखक म्हणून प्रूस्तच्या विकासाचा सुखद असा टप्पा ते दर्शवतात. तो 'इम्प्रेशनिस्टिक', दृक्प्रत्ययवादी आणि चिंतनशील लेखक आहे. त्याची संवेदनशीलता आणि बुद्धिमत्ता वाखाणण्याजोग्या. प्रस्तुत खंडात त्याची संवेदनशीलता वरचढ आहे. 'उ आमूर द स्वान' ही अत्यंत लक्षणीय कथा आहे. प्रेमाचा सिद्धांत विशद करण्यासाठी रचलेली. त्यात इतस्ततः विखुरण्यात आलेल्या सर्वसामान्य विधानात्मक प्रसंगामधून प्रेमावरील प्रबंध एकत्रितरित्या सहजी जुळवता येणं शक्य आहे. परंतु, ही विधानं डोळ्यात खुपण्याएवढी बटबटीत नाहीत आणि ती क्वचितच लांबलचक वाक्यांचा आधार घेतात. कथा ही काही झालं तरी कथा असते. मानसशास्त्रीय, प्रेमात पडलेल्या माणसाच्या एका पाठोपाठ येणाऱ्या भावना आणि 'इम्प्रेशन्स' यांच्याशी संबंधित असलेली 'नोम द पे : ल नोम' मधील स्थलनामावरील उतारादेखील, नायकाच्या मानसिक जीवनामधील एका टप्प्याचा वृत्तांत म्हणून, अमूर्त चर्चाविषयी बनत नाही. तत्कालिक आणि मूर्त वृत्तांत म्हणून यावरील भर, संवेदनशीलतेचा हा वस्तुपाठ, त्याच्या पुढील खंडामधून आढळून यावयाचा असतो, परंतु 'ग्यु कोते द शे स्वान' मध्ये तेवढ्या सातत्यानं मात्र आलेला दिसत नाही. पुनः पुन्हा संस्करणं करताना तो 'झाँ सान्तेय'ला अनुसरलेला आहे. म्हणजे असं की, चिंतनशील उताऱ्यांवर भर देण्याकडे त्याचा कल झुकल्यानं, तो कादंबरीकारापेक्षा निबंधकार वा तत्वज्ञ बनला होता.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

'द्यु कोते द् शे स्वान' प्रसिद्ध झालं. आता त्यावर परीक्षणं येण्याची आवश्यकता होती. आणि ती छापून येण्याची चोख व्यवस्था प्रूस्तनं केली. 'एक्सेल्सिअर'चा संपादक पिअर लाफिट्ट याचा प्रूस्तशी परिचय होता. काबुर्ग मुक्कामी त्यांची जानपहचान झाली होती. प्रूस्त त्याला जाऊन भेटला. त्यानं प्रूस्तलाच त्याचा परीक्षणकार निवडण्यास सांगितलं. प्रूस्तनं कॉक्तूची निवड केली. कॉक्तूचं परीक्षण 'एक्सेल्सिअर'च्या २३ नोव्हेंबरच्या अंकात प्रसिद्ध झाले. प्रूस्तची कादंबरी ही एक अभिजात साहित्यकृती असल्याचा कॉक्तूनं निर्वाळा दिला आणि थोर कलाकृतींचे एकमेकांशी कसे जवळिकेचे संबंध असतात- जणू काही त्या एकाच जातकुळीतील असावेत- हे विशद केलं. लिहिलं : 'Swann is a gigantic miniature, full of mirages, superimpositions of gardens, plays on space and time, broad cool touches in the style of Manet.' २७ नोव्हेंबर रोजी 'ल फिगरो'मध्ये ल्युसिएँ दॉदेचं परीक्षण छापून आलं. त्याचं परीक्षण काटछाट न करता ठळक जागी छापावं असं सम्राज्ञी युजेनी हिनं स्वत:च्या सचिवामार्फत कालमेट्टला लिहिलं होतं. दॉदेनंच तसा आग्रह धरला होता. हे परीक्षण तसं लक्षणीय आहे. दॉदेनं कादंबरीच्या महत्त्वपूर्ण वैशिष्ट्यांकडे वाचकांचं लक्ष वेधलं. त्यानं लिहिलं. 'It evokes the auther's presence for those who know him, and is capable of reconstituting it for those who do not.... it attains an extraordinary moral grandeur....... Monsieur Proust's analysis is so parfectly incorporated with a prodigious sensibility that the two qualities became indistinguishable ....... in the distant future it will seem one if the most astonishing manifestations of intelligence in the twentieh century. समारोप करतेसमयी त्यानं म्हटलं की गतकाळातील श्रेष्ठ अभिजात साहित्यकृतींमध्ये या कादंबरीला निश्चितच स्थान आहे, brcause every master piece is the cry of a precursor, and rallied beyond time, in the black frost of eternity, its companion yet to come.' मॉरीस रोस्तां यानं 'कोमेडिआ'- च्या २६ डिसेंबरच्या अंकात परीक्षण लिहिताना एक आख्यायिका सांगितली : 'टँगो'मधील त्याचा एक भिडू एका संध्याकाळी ऑडेट्ट विषयी भरभरून बोलला. 'स्वान'मधील तीसहून अधिक ओळी अगदी अचूक म्हणून दाखवल्या. अतिउत्साहाच्या भरात त्यानं प्रूस्तची तुलना पास्काल, रोली, लिओनार्दो द विंची, गटे, प्लेटो, डोस्टोएवस्की आणि शेक्सपिअर यांच्याशी केली आणि प्रूस्तचा रोष ओढवून घेतला. एप्रिल ब्लांशनं 'एको द पारी'च्या १५ एप्रिल १९१४ च्या अंकात लिहिलं : 'एकांतवास आणि काळोख यात काम करणाऱ्या मनाच्या निद्रानाशाचं हे पुस्तक, तरीही जीवनानं दुथडी भरून वाहणारं, वैविध्यपूर्ण आणि



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

एकसंघ. हे चौघेही परीक्षणकार प्रूस्तचे जिवलग स्नेही होते आणि तसा उल्लेखही त्यांनी केला होता. साहजिकच, मैत्रीखातर त्यांनी अशी स्तुतिसुमनं उधळणं स्वाभाविकच आहे असा वाचकांचा ग्रह होण्याची शक्यता. परंतु, वस्तुस्थिती अशी होती, लेखक म्हणून प्रूस्तविषयीचं कौतुक त्यांना असल्यामुळंच त्यांची त्याच्याशी मैत्री जुळून आली होती.

'जो काहीच वाचत नाही' त्या इमानदार आल्बुफेरानं ड्युक द गॅर्मांतला साजेशा पद्धतीनं गफलत केली. प्रूस्तनं त्याला टेलिफोन करून विचारले, "अरे प्रिय लुई, माझं पुस्तक वाचलंस तू?" "तुझं पुस्तक वाचलं? **पुस्तक** लिहिलंयस तू?" "हो, लुई, अर्थातच आणि मी एक प्रत तुला पाठवलीय." "आह्, माझ्या लाडक्या मार्सेला, तू ते पाठवलं असलंस, तर मी ते निश्चितच वाचलं असणार. माझ्यापर्यंत ते पोचलं होतं की नाही याची मला पूर्ण खात्री नव्हती."

दरम्यान, आपल्या कादंबरीला एखादा पुरस्कार मिळावा खास करून गाँकूर समिती देत असलेला- यासाठी प्रूस्त गळ टाकू लागला होता. असं मान्यताप्राप्त साहित्यिक पारितोषिक मिळणं म्हणजे सर्वोत्कृष्ट पब्लिसिटी, याविषयी तो नि:शंक होता. रॉबेरमार्फत गाँकूर समितीच्या दोन सदस्यांवर प्रभाव टाकण्याचा प्रयत्न केला होता पण त्याला यश लाभलं नव्हतं. याच सुमारास अन्य दोन सदस्यांवर प्रभाव टाकण्यासाठी ल्युसिएँ बॉदे प्रयत्नशील होता. अर्थात्, आपल्या हालचालीची वार्ता प्रूस्तच्या कानी पडू न देण्याची खबरदारी त्यानं घेतली होती. तरीही, असं काहीतरी शिजत असल्याची कुणकुण प्रूस्तला लागली होती आणि आपल्या या मित्राच्या हालचाली त्याला संशयास्पद वाटत होत्या. त्या वर्षीची गाँकूरसह सर्व पारितोषिकं अन्य पुस्तकांना मिळाली होती आणि अचंबा करणं आणि कुढत बसणं एवढंच प्रूस्त करू शकत होता. दॉदेनं हेतुपुरस्सर त्याचा विश्वासघात केला होता या निष्कर्षाप्रत तो नाईलाजानं आला होता. त्यानं दॉदेला सांगितलं, 'मला जेव्हा समजलं की एक्स आणि वाय या महाशयांना भेटायला तू गेला होतास, कुठल्याही परिस्थितीत ते मला गाँकूर पारितोषिक देणार नाहीत, याची खातरजमा करून घेण्यासाठी, मला ते लागून राहिलं.'

पब्लिसिटीला म्हणावं तसं घवघवीत यश लाभलं नव्हतं. पहिलं महत्त्वपूर्ण परीक्षण 'ल ताँ'च्या १० डिसेंबरच्या अंकात प्रसिद्ध झालं. परीक्षणकार होता रॉबेर साउदे. ते प्रसिद्ध होऊ नये म्हणून प्रूस्तनं हस्तक्षेप करण्याचा प्रयत्न केला होता ही बाब लक्षात घेता, ते तद्दन असमाधानकारक असणार असं त्याला वाटलं असणार हे निर्विवाद. साउेद हा काही तसा प्रतिकूल नव्हता. तो केवळ भोंगळ होता. त्याच्या ध्यानीही आलं नव्हतं की, कादंबरीचं मूल्यमापन करण्यासाठी निखळ 'कॉमन सेन्स'पेक्षा अन्य निकषांची गरज असते. त्यानं म्हटलं होतं की कादंबरी 'काहीशी उथळ' असली तरी 'तशी रटाळ नाही' ती 'व्याकरणांच्या चुकांनी भरलेली आहे.' स्वानच्या प्रेमप्रकरणावरील प्रकरण म्हणजे 'चक्क विषयांतर' आहे आणि एका छचोर पोरीबद्दल स्वानला वाटणारं आकर्षक 'एवढा प्रचंड अनुभव गाठीशी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

असलेल्या पॅरिसवासियाच्या संदर्भात भाबडं, असंभाव्य वाटतं.' तथापि, त्यानं मान्य केलं होतं की, लेखकापाशी उत्तम प्रतिभा आहे, तरल संवेदनाशीलता आहे, त्याची निरीक्षणशक्ती अत्यंत सूक्ष्म आहे, कल्पनाशक्ती अफाट आहे. परंतु, या सुरेख, हेवा वाटावा अशा देणग्यांची त्यानं पुरती वासलात लावून टाकली आहे. पात्रांची नको तेवढीदाटी आहे. त्यातील काही पात्रं तर नगण्य आहेत. प्रसंगांची रेलचेल आहे, अनावश्यक तपशील भरगच्च आहेत. ही सारी वैशिष्ट्ये रस्किन वा डिकन्स यांना साजेशी आहेत. म्हणजेच ती आंग्लाळलेली आहेत, फ्रान्सच्या भूमीतील नाहीत. शेवटी, त्यानं आशा व्यक्त केली होती की, पुढील खंडामध्ये अधिक बांधेसूदपणा असेल, शैली अधिक निखळ असेल, निवेदन अधिक संक्षेपानं केलेलं असेल. दयामाया न दाखवता त्यानं यात जर का काटछाट केली असती आणि कादंबरीला एक रेखीव संरचना दिली असती तर, ती आहे त्याहून अधिक मनोवेधक झाली असती.

या परीक्षणानं ग्रासेच्या रागाचा पारा चढला. जणू काही तो युद्धाची घोषणा करणार आहे अशा अभिनिवेशात त्यानं प्रूस्तला फोन केला. प्रूस्तही भडकला होताच. विशेषत: व्याकरणाबाबतच्या त्याच्या मतप्रदर्शनानं. संरचनेसंबंधीची त्याची शेरेबाजी त्यानं फारशी मनावर घेतली नव्हती. या परीक्षणाला उत्तर म्हणून त्यानं तातडीनं एक मसुदा तयार केला आणि साउदेच्या व्याकरणविषयक व तपशीलविषयक गफलती त्यात निदर्शनास आणून दिल्या आणि पुढं लिहिलं, 'याला मी जोड देऊ शकतो की ज्या भयानक परिस्थितीमध्ये मला या पुस्तकाची प्रूफं तपासावी लागली होती. (या परिस्थितीचा पब्लिकशी संबंध नाही, मला माहीत आहे आणि तिकडे दुर्लक्ष करण्याचा अधिकार तिला आहे) परिणामी, माझे पुस्तक भयंकर चुकांनी भरले गेले आणि त्या भयानक आहेत ही वस्तुस्थिती स्पष्टपणे दर्शवते की त्या लेखकाच्या नाहीत.' हे पत्र 'ल ताँ' नं छापलं नाही- ते छापलं जावं अपेक्षाही नव्हती, तथापि, साउदेवर आपण यशस्वीरित्या मात केल्याचं समाधान मात्र या पत्रानं दिलं, एवढं बरीक खरं.

अन्य परीक्षणात दोषदिग्दर्शन बव्हंशी कमी असलं तरी त्यांतील प्रतिक्रिया साउदेहून तशा फार भिन्न नव्हत्या. प्रत्येक परीक्षणकारानं मत व्यक्त केलं होते की, प्रूस्त हा प्रामुख्यानं 'इम्प्रेशनिस्ट' आहे. त्याच्या स्वत:च्या संवेदनांचा त्याचा वृत्तांत लक्षणीयरित्या परिपूर्ण असल्याचं त्यांना मान्य होतं पण अशा वृत्तांताची कादंबरीत आवश्यकता आहे का याविषयी ते साशंक होते. त्यांच्या मते, तो अहंवृत्तीचा एक प्रकार होता आणि म्हणूनच विकृत. त्यानं बारीक-सारीक तपशीलाकडे एवढं बारकाईनं लक्ष दिलं आहे की परिणामी निवेदनाच्या ओघाला बाधा निर्माण झाली आहे. पुस्तकाला संरचना आहे का याविषयी त्यांच्या मनात शंका होती. कादंबरी म्हणजे 'इम्प्रेशन्स'चा एकत्रित संग्रह आहे असा त्यांचा ग्रह होता- कदाचित लक्षणीय संग्रह, परंतु, कादंबरी मात्र खचितच नव्हे.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

ल्युसिअं मोरी यांने 'ला रव्ह्यू पोलिटिक एट्टीटेरेरे'च्या २७ डिसेंबरच्य अंकात केलेल्या परीक्षणात म्हटलं होतं की, प्रूस्त हा 'एस्थेट' आहे, 'टॅलेन्टेड' आहे याबद्दल शंका नाही, परंतु, त्याला 'जिनीअस' मात्र म्हणता येणार नाही. कादंबरीमध्ये चांगली, आगळीवेगळी नव्हेत, पुस्तकं कशीबशी एकत्र करण्यात आली आहेत. राशिल्डनं 'ल मर्क्युर द फ्रान्स'च्या १६ जानेवारी १९१४ च्या अंकात तक्रार केली होती की निवडीच्या बाबतीत लेखकानं चोखंदळपणा न दाखल्यामुळे एक श्रेष्ठ कलाकृती होण्याच्या शक्यतेचा त्यानं बट्ट्याबोळ करून टाकला आहे आणि मनोवेधक वाटू शकणारे उतारेही रटाळ वाटायला लावले आहेत.' उत्साहानं हे पुस्तक वाचायला मी सुरुवात केली, शेवट केला तो थरकापून ते खाली फेकण्यात, स्वतःहून अंमली पदार्थ घेण्यास नकार देणाऱ्या एखाद्या माणसागत.' 'ओपिनिअन'च्या २४ जानेवारीच्या अंकात ज्याँ द पिअरफ्यूनं कादंबरीला न्याय देण्याचा प्रयत्न केला होता. तरीही, पुस्तक गोंधळात टाकणारं आणि रोगट असल्याचं नमूद करण्यापासून तो स्वतःला परावृत्त करू शकला नव्हता. लेखकानं आंतरिक जीवनावर एवढं लक्ष केंद्रित केलं आहे की त्याच्यात नार्सिसस वास करत असावा असं म्हटलं तर ते वावगं ठरू नये. तो कादंबरीकर नव्हेच मुळी, तो आहे 'आत्म्याचा एक सूक्ष्मजंतूशास्त्रज्ञ.' आन्द्रे शोमिअनं 'डेबट'च्या २५ जानेवारीच्या अंकात प्रूस्तचे दोष सांगितले त्याचबरोबर त्याच्या गुणांकडेही लक्ष वेधलं होतं. ज्याला घाट नाही, किंबहुना जो अस्ताव्यस्त आहे असा तो एक लेखक आहे. त्याची शैली विनाकारण व्यामिश्र आणि काही वेळेला तर व्याकरणदृष्ट्या सदोषही. परंतु, तो अतिशय चतुरस्र आहे, अतिशय तल्लख आहे. काही विवक्षित उतारे वाखाणण्याजोगे आहेत. 'या अनोख्या आणि मनोवेधक पुस्तकामधून वाचक अटकतो, जणू काही तो अतिशय रमणीय आणि गुंतागुंतीच्या अरण्यात आहे, जिथं त्याचा मार्ग हरवलेला आहे, किंबहुना जिथं खरोखरी मार्गच नाही, परंतु जिथं पर्णसंभार, वृक्षराजी अतिसामान्य रोपटी, अतिशय चित्रविचित्र पडछाया आणि अंधूक प्रकाश या साऱ्यांनी भुरळ घालण्याला हातभार लावला आहे.'

१९१४ च्या जानेवारीच्या अखेरीस प्रूस्तला कळून चुकलं असणार की 'द्यु कोते द शे स्वान' आकलन होण्यास अवघड आहे आणि कादंबरीचा उर्वरित भाग प्रसिद्ध करून त्याच्या टीकाकारांना तो उत्तर देऊ शकतो. कादंबरीच्या घाटाचा समज त्याला नाही अशी ज्यांनी त्याच्यावर टीका केली होती त्या टीकाकारांना तो समज देऊ शकतो. त्यांच्या परीक्षणांची री ओढलेलीही त्यानं खाजगी संभाषणात त्यानं ऐकली तेव्हा शक्य तेवढ्या चांगल्या प्रकारे त्यानं त्यांच्या प्रतिवादाचं खंडन केलं होतं. एका समकालिन लेखकानं आरोप केला होता की त्यानं कादंबरीत सर्व काही कोंबलं आहे. त्याच्या आक्षेपाला प्रूस्तनं रॉबेर ड्रायफसला पाठवलेल्या पत्रात तपशीलवार उत्तर दिलं होतं, लिहिलं होतं; 'उलट मी सारं



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

काही लिहीत नाही. तोच साऱ्या गोष्टी कोंबतो. माझं एकही पात्र एकदाही खिडकी बंद करत नाही, किंवा त्याचे हात धूत नाही, किंवा ओव्हरकोट चढवत नाही, किंवा कुणालाही औपचारिकत्या (वाचकांसमोर) सादर करत नाही. पुस्तकामध्ये नवीन असं जे काही आहे तर ते बहुधा हे, माझा तसा विचार नसला तरीही, मला बोअर करणाऱ्या गोष्टी कागदावर उतरवण्याबाबत मी फारच आळशी आहे.'

तथापि, परिक्षणांमधून त्यानं जे वाचलं होतं त्याहून खाजगीत त्यानं जे ऐकलं होतं ते अधिक अनुकूल होतं. महत्त्वाची परीक्षणं येण्याआधी आणि नंतरही असे बरेच लोक होते ज्यांना 'स्वान'बद्दल कमालीचं औत्सुक्य होतं आणि ती कादंबरी 'मास्टरपीस' आहे याबद्दल त्यांना तिळमात्र संदेह नव्हता. त्यापैकी एक होता फ्रान्सिस जेम्स. हा कवी. त्यानं प्रूस्तला एक स्तुतीपर पत्र पाठवलं होतं आणि प्रूस्तनं ते आपल्या बऱ्याच मित्रांना दाखवलं हेतं. दुसरा निर्माता गॅब्रिएल आस्त्रुक. त्याचा प्रूस्तशी पत्रव्यवहार होता. प्रूस्तला त्याची खरोखरीच फार मदतही झाली होती. एका प्रतीमध्ये त्यानं मुद्रणदोष अधोरेखित केले होते आणि कोणते पात्र कुणावर बेतले आहे हेसुद्धा ओळखलं होतं. त्यानं दाखवून दिलेल्या मुद्रण दोषाबद्दल प्रूस्तनं त्याचे आभार मानले- याबाबत तो एव्हाना बराच हळवा झाला होता- आणि व्यक्ती अचूक ओळखल्याबद्दल आश्चर्य व्यक्त केलं, लिहिलं की, स्वानची व्यक्तिरेखा रेखाटताना हासचा विचार आपण केला होता हे खरं आहे. अर्थात्, व्यक्तिरेखा म्हणता येतील अशी पात्रं त्याच्या पुस्तकात नाहीत. हासबद्दल आणखीनही चविष्ट गोष्टी सांगण्याची तयारीही प्रूस्तनं दर्शवली. याहून विशेष म्हणजे, आपल्या या नव्या मित्राला आठवणीवजा ग्रंथ लिहिण्याच्या कामी मदत करण्याची तयारीही दर्शवली, फक्त एका अटीवर, त्यानं ही गोष्ट गुप्त ठेवावी.

या दोघांच्या पत्रांहूनही प्रूस्तला आश्चर्याचा जोरदार धक्का दिला आणि संतोषही दिला तो आन्द्रे जिदच्या पत्रानं. त्याच्या या पत्राला निमित्त झालं ते असं : १ जानेवारी १९१४ च्या 'नुवेल्ल रव्ह्यू फ्राँसोईज'च्या अंकात गेआँचं परीक्षण प्रसिद्ध झालं हेतं. त्यानं लिहिलं होतं की कादंबरीमध्ये आहे, 'poetry of the highest beauty, psychology of the newest, irony of the most original, a picture of "Society" that no one had ever drawn before; (but it was) 'a work of idle leisure, without organisation, form or selection, in short, the very opposite of a work of art.' या परीक्षणकारानं अशी समजूत करून घेतली होती, किंवा त्यानं बहाणा केला होता की' ताँ पेदर्यू 'म्हणजे फक्त वाया गेलेला काळ, भूतकाळ नव्हे. त्याच्या परीक्षणानं प्रूस्त दुखावला गेला होता. त्यानं चिडून त्याच्या चुकीची दुरुस्ती केली होती आणि 'स्वान' आपल्याला आवडली असल्याच्या त्याच्या निर्वाळ्याबद्दल असमाधान व्यक्त केलं होतं. परंतु, या समयी, 'एन् आर. एफ' मध्ये नाट्यपूर्ण घटना घडली होती. गेआँच्या परीक्षणातील गर्भितार्थ



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

ध्यानी आल्यानंतर बारा महिन्यापूर्वी घाईघाईनं केलेल्या आपल्या मतप्रदर्शनाबद्दल जिदच्या मनात शंका चुकचुकली होती. कादंबरीचं हस्तलिखित वाचताना आपली फसगत झाल्याचं त्याच्या ध्यानी आलं होतं. त्याच्याकडून गंभीर चूक घडली असल्याचं कॉक्तूनंही त्याला सांगितलं होतं आणि ती कादंबरी पुन्हा, किंबहुना पहिल्यांदा, वाचावी असं सुचवलं होतं. जानेवारीच्या पूर्वार्धात जिद आणि त्याचे सहकारी यांनी ती वाचली होती आणि कादंबरीचं श्रेष्ठत्व त्यांना उमगलं होतं.

१३ जानेवारीच्या सुमारास जिदनं प्रामाणिक पश्चात्तापानं प्रूस्तला लिहिलं, 'माझा प्रिय प्रूस्त, बरेच दिवस मी तुझं पुस्तक बाजूला ठेवलेलं नाही; अत्यानंदानं मी त्यात पूर्ण चिंब होत आहे, त्यातील मौज लुटत आहे. या पुस्तकाला दिलेला नकार म्हणजे 'एन्आरएफ्' कडून कधी घडली नव्हती अशी गंभीर चूक होती- आणि (त्याबद्दल बऱ्याच प्रमाणात मी जबाबदार असल्याबद्दल मला शरम वाटते) माझ्या अवघ्या आयुष्यातील अपराधांच्या नव्हे अतीव पश्चात्तापांच्या, डंखांपैकी अत्यंत जहाल डंख आहे.' दोन महिन्यानंतर 'एन्आरएफ्'च्या संपादकीय समितीची बैठक बसली. जिद सांगतो, त्या समितीत 'एकमतानं आणि उत्साहानं' निर्णय घेतला की 'आ ला रशार्श'चे उर्वरित दोन खंड प्रकाशित करायचे आणि ग्रासेकडून पहिल्या खंडाचे हक्क विकत घ्यायचे. अगदी मनापासून मागितलेली माफी, कळकळीची क्षमायाचना, उद्ध्वस्त स्वप्नाची पूर्ण भरपाई- प्रूस्तला हे अनपेक्षित, अगदी स्वप्नवत होतं.

प्रूस्तनं स्वत:चा आब राखून जिदला कृतज्ञतापूर्वक उत्तर दिलं, प्रकाशन व्यवहाराबाबत विचार करण्यासाठी अवधी मागून घेतला आणि सांगितलं की ग्रासे जर दुखावला जाणार असेल तर ही 'ऑफर' तो स्वीकारणार नाही. त्यानं ग्रासेबरोबर केलेलं करारपत्र एमिल स्ट्रॉसकडे पाठवलं. कायदेविषयक समस्यांचा तो तज्ज्ञ होता. प्रूस्तनं त्याला विचारलं, कराराचा भंग तो करू शकतो का? तसं केल्यास आपल्यावर खटला भरला जाण्याची शक्यता आहे का?

याच सुमारास केव्हातरी प्रूस्तला कळून आलं की ३ मार्चला रेनाल्डो हान प्रिन्सेस्स द पोलिग्नाला भेटणार आहे. प्रिन्सेस्स ग्रासेची मैत्रीण आहे हे प्रूस्तला ठाऊक होतं. त्यान रेनाल्डेला सांगितलं की त्याच्या वतीनं रेनाल्डोनं प्रकाशनाच्या पुढील व्यवस्थेबाबत प्रकाशकाशी तिनं अनौपचारिकरित्या बोलावं अशी विनंती करावी. तथापि, त्याच दिवशी ग्रासेचं पत्र त्याच्या हाती पडलं. त्याच्या कादंबरीचा दुसरा खंड केव्हा प्रकाशित करण्याचा त्याचा विचार आहे अशी विचारणा त्यानं केली होती. साहजिकच, रेनाल्डोला केलेली विनंती बाद केली, ४ ला ग्रासेला पत्र लिहिलं आणि 'एन्आरएफ्'कडे पुढील खंड तो देणार असल्याचं स्पष्टपणे कळवलं.' याला संमती देणं तुला शक्य आहे किंवा नाही याबाबत



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

निर्णय घेणं मी तुझ्यावर सोपवतो.' प्रूस्तच्या पत्रानं ग्रासे चक्रावला. प्रूस्तच्या भावनांचा आदर करण्याऐवजी कराराच्या बळावर कादंबरी न सोडण्याची चुकीची खेळी तो खेळला. त्याच्या पत्रानं आपल्याला दु:ख झाल्याचं प्रूस्तनं कळवलं. त्याला उत्तरादाखल पाठवलेल्या पत्रात ग्रासेनं शहाजोगपणे लिहिलं की प्रूस्तला जे चांगलं वाटतं ते त्यानं करावं, करारामधून त्यानं प्रूस्तची मुक्तता केली आहे,. त्याची मर्जी असल्यासच त्यानं करार पाळावा अशी इच्छा प्रदर्शित केली. औदार्याच्या या स्पर्धेत प्रूस्त हरला. त्यानं जिदला व्यथित होऊन सांगितलं, त्याला ग्रासेबरोबरच रहावं लागणार आहे.

आणखीन एक सुखद धक्का प्रूस्तला बसला. 'स्वान'ला मिळालेलं अनपेक्षित यश पाहून 'फासक्यूएल्व'नं त्या कादंबरीचे पुढील खंड प्रकाशित करण्याची तयारी दर्शवली. मॉरीस रोस्तांमार्फत आपला हा प्रस्ताव त्या संस्थेनं प्रूस्तपुढं मांडला. परंतु तो प्रूस्तनं फेटाळून लावला. एका व्यावसायिक प्रकाशकाकडून दुसऱ्या व्यावसायिक प्रकाशकाकडे जाण्यानं काही फारसं साधलं जाणार नव्हतं. 'एन्आरएफ्'ची गोष्ट वेगळी होती. हुषार आणि आदर्शवादी लोकांचा तो ग्रुप होता. त्याचं ते 'स्पिरिच्युअल' घर होतं. त्यानं त्यांना नकार कळवला होता, आत्मसन्मानापोटी, अहंभावापोटीही असेल. त्यांची कळ दाबून त्यांच्याकडून बोलावणं येण्याची वाट पाहाणं त्याला उचित वाटत होतं. परंतु, ग्रासेच्या प्रकाशनसंस्थेमधील त्याचं स्थान कौतुकास्पद नव्हतं. तो त्याचं हस्तलिखित न वाचताच प्रकाशित करणार होता. भाडं देऊन आपलं काम साधणं असं त्याच्या व्यवहाराचं स्वरूप होतं. कादंबरीची साहित्यमूल्यं वगैरे त्याच्या खिजगणतीत नव्हती. तो एक हाडाचा प्रकाशक होता. साहित्याबद्दलचं त्याचं प्रेम नि:स्वार्थी नव्हतं. त्याच्या लेखकांच्या प्रतिभेवरील विश्वासापोटीही तो प्रकाशन करत नव्हता. आपल्या संस्थेला आस्थिक स्थैर्य लाभावं यासाठी तो प्रयत्नशील होता. 'स्वान'ची विक्री समाधानकारक होती. डिसेंबरच्या सुरुवातीला तिची दुसरी आवृत्ती काढण्याचं त्यानं ठरवलं होतं. त्यासाठी पैसे खर्च करण्याची तयारी त्यानं दर्शवली होती आणि प्रूस्तला दहा टक्के मानधनही त्यानं दिलं होतं.

प्रूस्तच्या त्याच्या कादंबरीसाठीची मोहीम आता यशस्वीरित्या संपली होती. बरीचशी परीक्षणं छापून आली होती आणि तीसुद्धा अनुकूल, 'गॉकूर अकादमी'ला त्याच्या अस्तित्वाची जाणीव झाली होती, ज्ञान आणि अज्ञात एकनिष्ठ वाचक त्याला लाभले होते आणि 'फाक्यूएल्ल' आणि 'एन्आरएफ्' यांना त्यांच्या चुकीचा पश्चात्ताप झाला असल्याचं त्यानं पाहिलं होतं. प्रस्थापित नसलेल्या लेखकाच्या पहिल्या कादंबरीची विक्री होते त्याहून 'स्वान'ची विक्री बऱ्यापैकी होती. जानेवारीमध्ये तिसरी आणि चवथी आवृत्ती बाजारात आल्या होत्या आणि महायुद्ध सुरु होण्याआधी आणखीन दोन यावयाच्या होत्या. प्रूस्तला सोडून देण्यास आपली तयारी नाही हे सांगून ग्रासेनं आपलं खरं मत प्रदर्शित केलं. (कारण, प्रूस्त



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

हा एक किंमती 'ॲसेट आहे असं त्याला जाणवलं नसतं तर, त्याला परस्पर बाजूला करण्याची सुवर्णसंधी 'एन्आरएफ्'च्या ऑफरनं दिली असता त्यानं ती गमावली नसती) आणि स्वखर्चानं उरलेले खंड छापायचं आणि मानधन वाढवण्याचं मान्य केलं. 'स्वान' ही 'बेस्ट सेलर' खचितच नव्हती परंतु, तिचं पहिलं प्रकाशन अयशस्वी होतं, तिच्याकडे कुणाचं लक्ष गेलं नव्हतं, किंवा प्रूस्त स्वतःच नाखूष होता हा सर्वसामान्य समज निखलस चुकीचा होता.

कादंबरीचा दुसरा खंड ऑक्टोबरपर्यंत तयार होईल असा प्रस्तूचा समज होता. सांप्रत 'स्वान' मध्ये समाविष्ट न केलेली छापील पृष्ठं होती. परंतु हस्तलिखिताचा त्यापुढील भाग अद्याप पूर्णपणे टाइप करून झाला नव्हता. प्रूस्तनं आता दृढ निश्चयानं आणि आत्मविश्वासानं लेखनासाठी पुन्हा बैठक घातली. परंतु नेमक्या याच वेळी एका अघटित घटनेनं विकल केलं. त्याचा सेक्रेटरी, लाडका आगोस्तिनेल्ली त्याला सोडून गेला. त्यानं मित्रांना लिहिलं की पुस्तक प्रकाशनाच्या सुखापासून 'प्रचंड दुःखानं' त्याला वंचित केलं आहे. परंतु, त्याच्या भोगाचं स्वरूप मात्र त्यानं उघड केलं नव्हतं, ते अचूक हेरलं फक्त मॉन्तेस्क्युइउनं.

कादंबरीमधील बंदिवान आल्बेरटाइन हिच्याबरोबरच्या निवेदकाप्रमाणंच प्रूस्तच्या यातनाही दुपदरी होत्या. पहिली होती असूया- पण कुणासाठी आणि कशाची? आगोस्तिनेल्ली समलिंगरती होता. तरुण पुरुषांबरोबरच्या भेटीगाठी त्याच्या मालकाच्या जुलमाहून त्याला कमी खडतर वाटत होत्या आणि म्हणून त्याला त्यातून सुटका हवी होती? शक्यता आहे. पण तेवढा बळकट पुरावा मात्र नाही, अनुमान करता येणं मात्र शक्य आहे. एमिल स्ट्रॉसला प्रूस्त म्हणाला होता की आगोस्तिनेल्लीचं त्याची 'बायको' ॲना हिच्यावर प्रेम आहे पण तो तिच्याशी इमानी नाही-' जे तिला माहीत नाही, ती अत्यंत मत्सरी आहे. आणि तिनं त्याचा जीव घेतला'- हे विधान अधिक स्वाभाविक स्पष्टीकरण सूचित करतं. आगोस्तिनेल्लीची पत्नी आणि मालक यांच्याशी असलेली बेईमानी स्त्रियांच्या संदर्भातील होती, आणि त्यांच्याकडून मिळणाऱ्या सौख्यात 'नॉर्मल' प्रेमाचा वाटा नसावा ही प्रूस्तची धास्ती होती. आगोस्तिनेल्लीला ऑगस्ट १९११ मध्ये त्यानं तातडीनं पॅरिसला आणलं होतं कारण समुद्रकिनाऱ्यावर त्याला 'फ्लर्ट' करताना त्यानं पाहिलं होतं आणि त्याला कळून चुकलं होतं की बिच्चारी ॲनाच फक्त नव्हे तर साऱ्या स्त्रियाच त्याच्या प्रतिस्पर्धी आहेत. आगोस्तिनेल्लीच्या हालचालीवर पाळत ठेवण्याच्या दृष्टीनं डिटेक्टिव्हांविषयी त्यानं आल्बेर नाहमिआपाशी विचारणा केली होती. (कादंबरीमध्ये चार्ल्स मोरेलवट आणि निवेदक-आल्बेरटाइनच्या मते-आल्बेरटाइनवर पाळत ठेवतो) त्याची दुसरी यातना होती, निवेदकाप्रमाणेच, आगोस्तिनेल्लीचा बंदिवास संपत आल्याची जाणीव. या मस्तकलंदर मालकाविषयी आपुलकी, जिव्हाळा असूनही; नैतिकदृष्ट्या, आर्थिकदृष्ट्या त्यानं



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

केलेल्या मदतीबद्दलं कृतज्ञता असूनही, तो तरुण माणूस सुटका करून घेण्याचे आणि स्वतंत्रपणे स्वत:चं जीवन जगण्याचे बेत आखत होता.

बहुधा, १९१३ च्या ऑक्टोबरमध्ये विमानउड्डाणाचं शिक्षण घेण्याचा आपला बेत आगोस्तिनेल्लीनं जाहीर केला असावा. शक्यता आहे, व्यूक येथे शिक्षण घेण्याची त्याची इच्छा असावी. म्हणजेच त्याच्या धन्याला तो पूर्णपणे सोडून जात नव्हता आणि त्याच्या ट्रेनिंगसाठी प्रूस्तचा ठाम विरोध असलेला पाहून त्याच्या ध्यानी आलं होतं की, संबंध पूर्णपणे तोडून टाकणं अटळ होणार आहे. ही वेळ आली नोव्हेंबरच्या मध्यावर, जेव्हा 'द्यू कोते द शे स्वान' नुकतीच प्रसिद्ध झाली होती आणि तिच्या प्रकाशनाचा आनंद घेण्याच्या मन:स्थितीत आपण नसल्याचं त्यानं मित्रांना सांगितलं होतं आणि डिसेंबरच्या पहिल्या आठवड्यात आगोस्तिनेल्ली पळून गेला, त्याच्या मूळच्या घरात आणि त्याच्या कुटुंबियांच्या सहवासात शांतता आणि स्वातंत्र्य अनुभवण्यासाठी. त्यानं त्याच्या गावी रिव्हिएराला आसरा घेतला तेव्हा नोकरीत असताना प्रूस्तकडून मिळालेले भरपूर पैसे त्याच्या खिशात होते. मार्सेल स्वान या नावानं त्याने 'फ्लाईंग स्कूल' मध्ये प्रवेश घेतला. एकाकीपणा आणि आगोस्तिनेल्लीचा बेईमानीपणा यांनी प्रूस्त विव्हळला. त्यानं परत यावं यासाठी प्रूस्तनं त्याच्या विनवण्या केल्या, प्रसंगी धमकावण्याही दिल्या. एका पत्रात तर लिहिलं, 'विमान अपघातात सापडण्याचं दुर्दैव (परमेश्वर करो, तसं न घडो) तुझ्या नशिबी आलं तर तुझ्या बायकोला सांगून ठेव की मी तिला मदत करणार नाही, किंवा तिच्याशी मैत्रीचे संबंध ठेवणार नाही, किंवा माझ्याकडून तिला अर्धी पेनीदेखील मिळणार नाही.' तुफान वेगाचं आगोस्तिनेल्लीला असलेलं बेफाम आकर्षण म्हणजे मृत्यूबद्दल सुप्त प्रेम; हे प्रूस्तला जाणवलं असल्यामुळे दु:चिन्हाची पाल त्याच्या मनात चुकचुकली होती. १९०७ मध्ये त्यानं लिहिलं होतं : 'माझ्या तरुण मेकॅनिकचं स्टिअरिंग-व्हिल त्याच्या होतात्म्याची पूर्वसूचना देण्यापरीस त्याच्या टॅलेन्टचं प्रतिक म्हणून राहो !' बहुधा, त्याच्या मरणाची निंद्य तरीही अनावर इच्छा त्याच्या मनी बळावली असावी. अशी इच्छा बऱ्याच असहाय्य प्रेमिकामध्ये उत्पन्न होते. त्यांना वाटतं, जिवलगाच्या मृत्यूनं त्याची यातनेमधून मुक्तता करावी. कादंबरीमधील निवेदक सांगतो : 'आल्बेरटाइन जर का अपघातात सापडली असती आणि जिवंत राहिली असती, तर तिच्यापाशी धाव घेण्याची सबब मला मिळाली असती; ती मेली असती तर जगण्याचं माझं स्वातंत्र्य मला पुन्हा मिळालं असतं ! आणि त्याला आठवतं की ऑडेट्टच्या मृत्यूनं आपली मुक्तता होईल ही इच्छा स्वानच्या मनातही डोकावली होती. 'तो जर का अद्याप जिवंत असता तर मी त्याला सांगितलं असतं, थोड्या कालावधीनंतर, की त्याची इच्छा ही केवळ क्रिमिनल नाही तर विसंगतही आहे, त्याचे जिच्यावर प्रेम आहे त्या स्त्रीच्या मृत्यूनं त्याची कशामधूनही सुटका होणार नाही.' निवेदक मादम बॉन्ताला लाच देऊन



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

आल्बेरटाइनला माघारी आणण्यासाठी साँ लू याला टूरलिनला पाठवतो. त्याचप्रमाणे आगोस्तेनेल्लीला माघारी घेऊन येण्याची कामगिरी प्रूस्तनं आल्बेर नाहमियास याच्यावर सोपवली. त्याचं व त्याच्या नातेवाईकाची मतं वळवण्याचे डावपेच त्याला सांगितले. पण निवेदकाप्रमाणे फरारी इसमास पैसे देण्यास मात्र मना केले. परंतु त्याचे डावपेच अपयशस्वी ठरले. प्रूस्तची पत्रं गेली, तारा गेल्या. आगोस्तिनेल्लीनं त्याला उत्तरंही दिली. त्याच्या पत्रांचा सूर आल्बेरटिननं निवेदकाला लिहिलेल्या सीधासाध्या तरी भारदस्त आणि प्रेमळ पत्रांमधून स्पष्टपणे ऐकू येतो. एवढ्या विनवण्या करूनही तो माघारी काही आला नाही. प्रूस्तनं ॲनाला दोष दिला : 'विमान उड्डाणास प्रतिबंध करण्यासाठी जे करणं शक्य होतं ते सारं मी केलं, पण त्याच्या बायकोनं ठाम समजूत करून घेतली होती की तो लाखो रुपये कमावणार आहे.'

'ल कोते द गॅर्मांत'वर काम करणं आवश्यक होतं. 'द्यु कोते द शे स्वान'च्या पुढील जाहिरातींची व्यवस्था करायला हवी होती. परंतु, प्रूस्त उदासीन झाला, झुरत राहिला, क्लेश भोगत राहिला. त्यानं एका नव्या टायपिस्टची नेमणूक केली. त्यानं टाईप केलेल्या प्रतीवर संस्करण करण्यासाठी धडपडू लागला. जाक-एमिल ब्लांश या त्याच्या जुन्या मित्रानं 'स्वान'वरील प्रतिकूल टीकेला सडेतोड उत्तर देणारा लेख लिहिला होता. इस्टरच्या सुटीनंतर 'ले को द पारी' मध्ये तो छापवून आणण्याचा प्रूस्तचा विचार होता. कारण वाचकांचं लक्ष वेधलं जावं हा त्याचा हेतू साध्य होणार होता. त्याच्या इच्छेनुसार तो लेख त्या अंकात छापूनही आला आणि त्या लेखाचे प्रतिसाद इतर वृत्तपत्रांमधून यावेत या कामाला तो लागला. त्यानं त्यासाठी मसुदे तयार केले. त्यात स्वत:चं आणि ब्लांशचं कौतुक केलं. आपलं हस्ताक्षर ओळखलं जाईल म्हणून ते मसुदे ग्रासेकडून नकलून घेण्याची खबरदारी घेतली. नंतर 'ला फिगरो', 'गिल ब्लास', 'डेबट' आणि अन्य वृत्तपत्रांकडे ते पाठवून दिले. मित्रांना सांगितलं, याचा सारा खर्च ग्रासे करत आहे. ग्रासेनं पैसे खर्चले खरे पण दुसऱ्या हातानं प्रूस्तकडून ते वसूल करत राहिला.

'ल कोते द गॅर्मांत'ची मुद्रणप्रत छपाईसाठी मे महिन्यापासून ग्रासेकडे पाठवायला सुरुवात झाली असावी. पूर्वीप्रमाणंच आताही त्याचा या आगामी खंडामधील काही भाग प्रकाशित करण्याचं त्यानं ठरवलं. 'स्वान'च्या यशामुळे आता 'साभार परती'ची भीती नव्हती. एप्रिलमध्ये जिदनं हे प्रदीर्घ उतारे 'नुव्हेल्ल रव्ह्यू फ्रान्सोइज' मध्ये प्रसिद्ध करण्यासाठी मागितले. ७ मेच्या सुमारास प्रूस्तनं 'रिव्हिएर'चा पहिला हप्ता पाठवला. यात गेल्या वर्षीच्या गॅलीमधून बाल्बेकच्या पहिल्या भेटीचा मजकूर-रात्रीचा प्रवास, आगमन, मादम द व्हिलपारिसिसच्या बग्गीमधला प्रवास, साँ लू आणि बारॉं द चार्लस् यांच्या गाठीभेटी- संक्षिप्त करून पाठवला. हा हप्ता १ जूनच्या अंकात प्रसिद्ध झाला. १३ जून रोजी दुसरा हप्ता पाठवला, तो 'एम्आरएफ्'च्या १ जुलैच्या अंकात छापून आला.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दरम्यानच्या काळात प्रूस्तवर भयंकर अरिष्ट कोसळलं. शनिवारी, ३० मे १९१४ रोजी सायंकाळी पाच वाजता आगोस्तिमेल्जीनं एकट्यानं विमानोड्डाण केलं. एकट्यानं उड्डाण करण्याची त्याची ही दुसरीच खेप. जोसेफ गारबेरोचा मुख्य इन्स्ट्रक्टरनं विमान विमानतळाच्या परिसरातच फिरवण्याची ताकीद या सुसाट वेगाची आवड असणाऱ्या वैमानिकाला दिली. आगोस्तिनेल्लीचं विमान आकाशात उंच झेपावलं. त्याची बायको आणि त्याचा भाऊ त्याचं कौशल्य कौतुकानं पाहू लागले आणि आगोस्तिनेल्लीचा विमानावरचा ताबा सुटला. विमान गिरक्या घेत समुद्रात कोसळलं. किनाऱ्यापासून साधारण पाव मैलावर. आगोस्तिनेल्लीला पोहता येत नव्हतं. आपला जीव वाचवावा म्हणून जिवाच्या आकांतानं त्यानं हाका मारल्या. त्याचा आकांत आसमंतात घुमला. त्याला वावण्यासाठी बोट समुद्रात घुसली. पण ती अपघात स्थळी पोचण्याआधीच विमान आणि वैमानिक यांनी जलसमाधी घेतली.

त्या दिवशीच संध्याकाळी ॲनानं पाठवलेल्या तारेकवरून प्रूस्तला या दुर्घटनेची बातमी कळली. दुसऱ्या दिवशी सकाळी 'फिगरो'च्या सातव्यापानावर त्या घटनेचे तपशील त्याच्या वाचनात आले. आगोस्तिनेल्लीचं पत्रही त्याच्या हाती पडलं. त्यानंतर एखाद दुसऱ्या दिवसांनी त्याचा सावत्र भाऊ जाँ वित्तोरे १०२ बुलेव्हार होस्समानवर आला आणि प्रूस्त त्याच्या बाहूपाशात ढसढसा रडला.

शनिवारी दिवस मावळेपर्यंत बोटींनी आगोस्तिनेल्लीच्या मृत देहाचा शोध घेतला, परंतु, तो सापडू शकला नाही. रविवारी संध्याकाळी विमानाचे अवशेष किनाऱ्याला लागले पण त्यात वैमानिक नव्हता. ॲनानं आत्महत्त्येचे पुन:पुन्हा प्रयत्न केले. विधवेचे कायदेशीर हक्क तिच्या पतीच्या कुटुंबियांकडून नाकारण्यात आल्यामुळे प्रूस्तनं तिला स्वत:च्या संरक्षणाखाली घेतलं. मोनॅकोचा प्रिन्स आल्बर्ट याच्याकडे या संदर्भात शब्द टाकण्याची त्यानं एमिल स्ट्रॉसला विनंती केली. ती त्याची कायदेशीर पत्नी नसून केवळ एक रखेली होती हे त्याच्या कुटुंबियांकडून कळल्यावर त्याला आश्चर्याचा धक्का बसला. त्यानं एमिल स्ट्रॉसची व त्याच्या मार्फत प्रिन्सची माफी मागितली. पण ठाम शब्दात सांगितलं की ॲना रखेल असेलही, पण 'मृताबद्दलचं तिचं प्रेम आणि तिच्याबरोबरचे त्याचे संबंध अनेक कायदेशीर विवाहांहून अधिक जिव्हाळ्याचे होते.'

रविवारी ७ जूनला एका मच्छिमार-बोटीला आगोस्तिनेल्लीचा सडलेला मृतदेह काग्नेस येथे आढळला. विमान अपघात झाला होता त्या स्थळापासून सहा मैलावर. दुसऱ्या दिवशी त्याच्यावर अंत्यसंस्कार झाले. त्याच्या पुष्पचक्र वाहाण्यासाठी प्रूस्तनं ४०० फ्रँक पाठवले. ज्याच्यावर प्रूस्तनं जसं जिवापाड प्रेम केलं होतं तसं अन्य कुणावरही केलं नव्हतं, त्या बेडर, बुद्धिमान आणि दुसऱ्याचं भलं चिंतणाऱ्या तरुणाचा असा करूण शेवट झाला.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

ही घटना प्रूस्तनं नेमक्या कशाप्रकारे घेतली हे कळणं अवघड आहे. त्याच्या कादंबरीमधील आल्बेरटाइनसाठी नायकाला झालेल्या शोकाचं जे वर्णन त्यानं केलं आहे त्यावरून अंदाज करता येणं शक्य आहे. आगोस्तिनेल्ली ही वास्तवातील व्यक्ती आणि आल्बेलटाइन हे काल्पनिक पात्र, दोघांचाही अपघाती मृत्यू झाला आहे. प्रूस्त आणि कादंबरीमधील मार्सेल एकाच प्रकारे वागले, बराच काळ क्लेश भोगत राहिले, त्यातून स्वत:ची सुटका करून घेण्यासाठी झगडत राहिले आणि विस्मृतीच्या अंजनानं स्थिरावले. कहाणीमध्ये साम्य आहे, तरीही कादंबरीमधील कहाणी प्रूस्तनं शक्य होईल तेवढ्या वेगळेपणानं मांडली आहे. सर्वसाधारण मानसशास्त्रीय सिद्धांत विशद करण्यासाठी तिचं चित्रण केलं आहे. ती कहाणी त्याची स्वत:ची नाही तर कुठल्याही एखाद्या माणसाला झालेल्या दु:खाची आहे. एक सार्वत्रिक मानवी अनुभव आणि तसाच तो वर्णिलेला आहे. आपण निश्चितपणे एवढं म्हणू शकतो की बुलेव्हार हॉस्सामानमध्ये आगोस्तिनेल्ली असताना प्रूस्तनं जसे मानसिक क्लेश भोगले होते तेवढेच तीव्र आणि दीर्घकालीन क्लेश त्याच्या मृत्यूनंतर तो भोगत राहिला. त्याला झालेल्या शोकाबद्दल त्यानं मित्रांना लिहिलं परंतु या दु:खद घटनेनं प्रत्यक्षात केवढा आघात केला आहे याचा उच्चार न करण्याची दक्षता त्यानं घेतली. जिदला पाठवलेल्या पत्रात त्यानं लिहिलं की, या क्षणी तो एवढा दु:खी आहे, याचं कारण त्याच्या इतर मित्रांपेक्षा त्याला आगोस्तिनेल्ली अधिक प्रिय होता. त्या पोराचं मन आनंदी होत, पण तेवढ्यासाठीच मला आवडत होता असं नाही. माझ्या ध्यानी यायला तसा विलंब लागला, त्याच्यामध्ये मला कार्यक्षमता आढळली होती, तो जसा होता त्या साऱ्या गोष्टींना न साजेल अशी, पण त्यामुळे काही त्याच्याबद्दल मला वाटणाऱ्या जिव्हाळ्यात भर पडली नव्हती. मला तिचा शोध लागल्यानंतर, त्याच्या ते निदर्शनास आणून देण्यानं मला मिळाला होता तो कसा होता हे त्याला खरोखरीच कळून येण्याआधीच त्याचा अंत झाला. अवघी बाबच एवढ्या भीतीदायक परिस्थितीनं घेरली आहे, मी उद्ध्वस्त झालो आहे, हे असलं दु:ख मी कसा सहन करू शकणार आहे मला माहीत नाही.' पुढं लिहिलं की तो कामाला कधी लागेल याचीही त्याला कल्पना नाही. 'ल कोते द गॅर्मांत'ची प्रुफे तर दररोज येतच आहेत आणि ती न उघडताच त्यांच्या खोलीत तशीच पडून आहेत. मॉन्तेस्क्युईला पाठवलेल्या पत्राचाही सूर असाच आहे. त्यानं लिहिलं, 'माझं स्वत:चं सांत्वन मी करू शकत नसलो तरी विधवेचं सांत्वन करण्याइतपत बळ माझ्यापाशी आहे.' त्यानं बोलावल्यावरून ॲना त्याच्याकडे जूनच्या मध्यावर आली आणि जुलैच्या प्रारंभी निघून गेली. त्या दोघांनी एकाच पुरुषावर प्रेम केलं होतं आणि ती दोघं समदु:खी होते.

प्रूस्त त्याच्या शोकात बुडालेला असला, कादंबरीच्या कामाकडे तो लक्ष देत नसला तरी, दुर्लक्ष करता येण्याजोगी एक गोष्ट होती : त्याची आर्थिक गुंतवणूक. संपूर्ण युरोपमध्ये



अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

बजबज पुरी माजलेली. युद्धाचं सावट. रोखे धीमे धीमे घसरत चाललेले. त्याची आर्थिक हानी एव्हाना पोटात गोळा आणण्याइतपत झालेली. त्यानं ठरवलं, मार्केटमध्ये भाव वधारताच रोखे विकून टाकायचे. पण भाव वधारलेच नाहीत. आयुष्यात प्रथमच त्याला जाणवलं की अन्य प्रकारे काहीतरी पैसे मिळवायलाच हवेत. त्यानं रॉबेर द फ्लेरला. आता 'ल फिगरो' मध्ये त्यानं कालमेत्तची जागा घेतली होती. प्रूस्तनं त्याला सांगितलं की, कुठल्याही प्रकारचं काम आपल्याला देण्यात यावं. रॉबेरकडून त्याला अपेक्षित प्रतिसाद मिळाला नाही. परंतु 'ल कोते द् गॅर्मांत' मधील एखादं मोठं प्रकरण दहा हप्त्यात क्रमशः प्रसिद्ध करण्याची तयारी त्यानं दर्शवली. १५ जुलैच्या अंकात 'ओडेट्ट मारीए' या शीर्षकानं एक प्रकरण प्रसिद्ध होणार असल्याचं जाहीरही करण्यात आलं. परंतु ते सुरु होण्याआधीच फ्रांस युद्धात उतरलं. प्रूस्तनं त्याचे काही रोखे विकून टाकले. लाभ काहीच होऊ शकला नाही. या अनर्थकारक आर्थिक उलाढालीमध्ये आपण कंगाल झालो असल्याचं त्याला लखखपणे जाणवलं आणि प्रिय मित्राच्या हानीबरोबरच आर्थिक हानी झाली म्हणून म्हणून शोक करण्याची दुर्धर परिस्थिती त्याच्यावर ओढवली.

**प्रकरण : सतरा**

प्रूस्त उदास होता, आजारी होता. त्याच्या जिवलग मित्राच्या मृत्यूच्या धक्क्यातून अद्याप सावरलेला नव्हता. स्टॉक मार्केट कोसळल्यामुळे त्याला आर्थिक फटका बसला होता. तशात युद्धाची ठिणगी पडली. सुरुवातीला युद्धानं तो फारसा अस्वस्थ झाला नाही. त्याचा भाऊ सैन्यात दाखल झाला त्याला निरोप देऊन तो पॅरिसमध्येच राहिला. त्याची भावजय आणि पुतणी यांना काय हवं, नको ते पाहू लागला. परंतु, ती दोघं सुरक्षितपणे शहराबाहेर निघून गेल्यानंतर उन्हाळ्याची सफर काबुर्गला करण्याचा विचार त्याच्या मनात घोळू लागला. नाईसला जाणं त्याला आवडलं असतं. तिथं आगोस्तिनेल्लीच्या थडग्याला तो भेट देऊ शकला असता. तिथं जायचं असं त्यानं ठरवलंही. परंतु, तिथं जाण्यासाठी तीसेक तास प्रवास करावा लागणार हे समजल्यावर त्यानं तो बेत रद्द केला, कार्बुगला जाण्याचा बेत पक्का केला. तथापि, हा प्रवासही तेवढाच तापदायक ठरला. पाच तासाच्या प्रवासाला तब्बल बावीस तास लागले. चेंगराचेंगरीत जीव गुदमरून गेला. सेलेस्तसह काबुर्गला नेहमीप्रमाणं 'ग्रां हॉटेल' मध्ये १४७ नंबरच्या खोलीत उतरला. इथंच तो प्रथम आगोस्तिनेल्लीला भेटला होता. एकोणिस वर्षाच्या त्या देखण्या तरुणानं त्याला नॉर्मंडीमधून हिंडवलं होतं. आता, जिथं तिथं त्याची दृष्टी जात होती ती प्रत्येक गोष्ट, अगदी सागर किनाराही, त्या मित्रासमवेत घालवलेल्या सुखद दिसांची आठवण करून देत होती; वाटत होतं, मरून जावं.

तथापि, जर्मन सैन्य आस्ते आस्ते पुढं सरकू लागलं. जनतेमध्ये हलकल्लोळ माजला.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

तेव्हा त्याचं चित्त वर्तमान काळाकडे वळणं अटळ झालं. कोणत्याही क्षणी शत्रूच्या हाती पडेल याची खात्री झाल्यामुळे धास्तावलेल्या सोसायटी जनांनी कार्बुगला धाव घेतली. कॉम्प्तेस्स द ग्रेफ्फुल्ल आल्या आल्या प्रूस्तच्या भेटीला गेली. परंतु त्याला बरं नसल्यामुळे त्यांची भेट होऊ शकली नाही. तिच्यासंगे एक पुरुष असल्याचं त्याला समजलं. तो मॉन्तेस्कुइउ असल्याचं मात्र त्याला नंतर कळून आलं. राजधानीतून पळ काढताना या कवीचे अतोनात हाल झाले होते. तिसऱ्या वर्गाच्या डब्यातील चोवीस तासाच्या प्रवासानं त्याला पुरता बेजार करून टाकलं होतं. तशात स्वत:चं सामानसुमान त्याला स्वत:च वाहून न्यावं लागलं होतं. शहरामध्ये आता जुन्या ओळखीच्या चेहऱ्याबरोबर नवे चेहरेही दिसू लागले. त्यात जखमी सैनिकांचीही भर. प्रूस्त थोडं बरं वाटू लागताच त्यांच्या प्रकृतीची चौकशी करायला दररोज बाहेर पडू लागला. त्यांना भेटवस्तू देत राहिला, धीराचे चार शब्द बोलू लागला. त्याच्या मनात आलं, या सैनिकांचे देह जखमांनी सडल्यागत झालेत खरे, पण आपल्यापेक्षा ते किती दणकट आहेत.

प्रकृती बरी असल्यास प्रूस्त त्याच्या खोलीबाहेर पडू लागला. कारण एकटेपणा त्याला खायला उठू लागला होता. रात्री तो त्याच्या मित्रासंगे गप्पागोष्टी करत बसायचा आणि ते झोपायला गेल्यानंतर रात्रपाळीच्या पहारेकऱ्यांशी बोलत राहायचा. त्याचं दु:ख विसरायला लावण्यात या गप्पागोष्टी निश्चितच सहाय्यभूत ठरल्या आणि खरोखरीच त्यानं पॅरिसची वाट धरली तेव्हा विस्मृतीच्या विळख्यात आपण सापडलो असल्याच्या विचारानं तो धास्तावला. गाडीत त्याला दम्याचा एवढा जोरदार अटॅक आला की त्याची वाचा तो हरवून बसला. त्याची औषधंही त्याला सापडेनात. वस्तुत: ती त्याच्या एका ट्रंकेतच ठेवलेली होती. त्याची दशा पाहून त्याच्या सेवकाचे हातपाय गळाले. अखेरीस त्यानं वाटेत आडवा आलेल्या गार्डास बाजूला सारलं आणि 'लगेज व्हॅन'मध्ये गेला, औषधं घेऊन परतला, तेव्हा कुठं त्याचा जीव भांड्यात पडला. परंतु एका बाबतीत आपण सुखी आहोत असं तो समजत होता. सुखी एवढ्यासाठी की त्याच्या लाडक्या मित्राला तो खरोखरीच विसरून गेला नव्हता आणि पूर्वीप्रमाणेच तो आजही उदास उदास राहू शकत होता.

तथापि, दिवसामागून दिवस जाऊ लागले तसतसा त्याला मित्राचा विसर पडत गेला. आता युद्धानं त्याचं मन व्यापून टाकलं. त्यानं एक नकाशा विकत आणला आणि सैन्यानं व्यापलेल्या जागांवर खुणा केल्या. नित्यनेमानं वृत्तपत्रामधील युद्धवार्ता वाचू लागला. अधिकृत वृत्तांतामध्ये उघड न केलेली गुपितं हुडकून काढण्याचा प्रयत्न करू लागला. लष्करी भाष्यकारांची विश्लेषणं अभ्यासून त्यानुसार स्वत:ची व्यूहरचना करू लागला. तो वाचत असलेल्या लेखात 'Kulture' बद्दल तीव्र नापसंती दर्शवलेली असे, वॅग्नरचा धिक्कार केलेला असे आणि जर्मनांचं वर्णन 'Boches' सपारी घेतलेले मूर्ख गुंड असं केलं जात



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

असे. सांप्रत फॅशनेबल असलेल्या या पिष्टोक्ती त्याच्या मस्तकात जात वृत्तपत्रीय राष्ट्रप्रेमाच्या या बिनडोकपणानं त्याच्या रागाचा पारा चढत असे. त्याला कैकदा वाटायचं, फ्रान्स जाणूनबुजून स्वत:चा विश्वासघात करत आहे, स्वत:च्या स्फूर्तिस्रतोतापैकी एका स्रोताचा गळा दाबत आहे. परिणामी, रणमैदानावर मिळालेल्या विजयावर डांबर फासत आहे. त्यानं स्वत:ला प्रश्न केला, जर का जर्मनीबरोबर युद्ध न होता आपले युद्ध रशियाशी झालं असतं तर टॉलस्टॉय आणि डोस्टोएव्हस्की यांच्याबद्दल त्यांनी काय उद्गार काढले असते? पुढं जेव्हा पॉल साऊदेनं आपल्या या वृत्तपत्रीय सहकाऱ्यांच्या भोंगळ देशभक्तीवर टीका केली तेव्हा प्रूस्तनं त्याला तात्काळ अभिनंदनपर पत्र पाठवलं.

प्रूस्तला अद्याप वॅग्नर आणि स्ट्रॉस प्रिय होते, सांप्रत मानभावीपणे बोलणाऱ्या लोकांचा त्याला तिटकारा वाटत होता, असं असलं तरी त्याचं देशप्रेम यत्किंचितही उणं नव्हतं. मादम स्ट्रॉसला त्यानं एका पत्रात लिहिलं, 'फ्रान्सवर मी किती प्रेम करतो ते या आधी मला कधीच कळून आलं नव्हतं. त्रुव्हिल नजिकच्या वाटांवर प्रेम करणाऱ्या तुम्ही, तुम्हाला समजेल, जिथं मी कैकदा गेलो आहे तो आमिआँचा प्रदेश, ऱ्हीमचा आणि लाकेनचा प्रदेश, यांना माझ्या लेखी किती मोल आहे ----- परंतु या असल्या बाबींहून आपण माणसांवर अधिक प्रेम करायला हवं आणि सैनिकांसाठी मला अधिक रडू येतं आणि त्यांच्याविषयी अधिक आदर वाटू लागते, चर्चपेक्षाही जिथं केवळ वीरश्रीयुक्त भावनेची अभिव्यक्ती असते, तिचीच आजकाल क्षणाक्षणाला पुनरुक्ती केली जाते.' काबुर्गहून परतल्यानंतर, 'झेड्' या त्याच्या कुण्या परिचितानं मार्नंच्या रणभूमीला दिलेल्या भेटीचं केलेलं वर्णन त्याच्या कानी आलं. तो पुन:पुन्हा सांगत होता : 'जर्मनांचा तुम्ही पाठलाग केलात, माघार घ्यायला तुम्ही त्यांना भाग पाडलंत.' सुरुवातीसुरुवातीला प्रूस्त अवघडून जात असे. तो जाणून होता, त्यानं स्वत: काहीएक केलेलं नव्हतं. परंतु, त्याच्या जेव्हा ध्यानी आलं की 'झेड्' त्याला सांगत होता की, तोही एक फ्रेंच आहे, त्याला अतिशय भरून येत असे.

प्रूस्तच्या लेखी, युद्ध हा दूरवर रणक्षेत्रावर लढला जाणारा आणि त्यानंतर वर्णन केला जाणारा केवळ एक संघर्ष नव्हता. त्यात त्याचे बरेचसे मित्र गुंतलेले होते आणि आपणही गुंतून पडलो आहोत असं त्याला वाटत होतं, कारण, लष्करातील एक अधिकारी म्हणून नाहीतरी, त्याचा नामोल्लेख केला गेला होता. त्याच्या केसची वैद्यकीय अधिकाऱ्यांनी तपासणी केल्यानंतर लागलीच लष्करी सेवेत हजर राहाण्यासाठी बोलावणं येईल अशी त्याची अपेक्षा होती. असं काही घडून यावं अशी त्याला अर्थातच ओढ नव्हती. शिवाय, यातून त्याला माफ केलं जावं म्हणून सूत्रं हलवण्याचाही विचार त्याच्या मनात तरळून गेला होता. तरीही, आपलं प्रारब्ध जे ठरवील त्याची तो संचितपणे वाट पाहात राहिला. प्रत्यक्षात जेव्हा नियुक्ती केली जाण्याची शक्यता निर्माण झाली तेव्हा त्याच्या अपेक्षेनुसार ती काही



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

भयावह ठरली नाही. कारण, लष्करानं अद्याप अपंगांची भरती करण्याचा निर्णय घेतला नव्हता. त्याची रीतसर तपासणी झाली. तपासणी करणाऱ्या लष्कराच्या डॉक्टरांना त्याच्या कुटुंबियांविषयी काहीच माहिती नव्हती. त्यांची अशी समजूत झाली होती की तो एक वास्तुशास्त्रज्ञ असावा. इतर तपासण्या पुढं केव्हाही घेतल्या जाण्याची शक्यता असल्यामुळे निर्णय बदलण्याची शक्यता होती. त्यामुळे, चिंतेची टांगती तलवार त्याच्यावर सदैव होती. मित्रांचीही चिंता त्याला बैचेन करत होती. त्याचे काही मित्र आघाडीवर होते. काहींचा ठावठिकाणाही त्याला लागत नव्हता. त्यानं त्यांची चौकशी सर्वत्र जारी ठेवली होती, पत्रव्यवहार चालू होता पण त्यांचा ठावठिकाणा लागत नव्हता.

त्याला ज्या काही बातम्या मिळाल्या त्या धक्कादायक होत्या. प्राणहानीच्या वार्ता ऐकून तो अस्वस्थ होत होता. १९१४ च्या शारदात त्याला कळलं की त्याचा भाऊ ज्या हॉस्पिटलमध्ये कामावर होता त्यावर शेल्सचा वर्षाव झाला होता. शेल्स शस्त्रक्रियेच्या टेबलावर कोसळत असताना त्याचा भाऊ जखमी सैनिकांवर उपचार करत होता ही बातमी झळकली आणि प्रूस्त हे नाव सर्वतोमुखी झालं. १९१५च्या जानेवारीमध्ये त्याचा एकेकाळचा जिवलग स्नेही फेनलाँ युद्धाच्या धुमश्चक्रीत बेपत्ता झाल्याचं त्याला समजलं. उपलब्ध होऊ शकलेले पुरावे गोळा करून फेनलाँ अद्याप जिवंत असल्याची तो स्वत:च्या मनाची समजूत घालत राहिला. त्यानंतर १४ जानेवारी १९१५ च्या 'त फिगरो'च्या अंकात त्याच्या वाचनात आलं की त्याचा जुना मित्र गास्ताँ द काईल्लाने मृत्यू पावला आहे. रणभूमीवर नव्हे, आजारानं. त्याला रडू कोसळलं. त्यानं त्याच्या विधवेला सांत्वनपर पत्र लिहिलं पण तिला भेटायचा धीर त्याला होईना. तरीही एक दिवस धीर एकवटून तो तिच्या घरी गेला. रात्रौ अकराच्या सुमारास. घर काळोखात चिडीचूप. टॅक्सी चालू ठेवून तो तिष्ठत राहिला. घरात दिवा लागला नाही. खिडकीत कुणी आलं नाही. पुढं गास्ताँची विधवा त्याला भेटायला त्याच्या घरी गेली. विधवेच्या वेषात तिनं खोलीत प्रवेश करताच मार्सेल हुंदकारला, "माझा लाडका गास्ताँ गेला." आणि रडू लागला. जुनी छायाचित्रं बघताना, हरवलेल्या काळाच्या त्या प्रतिमा पहाताना आसवं ढाळू लागला. गतकाळच्या स्मृतींनी हरखूही लागला. गास्ताँच्या अखेरच्या दिवसांविषयी ती बोलली तेव्हा त्याचे हुंदके अनावर आले. ती म्हणाली, "मला निघायलाच हवं, मार्सेल, मी तुला फार यातना देतेय." - साँ लू मृत्यू पावला होता आणि गिल्बर्ट विधवा झाली होती.

१५ मार्च रोजी सकाळी 'फिगरो' वाचत असताना फेनलॉच्या दु:खद निधनाची बातमी प्रूस्तच्या नजरेला पडली. तो जिवंत असेल ही त्याची आशा धुळीला मिळाली. फेनलाँपाशी असलेल्या त्याच्या कुटुंबियांच्या छायाचित्रांवरून त्याची ओळख पटली होती. त्याला वीरमरण लाभलं होतं. बारा वर्षांपूर्वी त्यानं लिहिलं होतं : 'माझं एकमेव उद्दिष्ट आणि माझा



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

एकमात्र विचार, आमच्या प्रदेशाचं स्वातंत्र्य, आमच्या राष्ट्राची मुक्ती, आणि याला माझा थोडा जरी हातभार लागला, भले ते कुणाच्याही ध्यानी न येवो, मला सुख वाटेल; वाटेल, माझी कामगिरी पार पाडली जाईल.' आपला निश्चय साँ लूनं कधीच बोलून दाखवला नसता. फेनलाँनं त्याचा उच्चार केला होता. अगदी मनापासून. तेवढा अधिकार त्याला होता. त्याच्या वरिष्ठांनी नोंदलवं होतं : 'तो नेहमीच आघाडीवर असायचा, नेहमीच अत्यंत धोक्याच्या ठिकाणी, नेहमीच अगदी शांत, आनंदीही.' फेन लाँ साँ लूचं मरण मेला होता. साँ लूसाही निवेदकानं शोक केला आहे जसा शोक त्यानं ल्सुसिएँ दॉदेला पाठवलेलया पत्रात व्यक्त केला, 'मी अश्रू ढाळतोय, कारण ते सांगतात की तो कैदी असण्याची शक्यता नाही.' दुसऱ्या एका मित्राला लिहिलं, 'मी अखेरपर्यंत त्याच्यासाठी शोक करत राहीन.' त्याच्या जीवनावर आधारित त्यानं त्याची कादंबरी लिहिली होती, पण आता, आगोस्तिनेल्ली आणि फेनलाँ या जगातून गेले आणि जीवनानं त्याची कादंबरी लिहायला सुरुवात केली.

साँ लूच्या अखेरीशी मिळतंजुळतं वीरमरण कॉम्प्त द' ह्युमिएरस या त्याच्या मित्राला लाभलं. तो आता पुरता हादरून गेला. आपल्याला परिचित असलेली नावं दृष्टीला पडायला नकोत म्हणून वर्तमानपत्रावर नजर टाकायलाही तो घाबरू लागला. त्याला वाटलं, आगोस्तिनेल्लीच्या मृत्यूनं आपत्तींची ही अखंड मालिका सुरु झाली आहे. त्यानं क्लेमन्ट द मानग्यू या आपल्या मित्राला लिहिलं, 'तुला ठाऊक नाही, कारण आपली आयुष्यं आता दुरावली आहेत. वर्षापूर्वी माझा एक मित्र मी गमावला, माझी आई आणि माझे वडील यांच्या एवढीच जगात मला अत्यंत प्रिय अशी व्यक्ती. त्यानंतर एका पाठोपाठ मृत्यूची अखंड मालिका चालू आहे.'

३० मे हा आगोस्तिनेल्लीचा पहिला स्मृतिदिन. त्याच्या गावी प्रूस्तची मैत्रिण मादम कातुस्स सांप्रत वसतीला होती. तिला त्यानं लिहिलं की आगोस्तिनेल्लीच्या थडग्यावर वाहाण्यासाठी तिनं एक पुष्पचक्र खरेदी करावं, नजरेत भरेल असं, पण चाळी फ्रँकपेक्षा जास्त किंमतीचं नको. गेल्या वर्षी चारशे फ्रँक किमतीच्या पुष्पचक्राची कशी विल्हेवाट लागली होती याचा त्याला विसर पडला नव्हता. पुढं म्हटलं, 'किती मित्र मी गमावलेत, तुला नाही सांगू शकणार मी. बऱ्याच वर्षात मी त्यांना पाहिलंही नव्हतं. परंतु, दुर्दैवानं विस्मृतीची देणगी मला लाभलेली नाही. रात्रंदिवस मी फेनलॉं आणि द' ह्युमिएरस यांच्यासाठी मी आसवं ढाळत आहे, जणू काही कालच मी त्यांना भेटलोय.'

१९१५ मध्ये प्रूस्तचं आयुष्य पूर्वीपेक्षा अधिक एकाकी होतं. त्याचे मित्र दूर होते सामाजिक जीवन संपुष्टात आलं होतं. त्याच्या घरातही बरेच बदल घडलेले होते. फेलिस आणि झाँ हे प्रूस्त कुटुंबाचे जुने नोकर केव्हाच त्याला सोडून गेले होते. त्यानंतर आलेले





मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

सेलिन आणि निकोलस हे नोकरही निघून गेले होते. सेलिनला प्रूस्तनं हाकललं होतं, निकोलसला लष्करात भरती व्हावं लागलं होतं. युद्ध काळात प्रूस्तनं स्पार्टनासारखं साधं आयुष्य जगायचा निश्चय केला असावा. सांप्रत घरात फक्त एक मोलकरीण होती, सेलस्त. ओदिलाँ आल्बेर या प्रूस्तच्या टॅक्सी-ड्रायव्हरची ही बायको. १९१३ मध्ये त्यांच्या लग्नात तिची ओळख झाली होती. त्यानंतर, ती त्याच्या दृष्टीला पडली होती ती त्याच्या किचनमध्ये. कुठल्यातरी कामानिमित्त ती आली होती. पाहाताक्षणीच त्यानं तिला ओळखलं होतं. उंच, शेलाटी पोरगी. बांधा काहीसा अवघड आणि कांती लायलॅकच्या रंगागत पांढुरकी. हसत हसत आपला हात पुढं करून तो म्हणाला, "आह्, मादम आल्बरे, मार्सेल प्रूस्तशी तुमचा परिचय करून देतो-' अस्ताव्यस्त आणि पिंजारलेले केस- माफी मागायला हवी मी.'' पुढं सेलिन आजारी पडल्यानंतर हाऊसकिपर म्हणून त्यानं तिची नेमणूक केली होती आणि सेलिनशी भांडण होऊन तिला हाकलून दिल्यानंतर तिला कायमची नोकरीवर ठेवली होती. तिच्या कामाची वेळ सकाळी ९ ते दुपारी ४-५ वाजेपर्यंत. त्याच्या झोपायच्या खोलीत तिनं पहिल्यांदा पाऊल टाकलं होतं तेव्हा तिथल्या अंधारानं आणि विचित्र वासांनी ती घाबरून गेली होती. तिच्या खेड्यालगतच्या खाणींच्या वासाचं तिला स्मरण झालं होतं. तिच्या बोलण्यानं प्रूस्त अचंबित झाला होता. त्याला वाटलं होतं, निसर्ग प्रतिमांनी समृद्ध असलेलं शेतकऱ्यांचं काव्य तो ऐकत आहे. नंतर बऱ्याचदा तो तिला बोलावून घेऊ लागला होता आणि दिवसादिवसागणिक ती त्याला अधिकाधिक आवडत गेली होती. ओदिलाँ युद्धभूमीवर गेल्यानंतर तिला आपल्या अपार्टमेंटमध्ये एक खोली दिली होती, आपल्याबरोबर काबुर्गला नेलं होतं आणि पॅरिसला परतल्यानंतर परिचयानं ती त्याची विश्वासू सोबती झाली होती. एका तपापूर्वी त्याच्या आईचं त्याच्या जीवनात जे स्थान होतं. जवळजवळ तशाच प्रकारचं स्थान तिला लाभलं होतं.

सेलस्त त्याला आवडली, कारण एका वेगळ्या विश्वाशी तिनं त्याचा परिचय करून दिला होता. ती त्याच्या खोलीत प्रवेश करायची तेव्हा त्याला वाटायचं, तो पाहात आहे : जिथं ती लहानाची मोठी झाली होती त्या ऑक्सिलेक येथील मिल-हाउस, जिथं तिनं नन्सबरोबर एक वर्ष घालवलं होतं ते ला कॉनूरग्यू येथील कॉनव्हेंट, तिच्या गावची पठारं, आणि दऱ्या आणि धुवाधार पाऊस. तिचे मुड्स त्याला सतत पाण्याचं स्मरण करून देत. ती त्याची थट्टामस्करी करायची तेव्हा एखाद्या निर्झरागत ती आगंतुक असायची, ती संतप्त व्हायची तेव्हा आपल्या काठावर ओसंडून वहाणाऱ्या एखाद्या ओढ्यागत खळखळायची, खवळायची, क्रुद्ध, विध्वंसक, निखालस गर्हणीयं. ती थकून गेलेली असायची तेव्हा ती कोरडं ठणठणीत नदीचं पात्र वाटायची. 'कुठलीही गोष्ट तिला पुन्हा चालना देऊ शकली नसती. नंतर अचानक तिच्या देहातील अभिसरण पूर्वस्थितीवर यायचं, देखणं आणि हलकं



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

फुलकं. तिच्या निळसर त्वचेच्या ओपलसदृश पारदर्शकतेमधून पाणी वाहू लागायचं. ती सूर्याकडे पाहून हसायची आणि अधिकच निळीशार व्हायची; ॲट सच मॉमेन्ट्स शी वॉज ट्रुली सेलेस्टिअल !'

प्रूस्त तिचे मुड्स ओळखायला शिकला, तिच्यावर नियंत्रण ठेवणं जमलं नाही तरी निदान आपल्या स्वत:वरील त्याचे परिणाम कमी करायला शिकला. त्यानं तिला विश्वासात घेतलं, त्याच्या कादंबरीचं वर्णन केलं, त्याच्या हस्तलिखितामधील प्रसंग तिला दाखवले आणि तिला असं वाटू दिलं की त्याच्या या कामात तिचाही वाटा आहे, कित्येकदा तो आग्रही बनायचा आणि ती संतापायची, तिला स्वत:चं आयुष्य आहे हे तो ध्यानी घेत नसल्यानं खवळायची. अशा वेळी, त्या नेमक्या क्षणी तो काय करत आहे हे तो नेमकेपणानं तिला मजावून सांगत असे आणि त्याच्या एवढंच तिचंही योगदान किती महत्त्वाचं आहे हे तिला पटवून देत असे. क्वचित, तिनं उग्रावतार धारण केला की तो चिडून तिला तात्काळ खोलीबाहेर काढायचा, म्हणायचा, "सेलस्त, मी एवढा चिडलो आहे की तू मला एकट सोडावस अशी मी प्रार्थना करतो." तिला त्याचा लळा लागलेला असला तरी ही शिक्षा तिला झोंबत असे. तिच्या रागाचा पारा उतरला की तिला तो माफ करत असे, योग्य वाटल्यास खरमरीतपणे. परंतु, तिचे दोष तिच्या लक्षात आणून देण्याचे आणि तिला आज्ञाधारक बनवण्याचे, त्याच्यापाशी अन्य अनेक परिणामकारक असे मार्ग होते. अप्रत्यक्षरित्या दोष सूचित करत असे आणि आडवळणानं थट्टेच्या सुरात तिच्या ते निदर्शनास आणून देत असे. एकदा त्यानं जोरदार आवाज चढवला की चहा पुरेसा गरम नाही. परंतु त्यानं जेव्हा पाहिलं की तिचा स्फोट होईल नाहीतर तिला रडू कोसळेल, तेव्हा सावरून तो म्हणाला, "तुझं बरोबर आहे, सेलस्त, चहा कोमट घ्यायला हवा." एकदा, त्याला देण्यासाठी ती काही हातरुमाल घेऊन आली. तिला वाटलं, ते चांगले नरम मुलायम आहेत. पण ते तसे नसल्याची त्यानं तक्रार केली. तिनं ते नरम मुलायम करण्यासाठी बऱ्याचदा धुतले, तरीदेखील त्याची तक्रार कायम, असमाधान कायम. एखाददुसऱ्या दिवसानंतर तिनं त्याच्या खोलीत पाऊल टाकलं तेव्हा तिला आढळून आलं की, तो कात्रीनं हातरुमाल कापून त्याच्या पट्ट्या करत आहे. तिला पाहातच तो म्हणाला, "पहात नाहीयेस का तू सेलस्त, मला ते पुन्हा देण्यापासून परावृत्त करण्यासाठी हा एकच मार्ग आहे ..... माझ्या नाकाची ओलसर त्वचा एवढी संवेदनाशील आहे की हे भरडं लिनन मला शिंका द्यायला कारणीभूत होतं आणि माझा दमा लक्षात घेता, हे समंजसपणाचं नाही."

बेडरुममधील त्याची दिनचर्या गेली कित्येक वर्षं होती तशीच होती. फरक एवढाच, आता सेवेला सेलस्त होती. दुपारी त्याला जाग आली की, तिच्या काळ्या टाफेटा पोषाखाची किंचितशी सळसळ करत ती त्याच्या खोलीत पाऊल टाकायची. चेहऱ्यावर कायमचं कोरलेलं



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

स्मित. आधीचे नोकर ज्या गोष्टी घेऊन येत असत त्या ती आणायची : गरमागरम कॉफी, कोरीच्या आकाराच्या पातळ तुकड्याच्या पेस्ट्रीचं आवरण असलेले छोटे केक आणि लग्रा पावडर. पावडरची धुरी घेऊन झाल्यानंतर ती परतून येत असे आणि त्याचा पत्रव्यवहार तो वाचत असताना त्याच्या बिछान्याशेजारी ती बसून राहात असे. तो सहज मतप्रदर्शन करायचा त्यावरून कुठल्या पाव्हण्यांना तो भेटू इच्छितो, कुठली निमंत्रणं त्याला स्वीकारावीशी वाटतात, याबद्दल अंदाज करण्याची ती प्रयत्न करायची. त्याची पाव्हणेमंडळी आली की त्यांना आत घेऊन यायची, बाहेर दरवाजापर्यंत सोडायल जायची. कैकदा ते निघून गेल्यावर ती त्यांची नक्कल करून दाखवायची. आपण काय करत आहोत हे ध्यानीमनी न घेता. त्यांचे भाव प्रदर्शित करायची, त्यांच्या आवाजात बोलायची आणि त्यांच्या वर्मांची खिल्ली उडवणारी टीकाटिप्पणी करायची. प्रूस्तची हसूनहसून मुरकुंडी वळायची. त्यानंतर त्याच्या पलंगाशेजारील बांबूच्या टेबलावरील एव्हिअन पाण्याची बाटली ती बदली करायची आणि त्याच्यापाशी पुरेसे कागद व शाई असल्याची खातरजमा करून घ्यायची.

कैकदा, तो काम करत नसायचा तेव्हा रात्रभर सेलस्तनं त्याच्या खोलीत इथंतिथं वावरावं म्हणून तो तिची मनधरणी करत असे. काही वेळेला तिला आवडू शकेल असं त्याला वाटायचं अशी कथा तो तिला वाचून दाखवत असे. 'आमेली ड यून ह्युमर द ग्यूर (guerre)' ही तिच्याशी बरचसं साम्य असलेली एका येडपट मोलकरणीची कथा वाचत असताना तो एवढा खदखदा हसत राहिला. वाचता हसता ती दुखावली तर जात नसेल ना या विचारानं तो धास्तावला. पण त्यानं पाहिलं, तीही हसतेय. ती हसत होती वरच्या मजल्यावरील मोलकरीण व खालच्या मजल्यावरील स्वयंपाकीण आठवून, स्वत:ला नव्हे. कथेतील मोलकरीण ही आपणच आहोत हे तिच्या ध्यानी आलेलं नसायचे. कधीकधी स्वत:च्या पूर्वायुष्याच्या लांबलचक कहाण्या तो तिला सांगायचा, क्वचित प्रसंगी अलिकडच्या पार्ट्यांचं तो वर्णन करायचा, म्हणायचा, "सेलस्त, तू एकटी असतेस म्हणून तुझं मनोरंजन करायलाच हवं आणि मी केलेली आणि ऐकलेली सारी संभाषणं तुझ्यासाठी मी पुन्हा रचायलाच हवीत. सारं काही सांगण्याची, पार्ट्यांची पुन्हा उजळणी करण्याची गरज मला भासते." त्यावर ती विचारायची, "पण का मॉसिअ? आत्ता आत्ता, खट्याळागत नको, मी तुमचं मनोरंजन करायला हवं. मी काय सांगते, ऐका, ते विरंगुळा वाटायला तुम्हाला मदत करील आणि तुम्हाला शिकवेल. तुम्हाला सारं काही माहिती होईल."

अधूनमधून प्रूस्त रात्रौ बाहेर जात असे. १९१५ च्या जूनमध्ये त्याचा जुना मित्र ब्लांश याला भेटायला गेला. काही वर्षांच्या दुराव्यानंतर 'द्यु कोते द शे स्वान'ची तरफदारी करायला तो हिरीरीनं पुढं सरसावला होता. प्रूस्त टाळू शकला नसता अशी ही भेट. त्याला घेऊन बाहेर जेवायला जाण्याचा त्याचा बेत होता. परंतु तो एवढ्या उशिरा त्याच्या घरी पोचला की





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

तो झोपायला गेलेला होता. प्रूस्त आल्यानं तो उठून बाहेर दिवाणखान्यात आला. ज्यादा ओव्हरकोट मागून घेऊन अंगावर चढवणं आणि बोलत राहाणं याव्यतिरिक्त प्रूस्त काहीच करू शकला नाही. सेलस्तशी बोलायला तसा तो बोलत राहिला- युद्धामध्ये त्यानं गमावलेले मित्र आणि युद्धात स्वत:ला भाग न घेता आल्याबद्दलची हळहळ, त्याच्या कादंबरीची संरचना आणि पुढील भागात येणारे समलिंग संभोगाचे प्रसंग. त्याचं हे उघडउघड बोलणं ऐकून ब्लांश उठला आणि त्यानं खोलीचा दरवाजा लावून घेतला. पहाटे दम्याची उबळ आल्यानं तो तडकाफडकी तिथून बाहेर पडला. दुसऱ्या दिवशी त्याला सर्दीनं बेजार केलं. तो बिछान्यावर पडून राहिला. पडल्या पडल्या आधल्या रात्रीच्या विचार करू लागला. त्याला जाणवलं, ब्लांश बराच दुखावला गेलेला आहे. त्यानं त्याला पत्र लिहायला घेतलं, लिहिले, "एखाद्या उमद्या सामारिटनप्रमाणं तू मला तुझा कोट दिलास, खिडकी बंद केलीस आणि येत्या वर्षासाठी मला संरक्षण देण्याची तयारी दर्शवलीस. परंतु, मला भेटल्यानं तुला आनंद झाला असल्याचं पूर्वी मला जाणवायचं, त्या प्रेमळ हास्याचा मागमूसही मला आढळून आला नाही. औपचारिक आणि थंडं स्वागत का?'

युद्धाला तोंड फुटल्यानंतर प्रूस्तचा प्रकाशक ग्रासे, त्याच्या मर्यादित नोकरवर्ग आणि त्याचे मुद्रक यांना लष्करात भरती व्हावं लागलं होतं. परिणामी, १९१४च्या ऑक्टोबरमध्ये प्रकाशित व्हायचा प्रूस्तचा दुसरा खंड बेमुदत लांबणीवर पडला होता. तथापि, जवळजवळ संपूर्ण खंडाचं कंपोज झालं होतं. जूनमध्ये प्रूफे प्रूस्तच्या हाती पडली होती. खंडाच्या अखेरची पानं टाइप करून झाली होती. ही पानं जुलैच्या प्रारंभी बहुधा एमिल आगोस्तिनेल्लीनं टाइप केलेली असावीत. १९१४ च्या एप्रिलमध्ये प्रूस्तनं ग्रासेला इशारा दिला होता की प्रूफांमध्ये फेरबदल करणं त्याला भाग आहे. कार्बुगच्या भेटीमध्ये आणि १९१४च्या शरदात तो या संस्करणाच्या कामात गुंतला होता. 'तिसऱ्या' खंडाचं पुनर्लेखन १९१५च्या प्रारंभी सुरू झालं होतं आणि त्याच्या आयुष्याच्या अखेरपर्यंत ते चालू राहणार होतं. एप्रिलमध्ये त्यानं रॉबेर द विल्लीपाशी आशा व्यक्त केली होती की लष्करी सेवेसाठी तो निवडला जाणार नाही, 'कारण, मला ठाऊक आहे की मी किती कुचकामी ठरेन, आणि कारण माझी कादंबरी; मी पूर्ण करू शकण्याआधी माझी प्रकृती किती खालावलेली असेल.' जुलैमध्ये त्यानं मॉन्तेस्क्युइउला सांगितलं, 'जी काही थोडीबहुत शक्ती मला आहे ती कादंबरीसाठी मी राखून आहे', ही कादंबरी, परमेश्वराची इच्छा असल्यास, मी पूर्ण करण्याच्या मार्गावर आहे.' १९१५च्या नोव्हेंबरमध्ये त्यानं Albertine Disparue चा पहिला खर्डा पूर्ण केला होता. आगोस्तिनेल्लीच्या निधनाचं दु:ख ताजं असतानाच त्यानं हा खर्डा लिहायला सुरुवात केली होती.

१९१५ वर्ष संपायला आलं आणि आधीच्या वर्षाप्रमाणंच सरत्या वर्षाबद्दलची त्याची खिन्नता त्याला ग्रासू लागली. पण, यावेळी कारण वेगळं होतं. त्यानं आन्तोइन बिबेस्कोला



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

लिहिलं, 'हे दु:खी दिवस आपल्याला स्मरण करून देतात की वर्ष त्याच नैसर्गिक सौंदर्यानं मढून येतील, परंतु लोकांना ती परत आणू शकणार नाहीत. अरेरे, १९१६ सर्वांगानं वहरून येईल, परंतु बट्राड द फोनेलाँ मात्र यावेळी नसेल.' साँ लू मृत्यू पावला होता आणि प्रूस्तचं तारुण्य आणि मैत्री त्याच्याबरोबर त्याच्या अज्ञात थडग्यात गाडली गेली होती.

२५ फेब्रुवारी १९१६ रोजी जिद प्रूस्तला भेटायला आला. १८९२ मध्ये दोघांची भेट झाली होती, त्यानंतर चोवीस वर्षांनी तो प्रूस्तला भेटत होता. या भेटीत समलिंग संभोगी प्रवृत्तीविषयी ते बोलले. अन्य विषयही त्यांच्या बोलण्यात आले. प्रूस्तच्या कादंबरीविषयी बोलणं झालं. या संभाषणाच्या ओघात रिव्हिएर जर्मनांच्या कैदखान्यात 'स्वान' वाचण्याचा आनंद पुन्हा अनुभवत होता आणि दुसरा खंड प्रकाशित करण्यास ग्रासे असमर्थ होता. जिदनं सुचवलं की तो खंड त्यानं 'एन्आरएफ्'कडे द्यावा आणि प्रूस्तनं यावेळी ते अशक्य असल्याचं सांगितलं. परंतु, त्याच्या नकारात दोन वर्षांपूर्वीचाा ठामपणा नव्हता. १४ एप्रिलला ''एन्आरएफ्'च्या सदस्यांची बैठक झाली आणि त्यात 'आ ला रशार्श' प्रकाशनासाठी घेण्याचा प्रस्ताव मांडण्यात आला. १९१४च्या उन्हाळ्यात 'एन्आरएफ्'नं ती कादंबरी प्रकाशित करण्यास नकार दिला होता, त्या चुकीचं परिमार्जन करण्याची तयारी आता त्यानं दर्शवली. मध्यंतरीच्या या दोन वर्षात परिस्थिती पालटली होती. प्रूस्तनं त्यावेळी स्पष्ट नकार दिला होता त्यामागं ग्रासशी बेईमानी न करण्याचाच केवळ उद्देश नव्हता. १९१२ च्या डिसेंबरला 'एन्आरएफ्'नं दिलेल्या नकाराला स्वाभिमानी रट्टा प्रूस्तला हाणायचा होता. तथापि, या दुसऱ्या वेळच्या प्रस्तावानं 'एन्आरएफ्'चं अखेरीस पापक्षालन झालं. शिवाय, त्यांचे मुद्रक आता पुन्हा कामावर रुजू झाले होते, त्यामुळे कादंबरीचं प्रकाशन लौकर करण्याचं आश्वासन देणं त्यांना शक्य झालं होतं. परंतु, युद्ध समाप्त होईपर्यंत ती प्रकाशित न करण्याचा ठाम निर्णय प्रूस्तनं घेतला. दरम्यान प्रूफांची छपाई आणि दुरुस्त्यापरिष्करणं करणं त्याला शक्य होणार होतं. शांतता प्रस्थापित झाल्यानंतर योग्य अशी संधी निर्माण होताच खंड प्रकाशनासाठी तयार करावा असा विचार प्रूस्तनं केला. ग्रासेला सोडचिठ्ठी दिल्यानं मृत्यूबरोबरच्या शर्यतीत निदान वर्षाची उसंत मिळण्याची शक्यता त्याला जाणवली. ग्रासेशी बोलणी करण्यासाठी, पूर्वीप्रमाणंच, त्यानं रने ब्लमची मध्यस्थ म्हणून निवड केली.

ग्रासेबरोबरच्या वाटाघाटी अवघड आणि यातनादायी ठरल्या. आपल्या आपल्या कादंबरीच्या प्रकाशनाबाबत आपण घेतलेला निर्णय तिच्या लौकिकाला साजेसा आहे, भल्यासाठीच आहे असा त्यानं समज करून घेतला आणि आपल्या प्रकाशकाच्या बाबतच्या कर्तव्याला मूठमाती दिल्याची अपराधी भावना त्यानं दडपून टाकली. त्याच्या नेहमीच्या दिलदारपणाला त्यानं तिलांजली दिली. परंतु, स्वत:च्या निर्णयाच्या समर्थनार्थ त्यानं सबब पुढं केली ती येणेप्रमाणं : १९१४च्या जुलैमध्ये स्टॉक एक्सचेंजमध्ये आपण साफ धुपलो



अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

असल्याचं त्यानं ग्रासेला सांगितल्यानंतर ग्रासेनं दाखवलेली सहानुभूती आठवून त्यानं लिहिलं की आर्थिकदृष्ट्या सांप्रत त्याची फारच हलाखीची परिस्थिती निर्माण झाली असल्यानं, केवळ पैशाखातीर आणि प्रकाशनाला विलंब होऊ नये म्हणून 'एन्‌आरएफ्' ऑफर त्याला मान्य करावी लागत आहे. एवम् त्यानं स्वत:च्या मनाची समजूत घातली की त्याचं वागणं औदार्याला साजेसंच आहे आणि ग्रासेनं त्याची निराशा केली आहे, तथापि, नैतिकदृष्ट्या आणि आर्थिकदृष्ट्या तो त्याचा ऋणाईत आहे. युद्धानं ऋणकोला देणे देण्यासाठी दिलेली कायदेशीर सवलत लादलेली असल्यानं १९१४च्या एप्रिलपासून प्रूस्तला पुस्तक-विक्रीचे हिशेब मिळाले नव्हते आणि मानधनही. दुसऱ्या बाजूनं, ग्रासनं दुसऱ्या खंडाच्या जवळजवळ संपूर्ण भागाच्या प्रूफांसाठी बराच पैसा खर्च केला होता आणि प्रूस्तच्या भारंभार दुरुस्त्यामुळे पडणारा आर्थिक भार आणि मनस्ताप सहन केला होता आणि आता, आगामी खंड त्याला सोडून द्यावे लागणार होते, इतकंच नव्हे तर एव्हाना लोकप्रिय झालेली 'द्यु कोते द शे स्वान' ही नुकसान भरपाईविना गमवावी लागत होती, तक्रारीचा सूर नं काढता त्याचा अत्यंत 'प्रॉमिसिंग' लेखक त्याला गमवावा लागणार होता. हा एकूण प्रकार म्हणजे प्रूस्तला केलेल्या इजेबद्दल त्याला घ्यायला लावलेलं प्रायश्चितच.

तथापि, गासेचा ठावठिकाणा लागू शकत नव्हता. त्याच्या ऑफिसमधून त्याचा पत्ता दिला जात नव्हता. दरम्यानच्या काळात घडलं होतं ते असं : १९१५च्या उन्हाळ्यात ग्रासे टायफॉडनं भयंकर आजारी होता. सहा महिने मिलिटरी हॉस्पिटलमध्ये त्याच्यावर औषधोपचार करण्यात आले होते. त्यानंतर Naychatel नेशाटेल येथील स्विस सॅनिटोरियममध्ये जवळजवळ अज्ञातावस्थेत त्याला हलवण्यात आलं होतं. रने ब्लम, ले आँ बेइल्बी, लॉरी इत्यादी मित्रांच्या मदतीनं आणि ग्रासेच्या विश्वासू हस्तकाला लाच देऊन ग्रासेचा पत्ता लावण्यात मे आणि जून खर्ची पडले. जुलै आणि ऑगस्ट पत्रव्यवहारात गेले. या व्यवहाराबाबत ग्रासेला दु:ख झालं पण त्यानं समजुतदारपणा दाखवला. स्वत:चं आजारपण, युद्ध, दुसऱ्या खंडासाठी त्यानं केलेला खर्च, या गोष्टींकडे त्यानं लक्ष वेधलं आणि प्रूस्तनं त्याच्या निर्णयाचा पुनर्विचार करावा अशी विनंती केली, कायदेशीर हक्क गाजवण्याची धमकी दिली नाही. त्यानं ब्लमला सांगितलं, 'ज्याचा माझ्यावरचा विश्वास उडालेला आहे त्या लेखकाला धरून ठेवणं माझ्या लेखी मानपानाची बाब आहे आणि त्याच्या स्वातंत्र्याची संपूर्ण पुनर्प्राप्ती मी सुकर करीन.' तरीदेखील प्रूस्तनं त्याला उपमर्दकारक उत्तर दिलं. इतकंच नव्हे तर आजवर तो 'प्रिय मित्र' असा मायना लिहायचा, पण आता त्या ऐवजी 'प्रिय महोदय' आला. त्याच्याबरोबर वाद घालण्यात काही अर्थ नसल्याचं ग्रासेला कळून चुकलं. स्वत:ला दोषमुक्त करण्याचा प्रयत्न करण्याचाही त्यानं प्रयत्न केला नाही. त्यानं ब्लमला सांगितलं, 'त्या बिचाऱ्या लेखकासाठी मला वाईट वाटतं, म्हणून मला शक्य होईल तेवढा मी सामोपचारानं आणि मन:पूर्वकतेनं वागलो आहे.' आणि २९ ऑगस्टला



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

प्रूस्तला लिहिलं, 'माझी खंत व्यक्त केल्यावाचून एक मोलाचा लेखक मी गमावू इच्छित नाही आणि तुझ्या भावना दुखावण्याचं, इथं काही कारण नाही, माझ्या कृतीमुळे तुझ्या त्रासांमध्ये भर घालण्याची माझी इच्छा नाही. त्याग काय असेल तो असो, "आ ला रशार्श यु तां पेर्दू"- चा दुसरा खंड प्रकाशित करण्याचा हक्क मी सोडून देत आहे.' २२ सप्टेंबरला. त्याला उत्तर पाठवलं. पुन्हा पूर्वीच्याच 'प्रिय मित्र' या मायन्यानं. या एकूण प्रकरणात ग्रासेचं वागणं कौतुकास्पद होतं, प्रूस्तचं तेवढं निश्चितच नव्हतं. परंतु या चालढकलीच्या काळात, स्वत:ची कादंबरी अधिक परिपूर्ण करणं प्रूस्तला शक्य झालं, त्याच्या हयातीत प्रसिद्धीच्या सौख्याचा परमानंद त्याला लुटता आला.

'आ ला रशार्श'चा वाढत चाललेला आकार हे प्रकाशक बदलण्यामागील एक मुख्य कारण होतं, प्रकाशनाला प्रारंभ करणं म्हणूनच त्याला निकडीचं वाटत होतं. 'द्यु कोते द शे स्वान' - च्याच लांबीचे पुढील दोन खंड प्रूस्तनं मुळात लिहिले होते. परंतु, ३१ मे १९१६ रोजी ब्लमला पाठवलेल्या पत्रानुसारा एव्हाना ते चार बनले होते. १९१२ मध्ये त्यानं लिहून पूर्ण केलेल्या त्याच्या कादंबरीच्या अंतीम प्रकाशित स्वरूपात भरमसाट वाढ झाली होती. 'द्यु कोते द शे स्वान' (ग्रासच्या आवृत्तीमध्ये ५२५ छापील पृष्ठे) या कादंबरीमध्ये १,७०,००० शब्द आहेत आणि उरलेल्या जवळजवळ एकाच आकाराच्या दोन खंडामध्ये सुमारे ३,४०,००० शब्द आहेत, म्हणजेच १९१२ चा खर्डा एकूण ५,१०,००० शब्दांपर्यंत गेला. 'आ ला रशार्श'च्या अंतिम खर्ड्यात १२,४०,००० शब्द असून 'स्वान' नंतरच्या खंडांचा ३,४०,००० शब्दांचा पसारा १०,७०,००० शब्दांपर्यंत वाढत गेला.

गुणवत्ता आणि परिमाण या दोन्ही दृष्टीनं प्रूस्तनं त्याच्या कादंबरीमध्ये घातलेली भर प्रचंड आणि मुलभूत आहे. १९०९-१२चा खर्ड्यानं श्रेष्ठत्वाचा केवळ अर्धा टप्पा गाठला होता. ' झाँ सान्तेय'च्या बराच वरचा परंतु, अंतीम 'आ ला रशार्श'च्या खालचा. ती एका प्रतिभावंताची कृती होती, पण अद्याप 'मास्टरपीस' बनली नव्हती. तथापि, संविधानक, आराखडा किंवा प्रयोजन यात फारसे फेरबदल केले गेले नव्हते. त्यांचं मूळ स्वरूप जवळजवळ कायम ठेवण्यात आलं होतं. बदल झाले होते ते, पोताच्या गुणवर्धनात, संरचनात्मक एकसंघतेमध्ये, श्रेणीच्या परिवर्धनात. १९१३ ते १९२२ या पुनर्लेखनाच्या दहा वर्षांमध्ये प्रूस्तनं आदर्श कलारूप साध्य केलं होतं, जे साध्य करण्यासाठी 'ले प्लेझिर ए ले जूर' पासून तो धडपडत होता आणि १९०९-१२ चा खर्डा हा त्या दृष्टीनं त्याचा प्रारंभीचा सराव होता, त्याचं इप्सित साध्य करण्याच्या मार्गावर टाकलेलं पाऊल होत

१९१४च्या जूनमध्ये छापली गेलेली प्रूफं सध्या कुठं आहेत याचा ठावठिकाणा लागत नसला तरी ती उपलब्ध असताना त्यावर प्रा. फ्यूइल्लराट यानं बारकाईनं केलेल्या अभ्यासावरून त्यातील मजकूरादी गोष्टी कळू शकतात. प्रूफांच्या एकूण ९६ गॅल्या आहेत. प्रत्येक गॅलीत आठ पृष्ठांचा मजकूर, म्हणजे एकूण ५२८ पृष्ठे. प्रत्येक पानावर बदल



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

करण्यात आले आहेत, एका पदबंधापासून एखाद्या नव्या प्रसंगापर्यंत भर घालण्यात आली आहे. 'आ लॉम्ब्र दे जन फील (Filles) आं फ्लर' मध्ये मूळ ९८,००० शब्दांमध्ये १,१२,००० शब्दांची भर पडली आहे. नायक गिल्बेरला विसरून जातो, त्या अनुषंगानं या दोघांमधील दुरावा आणि नायक भोगत असलेले क्लेश यावर प्रूस्तनं पन्नास पृष्ठं खर्ची घातली आहेत. बाल्बेकवरील भागात ब्लोख बरोवरील खान्याच्या चित्रणात तीस पानांची भर घातली आहे. ब्लोख कुटुंब आणि तिथल्या सागरी रिसॉर्टमधील त्यांची बंदिस्त कॉलनी, त्यांचे आक्रस्ताली चालचलन आणि त्यांचा भपकेबाज पोषाख या निमित्तानं त्यांच्या सवंगपणाचं बोचरं वर्णन केलं आहे.

लेखनप्रकिया चालू असताना आपण काय साध्य करण्यासाठी धडपडत आहोत, आपण किती प्रगती केली आहे याविषयी प्रूस्त सेलस्तला सांगत असे. काही वेळेला, त्याच्या हातून उल्लेखनीय असं काही लिहून झालं म्हणून समाधान व्यक्त करायचा, काही वेळेला, बाहेर गेल्यामुळे आपला मौल्यवान वेळ खर्च झाला म्हणून हळहळायचा. काही वेळेला, लेखनाची बैठक घातली असताना त्यानं तिला सांगितलेलं असायचं की शक्यतो तिनं त्याच्या कामात कमीत कमी व्यत्यय आणावा म्हणायचा, "मी असं काही तरी लिहितोय जे अलौकिक आहे असा मला पूरा विश्वास आहे. इकडे तिकडे फिरू नकोस..... किंवा निदान आवाज न करता खोलीत फिर." त्याच्या सांगण्याबरहुकूम ती वागायची. इथंतिथं करायची तेव्हा तिच्या पोषाखाची सळसळ तेवढी कानी पडायची. ज्या कागदानं ते लग्रा पावडर जाळत असे त्या कागदावरच तो बऱ्याचदा नवा मजकूर लिहायचा. त्याचं काम पूर्ण होताच नवीन कागद प्रूफांवर वा नोंदवह्यांमध्ये ती काळजीपूर्वक डकवायची.

कैकदा, त्याला जेव्हा नवीन माहिती हवी असायची तेव्हा ती मिळवण्यासाठी प्रूस्त सेलस्तला पाठवायचा किंवा जुन्या मित्रांना भेटायचा वा त्यांना पत्र पाठवून त्याबाबत विचारणा करायचा. त्याच्या दुसऱ्या भागात प्रिन्सेस्स माथिल्ड हिच्या संदर्भात लिहिलेल्या मजकुरात तपशीलाबाबतची अडचण उद्भवताच त्यानं ल्युसिएँ दॉदेची मदत मागितली होती; तू अगदी तरुण असताना प्रिन्सेस्स माथिल्डला पाहिलं असल्याकारणानं, तिचा एखादा विशिष्ट पेहराव, खास करून, वसंतातील मध्यान्ही ती घालत असलेला, क्रिओलिनसारखा जांभळा पोषाख आणि स्ट्रिमर आणि व्हायोलेट खोवलेलं बॉनेट, जे काही ती अंगावर घालत असे जे तू पाहिलं असणारच, ते पुन्हा तुला आठवावं लागेल. (म्हणजेच माझ्यासाठी वर्णन करावं लागेल) 'दॉदेनं प्रिन्सेस्सच्या पोषाखाविषयी लिहून कळवलं होतं, परंतु प्रूस्तला आढळून आलं होतं, किंवा पुढं तो सांगत असे त्यानुसार, त्यानं जे लिहिलं होतं त्याहून ते फारसं वेगळं नव्हतं. तसं त्यानं दॉदेल कळवलंही होतं. परंतु, दॉदेच्या मजकूर होती पडल्यानंतरच त्यानं प्रिन्सेस्सवरील मजकूर लिहिला होता हे नि:संशय.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

शक्यता आहे, ड्यूक द गॅर्मांतवर काम करत असताना, प्रूस्त कॉम्प्त ग्रेफ्फुल्हेला भेटला होता. ग्रेफ्फुल्हे हा एक नामवंत रईस आणि प्रूस्त त्याला बऱ्याच वर्षांपासून ओळखत होता. एके दिवशी रू. दास्तोर्गवरील त्याच्या ड्राईंगरूममध्ये तो पोचला. नित्याप्रमाणं उशिराच. रिवाजानुसार अंगावरील फरकोट न काढता तो तसाच ठेवून त्यानं त्या उमरावाची मुक्त कंठानं स्तुती केली. म्हणाला, रुबाब सांभाळून राहाणाऱ्या उमरावांमध्ये तो शेवटचा संभाषणाच्या ओघात त्यानं प्रश्न विचारायला सुरुवात केली : घराण्याचे रीतीरिवाज, घरातील दैनंदिन कामाकज, बोई-बाउद्रां येथील प्रसिद्ध शिकारी वगैरे वगैरे. उत्तर ऐकत असताना, त्याचं निरीक्षण करत राहिला- सोनेरी केसांचा धिप्पाड माणूस, 'ग्रां सिग्यूएर' (seiquer) (महान उमराव) चं मूर्त स्वरूप. प्रूस्त आरामखुर्चीत अर्धवट टेकून बसलेला. त्याचा फरकोटामधून दिसणारा त्याचा फिकुटलेला चेहरा. त्या दोघांची प्रश्नोत्तरं ऐकणाऱ्या एखाद्याला तो भासला असता : शवविच्छेदन करून तपासणी करणारा एक डॉक्टर, दुसऱ्याला वाटला असता, भक्ष्याला संमोहित करणारा एक कोब्रा. प्रूस्तला जेव्हा वाटलं की, शक्य तेवढं हाती लागलं आहे, तो उठला. उशिरा आल्याबद्दल माफी मागितली. निरोप घेतला. घरी गेल्यावरोबर या भेटीबद्दलची ताजी इम्प्रेशन्स त्यानं लागलीच कागदावर उतरवली असणार.

प्रूस्त केवळ संस्करण, पुनर्लेखन करत नव्हता, जुन्या नोंदवह्यांत निव्वळ भर घालत नव्हता, तर नव्या नोंदवह्या भरत होता- नवीन प्रसंग आणि नवीन प्रकरणं यांचे मसुदे तयार करत होता, त्याच्या कादंबरीमध्ये ते समाविष्ट करण्यासाठी तो प्रयत्नशील होता. कादंबरी नको तेवढी प्रदीर्घ होत असल्याचा धोका त्याला जाणवला होता. केवळ जुन्या स्मृतींना तो उजाळा देत नव्हता. अत्यंत संस्मरणीय असे, त्याचे अलिकडचे अनुभवही तो शब्दबद्ध करत होता. या सर्वांत संस्मरणीय अनुभव होता, असोस्तिनेल्ली संबंधीचा. नायकाच्या प्रेमचाळ्याशी संबंधित असलेल्या प्रकरणाची सुरुवात करतेसमयी, त्याचा नायक आणि आल्बेरटाइन नामक एक छोकरी यांच्या दुःखदायी प्रदीर्घ प्रेमप्रकरणाचे वर्णन केलं होतं. आल्बेरटाइन हे नवीन पात्र नव्हतं. कादंबरीच्या आधीच्या खर्ड्यात एक दुय्यम पात्र म्हणून ते आलेलं होतं. आता, आल्बेरटाइनच्या संदर्भात बरेच भरभक्कम प्रसंग आणि एकूण तीन पूर्ण प्रकरणं लिहिण्यात आली होती. पहिली दोन प्रकरणं, तिच्याबरोबर नायक पॅरिसमध्ये राहात असताना त्याला वाटणाऱ्या असूयेसंबंधी आहेत आणि तिसऱ्यामध्ये ती त्याला सोडून गेल्यामुळे त्याला झालेला अनावर शोक आणि त्यानंतर तिला झालेला प्राणघातक अपघात. आल्बेरटाइनची व्यक्तिरेखा पूर्णपणे आगोस्तिनेल्लीवर बेतलेली नसली आणि तिची कहाणी त्याच्या कहाणीहून भिन्न असली, तरी एक गोष्ट स्पष्ट आहे की, ती लिहीत असताना प्रूस्तच्या मनात आगोस्तिनेल्लीच्या स्मृती ताज्या होत्या, तत्संबंधीचे अनुभव मनात रेंगाळत होते.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

## अठरा

आपल्या कादंबरीमध्ये अत्यंत महत्त्वपूर्ण ठरावी अशी भर घालून संपवल्यानंतर, प्रस्तूनं पुन्हा सामाजिक जीवनात भाग घ्यायला सुरुवात केली असल्याचं दिसतं. सोसायटींमधून वावरणं त्याला आता शक्य झालं, कारण आधीच्या वर्षांहून त्याचा दमा आता कमी तापदायक होता. बऱ्याचदा तो मित्रमंडळींना भेटत राहिला, पाहिजे तिथं जाऊ लागला. काही वेळेला संध्याकाळ होण्याआधी. आता, त्याची मुख्य तक्रार होती तो ही की, तो लिहू वा वाचू लागला तर त्याचे डोळे दुखू लागत. नेत्रविशारदाचा सल्ला त्यानं घेतला असेलही. त्यासाठी एखाद दुसरा तास तो नेहमीपेक्षा लौकर उठलाही असेल.

सांप्रत, शक्य तेवढा वेळ तो त्याच्या स्नेह्यासोबत्यांच्या सहवासात घालवू लागला. त्याचे अगदी घनिष्ट स्नेही जरी दूर असले, एकतर युद्धभूमीवर वा परदेशी, तरी ते शहरात आले असल्याची बातमी त्याला कळताच तो त्यांना भेटू लागला. स्थानिक मित्रांच्या भेटीगाठी तर नित्याच्याच. मादम शईकेव्हिच हिच्याबरोबरची त्याची मैत्री खास समजायला हवी. एका रात्री तो तिच्या अपार्टमेंटमध्ये अचानक गेला आणि सिरोला जाण्याचा तिला त्यानं आग्रह केला. त्याच्या आग्रहाला तिनं मान दिला. हॉटेलमध्ये त्यानं तिच्यासाठी उंची शापेन, फिले द सोलव्हाँ ब्लांक, बोएफ ला मोड, थोडसं सलाड आणि सुफ्ले ओ चॉकोलाट अशी ऑर्डर दिली. 'सुफ्ले'वर भरपूरसं क्रीम घालण्याची वेटरला सूचना दिली. गोळ्या घेण्यासाठी त्यानं पाण्याचा एक ग्लास मागवला आणि कडक कॉफीचा कप. गरमागरम कॉफी अधूनमधून पिणं चालू. मध्येच शेजारच्या टेबलावरील कुठलीतरी गोष्ट त्याला खुपली. तो पटकन उठला, मुख्य वेटरपाशी गेला आणि थरथरत्या आवाजात म्हणाले, "मादमच्या मागं बसलेल्या सदगृहस्थांपैकी कुणा एकाच्या हातात माझे हे कार्ड देण्याची मेहरबानी कर ...... त्यांचं वागण अत्यंत घाणेरडं आहे आणि मी ते खपवून घेणार नाही. हिंमत कशी होते त्यांची" दरम्यान ते सद्‌गृहस्थ आपले स्नेही असल्याचं मादमच्या ध्यानी आलं. ते इटालियन वकिलातीमधील होते. प्रस्तूचा राग थंडावला. तिनं त्यांच्याशी ओळख करून दिली. प्रस्तूनं लागलीच स्वत:ला सावरलं, म्हणाला, "अरेच्या, मी घाबरलो होतो.... मादमसंबंधी तुम्ही गफलत करत असाल. तुमचा परिचय झाल्यानं मला फार आनंद झाला. मला इटाली अतिशय आवडते आणि फ्लॉरेन्स बघायला मला खूप आवडेल, तिथं मी अजून गेलो नाही." पुढं एकदा मादाम व्हर्साइलामध्ये उतरली असता तिथं जाऊन तो पुन्हा तिला भेटला. पश्चिम आघाडीवरील रशियन सैन्याचा कमांडर-इन-चीफच्या गाडीमधून फेरफटका मारला. सूर्य मावळायच्या आधी त्यानं तिला सुचवलं, पार्कमध्ये थोडं हिंडू. आपला हा दमेकरी मित्र फुलांच्या ताटव्यांवर वाकत आहे, फुलांची नाव चौकसपणे विचारत आहे, पानं खुडून त्याचं बारकाईनं निरीक्षण करत आहे हे पाहून मादाम आश्चर्यचकित झाली.

मादाम शईकेव्हिचसारख्या जुन्या मित्रांबरोबर प्रूस्त कांही वेळ खर्चू लागला. परंतु,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

आयुष्याच्या अश्या टप्प्यावर तो पोचला होता जिथं पूर्वीच्या स्नेह्यांपेक्षा अलीकडच्या काळातील स्नेह्यांच्या संगतीत गहाणं त्याला अधिक आवडू लागलं. याची कारण काहीशी व्यामिश्र होती. पूर्वीप्रमाणेच आताही सोसायटीचा धांडोळा घेण्यात त्याला स्वारस्थ होतं. बहुधा, काही प्रमाणात त्याच्या लेखनासाठी. परंतु सोसायटीमध्ये बदल होऊ लागला होता. नवीन नावं नावारुपाला येत होती, नव्या यजमानिणी एकत्र जमत होत्या. प्रूस्तनं एकूण परिस्थितीचा अंदाज घेऊन ठरवलं की त्यानं काळाबरोबर राहायला हवं, सांप्रत फॅशनेबल असलेल्या लोकांच्या सहवासात. हळूहळू प्रूस्त नव्या ओळखी करून घेऊ लागला, जुने मित्र बाजूला सारत गेला. ही प्रक्रिया त्याच्या आयुष्याचा अखेरपर्यंत चालू राहिली, आता युद्धानं तिची गती वाढवली. शिवाय, सोसायटीच्या बरोबरीनं त्याच्यामध्येही बदल झाले होते. युद्धपूर्वकाळात, ज्याच्याविषयी बऱ्यापैकी अपेक्षा बाळगाव्यात असा, पण काहीही लक्षणीय कामगिरी करू न शकलेला एक रुबाबदार होतकरू लेखक म्हणून तो ओळखला जात होता. परंतु, आता, प्रस्थापित कादंबरीकार म्हणून त्याचा नावलौकिक झाला होता. त्याची ख्याती सर्वदूर पसरली नसली तरी, सीमित वर्तुळात त्याला मान होता आणि तो दैवतही बनला होता. आपली ख्याती लक्ष्यात ठेवली जावी आणि एक श्रेष्ठ व्यक्ती म्हणून आपल्याला वागणूक दिली जावी याविषयी तो उत्सुक होता, म्हणूनच, त्याच्या जुन्या मित्रांपेक्षा त्याच्या साहित्यामुळे ज्यांच्याशी मैत्री जुळून आली आहे अशा मित्रांना भेटणं त्यान अधिक पसंत केलं होतं. यात तरुण स्नेही होते. त्यांचा उत्साह उदंड होता. समकालीन साहित्य जगतात प्रूस्त 'गुरु' असल्याचं त्यांनी स्वत:च्या मनावर ठसवलं होतं. ही प्रवृत्ती एव्हाना पक्की झाली. पुढील काळात ती बळावली, ठळक झाली, काहींच्या मते, अस्वस्थ करण्याजोगी.

युद्धाच्या अखेरच्या पर्वात प्रूस्त ज्यांना वरचेवर भेटत होता त्या मित्रांपैकी बरेचसे तरुण होते. साहित्यात किंवा सोसायटीमध्ये वा दोन्हीमध्ये हे तरुण नुकतेच नाव कमाऊ लागले होते. पण त्याच्या खास मित्रांमध्ये वॉल्टर बेरी नामक एक मित्र मात्र साठीकडे झुकला होता हे विशेष. परंतु, सामाजिक प्रतिष्ठा मिळवू इच्छिणाऱ्या लेखकांच्या लेखी मात्र त्याला मोल होतं. पॅरिसमध्ये जन्मलेला हा अमेरिकन व्यवसायानं प्रख्यात वकील. रुझवेल्ट कुटुंब, वॉशिंग्टनमधील लॉज आणि युरोपमधील बरेचसे प्रतिष्ठीत यांच्याशी त्याचे सलगीचे संबंध. ग्रंथप्रेमी आणि ग्रंथसंग्रहाक. परिसमधील प्रख्यात अमेरिकन कादंबरीकार एडिथ व्हार्टनचा (हिनंच त्याचा प्रूस्तशी परिचय करून दिला होता) आयुष्यभराचा स्नेही आणि सल्लागार म्हणून त्याची ख्याती, निदान प्रूस्तच्या वर्तुळात. सांप्रत पॅरिसमधील' अमेरिकन चेंबर ऑफ कॉमर्स'चा प्रेसिडेंट. दोस्त राष्ट्रांना पाठिंबा देण्यात त्याचा हिरीरीनं पुरस्कार. अमेरिकनं युद्धात उतरावं यासाठी प्रयत्नशील. १९१५च्या मेमध्ये एक दिवस सीनच्या काठावरील एका पुस्तकाच्या दुकानात त्याच्या हाताला एक ग्रंथ लागला. हा ग्रंथ एकेकाळी गॅर्मांत कुटुंबातील कुणाच्यातरी मालकीचा होता. त्यावर सोन्ट्र द गॅर्मांतची अक्षरमुद्रा होती आणि कुळाच्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

ढालीवरील रेखाटनाची शिक्का होता. नुकतंच मोठ्या आवडीनं वाचलेली 'स्वान' आठवून त्यानं तो खरेदी केला आति त्या देघांची 'कॉमन' मैत्रीण मादाम शइकोव्हिच हिच्या घरी त्यानं तो प्रूस्तला भेट दिला. लागलीच त्याला बुलेव्हा होस्समानला येण्याचं आमंत्रण देण्यात आलं. बेरी प्रूस्तकडे गेला. एक अपंग ग्रंथकार आणि दुसरा गुलाबी गालांचा आणि पिकलेल्या केसांचा रुबाबदार ग्रंथप्रेमी. पहाटेपर्यंत दोघांच्या गप्पा रंगल्या. ते बोलत राहिले, पुस्तकांविषयी, प्रूस्तच्या कादंबरीमध्ये पुढं येणाऱ्या गॅर्मांतांच्या हकिगतीविषयी प्रूस्तच्या कादंबरीमध्ये पुढं येणाऱ्या गॅर्मांताच्या हकिगतीविषयी, आयुष्याबद्दल, कलेबद्दल. बोलता बोलता बेरीनं छद्मीपणानं रमी द गॅर्मांत उद्धृत केला : 'ज्या गोष्टी एखाद्यानं अनुभवलेल्या नसतात त्याविषयी तोच उत्तम लिहू शकतो'. प्रूस्त त्याच्या खुर्चीकरून नाट्यमयरित्या उठत म्हणाला, "माझी संपूर्ण कादंबरी म्हणजे तेच आहे." त्यांच्या कादंबरीला वास्तवाचा पाया असला तरी तिच्यातील वैशिष्टयपूर्ण कल्पकतेला त्याच्या लेखी त्याहून विशेष स्थान होतं. या भेटीत प्रूस्तला जाणवलं की आजवरच्या त्याच्या आयुष्यात एवढा जाणकार त्याला आढळून आलेला नाही. यापुढील त्यांच्या भेटी अटळ ठरल्या, प्रूस्तच्या घरी, बेरीच्या घरी किंवा फॅशनेबल यजमानिणींच्या घरी. बेरी हा एक आनंदी वृत्तीचा स्नेही ठरला. सुसंस्कृत आणि ऐहिक. शिवाय प्रूस्त पुढं भोजनसमारंभ आयोजित करणार होता, त्यात आवर्जून बोलवावा एवढा स्मार्ट.

हेन्री बारडॅक हा प्रूस्तचा जुना मित्र. ऑक्सफर्डचा पदवीधर. लंडनयेथील 'फ्रेंच वकिलाती'मध्ये नेमणूक झाल्यानंतर त्यानं 'स्वान'चं गॉस्पेल सर्वत्र पसरवलं. दरम्यान, ४ डिसेंबर १९१३ रोजी 'टाइम्स लिटररी सप्लिमेंट' मध्ये मेरी ड्युकलॉक्सचं परीक्षण प्रसिद्ध झालं. तिनं मार्मिकपणे म्हटलं. 'Proust's images in which matter and memory are are subtly combined in a sudden warm flood of life revived, without the intervention of the understauding. 'दोन मार्गां'ची अर्थपूर्णता तिनं नोंदवली आणि भ्रष्ट प्रौढ जगाबरोबरच्या एका बालकाच्या संपर्काचा अभ्यास म्हणून तिनं 'स्वान'ची हेन्री जेम्सच्या 'अ स्मॉल बॉय' आणि 'व्हॉट मेइसी न्यू' या कहाणींशी तुलना केली. हे परीक्षण हेन्री जेम्सच्या वाचनात आलं. त्यानं एडिथ व्हार्टनला पत्र पाठवून 'स्वान'ची प्रत मिळवली. एडिथ लिहिते : 'he seized upon "Swann" and devoured it in a passion of curiosity and admiration... he recognized a new mastery, a new vision and a strtural design as yet unintelligible to him but there is hard bone under soft skin in a living organism.' हेन्री जेम्सनं प्रूस्तला प्रशंसापर पत्र लिहिलं आणि स्तान्धानलच्या La chartreuse de parme नंतरची श्रेष्ठ फ्रेंच कादंबरी म्हणून गौरव केला असं म्हटलं जातं असे. परंतु ती एक सांगोवागीची गोष्ट असल्याचं पुढं सिद्ध झालं.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

तर सांगायचं म्हणजे, इंग्रजी साहित्य जगतात 'स्वान'ची महती गाणाऱ्या हेन्रीमुळं पॉल मोराम्द नामक एक तल्लख तरुण चहाता प्रूस्तला लाभला. कॉक्तू, गिरोदोक्ष, विबेस्को यांचा हा स्नेही. 'स्वान'नं प्रभावित झालेला. 'तिनं फ्लॉबेरचा पार धुव्वा उडवला' हे त्याचं मत प्रूस्तला कळवण्यात आलं होतं. १९१६च्या वसंतात पॉल पॅरिसला आला असता एका रात्री त्याला जागवण्यात आलं. रात्रौ अवेळी आलेल्या त्या आगंतूक पाव्हण्यानं ओळख करून दिली. ''मी मार्सेल प्रूस्त'' ऑगस्टमध्ये पॉलची बदली क्वीदोरसेला झाली. आणि त्यानंतर हिवाळ्यात १०२ बुलेव्हार होस्समनला त्याच्या भेटी होत राहिल्या. या काळात प्रूस्तनं त्याला ऐकवलेल्या बऱ्याच आख्यायिका 'आ ला रशार्श' मध्ये पुढं समाविष्ट झाल्या.

पॉलची मैत्रीण आणि भावी पत्नी प्रिन्सेस्स हेलन सुट्झो ही रुमानियन ग्रीक. प्रूस्तला मैत्रिणींच्या यादीत अंतर्भूत झाली. बेरीहून अधिक जवळची झाली. राजकीय आणि साहित्यिक जगताबरोबरच केवळ नव्हे तर युरोपियन सोसायटीबरोबरचे तिचे संबंध घनिष्ट. रुमानियाची राणी आणि ऑन्तेनेग्रोचा राजा यासारखी राजघराण्यातील नावं तिच्या परिचितांमध्ये. इतर बाबतीतही प्रूस्तला आवडावी अशी देखणी, बुद्धीमान, तिखट जिभेची. असं सांगतात, एकदा ती म्हणाली होती की सुंदर स्त्रिया वश करणं अतिशय सोपं, कारण वारंवार केलेल्या त्यांच्या याचनांनी त्यांच्या बचाव, कमकुवत होत जातो. सर्वसामान्यपणे तिची मतं बेरीहून कमी 'कास्मोपॉलिटन.' एकदा ती म्हणालीही होती की युद्धासाठी फ्रेंच सर्व काही देत आहेत पण त्यांना काहीच मिळत नाही, तर इंग्रज स्वत:ची काळजी घेत आहेत पण अमेरिकनां-कडून हार खात आहेत.

तिची प्रूस्तशी पहिली भेट झाली ४ मार्च १९१७ मध्ये. तो तेव्हा 'लारुए'मध्ये भोजन घेत होता. एकटाच अंगावर सेलस्तनं दिलेला पातळ वेस्ट-कोट. त्यावर डिनर जाकिट शर्टावर साबणाचे ढब्बे असला पोषाख घालावा लागल्यामुळे बेचैन. त्याची नजर भिरभिरत एका टेबलावर स्थिरावली. तिथं त्याचा मित्र पॉल मोरान्द आणि एक देखणी तरुणी. त्याची चौकस नजर नित्याप्रमाणं तिला बारकाईनं न्याहाळत राहिली. तो उठला. त्यांच्या टेबलापाशी गेला. त्यांच्यात सामील झाला. त्या तरुणीशी त्याची ओळख करून देण्यात आली. तिचं नाव सुट्झो असल्याचं समजलं. संभाषण सुरु झालं. साबणाचे डाग असलेल्या शर्टाबद्दल त्यानं दिलगिरी व्यक्त केली. पेस्ट्री मागवली. त्यानंतर गरमागरम कॉफीचे बरेच कप प्याला. सलाडबरोबर जेवण घेतलं. हातमोजे न काढताच. 'स्वान'च्या संदर्भात बोलणं झालं. नंतर 'रिट्झ' इथल्या प्रिन्सेस्सच्या अपार्टमेंटमध्ये सीझर फ्रँक याचा खाजगी परफॉर्मन्स आयोजित करण्यासाठी क्वाटूओर पुलेतला पाचारण करण्याची तयारी दर्शवली. एवढंच नव्हे तर टॅक्सी करून तो निघालाही. त्यानं पुलेतला जागवलं. त्याच्याकडून त्याला समजलं की त्याचा चेऊलवादक सध्या हॉस्पिटलमध्ये आहे. तो रिट्झला परतला तेव्हा मध्यरात्र उलटून गेलेली आपल्याला अपयश, आल्याचा त्यानं प्रिन्सेस्सला सांगितलं आणि फ्लॉबेर आणि आधीच्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

पिढीतील सोसायटी गॉसिप यावर बोलत राहिला. बाहेर मुसळधार पावसाच्या सरी

तद्नंतर प्रूस्त आणि प्रिन्सेस. यांच्या भेटीगाठी होत राहिल्या. १६ मार्चला प्रूस्तनं 'सिरो'मध्ये खाना दिला. अगदी अखेरच्या क्षणी संध्याकाळी साडेसातला त्यानं तिला भोजनाचं निमंत्रण दिलं. त्याचे अन्य पाहुणे होते पॉल मोरान्द आणि प्रिन्स अन्तोईन बिबेस्को. रेस्टॉरंटमध्ये सर्वांचं लक्ष्य प्रूस्तकडे. दाम देऊन काम भोगू देणाऱ्या बायांच्या नजराही प्रूस्तकडे. हातमोजे न काढता शांपेन पिणारा हा महाभाग कोण? परंतु प्रूस्त निश्चित. त्याचा मूडही बऱ्यापैकी लागलेला. अलिकडील वा फार पूर्वीच्या कहाण्या एकापाठोपाठ ऐकवण्यात दंग : मॉरीस रोस्तान्दच्या उत्तरानं बुलेव्हार होस्समान मधील बऱ्याच पार्टिशनमधून शिरकाव करून घेऊन त्याचा दमा कसा चाळवला होता; युद्धाला सुरुवात होताच बिबेस्कानं त्याला तार केली होती : 'मी आशा करतो की "शॉक ट्रुप्स" मध्ये तुझी भरली केली जाईल; १९१३ मधील त्याचं कमनशिबी स्पेक्युलेशन. त्यात त्यानं गमावलेले ७,००,००० फ्रँक्स; वगैरे वगैरे. पार्टीची सांगता झाली. त्याच्या सवयीनुसार त्यानं सढळ हातानं टिप्स दिल्या. त्यानं एकूण किती पैसे दिले हे जाणून घेण्यासाठी बिबेस्को मागं रेंगाळलेला. प्रूस्त सांगतो, "तो त्यांना समजावून देत होता की माझ्याकडून चूक घडलेली आहे, जेणेकरून त्याबद्दल मला "क्रेडीट" मिळू नये." ज्यूविरोधी कथाबद्दलची त्याची ऑब्सेशन वाटावी अशी आवड पाहून मोरान्द अचंबित झाला. त्यावर बिबेस्कोनं त्याला सांगितलं की प्रूस्तच्या आईच्या माहेरचं आडनाव वईल. एका ज्यू मुलीच्या पोटीच प्रूस्तचा जन्म झाला आहे.

वरील पार्टीनंतर दोन आठवड्यांनी प्रिन्सेस्स सूट्झोनं 'रिट्झ'मध्ये खाना दिला. प्रूस्त आणि त्याचे बरेच मित्र यांना निमंत्रण गेली. तिच्या निमंत्रितांमध्ये रुमानियन जनरल एलिएरको होता. प्रूस्त उशीरा आला. अंगात डिनर जाकीट आणि सफेद टाय. रुमानियन जनरल त्याचं कुतूहलानं निरीक्षण करू लागला. प्रूस्तसुद्धा त्याला न्याहाळू लागला. त्याला वाटलं, ज्याच्याविषयी अलिकडेच त्याला सांगण्यात आलं होतं तो कुख्यात देशद्रोही हा असावा. विशेष, तो खरोखरीच तसा भासत होता. बोलता बोलता विषय प्रूस्तकडे वळला. नेहमी नेहमी सांगितला जाणारा त्याच्याबद्दलचा जोक एकजण ऐकवू लागला. दररोज संध्याकाळी बुलेव्हार होस्समानच्या प्रूस्तच्या अपार्टमेंटमध्ये खाना आणला जात असे. कधी या रेस्टॉरंटमधून तर कधी त्या. परंतु खान्यात राव्हिओली अगदी 'मस्ट'. पैसे कधीच चुकते केले जात नसायचे. नंतर दहाच्या सुमारास वेटरची 'एन्ट्री' आणि प्रश्न, "साहेबांना राव्हिओली पुरेशी झाली ना?" प्रूस्त क्षणभर अवघडल्यासारखा झाला. त्यानं स्पष्टीकरण दिलं, "मला कुणी शत्रू नसल्यानं माझ्या साऱ्या मित्रांचा संशय घेणं मला भाग आहे; हे अगदी भयानक आहे." पुढं पुष्टी जोडली की बिबेस्कोला दोष द्यावा असं त्याला वाटतं. त्याला आठवतं, त्याच्या उपस्थितीत आपण एकदा उद्गार काढले होते, "घरी मी अगदी आरामात जेवण घेऊ शकतो. मला एवढंच हवं, एखादं थंडगार भोजन वा थोडीशी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

राव्हिओली मागवणं.' या क्षणी बिबेसको पॅरिसमध्ये नव्हता एवढं बारीकखरं.

याच सुमारास प्रूस्त इम्यॅन्यूएल बर्लला भेटत असे. बर्ल हा एक तरुण होतकरू लेखक. युद्धात अपंग झालेला. सांप्रत, रखेल प्रेयसी आणि आजवरच्या आयुष्यावर जिची मोहिनी होती ती गूढ सिल्व्हिआ. या त्रिकोणात तो त्रस्त झालेला. प्रूस्तप्रमाणंच बर्गसाँचा दूरचा नातेवाईक. मादाम द नोआइल्लेचा प्रियकर हेन्री फ्रँक या कवीचा कझिन. त्यानं प्रूस्तचं 'सेसाम ए ले लिस' खंदकात बसून वाचलं होतं. आणि भारावून त्यानं त्याला पाठवलं होतं. तो आला की प्रूस्त हस्तलिखित बाजूला सारत असे आणि रात्रीमागून रात्री त्याचं बौद्धिक घेत असे. मानवी एकांत आणि मानवी प्रेम यांचा फोलपणा याविषयी प्रवचन देत असे सांगायचा, प्रेम म्हणजे केवळ आभास, त्याची परिणती अपेक्षा भंगात होणं हे अगदी अटळ. दर भेटीत समलिंग संभोगी वृतीची तरफदारी करण्यात तो चुकत नसे. त्याच्या या तरुण मित्रावर प्रत्यक्षात त्यानं प्रभाव टाकलेला नसला तरी हितकारक सल्ला देत राहिलेल्यानं निदान स्वत:च्या सद्सद्विवेक बुद्धीवर ताण हलका व्हायला मदत व्हायची. एका रात्री तो आला आणि सिल्व्हिआशी आपण पुन्हा ऋणानुंबध जुळवले असल्याची आनंदाची बातमी त्यानं प्रूस्तच्या कानावर घातलं. वर ऐकवलं, मानवी हृदयाचा सच्चा मिलाफ शक्य आहे. प्रूस्त भयंकर उखडला. त्याला लेक्चरच दिलं. पुन्हा तो रखेलीच्या कच्छपी लागला आहे म्हणजेच निष्ठूर अपेक्षाभंग त्याच्या नशिबी आहे हे निश्चितच, आणि त्याची रखेल जर का खरोखरच मेली तर खूष होण्याजोगं सबल कारण त्याला लाभेल, वगैरे वगैरे. स्वत:च्या रागाला शक्य तेवढा आवर घालून बर्ल कडवटपणे म्हणाला, की त्याच्या मित्राच्या मते प्रेम हे दुसरं तिसरं काही नसून हस्तमैयुनाचाच एक प्रकार आहे. प्रूस्तचा चेहरा अधिकच पांढराफटक पडला. तो उठला, ड्रेसिंगरुममध्ये गेला, तिथून तोंडसुख घेत राहिला. अखेर, सभ्यता, सौजन्य यांनीही त्याला सोडचिठी दिली. तो तारस्वरात ओरडला, "चालता हो ! चालतो हो !" बर्ल चालता झाला. आणि अश्या रितीनं प्रेमाप्रमाणंच मैत्रीदेखील कवडीमोलाची असते याचं प्रूस्तनं त्या तरुणाला सोदाहरण प्रात्यक्षिक दाखवलं. ज्या कल्पना तो बर्लला विशद करायचा त्यापैकीच ही एक कल्पना होती.

प्रूस्त आता नित्यनेमानं नियोजित भेटी घेत होता. ही सवय त्याच्या अंगवळणीही पडली होती. गेली कित्येक वर्ष त्यानं असं साहस केलं नव्हतं. आता, बऱ्याचदा तो बाहेर रेस्टॉरंटमध्ये तरी जेवत असे किंवा मोरान्दसारख्या त्याच्या एखाद्या तरुण मित्राला त्याच्या घरी बोलावत असे. सफरचंदाची दारू आणि तळलेले बटाटे पाव्हण्यासमोर ठेवले जात. या भेटी बऱ्याचदा सेलस्त ठरवत असे : 'आज संध्याकाळी मॉसिअँ मोरान्द यांच्यासंगे भोजन घेणं मॉझिअँ प्रूस्त यांना आवडेल.' आपल्या धन्याकडून उचललेल्या कडक वाक्प्रचारांचा वापर करताना तिनं एकदा टेलिफोनवरून सांगितलं होतं,"मॉसिअँ मार्सेल प्रूस्त यांच्याबरोबर



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

एकट्यानं भोजन करण्यास वैताग येत असेल तर मॉसिअँ मोरान्द यांनी त्यांना आवडेल अशा कुणालाही बोलवावं, परंतु मॉसिअँ मासेंल यांनी दाढी केलेली नसल्यामुळे त्यांची अशी विनंती आहे की मॉसिअँ मोरान्द यांनी अपरिचित लेडिजना पाचारण करून त्यांना अवघडवू नये.'' क्वचित प्रसंगी 'लारुद' येथे मांस रहित युद्धकालीन भोजन करत असताना, स्वत:च्या खडतर सामाजिक जीवनाबद्दल तो बोलत असे; काही वेळेला गतकाळात तो ओळखत असलेल्या लोकांविषयी सांगत असे; काही वेळेला त्याच्या कादंबरीच्या पुढील खंडात येणारा स्वान आणि इतर पात्रं, खास करून साँ लू आणि चार्लस यांच्यासंबंधी ऐकवत असे; तर काही वेळेला समलिंगरतींचा विषय काढत असे. समलिंगरती एव्हाना बरेच झाले असल्यानं ते 'नॉर्मल' आहेत हे त्याचं आवडचं प्रतिपादन. स्त्री पसंत करणाऱ्या पुरुषाबद्दल तो म्हणायचा, ''मी उत्तर देऊ शकेन त्याच्या वतीनं. तो पूर्णपणे ॲबनॉर्मल' आहे.'' एकदा संभाषणामध्ये एका माणसाचा विषय निघाला. त्याची ख्याती तशी संशय घेण्याजोगी. त्यानं युद्धाच्या आघाडीवर मुर्दुमकी गाजवून नावलौकिक मिळवलेला. प्रूस्तचं त्याच्याविषयीचं भाष्य : पुरुषाविषयी त्याला वाटणाऱ्या ओढीनं त्याला मर्दानीपणाप्रत नेलं आणि त्याच्या मर्दानीपणानं नावलौकिकप्रत.

प्रूस्त स्वत: मर्दानी होता आणि तसा पुरुषांमधील मर्दानीपणा त्याला नेहमीच पसंत असे. परंतु सांप्रत तो सोडोमच्या खळग्यात उतरला होता आणि या भयानक काळात, फार पूर्वीपासून सुप्तावस्थेत असणाऱ्या आणि कारण मिळताच क्षणार्धात उदभवणाऱ्या हिंसाचार आणि क्रौर्य या प्रेरणांनी त्याचा कब्जा घेतला होता. परंतु त्याची अपेक्षा असे, क्रौर्याच्या निव्वळ आभासत्मक प्रतिमेची वास्तवाची नव्हे. याचं प्रत्यंतर येतं आल्बेर ल कुझिआत याच्या 'बें ड्यू बालों डालसास'मध्ये.

आल्बेरच्या मालकीच्या या वेश्यागृहाला प्रूस्त भेट देत असे. इथले निकटवर्तीय दणकट तरुण त्याला आवडायचे. ३० मे १८८१ रोजी जन्मलेला हा आल्बेर त्याचा जुना दोस्त, त्याचा 'प्रोटेझ' तो उमरावांच्या पदरी 'फुटमन' असल्यापासूनची त्याची ओळख. खानदानी सदस्यांची मुक्तपणे भलाभण करण्याची प्रूस्तप्रमाणेच त्याची प्रवृत्ती. त्यानं मोठ्या प्रमाणावर धंदा खोलावा म्हणून प्रूस्तनंच त्याला प्रोत्साहन दिलं होतं. इतकंच नव्हे, तर, स्वत:च्या घरातील वापरात नसलेलं फर्निचर त्याला देऊन टाकलं होतं. एव्हाना त्याचा धंदा भरभराटला होता. आल्बेर बहुधा कॅशिअरच्या डेस्कपाशी बसून असायचा. निश्चल, निर्विकार. हातात इतिहासाचं बाड किंवा खानदानी वंशावलीचं पुस्तक. वरच्या मजल्यावर त्याची खाजगी खोली. तिला तो म्हणायचा 'रॉयल चेंबर' कारण, या सोडोमचा सर्वेसर्वा असा तो राजपुत्र होता. त्यानं प्रूस्तला सांगितलं होतं, ''मी घरी आहे हे दर्शविण्यासाठी माझ्या छोट्या खिडकीतला दिवा मी ठेवतो, आणि तुम्ही येऊ शकता. ती माझी 'सेसम' आहे आणि तुम्हाला ''लिलीज'' हव्या असतील तर अन्यत्र प्रयत्न करणं बरं.'' प्रूस्तच्या कादंबरीमधील



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

ज्यूपिअँचे हे उद्‌गार आल्बेरनंच प्रूस्तला सुनावलेले असणार हे नि:संशय. आल्बेरप्रमाणेच ज्यूपिअँसुद्धा त्याच्या गिऱ्हाईकांना त्यांच्या खऱ्या नावानं पुकारत नव्हता. गंमत म्हणून असेल नाहीतर व्यावसायिक गुप्तता पाळण्यासाठी त्यानं हा मार्ग अवलंबिलेला असेल. त्याच्या या 'टेम्पल ऑफ इम्मॉडेसटी'मध्ये त्याच्याबरोबर गप्पा करणं, 'सेक्स'विषयी त्याला पंपिंग करणं, दडून परिचितांच्या विक्षिप्त, ती ती बाह्य ठरतील अशा कृती पाहाण्यासाठी त्याच्या संगे जाणं हे प्रूस्तचे षौक. अशा प्रकारची कृत्यं त्यानं स्वत:ही प्रदर्शित केली असण्याची शक्यता आहे.

एक दिवस खऱ्याखुऱ्या खाटकाला भेटण्याची इच्छा प्रूस्तनं आल्बेरपाशी व्यक्त केली. आल्बेरला ऐन वेळा खरा खाटीका मिळू शकला नाही. खाटीक असल्याची बनावणी करण्यास तयार असणाऱ्याला एका तरुणाला त्यानं नीट पटवून प्रूस्तसमोर उभं केलं. प्रूस्तनं प्रश्नांची सरबती सुरु केली : 'आज काम केलंस तुझं? जनावर मारलंस तू? एखादा बैल? फार रक्त भळभळून वाहात होतं का त्याचं?'' तो तरुण त्याच्या प्रश्नांना अस्पष्टसा होकारार्थी हुंकार देत राहिला. शेवटी अवसान एकवटून म्हणाला, "अर्थात, मी मारलाय, मी माझे दोन्ही हात थैट आत घुसवले.'' प्रूस्तनं फर्मान सोडलं, "दाखव मला तुझे हात.'' एक दिवस आल्बेर त्याला खऱ्या खटकाच्या दुकानात घेऊन गेला. तिथं प्रूस्तनं एका शिकाऊ पोराला सांगितलं, "तू वासरू कसं मारतोस ते मला बघायचंय.'' हा उंच आणि सडसडीत झकास झुल्फेवाला खाटकाचा पोरगा आल्बेरटाइनच्या बंदिवासाच्या काळातील एका सकाळी तुम्हाला सामोरा येतो. गाईच्या मासाचे उत्कृष्ट आणि निकृष्ट असे तुकडे करत असताना आणि तोलत भासतो, 'कयामतच्या दिवशीचा खुबसुरत देवदूत, "चांगलं" आणि "वाईट" यांना वेगवेगळे करण्याची आणि आत्म्यांना तोलण्याची तयारी करत असलेला ! आल्बेरच्या वेश्यागृहाप्रमाणं ज्यूपिअँच्या वेश्यागृहाचा खेदजनक विरोधाभास आहे. तिथं अस्सल 'इव्हिल' नसायचं. साखळदंडात जखडलेल्या बॅरनला फटकावणारा एक खुनी आहे असं बॅरनला सांगून ज्यूपिअँनं ज्याला आणलेलं असतं तो मॉरीस प्रत्यक्षात जवाहिऱ्याच्या दुकानातील मृदू अंत:कारणाचा अप्रेन्टिस असतो. क्रौर्याचे असे नमुने पेश करण्यासाठी आणले जात होते, दुग्धालयातील पोरगा, आघाडीवरून सुटीवर आलेले कामगार-वर्गातील सैनिक, देशप्रेमी, मानवतावादी, निष्कपटी, निष्पाप. हा भयानक व्यवसाय ते करतात, यांत्रिक सवय म्हणून, शिक्षणाची हेलसांड झाल्यानं, पैशाच्या गरजेपोटी, आणि तो मिळवण्याचा हा मार्ग अंगमेहनतीच्या कामापेक्षा त्यांना कमी कष्टाचा वाटत होता, गफलतीन !

प्रूस्तच्या आयुष्यातील या त्याज्य एपिसोडच्या जाणीवपूर्वक हेतूविषयी अनुमान करता येणं शक्य आहे. या सोडोमच्या खळग्यात प्रूस्त त्याच्या दुराचरणाला अनुसरत होता. रेनाल्डो, ल्युसिअँ यासारख्या त्याच्या बरोबरींच्या मित्रांवरील प्रेमामधून त्याचं बीज रोवलं गेलं; फेनलाँ, आन्तोइन बिबेस्को यांच्यासारख्या त्याच्याहून उच्च सामाजिक स्तरावरील



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

त्याच्या स्नेह्यांविषयीच्या अशा जिव्हाळ्यामधून उलरिच, आगोस्तिनेल्ली यासारख्या सामाजिक दृष्टया त्याच्याहून खालच्या वर्गांमधील परिचिताविषयीच्या शारीरिक आकर्षणापर्यंत ते विकसित होत गेले, आणि आता भ्रमनिरासापोटी व्यावसायिकरित्या शरीरविक्रम करणाऱ्या पोट्यांबरोबरच्या वांझ संभोगामध्ये ते त्याची परिणती झाली होती. ''इव्हिल'शी त्याचे प्रयोग सुरु झाले होते – 'इव्हिल' जे बहुधा नैसर्गिक वा अनैसर्कि 'सेक्स'च्या प्रदेशात कुठंही अस्तित्वात नसतं. नैतिक संवेदनशून्यता, हताशांसाठीचं एक मृगजळ म्हणून त्याचं अस्तित्व वगळता इजा होऊ न देता आता तो त्याच्याशी संबंध जोडण्यासाठी स्वबलाची चाचणी करत होता. पैशाच्या मोबदल्यात आणि वेळ किंवा भावना खर्ची न घालता, तो केवळ सुख समाधानाच नव्हे तर मानवी समाज स्वस्तात खरेदी करत होता, अगदी हीन स्वरुपात आब्लेर-ज्यूपिअँचं देहविक्रय खाना अन्य कुठल्याही प्रकारासारखा समाजाचं एक संरुप होतं.

आल्बेरसारख्या किळसवाण्या पुरुषांशी आपल्या मालकानं संबंध जोडावेत हे न आवडून सेलस्तनं आपल्या मालकाची हजेरी घेतली तेव्हा त्यानं पुढं केलेली सबब कितीही लंगडी असली तरी तीत सत्याचा अंश होता. तो हसत हसत म्हणाला, "माय डियर सेलस्त, अगदी बरोबर आहे तुझं, पण इलाज नाही; तो मला पुरवत असलेल्या माहिती खातीर तो अत्यावश्यक आहे." युद्धकाळात प्रूस्तनं अगदी जाणूनबुजून स्वर्ग आणि नरक या दोन टोकावरील अनुभवांचा शोध घेतला. ते हासिल केले. हे अनुभव त्यांच्या कादंबरीच्या इमल्यामधील सापडत नसलेल्या कोनशिला देणार होते : व्हनितईल सेपटेट Vinteuil Septet आणि ज्यूपिअँचा देहविक्रयखाना.

तरीही वाईट उरतंच. या तरुण पुरुषांमधील क्रौयासाठीचा प्रूस्तचा शोध म्हणजे ज्वानीचा जोष आणि ननैतिकता यांच्या कल्पित सौंदर्याच्या सबोध आसक्तीचा केवळ एक भाग होता. अगदी लहानपणी, तो फक्त बावीस महिन्याचा होता आणि त्याचा भाऊ रॉबेरचा जन्म झाला होता आणि आईनं केवळ आपल्यावरच प्रेम करावं ही त्याची इच्छा फलद्रूप होऊ शकणार नव्हती. तेव्हा त्याला झालेल्या दुखापतींच्या बदल्याची ही त्याची एक प्रतिकात्मक कृती होती. रॉबेरचा दोष नव्हताच आणि मार्सेलनं त्याच्या भावाला लहानपणीच माफ केलं होत. परंतु त्याच्यामधील अतिक्रूर भागानं त्याच्या आईला माफ केलं नव्हतं. प्रूस्तच्या आयुष्याचं खोलवरचं गुपित, तणावाचं अंतिम मूळ, ज्यांनी घडवला होता त्याच्या आत्म्याचा विशालपणा, त्याचा चांगुलपणा आणि धारिष्ट्य, त्यांची कादंबरी आणि त्याचं दुराचरण, आता पृष्ठभागावर आलं होतं. तिरस्करणीय आणि विरूप कृतींमधून ते लगेचच आविष्कृत झाले होते. परंतु त्याच्या साऱ्या पापी सोबत्यांनी भीतीयुक्त आदर आणि सहानुभूतीनं ते माफ करायला हवं. शक्यता आहे, ही पापं त्यांच्या मुक्तीसाठी आवश्यकही असतील. आजवर बाहेर न पडलेला बाळपणीच्या हल्लेखोरी वृत्तीचा पू चव्वेचाळीस वर्षांनंतर आता वाट मिळाल्यानं बाहेर पडला होता, जेणेकरून अखेरीत त्याला मुक्तता लाभली होती, मरण्याची



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

सज्जता केली होती. त्याच्या कादंबरीमध्ये ज्या तऱ्हेनं ही भयानक कृत्ये येतात त्यावरून एक गोष्ट स्पष्ट आहे, जरी त्याचे या कृतींमधील कारण अर्थ त्याच्या नेणिवेच्या अगदी खोलतळीच्या गाभ्यातून आले असले तरी, त्याचं अर्थपूर्ण भान या निष्णात आत्म-विश्लेषकाला होतं. त्याच्या मृत आईवडलांच्या मालकीच्या फर्निचरची त्यानं आल्बेरच्या देहविक्रयखान्याला दिलेली भेट ही या संदर्भातील वानगीदाखल कृती. निवेदक ब्लॉखच वेश्यागृहाच्या मालकिणीला लेऑनीआत्याच्या खुर्च्या आणि सोफा भेट म्हणून देतो, त्यांचा वापर रोगट बंदिवान करत असलेलं पाहून पश्चात्ताप पावतो, त्या निष्ठूर संपर्कानं त्याला यातना होतात. त्या त्यानं दिलेल्या वस्तू स्वतःच्या बचाव करण्यास असमर्थ असतात. तो म्हणतो, 'If I had caused the body of a dead woman to be violated, I should not have suffered more'. जिच्या देहाची विटंबना प्रूस्तनं करू दिली होती, पाहिली होती ती मृतबाई त्याची आई होती. तो सांगतो, 'कुंटणखान्याला भेट देण्यासाठी मी पुन्हा कधीही परतून गेलो नाही, कारण मला वाटायचं, त्या वस्तू जिवंत झाल्या आहेत आणि माझी मनधरणी करत आहेत', "अरेबिअन नाइट्स'मधील अचेतन वस्तूंसारख्या, ज्यांमध्ये मानवी आत्मे बंदिस्त केलेले असतात, जे हौतात्म्य भोगतात आणि मुक्तीची याचना करतात ! असं असूनही प्रूस्त पुन:पुन्हा आल्बेरकडे जात राहिला होता.

प्रूस्त आयुष्यभर त्याच्या संग्रहातील छायाचित्रं त्याच्या नवीन मित्रांना दाखवत असे त्याची ही सवय, त्याचा षौक. परंतु आता त्याच्या या सवयीनं अधिक अभद्र रुप धारण केलं. आल्बेरनं मॉरीस सारा याला पुढं केव्हातरी सांगितलं होतं, त्यानुसार, प्रूस्त एक दिवस लाडक्या वा ख्यातनाम मैत्रिणीच्या छायाचित्राचं पाकीट घेऊन 'अॅटेल मारिग्नी'मध्ये आला. त्या संध्याकाळी त्याला सोबत करणारा तरुण खाटिक किंवा तारवाला यांनी निश्चितपणे ते अत्यंत आदरानं डोळा भरून पाहिले असते, कारण कौटुंबिक छायाचित्रं पाहाण्याचा धार्मिक विधी जसा श्रमिक वर्गामध्ये अत्यंत सौजन्यानं पाळला जातो तसा अन्यत्र कुठंही नाही. तथापि, आल्बेरनं कानमंत्र दिलेला असल्यानं तरुण पोरगा प्रूस्तची आवडती प्रिन्सेस्स हेलन द चिमे हिचा पोर्ट्रेट बघताक्षणीच किंचाळला, "आणि ही छोटी चालू बया आहे तरी कोण?" अशा तऱ्हेनं अनादर दाखवलेली तसबीर काही वेळेला मादाम प्रूस्तची असायची. कादंबरीमध्ये एक प्रसंग आहे. मॉन्सिजूव्हेन येथे मादमाइसेल व्हिन्त्यूइल आपल्या बापाच्या पोर्ट्रेटची अवहेलना करण्यासाठी आपल्या मैत्रिणींना चिथावते. प्रूस्तनं स्वतःच्या आयुष्यात असेच प्रसंग पुनरावृत्त केले होते. तथापि, मादमॉइसेल व्हिन्त्यूईल (जी तिचं आयुष्य तिच्या दुर्गुणांना समर्पित करते तसंच तिच्या मृत आईवडिलांच्या स्मृतीलही) हिच्या प्रमाणंच प्रूस्तच्या बाबतीतही खरं आहे की हे निंद्य कृत्य केवळ तिरस्काराचं नव्हे तर दुखावला गेलेल्या आयुष्यभराच्या प्रेमाचं एक लक्षण होतं.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

प्रूस्तच्या परपीडक वृत्तीनंही या काळात विकृत रुप धारण केलं असल्याचं दिसतं. तो उंदीर आणवून घेत असे आणि हॅटच्या पिनांनी त्यांचा जीव जाईपर्यंत टोचलं जात असताना तो ते दृश्य एकटक पाहात असे. हा प्रसंग आणि त्याचा अर्थ दाँसिएर' इथल्या निवेदकाच्या विवेचनामध्ये, दु:स्वप्नांच्या फॅन्टॅस्टिक आल्बममध्ये.... 'in which our parents who are dead have met with a serious accient, that does not preclude a speedy recovery. Meanwhile we keep them in a little ratcage, where they are smaller than white mice, covered with big red spots in each of which a feather is stuck, and address us with ciceronian speeches.' इथं आहेत बिचारे उंदीर, त्यांच्या जखमा आणि हॅट-पिना, लोखंडी तारां या उंदरांचा सापळा, ज्यात ते पकडले जातात आणि त्याच्यासमोर आणलेले जातात, आणि त्याचं प्रत्यक्ष अस्तित्व. त्याचे बळी नि:संशयपणे बऱ्याच गोष्टींच प्रतिनिधित्व करतात, कारण उंदीर हे नेणिवेच्या 'इन्फर्नो'मधील अतिशय शक्तीमान, वैश्विक आणि व्यामिश्र प्रतिक आहेत. समलिंगरती त्यांच्याकडे विशेष कामप्रेरणा आणि धास्ती म्हणून पाहातात आणि त्यांच्या लेखी ते 'ॲनल ॲग्रेशन' आणि 'ॲनल बर्थ' यांची बोधचिन्ह असतात. परंतु या काळात प्रूस्तच्या लेखी ते मुख्यत्वे त्याचे मृत आईवडील होते, त्यानं घेतलेल्या बदल्यामुळे 'गंभीर अपघातात' सापडले होते आणि गणना करता न येणाऱ्या काळानं खुजे केलेले, त्याच्या सबोध स्मृतीशी अश्राव्य गूढासंबंधी त्याच्याशी बोलत होते.

उंदराचे उल्लेख १९१८च्या एप्रिलमध्ये त्यानं प्रिन्सेस्स सुट्ओ हिला लिहिलेल्या पत्रात आढळतो : 'मला तोफांची आणि विमानांची भीती नाही वाटत, पण मला भीती वाटते अगदी कमी धोकादायक गोष्टींची, उदाहरणार्थ 'उंदीर'. १९१८च्याच वसंतामध्ये निवेदक ज्यूपिएँच्या देहविक्रयखान्यामधून बॉम्ब वर्षाव होत असताना बाहेर पडतो, स्वत:शी विचार करतो, 'गंभीर द्वंद्वाला भीक न घालणाऱ्या एखाद्याला झोप न येण्याची भीती वाटते, एखादा उंदराला घाबरतो, सिंहाला नाही घाबरत. आणि त्याला आठवतो अरिष्टाप्रत जाणाऱ्या पॉम्पी शहराच्या एका भिंतीवर लिहिलेला एक शब्द 'सोडोम'.

सामाजिक जीवनात कुणीतरी केंद्रस्थानी असणं प्रूस्तला बहुधा आवश्यक वाटत असावं आणि त्याच्यासाठी या स्थानी प्रिन्सेस्स सुट्झो विशेषमान झाली होती. प्रारंभीच्या काळात जे स्थान मादाम स्ट्रॉस आणि मादाम लेगेर यांना होतं ते सांप्रत प्रिन्सेस्सनं विभूषित केलं होतं. तो तिच्यावर स्तुतीसुमनांचा वर्षाव करत होता, तिच्या गाउनचं वारेमाप कौतुक करत होता आणि ती दुरावल्यासारखी वाटताच असूयाग्रस्त होत होता. आपण तिच्या प्रेमात असल्याचा, फारसा गंभीर नसला तरी, बहाणा ' तो करत होता. तिच्याविषयीच्या त्याच्या हळूवार भावनेपेक्षाही भलाभक्कम लाभ तिच्याकडून उठवता येईल याची त्याला पूर्ण जाणीव होती.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

'रिट्झ'मध्ये तिचं अपार्टमेंट होतं. तिथं त्याचं स्वागत होत होतं, नामवंत आणि स्वारस्य वाटावं अशा लोकांना तो भेटू शकत होता, त्यांना स्वत:च्या भोजन समारंभांना आमंत्रित करू शकत होता. थोडक्यात, स्वत:च्या घरात असल्यासारखा तो तिथं वावरू शकत होता. युद्धाच्या काळात अपार्टमेंटला लक्षणीय महत्त्व प्राप्त झालं होतं. कारण, ९-३० वाजता रेस्टॉरंटमधले दिवे मालवले जात होते आणि त्याच सुमाराला तर प्रूस्तचे सामाजिक जीवन सुरू होत होते.

सांप्रत 'रिट्झचा प्रूस्त' म्हणून तो ओळखला जात होता. ते भव्य हॉटेल त्याचं दुसरं घर बनलं होतं. त्याच्या अपार्टमेंटमधील बेडरुम इतकंच सोयीचं आणि सोहार्द्रपूर्ण. तिथली त्याला खडानखडा माहिती होती. तिथले मॅनेजर, वेटर, लिफ्ट चालवणारे छोकरे याच्याशी प्रिन्सेस्स एवढीच त्याची दोस्ती जमली होती. त्याच्या टेबलाभोवती पोरगेले सेवक आणि म्हातारे वेटर घोळका करत होते. एखाद्या दिवशी तो विचारायचा, "कोपऱ्यातील दोन बायांमधली तरुणी कोण? मला शोधून काढायला हवं, कारण, ती हुबेहूब माझ्या पुस्तकातल्या एका पात्राप्रमाणंच आहे. थोरली आहे तिला मी आधीपासूनच ओळखतो. आहे, माझ्या काळात तुम्ही तिला पाहिलं असतं तर !" तो तासन्‌तास त्यांच्याशी बोलत होता, त्यांच्या अनुभवांचं समन्वेषण करत होता, उदारहस्ते त्यांना टिप देत होता, त्याच्या अडीअडचणीत त्यांना मदत करत होता. आणि नवीन वर्षी त्यांची कृतातेनं ओथंबलेली पत्रं त्याच्या हाती पडत होती. ते त्याच्या स्वास्थाकडे आस्थेनं लक्ष्य पुरवत, त्याची कुठल्याही प्रकारची गैरसोय होऊ नये याची काळजी घेत, त्याच्या पाव्हण्यांची मस्तपैकी सरबराई करत, मुदपाकखान्यातील एखाद्या देखण्या छोकऱ्याशी त्याला बोलायचं असल्यास वा एव्हाना 'एन् आर एफ' कडून येऊ लागलेली प्रूफं तपासावयाची असल्यास ते त्याला खाजगी खोलीत स्वत: घेऊन जात.

संध्याकाळ झाली की 'रिट्झ'ला जाण्यासाठी तो बाहेर पडायचा. हजाम येऊ शकत असल्यास सेलस्त त्याला मालकाची दाढी करण्यासाठी आणि त्याचे केस कापण्यासाठी बोलावून आणत असे. त्यानंतर त्याचं अंग धुणं, पोषाख चढवणं या कामी ती त्याला मदत करत असे. कारण, त्याला नेहमीच उशीर होत असे आणि नेहमीच वेळ वाचवण्यासाठी अंगात आल्यागत तो धडपडत असे. सर्वात शेवटी, त्याची हॅट, त्याचा फर-कोट, त्याचे हातमोजे आणि त्याची वेताची छडी त्याच्या हाती ती देत असे. तो हॉटेलमध्ये पोचायचा तेव्हा त्याची टाय क्वचितच नीट बांधलेली असायची, हॅट डोक्याच्या मागच्या बाजूला सरकलेली असायची. दरवाजापाशी त्याच्या ओळखीच्या लोकांशी बोलत रेंगाळायचा. त्यानं स्वत: पार्टी आयोजित केलेली असली तर तिथं त्याची वाट पाहात बसलेल्या पाव्हणे-मंडळीचं स्वागत करायला मॅनेजर मागोमाग तो त्या स्थळी पोचायचा. त्याची पार्टी नसली तर प्रिन्सेस्स सुटझोच्या अपार्टमेंटमध्ये जाण्यासाठी लिफ्ट पकडायचा. अपरिचितांना त्याचा वावर एखाद्या संशयितासारखा वाटायचा. धुंदीचा अंमल असल्यागत. 'तो तुमच्यापुढं येत नसे,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

एकदम अवतीर्ण होत असे.' पूर्वीपेक्षा आता तो स्थूल झाला होता. खास करून, दमेकऱ्यांसारखा छातीमध्ये. त्याच्या देहाच्या मानानं दाढी प्रमाणाबाहेर वाढली होती. तरी इतर बाबीमध्ये तो होता तसाच राहिला होता. मानेलगत कापलेले केस, उंचावलेली कॉलर, तरुणपणीचा घट्ट कोट- वाटायचं, तो कुणी तरी दुसऱ्या युगातील जिवंत राहिलेला माणूस असावा.

त्याच्या मित्रांच्या घोळक्यात, एखाद्या वेळी, तो तिरशिंगराव वाटायचा. आपल्या क्लेशांचं रडगाणं लावणारा. परंतु, काही वेळेला, तो अगदी मनमोकळा असायचा, लोभस आणि आनंदी. त्याच्या हास्याचा स्फोट झाला की त्याचे सुरेख दात चमकायचे. नंतर लागलीच, खोड करताना पकडल्या गेलेल्या द्वाड मुलागत आपल्या हातानं स्वतःचं तोंड झाकायचा. एखाद्याला त्याचं व्यक्तिमत्त्व गोंधळून टाकायचं – काही वेळेला, छाप पडावी असं जोशपूर्ण तर काहीवेळेला पूर्णपणे बायकी, क्वचित प्रसंगी अत्यंत विनम्र तर एखाद्या वेळी बेछूट. एकाच वेळी तो फार वयोवृद्ध मॅन्डेरिन वाटायचा आणि एखादं बालकही. संध्याकाळचं जेवण त्यानं डायनिंग रुममध्ये केलं असलं तरी बऱ्याचदा तो संध्याकाळ वरच्या मजल्यावर घालवायचा. कारण डायनिंगरुम मधील दिवे मालवले जात. वेटरांना तो सांगायचा, "पुन्हा लाव ते दिवे क्षणभर, निघायचीच इच्छा आहे माझी, परंतु मला असं वाटता कामा नये की मला घालवण्यात येत आहे." वरच्या मजल्यावरील प्रिन्सेस्स सुटझोच्या ड्रॉईंगरुममधील शेकोटीलगत बसून त्याची बडबड चालू असायची. शेवटी निघण्या आधी तो कोट काढायचा खोलीतील तपमान आणि बाहेरचं तपमान यामधील क्षणिक समतोलपणा राखण्यासाठी, असं तो सांगायचा. नंतर कोट पुन्हा अंगावर चढवायचा आणि आपण बाहेर पडत आहोत हे विसरून स्थानपन्न व्हायचा, बोलत बसायचा, बोलतच राहायचा.

त्याच्या सामाजिक जीवनाची गती आता भोवळ येण्याजोगी झाली होती. प्रिन्सेस्स सुट्झोकडचे भोजनसमारंभ दमछाक होईस्तोवर एकापाठोपाठ होत होते. २१ एप्रिल १९१७ रोजी वा त्या सुमारास तिच्या अपार्टमेंटमध्ये मोरान्द, कॉक्तू, त्याचे जुने स्नेही मार्क्विस द लान्द्र आणि कॉम्प्तेस्स द शेव्हिग्न यांच्याबरोबर त्यानं खाना घेतला. ज्या स्त्रीच्या मागं तो तरुणपणी लागला होता तिच्यासंगे त्याच्या झकास गोष्टी रंगल्या. तेवढ्यात कुणीतरी अनवधानानं बोलून गेला की प्रिन्सेस्सला भेटण्यासाठी प्रूस्त आगाऊ वर्दी न देता वरच्या मजल्यावर येतो. या बोलण्यानं प्रूस्त सर्द झाला. कारण त्यानं मादाम द शेव्हिग्नला सांगितलं होतं की तो कधीच बाहेर पडत नाही. १४ जुलैला प्रूस्तनं प्रिन्सेस्स, मोरान्द आणि एटीएन्न द बोमाँ यांना खाना दिला. कॉम्प्ते द बोमाँ यानं पूर्वीच्या सोसायटी व्यक्तींच्या गोष्टी सुनावल्या. त्या व्यक्तीपैकी मादाम स्टँडिश आणि रॉबेर द मॉन्तेस्क्युइउ हे प्रूस्तचे जानपहेचानवाले. फ्रान्सिस जेम्स या कॅथलिक कवीबरोबर काही महिन्यापूर्वी झालेल्या आपल्या भेटीचा वृत्तांत प्रूस्तनं ऐकवला. म्हणाला, त्याची समजूत, तो गरीब आणि श्रद्धाळू असावा. तथापि,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

प्रत्यक्षात त्याला आठवून आलं होतं की तो ऐहिक गोष्टींना महत्त्व देणारा होता, समाजात असलेल्या स्वत:च्या लाग्याबांध्याचा त्याला अभिमान होता. शिकारी, तेल-पुरवठा हे त्याच्या आवडीचे विषय होते. संध्याकाळी, प्रूस्तनं मोरान्दला खाजगीत सांगितलं की तो एक भव्य पार्टीत एक ख्यातनाम नटी मोरान्दच्या काही कवितांचं वाचत करणार आहे.

ही भव्य पार्टी होण्याआधी प्रूस्त, मोरान्द आणि बॉमाँ यांनी एकत्र जेवण घेतलं. या समयी प्रिन्सेस्स सुट्झो, कॉक्तू, प्रिन्सेस्स म्यूरा आणि रीनाख हेसुद्धा आले. बॉमाँ संमोहन शास्त्राबद्दल बोलला. एका हिप्नोटिस्टला पाचारण करण्यातही आलं. त्यानं एका पाठोपाठ एका पाव्हण्यांना निद्रेच्या आधीन केलं. त्याचं प्रात्यक्षिक चालू असतानाच हवाई-हल्ल्याचा इशारा झाला. सायरन वाजले. प्रकाशझोत फाकले. फ्रेंच लढाऊ विमानानी आकाशात झेप घेतली. एव्हाना सर्वांना संमोहनामधून जागं करण्यात आलं. प्रूस्त अगदी शांत राहिला, म्हणाला, "ट्रान्समध्ये गेलेल्या लोकांना नेहमीच्या त्याच्या भविष्याबद्दल बोलायला सांगितलं जातं, कारण त्यांच्या गतकालाच्या झाडा त्यांना द्यावा लागेल ही त्यांची धास्ती ! "नंतर तो उठला, बाल्कनीत गेला. विमानं वर झेपावलेली. नक्षत्रांकित आभाळात तारकापुंजागत एकत्र. हॉटेलमधील कॉरीडॉरमधून मोत्यांचे हार घट्ट धरून स्त्रियांची सैरभैर धावपळ. 'द बेरिअल ऑफ काऊंट दोरगा' या एल् ग्रेकोच्या पेटिंगचं प्रूस्तला स्मरण झालं. या चित्रामध्ये दोन पातळ्यांवरील घडामोडी रंगवलेल्या आहेत. एक, स्वर्गातील दुसरी खाली भूलोकी. त्याचं हे निरीक्षण 'ल तॉ रव्हू' मध्ये चित्रित झालं आहे. इथं नाईट गाऊनमधील स्त्रिया अमेरिकन ज्यू आहेत. बचिकेएवढ्या छातीवरील हार त्यांनी घट्ट धरलेले आहेत. कारण, त्यांच्या आधारेच कंगाल ड्यूकबरोबर लग्न करणं त्यांना शक्य होणार होतं.

स्वत: दिलेल्या पार्ट्यांनाच फक्त प्रूस्त पैसे खर्चत होता असं नव्हे तर, प्रिन्सेस्स सुट्झोनं आयोजित केलेल्या पार्ट्यांचाही खर्च करत होता, तोही बहुधा सढळ हातानं. एरवीच्या काळात खर्चाची त्याला क्वचितच फिकीर असे. परंतु, युद्धाच्या काळात त्याची मिळकत मर्यादित झाल्यानं नगद पैशाची त्याला वरचेवर चणचण भासू लागली होती. ज्यादा पैसा कसा कमावता येईल याचा विचार करत असताना एक कल्पना त्याच्या डोक्यात आली. काही धनिक पॅरिसवासी त्या मार्गाचा अवलंब करत असत. तो मार्ग म्हणजे स्वत:चं फर्निचर विकणं. तोच मार्ग अवलंबिण्याचा निर्णय त्यानं घेतला. त्याचं बरचसं, किंबहुना सारंच फर्निचर त्याच्या लेखी कुचकामी होतं. सोळाव्या लुईच्या काळातील आरामखुर्च्या, कसरीनं खाऊन टाकला जाण्याची शक्यता असलेला एक सोफा, काही टॅपेस्ट्री, डायनिंगरुममधल्या काही खुर्च्या, गेली दहा वर्षं सामानाच्या खोलीत पडून असलेला एक रग, एक वॉर्डरोब, लिव्हिंगरुममधील चुलफळी व खोली विशोभित करणार एक घड्याळ, कुटुंबाचं चांदीचं सामान इत्यादी गोष्टी विकायला काढण्याचं त्यानं निश्चित केलं. या संदर्भात, बेरी, मादम कातुस्स आणि स्ट्रॉस या त्याच्या मित्रांशी तो खाजगीत बोलला. बेरीनं काही नगांबाबत



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अदमास दिला परंतु, इतर गोष्टींबाबत त्याचा काही उपयोग होऊ शकला नाही. मादाम कातुस्सनं अंदाज वर्तवला आणि दोन संभाव्य गिऱ्हाईकांना त्याच्या घरी पाठवलं. त्या होत्या घरंदाज स्त्रिया. त्यांना पेंटिंगमध्ये स्वारस्य. दुपारी दोन वाजता त्या त्याच्या घरी गेल्या, यावेळी त्याच्या अपार्टमेंटमध्ये कुणी येत नसत. तथापि, सेलस्तनं त्यांचं स्वागत केलं, दिवाणखान्यांच्या खिडक्यांची शटर्स उघडली. त्यांनी चौकस नजरेनं फर्निचर पाहिलं. निरीक्षण चालू असताना त्यांनी तक्रारीचा सूर लावला. हिरवी टॅपेस्ट्री फारच हिरवी आहे, आराम-खुर्च्यांची डागडुजी करण्यात आली आहे. दरम्यान, खिडक्या उघडल्यामुळे प्रूस्त बिछान्यात कुडकुडू लागला. त्या दोन बायांवर तो अतिशय चिडला. मादाम कातुस्सचाही त्याला राग आला. 'रिटझ'मध्ये त्यानं तिला खाना दिला होता तेव्हा त्याच्या आर्थिक समस्यांबद्दल त्यानं सांगावं म्हणून ती खनपटीलाच बसल्यानं आपला विचार त्यानं तिला बोलून दाखवला होता. एमिल स्ट्रॉस अधिक समजुतदार आणि कामाचा निघाला. त्यानं काही गोष्टी मागवल्या, त्यांचं मूल्यमापन केलं आणि व्यापाऱ्यांशी व संभाव्य गिऱ्हाईकांशी बोलणी केली. सामान विकण्यात तो यशस्वी ठरला. वर्ष संपायच्या आत त्यानं सेलस्तपाशी १४,००० फ्रँक्स पोचते केले. ४,००० दोन टॅपेस्ट्रींचे (प्रूस्तच्या मते गिऱ्हाईकांना सौदा स्वस्तात) आणि एक सोफा आणि चार आरामखुर्च्यांचे १०,००० इतर वस्तू पाठवण्यासंबंधी प्रूस्तशी त्याचं बोलणं झालं आणि त्यानुसार सामानाच्या कोठीत पडलेले रग त्यानं पाठवून दिले, पण नंतर अचानक पुढील विक्रीबाबत त्याचा उत्साह मावळला.

जुन्या मित्रांचं प्रस्थान, एनआरएफ' कडून येणारी प्रूफं, प्रूस्त आणि प्रिन्सेस सूट्झो यांच्या प्रकृतीत होणारा अचानक बिघाड या व्यापातापातून सवड मिळेल तसे भोजन समारंभ दरम्यानच्या काळात चालू राहिले. १५ नोव्हेंबर १९१७ रोजी प्रिन्सेस्सला थारेपालट म्हणून तो तिला क्रिलाँ इथं घेऊन गेला. पण तिथं ती फार काही खात नसल्याचं पाहून धास्तावला. दुसऱ्या दिवशी त्यानं सेलस्तला पाठवून तिच्या तब्यतीची चौकशी केली आणि काही दिवस बाहेर न पडण्याचा तिला सल्ला दिला आणि धुक्यात फेरफटका मारायला गेल्यामुळे तो स्वत: आजारी पडला असल्याचं तिच्या कानावर घालायला सांगितलं. १ डिसेंबरला तिनं आयोजित केलेल्या भोजनास तो गेला. काहीसा कुरबुरतच. मोरान्दविषयी त्याला विशेष आस्था. इटालीला त्याची बदली व्हायची होती. बोलत असतानाच दम्याचा ॲटक येत असल्याचं त्याला जाणवलं. दिलगिरी प्रदर्शित करून तो उठला. खाली उतरला आणि टॅक्सीची वाट पाहात राहिला. बराच वेळ त्याला टॅक्सी मिळू शकली नाही. तोवर बाकीचे पाव्हणे निघूनही गेले. अखेर टॅक्सी मिळाली आणि तो घरी परतला. त्याला एवढं उदास वाटू लागलं की तिच्या खान्यास पुन्हा न जाण्याचा विचार त्याच्या मनात घोळू लागला. याबाबत तो सेलस्तपाशी बोलत राहिला. यातच एवढा वेळ गेला. फार उशीर झालेला. अखेर त्यानं ठरवलं, प्रिन्सेस्सला पत्र लिहायचं. लिहिलं तिच्या निकट सहवासात राहाता न आल्याबद्दल :



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

खंत व्यक्त केली आणि अॅपेन्डिक्स लागलीच काढून टाकण्याचा तिला सल्ला दिला. त्याचा सल्ला मानून डिसेंबर अखेर तिनं ऑपरेशन करून घेतलं. त्या नंतर प्रूस्तची पत्रं तिला वरचेवर जाऊ लागली. तिच्या तब्यतीचे रिपोर्ट मिळवून तो मोरान्दला तारेनं कळवू लागला. तिला थोडं बरं वाटू लागताच तिच्या चौकशीला नेमानं जाऊ लागला. एक अपंग दुसऱ्या अपंगाला भेटतो तेव्हा अडचणी उद्‌भवणं अटळच. समय अडचणींचा आणि भेटी दमणूक करणाऱ्या, हवामान खराब आणि काळ औदासीन्यपूर्ण, खिन्न, तशात अवसान पूर्ण गळालेलं. त्यात हृदयविकाराच्या झटक्याचा त्रास आणि ब्राँकायटिसची लक्षणं, तरीही, 'रिट्झ'वर जाण्याचा शिरस्ता महत्प्रयासे प्रूस्त पार पाडत राहू लागला. काही वेळेला कांकू करायचा. एका रात्री त्यानं पाहिलं, बाहेर धुकं पसरलेलं आणि त्याचा फुलवालाही गायब. त्यानं बाहेर पडण्याचा बेत रद्द केला. बऱ्याचदा तो स्वत:ला विचारायचा, युद्धाच्या काळात, लष्करी सेवेसाठी अपात्र ठरवण्यात आलेल्या माणसासाठी नाही म्हटलं तरी 'रिट्झ' थोडंफार शानदारच.

## एकोणीस

१९१८ साल उजाडलं. युद्ध शिगेला पोचलं. फ्रेंच, ब्रिटिश आणि अमेरिकन या दोस्त राष्ट्रांचे सैनिक भरभरून येऊ लागले. त्याचं ठिकाण तसं एका बाजूलाच. त्याचं बेडरुम आणि 'प्लेस व्हेन्दोम'चा दिवाणखाना या दरम्यानच त्याचं जाणंयेणं. तरीही सैनिकांची उपस्थिती त्याला जाणवायची. एका रात्री त्याला आढळून आलं की त्याच्या इमारतीमधील कोठीची खोली कॅनडियनांना भाड्यानं देण्यात आली आहे. त्याला वाटलं, ते साखर आणि अन्य जीवनोपयोगी वस्तूंचा साठा करून ठेवत आहेत. त्यांच्यापाशी त्या मुबलक असूनही फ्रेंच भुकेले असतानाही ते साठा करत आहेत ही गोष्ट त्याला खटकली. एका रात्री मागचापुढचा विचार न करता तो फेरफटका मारण्यासाठी गावाबाहेर पडला. रस्त्यावर बर्फ साचलेलं. वाटेत त्याला अमेरिकन सोजीर भेटले. ते 'हॉटेल बेडफोर्ड' शोधत होते. आणि ते नाव प्रूस्तनं कधी ऐकलेलं नव्हतं. त्यांच्याशी तो इंग्रजीमध्ये बोलू शकत नव्हता आणि त्याचं फ्रेंच काही केल्या त्याला कळत नव्हतं. त्यामुळे त्या हॉटेलच्या शोधार्थ तोसुद्धा त्यांच्यासवे पावलं उचलू लागला. नाक्यावरच त्यांना ते आढळलं. एका रात्री 'रिट्झ'मध्ये तो एकटाच जेवत असताना बाजूच्या टेबलावर इंग्रजांचा एक ग्रूप बसला होता. त्यात ड्यूक ऑफ मार्लबरोचा एक वंशज होता– पुढं नावारूपाला आलेला विस्टन चर्चिल.

जानेवारीच्या अखेरीस जर्मन विमानांनी पॅरिसवर हल्ले सुरू केले. नागरिकांना तळघरात आसरा घेण्यास सांगण्यात आलं. बुलेव्हार होस्समानच्या तळघरात सेलस्त सरपटत गेली. परंतु, इथंही संरक्षणाची हमी नव्हती. ती घाबरली आणि ती निघून जाईल म्हणून प्रूस्त धास्तावला. हवाई हल्ल्यांच्या वेळी प्रूस्त घरी असला तर बिछान्यातच पडून राहायचा. एकदा



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

बोरोदींचं 'सेकंड क्वाट्रेट' ऐकून तो 'गाब्रिएल द ला रोशफुको' मधून बाहेर पडला तेवढ्यात भोंगे वाजले, त्याला टॅक्सी मिळाली. टॅक्सी ड्रायव्हर म्हातारा, बहिरा. त्यानं अर्धा तास टॅक्सी सुरूच केली नाही. आणि नंतर 'आव्हेन्यू द मेसिन'मध्ये आणखीन अर्धा तसा उभी करून ठेवली. दोन्ही वेळेला प्रूस्त टॅक्सी बाहेर पडून टॅक्सी शेजारी उभा राहिला, तो घरी पोचला तेव्हा ड्रायव्हरला आपल्या अपार्टमेंटमध्ये रात्रौ मुक्कामाला राहायला सांगितलं. त्या म्हाताऱ्याला हल्ला सुरू असल्याची वार्ताही नव्हती. तो म्हणाला, "तो इशारा फसवा आहे. शहरावर एकही विमान नाही." आणि त्याच वेळेला काही अंतरावरील रस्त्यावर बॉंबस्फोट झाला.

एका रात्री इशाऱ्याचे भोंगे झालेले असूनही प्रूस्त बाहेर पडला. काहीही करून त्याला तात्काळ त्याचा मित्र रेमॉं फर्नांडिसला भेटायचं होतं. त्याचं घर प्रूस्तनं शोधून काढलं पण दरवान बेपत्ता. तो तळघरात आसऱ्याला गेलेला. नाक्यावरल्या मोबाईल गन फैऱ्या झाडत नसल्यामुळे त्यानं कोर्टयार्डमधून त्याच्या मित्राच्या नावाच्या पुकारा केला. खिडकी उघडी असल्यानं अंथरुणात पडलेल्या फर्नांडिसनं त्याच्या नावानं मारलेली हाक ऐकली. त्याला वर बोलावण्यात आलं, वर पोचताच तो म्हणाला, "मेहरबानी कर माझ्यावर, अत्यंत अयोग्य वेळीची मेहरबानी. मी तुला त्रास देतोय हे समर्थनीय नाही आणि यावरून तू नेहमीच माझा उद्धार करशील, पण माझी अडचण तू ध्यानी घ्यावीस. तुला इटालियन येतं Sans rigueur चा समानार्थी इटालियन शब्द कसा उच्चारला जातो, "Senza rigere" तरीही प्रूस्त म्हणाला, "पुन्हा उच्चारायला लावल्यास तुला मी फार त्रास तर देत नाही ना? परभाषेतील एखाद्या शब्दाचा उच्चार कसा करायचा हे मला कळत नाही तेव्हा मला एक प्रकारचा घोर लागतो. मला तो भावत नाही, तो आत्मसात करता येत नाही, त्याला मी माझा एक भाग बनवू शकत नाही." त्यानं खुलासा केला की त्याच्या हस्तलिखितात Sanza rigere वापरण्याचा त्यानं मूर्खपणा केला आहे. आणि त्याबद्दल तो फार नाखूष आहे. फर्नांडिसनं शब्द पुन:पुन्हा उच्चारले आणि प्रूस्तनं डोळे मिटून ते ऐकले. नंतर त्यानं या मित्राचे भरभरून आभार मानले. निरोप घेतला आणि ज्वाला भडकलेल्या रस्त्यामधून दिसेनासा झाला.

बॉंब, बॉंबचे उडणारे कपचे यांची दिक्कत प्रूस्तला फारशी नव्हती. त्याला घोर लागून राहिला होता तो व्यक्तिगत विवंचनांचा आणि या क्षणी त्या असंख्य होत्या. विशेषत: 'एनआरएफ'च्या संदर्भातील तर अस्वस्थ करणाऱ्या होत्या. सांप्रत, दुसऱ्या खंडाची प्रूफं तो तपासत होता. एका प्रकरणासाठी राखून ठेवलेलं 'आ लॉम्ब्र दे जन फिल आं फ्लर' हे शीर्षक या खंडाला देण्याचं त्यानं निश्चित केलं होतं. रणधुमाळीतही त्याच्या बेडरुममध्ये तो काम करत होता परंतु, हे काम निकरीचं होऊन बसलं होतं. कारण, त्याचे डोळे त्याला सतावत होते आणि. दुर्दैवानं प्रूफं नियमितपणे मिळण्याची शाश्वती नव्हती. मुद्रक फारच



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

बेफिकीर निघाला होता. हस्तलिखितांची त्याला पर्वा नव्हती. आणि एकदा तर अख्खी नोंदवही त्यानं हरवली होती. काही काळ, कामगार येत नसल्याची सबब पुढं करून प्रूफं पाठवण्याचं थांबवलं होतं. या अशा मुद्रकावर विश्वास तरी कितपत ठेवायचा? 'एनआरएफ'शी आपण उगाचच करारबद्ध झालो असा विचरही त्याच्या मनाला स्पर्शून गेला होता.

मार्चमध्ये जर्मनांचे बॉंबहल्ले प्रखर झाले आणि प्रूस्तची तब्यतही बिघडली. त्याला भोवळल्यागत वाटू लागलं. पूर्वीप्रमाणं त्याला जलद बोलता येईनासं झालं. बोलणं अस्पष्ट झालं. ही लक्षणं काही तेवढी गंभीर म्हणता येण्याजोगी नव्हती तरी त्याच्या आईच्या शेवटच्या आजाराची त्यांनी त्याला तीव्र स्मरण करून दिलं. काही धक्कादायक शक्यता त्याला प्रकर्षानं जाणवल्या. वाटलं, त्याच्या मेंदूवर परिणाम झाला आहे; त्याच्या वाचेत व्यंग वाढीला लागत आहे आणि हळूहळू तो वाचा हरवूनही बसेल. कदाचित, त्याल इतरांपासून अलग व्हावं लागेल; कदाचित् अखेरचाउपाय म्हणून मेंदूवर शस्त्रक्रिया करून घ्यावी लागेल. तो डॉक्टरांना भेटला. त्यानं त्याला जे वाटतंय तसं काही नसल्याचं सांगितलं, केस गंभीर असल्याचंही त्यांनी अमान्यही केलं. त्याल वाटलं, हे भयसूचक आहे कारण सत्य सांगायला ते घाबरत आहेत. खरं तर त्याच्या आपत्तींपैकी ही एक, तीही जवळ येऊन ठेपलेली अधूनमधून ही लक्षणं त्याला जाणवायची, त्रस्त करायची, परंतु या ना त्या कारणानं ही आपत्ती बेमुदत पुढं ढकलली गेली.

दरम्यान, प्रूस्तनं घिसाडघाईनं स्वत:ला एका दुसऱ्या कामात गुंतवून घेतलं – संग्रह काढण्यासाठी त्याचे लेख व विडंबन तो गोळा करू लागला. संग्रहाचे नाव मुक्रर केले : 'पासतिश ए मेलांझ.' शिवाय, जाक एमिल ब्लांशच्या 'द दाव्हिद अ देगा' ला प्रस्तावना लिहिण्याचं मान्य केलं आणि त्या कामालाही तो लागला. ही प्रस्तावना त्याच्या मनस्तापाला कारणीभूत ठरली. ब्लांशला ती आवडली नाही. प्रूस्तच्या कानावर त्यासंबंधी ज्या गोष्टी कानावर येत होत्या त्यावरून त्यानं तसा समज करून घेतला होती, तरीही तो सर्वांपाशी त्याबाबत बोलत होता, सांगू नये तेही सांगत होता. शेवटी यातून स्वत:ची सुटका करून घेण्यासाठी प्रूस्तनं त्याला लिहिलं, 'तुझ्याकडून लोभस विनंती मिळण्याचं आणि माझ्या इच्छेनुरुप लिहिण्याचं भाग्य मला लाभलं. सांप्रत, हे अधिक चांगलं होणार नाही का, की (प्रस्तावना) अप्रकाशित राहावी, ती गोष्ट फक्त आपल्या दोघांमध्येच राहू द्यावी.' परंतु, त्याची प्रस्तावना छापली गेली व पुस्तक १९१९च्या मार्चमध्ये प्रकाशितही झालं.

वसंतात आणि उन्हाळ्यात युद्ध निर्णायक अवस्थेप्रत लढले जात असताना प्रूस्तला त्याची प्रस्तावना, त्याची प्रूफ, त्याची वाचा हरवली जाण्याची शक्यता याची काळजी वाटू लागली. त्यात भर पडली त्याच्या नवीन सेक्रेटरीबद्दलच्या चिंतेची. हा सेक्रेटरी त्यानं 'रिट्झ' मधून मिळवला होता. तसा तो सुशिक्षितही नव्हता. या छोकऱ्यात चित्रकाराचे 'टॅलेंट' आहेत



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

असं प्रूस्तच्या मनानं घेतलं. काही वेळेला, मोकळा वेळ मिळाला की प्रूस्त त्याला बरोबर घेऊन चित्रप्रदर्शनाला जाऊ लागला. एका रात्री, फातिन-लातूरनं काढलेल्या एका 'स्टिल लाईफ'चा अभ्यास करण्यासाठी दोघंही ब्लांशच्या घरी गेले. त्याच्या घरी कुणीतरी पाव्हणे आले आणि छोकरा एका कोपऱ्यात निमूट बसून राहिला. ज्या कामासाठी ते आले होते त्याबाबत बोलणं झालं नाही. प्रूस्त त्याला घेऊन मित्रांकडे जाई तेव्हा त्यानं त्याचे कॅनव्हास मित्रांना दाखवावेत म्हणून त्याला आग्रह करत असे त्याच्यातील कलागुण, प्रूस्तच्या हस्तलिखिताच्या कामी त्याची होणारी मदत जमेस धरूनही त्या दोघांमधील संबंध फारसे सुखदायी ठरत नव्हते, कारण, बहुधा छोकरा फारच कोवळा होता आणि धनी फारच पंगू.

ऑक्टोबरच्या प्रारंभी जर्मनांची पिछेहाट होऊ लागली. फ्रान्समधून ते माघार घेऊ लागले. त्याच सुमारास प्रूस्तच्या कानावर आलं की, त्याचा भाऊ आघाडीवर मरता मरता वाचला. त्याच्या डोक्याला जबर दुखापत झाली असून बराच रक्तस्राव झाले. तशा अवस्थेत जवळपासच्या एका गांवढ्या घरात त्याच्यावर तातडीचे उपचार झाले आणि तिथून त्याला पॅरिसला हलवण्यात आलं. प्रूस्त तिथं जाऊन त्याला भेटला. प्रूस्तनं केलेल्या विनवण्या धुडकावून आघाडीवर जाण्याचा त्याचा हेका चालू राहिला. प्रूस्तनं त्यावर वाद घातला नाही, त्याची विचारपूस करण्यासाठी जात राहिला. पण या दगदगीचा त्याला त्रास झाला. त्याला सर्दी झाली आणि आठवड्याभरासाठी त्यानं 'रिट्झ' सोडलं. बरं वाटू लागताच पुन्हा तिथं जाऊ लागला, निरनिराळ्या मित्रांसमवेत खाना घेऊ लागला. पण त्यात प्रिन्सेस्स सुट्झो नसायची. तिच्याबरोबरचे त्याचे संबंध दरम्यानच्या काळात बिनसले होते. एका पत्रात त्यानं तिला विचारलं होतं, 'पुन्हा मी तुला भेटू का? किंवा "गुड बाय" म्हणायची हीच वेळ आहे?... विचार करता करता एकूण परिस्थितीमधील विनोदी अंशच पुन:पुन्हा माझ्या नजरेसमोर येतो. तुझ्या नेहमीच्या सवयीनुसार आताही माझ्याविरुद्ध कुठलीतरी नवीन तक्रार तू शोधून काढशील. जर्मन गराड्याचा वापर करतात तसाच या हिकमतींचा वापर तू सतत करत असतेस. परंतु बचाव सोपा असतो.'

याच महिन्याच्या अखेरीस 'पास्तिश ए मेलांझ' साठी तो लिहित असलेल्या एका नव्या विडंबनानं त्याला जाम सतावलं. हे विडंबन जुनंच होता पण त्याचे पुनर्लेखन करून प्रूस्त त्याचा विस्तार करत होता. यावेळी ड्यूक द गुईश, प्रिन्स आन्तोइन बिबेस्को आणि मादाम स्ट्रॉस या मित्रांचा उल्लेख करण्याची संधी त्यानं साधली होती परंतु आपला उल्लेख छापील स्वरूपात यावा ही गोष्ट मादाम स्ट्रॉसला रुचली नव्हती आणि प्रूस्त पुन:पुन्हा तिची समजावणी करत होता, तिला प्रूफं दाखवत होता, उताऱ्यातील मजकूर बदलण्याची आणि तद्नंतर प्रूफं दाखवण्याचं आश्वासन देत होता. त्यांच्यामध्ये काही समझोता घडून येण्याआधी, युद्धात शस्त्रसंधी झाला.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दरम्यान, 'पास्तिश ए मेलांझ'च्या प्रूफांतील दुरुस्त्या करण्याच्या कामी तो गुंतला होता– मादाम स्ट्रॉसवरील उतारा तिची मर्जी खफा होणार नाही याची दक्षता घेत त्याची फेरमांडणी करत होता, बेरीला मान्य होईल अशी अर्पणपत्रिका लिहिण्याचा प्रयत्न करत होता आणि प्रिन्सेस्स सुट्झो खूष होईल असा मजकूर समाविष्ट करण्यासाठी धडपडत होता. शिवाय, त्याला शक्य होईल त्या मार्गानं पैसे उभे करण्याच्या कामी प्रयत्नशील होता. प्रूफं तपासणं आटोपलं. पण पैशाची विवंचना काही सुटू शकली नाही. स्ट्रॉसमार्फत त्याचं कार्पेट विकलं गेलं परंतु, इतर फर्निचर विक्रीबाबत तो फारशी प्रगती करू शकला नाही. त्यातील काही वस्तू बेरीनं त्याच्या अखत्यारित्या. 'अमेरिकन चेम्बर ऑफ कॉमर्स'च्या तळघरात नेऊन ठेवण्याची विनंती केली. दुर्दैवानं, या क्षणी त्याच्या गरजाचा ताण असह्य झाला. नुकतंच बुल्हेवार होस्समानवरील तो राहात होता ती इमारत विकली गेली होती आणि जवळजवळ २५,००० फ्रँक्स एवढं थकलेलं भाडं नवीन मालक लगेचच त्याच्याकडे मागणी करण्याची शक्यता होती. आर्थिक परिस्थिती डबघाईला आलेल्या प्रूस्तसाठी ही रक्कम भरमसाट होती. या अरिष्टांनी त्याला हवालदिल केलं. आपलं प्रारब्ध आपल्यावर कसं नि कोणत्या क्षणी झडप घालील याची निष्क्रीयतनं प्रूस्त वाट बघत असताना, त्याचा जुना स्नेही अल्बुफेरा याच्याकडून एक कात्रण अकस्मात त्याच्या हाती पडलं. त्यावरून स्पष्ट झालं की जागा खाली करायला लावलेल्या भाडेकरूंना आता चांगली भरपाई मिळणार आहे. प्रूस्तची इमारत ज्यानं विकत घेतली होती, त्याला तिचं स्वरूप बदलून बँकेत रुपांतर करण्याचा बेत असल्यानं जागा सोडण्याचा तगादा भाडेकरूंना त्याला लावावा लागणार होता हे उघड होतं. प्रूस्तनं त्याचा जुना दोस्त ड्यूक द गुईश याच्याशी संपर्क साधाला, त्याच्याशी बोलणी केली, त्याला काही सूचना केल्या आणि या व्यवहाराबाबत काय करता येईल याची चाचपणी करण्यासाठी त्याला नव्या मालकाकडे पाठवलं. विश्वास बसू शकणारनाही एवढी बोलणी यशस्वी झाली. हिशेब केले गेले. थकलेले भाडे आणि भरपाई यांचा ताळमेळ घालता प्रूस्त घरमालकाला काही देणं लागत नव्हता, उलट, त्यालाच थोडेफार पैसे मिळणार होते. प्रूस्त समाधान पावला. आपल्या उपकारकर्त्या मित्राचं स्मरण ठेऊन 'पास्तिश ए मेलांझ'च्या प्रूफात त्याचा स्तुतीपर निर्देश अंतर्भूत केला.

लॅरिन्जायटिसचा खतरा टळला आणि इतर कटकटींची विवंचनांची काळजी करण्यास प्रूस्त मोकळा झाला. आपल्याला चेहऱ्याचा पक्षाघात होईल ही भीती त्याच्या मनात ठाण मांडून होती. त्यानं बेरीला लिहिलं, 'बोलताना मला अडखळल्यासारखं होतं, मला सिफिलीस नसल्यानं, हा बहुधा मेंदूच्या गंभीर बिघाडाचा परिणाम असावा. काहीही असो, शब्द उच्चारण्यातील ही अडचण अतिशय अस्वस्थकारक आहे. एवढीच आशा करतो की व्हेरोलिनच्या माझ्या अती वापरानं आणलेल्या कैफाची ही परिणती असावी. परंतु मला धास्ती आहे, हेच खरं कारण असण्याची शक्यता कमी.' अस्वस्थ करून टाकण्याजोगी ही



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

बाब त्याला घरी ठेवण्यास वा 'रिट्झ' वा अन्यत्र सोबत्यांसवे मौजमजा करण्यास अटकाव करण्याइतपत पुरेशी गंभीर असल्याचं मात्र दिसत नव्हतं.

२ मार्च १९१९मधील एक संध्याकाळ. स्थळ : प्रिन्सेस्स सुट्झोचं अपार्टमेंट. प्रूस्तच्या समोर हॅरॉल्ड निकोल्सन. शांतता परिषदेसाठी आलेला ब्रिटिश प्रतिनिधी. प्रूस्त गबाळा. दाढी वाढलेली. रिवाजानुसार फर कोट न काढता अंगावर ठेवलेला. कॉफीचे घुटके घेत त्याचे या नवीन मित्राला प्रश्न :

"समितीचं काम काज कसं चालतं?"

"साधारणपणे दहाला आम्ही जमतो. सेक्रेटरी मागं.... "

"जरा, एक मिनिट, एक मिनिट. तुम्ही फार भरभर जाताय. पुन्हा पहिल्यापासून सांगा. तुम्ही ऑफिशियल कार घेता.' क्वाई दोरसे' इथं तुम्ही बाहेर पडता. तुम्ही वर जाता. तुम्ही खोलीत प्रवेश करता नंतर काय घडतं? माझ्या प्रिय मित्रा, सर्व काही मला सांगा. अगदी सगळं सगळं."

निकोल्सनं मग पहिल्यापासून सुरू करतो, तपशीलवार. हस्तांदोलने, नकाशे, शेजारच्या खोलीत देण्यात येणारा चहा आणि मक्रून्स. प्रूस्त त्याचं बोलणं एकाग्र चित्तानं ऐकतो. अधूनमधून अधिक तपशील हवा असल्यासच त्याच्या बोलण्याला खीळ घालतो आणि विनंती करतो," सर्व सर्व सांगा मला, माझ्या प्रिय मित्रा, भराभर जाऊ नका."

मग पुन्हा निकोल्सनचं बारीकसारीक तपशीलसह वर्णन.

दुसऱ्या दिवशी 'रिट्झ'च्या डायनिंग रुममध्ये दोघांची भेट. पुन्हा प्रूस्तचा त्याच्यावर प्रश्नांचा भडीमार. बोलण्याचा ओघात समलिंगसंभोगी वृत्तीचा विषय. प्रूस्त म्हणतो, 'सवयीचाच मामला आहे तो.'

निकोल्सनची त्यावर हरकत.

प्रूस्तची सफाई, "नाही, नाही मूर्खपणाच झाला माझा. मला म्हणायचं होतं की इट वॉज अ मॅटर ऑफ डेलिकसी."

मादाम हेन्नेस्सी या त्याच्या नव्या मैत्रिणीनं प्रूस्तच्या सन्मानार्थ खान्याचा प्रस्ताव मांडला. तेव्हा त्यानं तिला लिहिलं, 'तुमचं घर जर उबदार असेल आणि डायनिंगरूमच्या सर्व खिडक्या बंद केलेल्या असतील, त्यातही खास करून तुम्ही नंतर त्या खोलीच्या खान्याला येण्याची मी सर्वतोपरी प्रयत्न करीन.... मी काही तसा खास डायटवर नाही. मी सर्व खातो आणि सगळं पितो. रेड वाइन्स मला आवडत नाहीत पण सर्व प्रकारच्या व्हाईट वाइन्स मला आवडतात. तसंच बिअर आणि सायडर. तुमची परवानगी असल्यास, Cantrexeville किंवा एव्हिआँ पाण्याची एक बाटली मी घेऊन येईन आणि एका वेगळ्या ग्लासातून मी ते थोडे घेईन.' पुढं लिहिलं की, डायनिंगरुमच्या तपमानाची तेवढी फिकीर त्याला मिळत जाते. आणि



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

पुस्ती जोडली, अर्धे अधिक जेवण झाल्यानंतर डायनिंगरुमचे दरवाजे उघडण्यात यावेत– वस्तुत: उघडले तर बरं होईल, तेणेकरून डायनिंगरुममधील गारठ्यानं त्याला तेवढी हुडहुडी भरणार नाही.

मादाम हेत्रेस्सी या त्याच्या सूचना लक्षात घेऊन तिच्या घरच्या तपमानाकडे लक्ष पुरवलं. परंतु ठरलेल्या संध्याकाळी प्रूस्त भोजनाला जाऊ शकला नाही. तथापि, त्या संध्याकाळी तो प्रिन्सेस्स सुट्झोला भेटला. अलिकडच्या काळातील त्याची रोगलक्षणं त्यानं तिला ऐकवली. ती पूर्णपणे निर्विकार. तिला घरी पोचवण्याची तयारी त्यानं दर्शवली तरी ती Beaumant (बोमान्त) बरोबर निघून गेली. त्याला वाटलं, आता एकदाचा सोक्षमोक्ष लावून टाकायलाच हवा. एक लांबलचक पत्र त्यानं तिला लिहिलं, सांगितलं, मला बसलेला एक छोटासा धक्का मला अजूनही आठवतो. जेव्हा मी तुम्हाला म्हणालो होतो, "प्रिन्सेस्स, मी तुम्हाला घरी पोचेवणार आहे." आणि तुम्ही उत्तरला होता, मी Beaumant बोमान्त बरोबर जाणार आहे." खरोखरीच, अश्या बाबींमध्ये, जेव्हा तुम्हाला ठाऊक असतं की तुमच्यामुळे किती घोर लागू शकतो, तुम्ही सुरुवातीलाच सांगायला हवं होतं, "तुला सांगते की तुझ्याबरोबर मी घरी जाणार नाही." त्यामुळे एखाद्याला सावरायला संधी मिळते, त्याचवेळी जिच्याविषयी आपल्याला आपुलकी आहे ती व्यक्ती तो गमावून बसत नाही आणि त्यानंतर तिला भेटण्याची आशा तो बाळगून असतो."

याच पत्रात रुमानियाच्या राणीसाठी प्रिन्सेस्स सुट्झोनं आयोजित केलेल्या भोजन समारंभाचं आमंत्रण प्रूस्तनं नाकारलं. बडीबडी मंडळी या खान्याला येणार आहेत हे माहीत असूनही. दुसऱ्या दिवशीच्या पत्रातही त्यानं आमंत्रण स्वीकारता येणार नसल्याचं सांगितलं. पण यावेळी सूर मवाळ लावला, सांगितलं की भोजनाला तो हजर राहू शकणार नाही आणि त्यानंतरच्या समारंभालाही, कारण त्याला फार उशीर होईल.' एक तर राणीसाहेबा निघून गेलेल्या असतील किंवा तुमचे त्यांच्याबरोबरचे वार्तालाप थांबलेले असतील. तरीही मी सांभाळून नेऊ शकतो, कारण ते काही तेवढं अवघड नाही, परंतु मला भीती आहे, जुने समारंभ मशालींच्या उजेडातील शोभायात्रा, माथ्यावर हॅट घातलेली माणसं, इ. पाळणं कधीच संपुष्टात आलं आहे.'

तब्येतीला विश्रांतीची आत्यंतिक गरज असताना प्रूस्तला दुसरी जागा धुंडाळणं प्राप्त होतं, बाडबिस्तरा लौकरात लौकर गुंडाळावा लागणार होता. त्याच्या जीवाला घोर लागला. नाना प्रश्नांनी तो बेचैन झाला : जायचं कुठं? पॅरिसजवळचे बरेचसे मोहल्ले गोंगाटानं गजबजलेले. कॉर्क बसवलेले दरवाजे हलवायचे तरी कसे? भवितव्याबाबत विचार करणंही एकूण तापदायकच. तरीही अशी वेळ येऊन ठेपली की त्याचा विचार करणं त्याला भागच पडलं. योग्य असं ठिकाण निवडण्यासाठी पॅरिसचा नकाशा त्यानं नजरेखालून घातला. 'रु द रिव्होली' तेवढा काही वाईट नाही. तिथं गोंगाट असतो, प्रश्नच नाही, पण कानात इअर



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

स्टॉपर्स' घालता येतील त्यांचा वापर कसा करायचा याची माहिती मिळवायला हवी. अगदी वरच्या मजल्यावर जर का अपार्टमेंट मिळालं तर आवाजाची ब्याद टाळता येणं शक्य आहे. अकस्मात त्याला आठवलं, नाईस आणि मान्ते कार्लो यांच्यामधील भागात असलेलं एक घर त्याला ऑफर करण्यात आलं होतं. समुद्रावर नजर खिळवून असलेल्या एक खडकावरील पूर्णपणे अलग आणि बहुधा त्याच्यासारख्या अपंगासाठी सुखकारक ठिकाण. मादम कातुस्स या त्याच्या मैत्रिणीच्या मालकीचं हे घर. त्यानं तिला लागलीच पत्र लिहिलं, "टॉवर भाड्यानं दिलेला आहे का? की नाही? तो दिला नसल्यास, माझ्या डॉक्टरांनी नाईसला ट्रिप काढण्यातील धोके सूचित केलेले असले-तरीसुद्धा (मी जे काही भोगत आहे ते कुठल्याही प्रकारे सांसर्गजन्य नाही) तिथं मला सुविधा मिळू शकेल. (मला वाटतं की टॉवर इतर इमारती शेजारी नाही) घर पूर्णपणे माझ्याकडे राहील, तिथं आवाज कानी पडण्याची सुतराम शक्यता नाही त्यामुळे झोपेच्या गोळ्यात कपात करणं मला शक्य होईल. अर्थात् मला धास्ती आहे, अपेक्षा केलेले फायदे भ्रामक असल्याचं निष्पन्न तर होणार नाही ना. टॉवर जर रिकामा असेल तर मेच्या मध्यावर मी पोचेन, किंवा मेच्या प्रारंभीही (ट्रिप काढण्याचं मी निश्चित केलं तर) आणि थंडीचा मोसम सुरु झाल्यावर मी इटाली, पिसा, सिएन्ना, ऐरग्युइआ यासारख्या शहरांना भेटी देईन, कदाचित् मी तिथं मुक्काम करीन..... थेट समुद्र दिसतो अशाच ठिकाणी टॉवर आहे ना? तो उत्कृष्ट स्थितीत आहे का? की तो झाडांमध्ये आहे, पर्णराजीनं आच्छादलेला, डासांनी दूषित केलेला वगैरे वगैरे? तो दगडांनी बांधलेला आहे का, लाकडांचा वापर न करता? म्हणजे सेलस्त वरखाली करील ते मला ऐकू येणार नाही. (कारण अगदी वरच्या मजल्यावर राहायचा माझा विचार आहे, तिथं निदान पावलांचे आवाज माझ्या कानी पडणार नाहीत) शेवटी, १५ मे ते १५ नोव्हेंबर या महिन्यांचे, त्या जागेचा सराव झाल्यास, त्याहून अधिक काळाच, एखाद्या वर्षाचं भाडं सांगण्याची मेहरबानी तुम्ही कराल का?"

त्याच्या प्रश्नांना समाधानकारक उत्तर मिळाली, पण दरम्यान 'रु द रिव्होली'वर त्याला पाहिजे तसं एक अपार्टमेंट त्याला आढळून आलं टॉवरपेक्षा बरंच कमी खर्चिक. कुठं जायचं हे त्याच्या डळमळीत स्वभावनुसार त्याला ठरवता येईना. तशात गंभीर वळण मिळालेल्या एका नव्या प्रेमप्रकरानं त्याच्या जीवाला घोर लावला. त्यात 'अ लॉम्ब्र दे जन फिल आं फ्लर' 'पास्तिश ए मेलांझ' आणि 'स्वान'चं पुनर्मुद्रण यांच्या चितांची भर पडली. प्रकाशनाची तारीख, या ना त्या कारणानं, किंबहुना कारणविना, सतत पुढं ढकलली जाऊ लागली. त्याच्या मते, 'एन्आरएफ'चे संपादक निगरगट्ट, चेंगट तद्वतच बथ्थड. छपाईचं काम त्यांनी नालायक मुद्रकाकडे सोपवलेलं, तरीही प्रूफातील बऱ्याचशा चूकांबद्दल त्यांचा तक्रारीचा सूर. प्रूफामध्ये पुनर्लेखन करण्याची प्रूस्तची सवय त्यांना ठाऊक असूनही त्याची कुरबुर. त्यानं गॅलिमारला लिहिलं, 'क्षणभर आपण धरून चालूया की सर्व चुका माझ्याच आहेत. तरी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मुद्रितशोधकांनी काहीतरी करायला पाहिजे तुम्ही म्हणता की बऱ्याच मुद्रकांकडे तुम्ही गेलात, आणि मी कृतज्ञ आहे तुमचा, तुमच्या आस्थेनं मी भारावून गेलो आहे, पण तुम्ही हे केलंत त्याच जुन्या मुद्रकाकडे माघारी जाण्यासाठी, कारण डिसेंबरमध्ये जेव्हा La Semense (छापखान्यातून) आपण बाहेर पडलो तेव्हा त्याच नावाचा उल्लेख तुम्ही केला होता. एरवी त्याच्यापाशी बहुधा बरेच गुण असतीलही, परंतु मला सांगायचं आहे की 'ला न्यूव्हेल्ल रव्ह्यू फ्रान्सोइज'साठी त्यानं 'आ लॉम्ब्र द जन फिल आं फ्लर' मधून काढलेल्या पानांची एक प्रत तुम्ही घ्या. "रिट्झ' मध्ये किंवा इथं, आपण दोघं मिळून वाचू आणि तो किती निष्णात आहे हे तुम्ही बघाल. माझ्यावर एवढी मेहरबानी करा आणि मी खात्रीनं सांगतो की तुम्ही चक्रावून जाल. माझ्या प्रिय मित्रा आणि प्रकाशका, पुनर्लेखनाच्या माझ्या सवयी वरून तुम्ही मला खडसावता आणि मला जाणीव आहे की त्यात बऱ्याच गुंतागुंती अंर्तभूत असतात. ("रव्ह्यू"साठीच्या मजकूरात निश्चितच नाहीत) परंतु ग्रासेला सोडून द्यायला आणि तुमच्याकडे यायला तुम्ही मला सांगितलंत, तेव्हा तुम्हाला ते माहीत होतं, कारण पुनर्लेखन केलेली ग्रासेची प्रूफं पाहून copeau कोपओ उद्‌गारला होता, "अरे, हे तर नवीन पुस्तक आहे !" तेव्हा तुम्ही तिथं होता. प्रकाशकांबरोबरचे प्रूस्तचे संबंध चांगले राहिले तरी ती माणसं समंजस आहेत असं मानण्यास तो तयार नव्हता.

बस्तान हलवण्याच्या निर्णायक बाबीवर ठाम निर्णय घेणं काही त्याला अद्याप जमत नव्हतं. १मे ला नाईस येथील टॉवर भाड्यानं घेण्याचा त्यानं अखेर निर्णय घेतला. तो तात्काळ मिळण्याजोगा होता आणि त्याच्या मैत्रिणीचा मालकीचा होता : पण ८ मे रोजी तो गडबडून गेला. त्याला वाटलं, निराश करणाऱ्या अडचणी त्याच्यासमोर उभ्या ठाकल्यात. ११ मे रोजी 'रु द रिव्होली' वरील अपार्टमेंट घेण्यासंबंधीच्या वाटाघाटी त्यानं केल्या. तथापि, काही दिवस उलटल्यानंतर त्यानं हे दोन्ही पर्याय अव्हेरले. आपण कुठं जाणार आहोत यावर यत्किंचिही कल्पना नसतानाही त्यानं सामानाची बांधाबांध सुरू केली. सेलस्त तिच्या गतीनं त्या कामाला लागली. झोपण्याची उसंतही तिला मिळेना. क्वचित् प्रूस्तनं तिच्या कामाला हातभार लावला. अलमाऱ्यांमध्ये, ट्रंकांमध्ये त्या अनोख्या गोष्टी आढळून आल्या. मौल्यवान आणि यातनदायी गोष्टी. जुन्या स्मृती जागवणाऱ्या. उदाहरणार्थ, त्याच्या आईचे पोषाख त्याच्या हाती लागले. त्यात त्याच्या भावाच्या लग्नप्रसंगीचा एक पोषाखही सापडला. त्या दिवशीच फक्त तिनं तो वापरला होता. १९००च्या त्या फॅशनी सध्या पुन्हा बाजारात आल्या आहेत आणि हे पोषाख आता पुन्हा वापरता येणं शक्य आहे, असा विचार त्याच्या मनात आला आणि त्यानं पोषाख मित्रांकडे, नातलगांकडे पाठवून दिले. हे करत असताना त्याला जाणवत राहिलं की गतकाळाबरोबरच आणखीन एक बंध तो तोडून टाकत आहे. एकदा, सेलस्त जुनी छायचित्रं आणि हस्तलिखितं जाळत असताना, अकस्मात एक छायाचित्र त्याच्या नजरेला पडलं. त्याच्या बालपणीच्या खजिन्यामधील ते एक होतं. आगीच्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

भक्ष्यस्थानी ते पडू नये म्हणून तो ओरडला, "नाही ते नाही." ते छायाचित्रं वाचलं. ते होतं आवल दसजार्दिन याचं. त्यावर लिहिलेलं होतं, 'एक्स वगळता माझा अच्युत्तम मित्र मार्सेल प्रूस्त यास.' 'एक्स वगळता' या शब्दावर त्यानं काट मारली होती.

३१ मे. रोजी १०२ बुलेव्हार होस्समानवरील अपार्टमेंट खाली करून देणं भाग झालं, त्या आधी एक दिवस थोर नटी रेझां हिच्या 'रू लोरॉंत पिचाट' वरील Rue Laurent Pichat घरामधील एक अपार्टमेंट घेण्याचा निर्णय प्रूस्तनं घेतला. रेझांचा मुलगा जॅक पोरेलनं प्रूस्तला १९११ मध्ये काबुर्गमध्ये पाहिला होता. त्याच्या 'स्वान'नं तो एवढा प्रभावित झाला होता की त्यानं त्याच्या आईला ती १९१४ मध्ये वाचायला लावली होती. सांप्रत सव्वीस वर्षाचा हा अपंग 'वॉर हिरो' नोकरीविना होता. १९१७च्या मेमध्ये मोरान्दकडून कळलं होतं की 'स्वान' जाकला अतिशय आवडलेलं आहे. म्हणून प्रूस्तनं सेलस्तला पाठवून या चाहत्याला आमंत्रण दिलं होतं. प्रूस्तच्या निरोप देऊन आल्यानंतर सेलस्तनं त्याला सांगितलं होतं, "मला तो आवडला, पण तो थोडासा भराऱ्या मारणारा आहे." त्यानंतर प्रूस्त त्याचा उल्लेख 'भराऱ्या मारणारा पोरेल' असा करायचा आणि म्हणायचा, "सेलस्त, सगळ्या खिडक्या बंद कर नाहीतर पोरेल महाशय उडून जातील." त्यांच्या भेटीगाठी होत राहिल्या. पोरेल सांगतो : 'माझे अगदी घनिष्ठ मित्र मला ओळखतात त्याहून मला तो चांगला ओळखतो.' एका रात्री खाना घेत असताना प्रूस्त बाल्झाकबद्दल एवढ्या आदरानं भरभरून बोलत होता की पोरेलला क्षणभर वाटून गेलं होतं की बाल्झाक स्वत: त्या क्षणी त्या रेस्टॉरंटमध्ये त्यांच्या बाजूला बसून त्याचं बोलणं ऐकतोच. प्रूस्त त्याला म्हणाला होता की डिकन्सची 'ब्लीक हाऊस' त्याच्या आवडत्या कादंबऱ्यापैकी एक आहे. बऱ्याचदा तो समलिंगसंभोगी प्रवृत्तीविषयी बोलायचा, पण अगदी वस्तुनिष्ठपणे. "रू लोरॉन्ते पिचेट अलिकडे एवढ्या संख्येनं आहेत की एखादा म्हणेल नॉर्मल आहेत रू लोरॉन्ते पिचेट उदाहरणार्थ, अमका तमका नॉर्मल आहे, माझ्या शब्दावर विश्वास ठेव, परंतु, एक्स ॲबनॉर्मल आहे, त्याला बाया आवडतात." प्रूस्तला ठाऊक होतं की या अर्थानं पोरेल 'ॲबनॉर्मल' होता. ॲन-मारी या देखण्या पोरीच्या प्रेमात आपण पडलो आहोत असं पोरेलनं त्याच्याच प्रथम कानावर घातलं होतं. युद्धात तिन नर्सचं काम केलं होतं आणि ती घटस्फोटिता होती. ११ मार्च १९१८ रोजी ती दोघं विवाहबद्ध झाली होती. प्रूस्त म्हणाला होता, जीवनात पुढची पावलं टाकण्याची तुझी तयारी चाललेली पाहून "मला तुझी फार काळजी वाटते, एवढा तरुण आणि तुझ्या बाहूंतर हे मस्त ओझं." सांप्रत, १९१९च्या मेमध्ये Rue Laurent-Pichat रू लोरॉन्त पिचाट वरील घराच्या दुसऱ्या मजल्यावर बासष्ट वर्षाची रझां राहात होती. अजूनही ती बरीच ख्यातनाम, पॉप्युलर, पण एकाकी. तिसऱ्या मजल्यावर पोरेल, त्याची बायको आणि सात महिन्याची मुलगी. चौथ्या मजल्यावरची जागा



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

रझांनं तिच्या दुरावलेल्या मुलीसाठी राखून ठेवली होती, ती परत आल्यास तिला राहाता यावं म्हणून. पोरेलनं ही जागा प्रूस्तला दिली.

आणि ३१ मे रोजी प्रूस्त नव्या जागेत राहायला आला. सामानसुमान हलवणाऱ्या मजदूरांनी एवढा गदारोळ घातला की त्याला वाटलं, तो मेल्यांतच जमा, प्रारब्ध त्याला बोलावत आहे. मरणोन्मुख बर्मा (रे झां आणि तिची मैत्रिण सारा बर्नाहार्ड यांच्यावर बेतलेलं पात्र) आणि तिची मुलं यांच्या घरात तो प्रवेश करत नव्हता का? त्याच्या स्वत:च्या मृत्यूच्या दिशेनं टाकलेलं एक पाऊल. तो जुन्या जागेतून बाहेर पडत असतानाच विचित्र योगायोगानं त्याच्या हाती 'ल कोते द गॅर्मांत' ची नवीन प्रूफं पडली. निवेदक त्याच्या कुटुंबियांसकट गॅर्मांत मॅन्शनमधील नव्या अपार्टमेंटमध्ये राहायला आलेला असतो. इथला 'दिवस उजाडतानाचा पक्ष्यांचा चिवचिवट फ्रान्सोइसला टुकार वाटला होता.' या भागात निवेदकाचं नैराश्य वर्णिलेलं आहे. १९०० च्या ऑक्टोबरमध्ये ४५ 'रु द कुगसेल'मधून प्रूस्त कुटुंब बाहेर पडलं होतं त्या स्मृतीला इथं उजाळा दिलेला आहे. परंतु, जागा बदलताना नेहमीच उचल खाणाऱ्या दम्यानं हैराण झालेल्या प्रूस्तनं निवेदकाच्या उद्गाराची चव चाखली असणार : 'जुन्याचा त्याग करणं त्याला जेवढं सोपं जातं तेवढंच नव्या गोष्टी आत्मसात करणं त्याला नेहमी कठीण जातं.' १०२ बुलेव्हार होस्समान सोडल्याचं दु:ख त्याला नव्हतं, तो आता बेघर झाला होता, उखडला गेला होता, कायमचा.

या नवीन अपार्टमेंटमध्ये असह्य गोंगाट कानी पडू लागला. डुलकी घेणंही मुष्किल झालं. त्याच्या मते कागदाच्याच घरात तो राहात आहे. शेजाऱ्यापाजाऱ्यांची संभाषणं, खिडक्यांची उघडझाप, हातोड्यांचे ठोके, आंघोळी या साऱ्यांचा संमिश्र कोलाहल चोहोबाजूनी त्याच्या कानावर आदळू लागला. तो एवढा त्रासला की त्याला वाटलं, जागा सोडावी. पण जाणार कुठं? तो राहिला. त्यावाचून अन्य मार्गच नव्हता. लिफ्ट बंद त्यामुळे धापा टाकत जिने चढणंउतरणं प्राप्त. क्वचित रझां जिन्यात भेटायची. धापा टाकत दोघाचं संभाषण चारदोन वाक्यात संपायचं. परंतु दुसऱ्या दिवशी मात्र तो तिच्यासंबंधी पोरेलजवळ भरभरून बोलायचा.

'एनआरएफ्'नं ६ जूनला प्रूस्तची कादंबरी प्रकाशित करत असल्याचं जाहीर केलं. पुढे १५ जून हा दिवस नक्की केला. आपल्या पुस्तकाचं भवितव्य काय? प्रूस्तला कळेना. प्रकाशन संस्थेमधून गुपचूप माहिती काढण्यासाठी त्याचे हेर ओदिलॉ (सांप्रत लष्करामधून परतलेला) आणि सेलस्त यांना पाठवलं. परंतु त्यांनाही ठोस माहिती मिळू शकली नाही. सीझन संपत चाललेला. सोसायटी जन बाहेर गावी निघालेले आणि प्रकाशन लांबणीवर पडत चाललेलं. अखेर २३ जूनच्या दरम्यान 'आ लॉम्ब्र दे जन फिल आं प्लर', 'पास्तिश ए मेलांझ' आणि द्यु कोते द शे स्वान'ची नवीन आवृत्ती अशी तीन पुस्तकं प्रकाशित झाली आणि प्रूस्त त्यावरील प्रतिक्रिया प्रसिद्ध होण्याची वाट पाहू लागला.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

## वीस

'द्यु कोते द शे स्वान'च्या अखेरीस अनपेक्षितरित्या सोडून देण्यात आलेल्या नायकाच्या कथेच्या धागा 'आ लॉम्ब्र जन फिल आं फ्लर' ने पकडलेला आहे. आधीच्या खंडामधील कालाक्रमापेक्षा या खंडामधील कालानुक्रम अधिक काटेकोरपणे पाळण्यात आला आहे. तरी, रचना तेवढीच गुंतागुंतीची आहे. निवेदन अजूनही वर्तुळाकारच फिरतं, पात्रं काही लक्षणीय अपवाद वगळता, कमी अधिक प्रमाणात परिचित झालेली पात्रं प्रत्येक प्रकरणातच नव्हे तर प्रत्येक प्रकरणाच्या प्रत्येक भागात भेटतात. प्रारंभीच्या ऐंशी पृष्ठांमध्ये एका दिवसामधील घटनांचं चित्रण आहे. मार्सेल त्याच्या आईवडलांना, आजीला, फ्रान्सोइज आणि नॉरपोई यांना भेटतो; शिवाय, स्वान, ऑडेट्ट, कोत्तार, गिल्बेर आणि बरगोत्त यांच्याविषयी विचार करतो वा बोलतो. प्रमुख व्यक्तिरेखा कुठल्या हे सांगणं दुरापास्त आहे, कारण सर्वच महत्त्वपूर्ण आहेत. परिणामी, एकाच वेळी सर्व रिंगामध्ये तद्वतच रिंगांच्या बाहेरही काहीतरी चाललेले असते अशा भव्य सर्कशीचं स्वरूप कथानकाला प्राप्त झालं आहे.

निवेदन एवढं गुंतागुंतीचं आहे की संक्षेप करण्याचा प्रयत्न एकूण धाडसाचाच. तरीही, घट्ट विणीच्या पटामधून थोडेफार धागे पकडता येणं शक्य आहे. 'ऑतूर द मादाम स्वान' या पहिल्या प्रकरणातील बरीचशी जागा विवक्षित पात्रांनी व्यापलेली आहे. ही पात्रं, गट आणि व्यवसाय यांचं इतरांपेक्षा अधिक ठळकपणे प्रतिनिधित्व करतात. नॉरपोई हा राजनीतिज्ञ आहे. ल बर्मा नटी आहे आणि बरगोत्त साहित्यिक आहे हे सदैव जाणवत राहातं. व्हिन्तउइल हा संगीतरचनाकार आहे आणि ब्लॉख ज्यू आहे. हे कादंबरीमध्ये अन्यत्र जाणवत राहातं तसं. सर्वसामान्यपणे या व्यक्ती एकसारख्या भासत असल्या तरी त्यांना वेगवेगळ्या तऱ्हांनी हाताळण्यात आलं आहे. नॉरपोई हे एक अर्कचित्र आहे – एक आढ्यताखोर गाढव, जो नेहमी वापरून वापरून गुळगुळीत झालेली वृत्तपत्रीय वचनं वापरतो आणि सदैव तोलूनमापून मूर्खासारखी बडबड करतो. तो आता लेखकाला साहित्यिक करीयरबद्दल मूर्खपणाचा सल्ला देतो. एवम् 'झाँ सान्तेयमधील धुरोक आणि त्यानंतरच्या नोंदवह्यांमधील मॉसिअँ द गुरे यांना नेमून दिलेल्या भूमिकेचा तो वारसा चालवतो. बारगोत्तदेखील काही पृष्ठांमध्ये अर्कचित्रवजा रेखाटला आहे. नायक जेव्हा त्याला प्रथम भेटतो तेव्हा, डचेस्स द गॅर्मांतच्या पहिल्या भेटीत जसा अपेक्षाभंग त्यानं अनुभवला होता, तसाच तो यावेळी अनुभवतो. परंतु, बरगोत्तमध्ये लौकरच बदल घडून येतो आणि त्याला पूर्णपणे एका साहित्यिकाचं गंभीर रुप प्राप्त होतं.' झॉ सान्तेय' प्रमाणेच इथंही लेखक आणि त्याची कृती यातील संबंध निश्चित करण्याचा प्रयत्न प्रूस्तनं केला आहे. आता तो सांगतो की लेखक आणि त्याची कृती यात ओळखू येण्याइतपत साम्य असतं. 'द मॅन इज द स्टाइल.' बरगोत्त जसा लिहितो तसा बोलतो. उलटपक्षी, लेखकानं त्याच्या पुस्तकात दिलेल्या उदाहरणांसारखी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

त्याची नैतिकता असायला हवी असं नाही. बरगोत्तचे नायक नीतीमूल्यं जपणारे आहेत, ते वाकडा मार्ग अनुसरणारे नाहीत. पण बरगोत्त त्याच्यासारखा नाही. तो अवगुणांना शरण जातो.' ते जगतात त्या वर्तुळाचे ते दुर्गुण (किंवा निव्वळ दुबळेपणा आति वेडेपणा) असतात, अर्थहीन संभाषणं, त्यांच्या मुलींची फालतू आणि धक्कादायक आयुष्यं, त्यांच्या बायकांची बेईमानी किंवा त्यांची स्वत:ची अपकृत्यं, ज्यांचे लेखक त्यांच्या पुस्तकांमधून वाभाडे काढतात, त्यांच्या कुटुंबांची आर्थिक घडी बदलणं किंवा त्याच्या कुटुंबाचा सूर सुधारणं आवश्यक असतं हे विचारात न घेता.

प्रूस्तचा नायक, राजनीतिज्ञ आणि साहित्यिक यांच निरीक्षण करत असतो, त्यांच्याविषयी ठोकताळे बांधत असतो. हे चालू असताना गिल्बेरबरोबरच्या प्रेमप्रकरणात तो थोडीफार प्रगतीही करतो. 'द्यु कोते द शे स्वान' हून कथेचं रुप इथं भिन्न आहे. गिल्बेर आता तशी आत्मसंतुष्ट आहे निश्चितपणे सहज प्राप्त होण्याजोगी आहे. आपल्या उपस्थितीत– एखाद्या म्हणू शकेल तिच्याबरोबरही – देहसंग अनुभवण्यास ती मार्सेलला अनुमती देते; तिच्या चहापानाच्या पार्ट्यांनाही ती त्याला आमंत्रित करते. परंतु, कोणत्या कारणास्तव ते पूर्णपणे स्पष्ट नाही, ती अचानक दुष्प्राप्य होते आणि मार्सेल तिला भेटायचं. थांबवतो हळूहळू प्रेम खतम होतं, तोवर बरीच पानं तो त्याखातीर क्लेश भोगत असतो. ज्यात त्याच्या त्याच्या भोगाचं चित्रण करण्यात आलं आहे ते उतारे प्रूस्तनं युद्धाच्या काळात लिहिले होते आणि ते त्याला प्रिय असावेत, कारण 'एनआरएफ'च्या मासिकात आगाऊ प्रसिद्ध करण्यासाठी त्यानं ते निवडले होते, किंवा त्यांची निवड करण्यास त्यानं रिव्हिएरला अनुमती दिली होती. विश्लेषण करण्याच्या त्याच्या हातोटीचे नमुने म्हणून ते खचितच प्रभावी उतरले आहेत. अपेक्षाभंग झालेल्या प्रेमिकाच्या भावना एवढ्या बारीकसारीक तपशीलानं, भावनेच्या आहारी न जाता, त्यानं केल्या आहेत तेवढ्या आजवर बहुधा कुणी केल्या नसतील. पहिल्या हिमयुगातील वनस्पतीच्या जीवाच्या ऱ्हासाचा, अवनतीचा विचार बहुधा प्रूस्त करत असावा.

स्वानच्या कथेमध्ये गिल्बेरची कथा पुन:पुन्हा झिरपत राहाते. अर्थात् पहिल्या खंडाहून ती भिन्न आहे. कथानकाच्या ओघात बऱ्याचशा पात्रांमध्ये बद्‌ल होत गेला आहे तसाच तो स्वानमध्येही झालेला आहे. १९१३ मध्ये प्रसिद्ध झालेल्या बोईबरोबरच्या मुलाखतीत अशा प्रकारच्या बदलाबाबत प्रूस्तनं स्पष्टीकरण केलं होतं ते असं : निवेदनामधील कालौघ दर्शवण्याचा तो एक प्रयत्न असतो. भूमितीमध्ये जसे 'प्लेन' आणि 'सॉलिड' असे प्रकार आहेत तसेच प्रकार मनोविज्ञानात आहेत. 'प्लेन' आणि काळाचं परिमाण अंतर्भूत असलेले. ट्रेनमधील प्रवासी एखादं गाव पाहातो, एकदा त्याच्या उजव्या अंगाला, एकदा त्याच्या डाव्या अंगाला आणि त्याला जाणवतं की त्याची अंगस्थिती बदलत असते; कादंबरीचा वाचक पाहातो की पात्रं तीच पण त्यांच्यामध्ये बदल घडून आला आहे, त्यांच्या वेगळ्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

छटा तो अनुभवतो आणि त्याच्या ध्यानी येतं की काळ पुढं पुढं सरकत आहे. एखादा वाचक पुस्ती जोडू शकेल (प्रूस्तनं तशी जोडलेली नाही), की वाचकांना ही जाणीव वरचेवर होते, कारण कादंबरीमधील पात्रं क्वचितच स्थितीशील असतात. प्रूस्तच्या कादंबरीचं वैशिष्ट्य असं की एकापाठोपाठ उमटत जाणारे ठसे काही वेळेला एवढे भिन्न असतात की पात्रं तीच आहेत की काय असा संभ्रम निर्माण व्हावा, ती अगदी वेगळी असतात, ज्यांना स्वैरपणे तीच ती नाव देण्यात आलेली आहेत. बऱ्याचदा एखाद्याला शंका येते की त्याच्यासंबंधी प्रूस्तच्या मनात बदल झालेला असावा. किंवा त्याच्या कृतीच्या वेगवेगळ्या भागात त्यानं वेगवेगळी मॉडेल्स वापरलेली असावीत.

स्वानमध्ये मात्र आमुलाग्र बदल झाला आहे. आता तो ऑडेट्टचा पती म्हणून समोर येतो. असं दिसतं, तिच्याविषयीचं त्याचं प्रेम ओसरल्यानंतर बऱ्याच कालावधीनं तो विवाहबद्ध होण्यास राजी झाला असावा. अर्थात् त्याच्या खुषीनं हा संबंध जुळून आलेला नाही. स्वान आणि ऑडेट्ट या पात्रांबद्दल आपल्याला एव्हाना जे काही माहित झालेलं असतं, त्याच्याशी त्यांचा हा शरीरसंबंध सुसंगत वाटत नाही. या वस्तुस्थितीचा स्वीकार करणंही अवघड जातं. या प्रकरणी प्रूस्त बरीच कल्पक स्पष्टीकरणं देतो. तो सूचित करतो की, नाही तरी स्वान आणि ऑडेट्ट यांच्यामध्ये समान असं काहीतरी आहे. आपल्या प्रियकराचं व्यक्तिमत्त्व आणि काही प्रमाणात त्याचं साहित्य यांची जाण तिला आहे. त्याला चतुर साहित्यिक सल्ले देण्याइतपत पात्रता तिच्याकडे आहे. काहीही होवो, समाज काहीही म्हणो, या अशक्यप्राय वाटणाऱ्या विवाहाला स्वान टाळू इच्छित नाही, कारण, समाजापासून तो केव्हाच दूर झाला आहे. बहुधा, अशा लग्नाची कल्पना त्याला भावली असावी. बहुधा कलात्मक, 'If not the perverse side of swaun's nature would in any event have derived a certain amount of pleasure from coupling with himself, in one of those crossings of species such as Mendelians practise and mythology records, a creature of a different race, archduchess or prostitute, from contracting a royal alliance or from marrying beneath him.' किंवा बहुधा त्यानं एवढीच आशा बाळगली असावी की, त्याचं लग्न झाल्यानंतर तो ऑडेट्टल – आणि त्यांच्या मुलीलासुद्धा – घेऊन तो डचेस्स द गॅर्मांतला भेटायला जाईल, कारण त्याच्या लेखी तिचंच मत मौलिक होतं. पुढं काय घडेल याचा अंदाज बांधण्याची प्रूस्तची बुद्धिमत्ता एवढी स्वास्थ्यपूर्ण आहे की अखेरीस स्वान ही तीच व्यक्ती आहे की नाही याची फिकीरही कुणाला करावीशी वाटत नाही.

स्वानपेक्षा ऑडेट्टमध्ये तर फारच बदल झालेला आहे. आपल्या प्रियकराला ती सतत हुलकावणी देत असे, परंतु आता, सनसनाटी दुर्गुण असलेली पूर्वीची ती तापदायक फँटम



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

राहिलेली नव्हती. आता ती प्रतिष्ठित विवाहित स्त्री आहे. एखादं सॅलाँ स्थापन करण्याची मनीषा मनी बाळगणारी. परंतु, ही नवी ऑडेट्टदेखील नेहमीच तीच ती असत नाही. बऱ्याचशा उताऱ्यांमध्ये तिच्या सामाजिक यशाचं वर्णन साधारण बऱ्यापैकी या शब्दात करण्यात आलं आहे. तिच्या पूर्वायुष्यातील ओळखीच्या असिस्टंट अंडर सेक्रेटरींच्या बायका आणि 'जॉकी क्लब'चे सदस्य अशानांच फक्त तिचं ड्रॉईंगरुम आकर्षित करू शकत. तरीही, अन्यत्र प्रिन्सेस्स माथिल्ड आणि डचेस्स द व्हेन्दोम यांच्याशी तिचे संबंध चांगले असल्याचं दिसतं. शिवाय, जिची ती एकेकाळी 'प्रोटेज' होती त्या मादम व्हेरदुरीची असूया ती चेतवते, कारण तिच्या सॅलाँचं प्रमुख भूषण आहे बरगोत्त. तिच्या संबंधीच्या उताऱ्यांमध्ये क्वचितच एकसूत्रता आढळते. यास्तव, ऑडेट्टसाठी प्रूस्त एकाहून अधिक मॉडेलांचा वापर करत असल्याच्या निष्कर्षाप्रत आपण पोचतो. क्वचित प्रसंगी, सामाजिक प्रतिष्ठेचा हव्यास असलेल्या माजी वारांगनांचं त्याला स्मरण होतं, बहुधा प्रामुख्यानं मादाम हेमान हिचं, आणि काही वेळेला (विशेषत: गिल्बेर = जाँ Pouquet = गिल्बेर आणि आनातोल फ्रान्स = बेरगोत्त, ही समीकरणं नजरेसमोर तो ठेवतो) त्याला प्रस्थापित यजमानिणी आठवतात, ज्याच्यांपैकी एक निश्चितच मादाम आर्मा द कैल्लावे आहे.

ऑडेट्टच्या व्यक्तिमत्त्वावरील मादाम हेमानचा प्रभाव संपूर्ण प्रकरणभर ठळकपणे जाणवत राहातो. ऑडेट्ट अवतीर्ण होते तीच मुळी नजर खिळवून ठेवणारी अंगलट असलेली अतिशय देखणी आणि रुबाबदार अशी स्त्री, प्रथम पदार्पणातच एका तरुण चाहत्याला पूर्णपणे वश करणारी. ऑडेट्टच्या सामाजिक स्थानाचा वृत्तांत देण्याचा प्रूस्त जेव्हा सातत्यानं प्रयत्न करत असतो तेव्हा प्रयोजनाचं विश्लेषण 'कॉम्ब्रे'मधील वर्णनासारखं नटवं आणि 'नॉस्टॅल्जिक' होतं. त्या त्या वर्षांमध्ये वेगवेगळ्या ठिकाणी, आणि वेगवेगळ्या ऋतूत ऑडेट्टनं त्याच्यावर केलेल्या 'इम्प्रेशनां'वर स्थिरावल्यानंतर नायक पूर्णपणे सुखद सानिध्याच्या आठवणींमध्ये रमून जातो. काही वेळेला, तिनं त्याचं स्वागत केलेलं असतं ती खोली त्याचं लक्ष वेधून घेते – समुद्राच्या दिशेनं असलेला मोठाल्या खिडक्या असलेला दिवाणखाना. मध्यान्हीचा प्रकाश. 'सोन्याची झळाळी असलेली भरती, ज्यामधून सोफ्याचे निळसर सुळके आणि बाष्परूप गालीचाच्या पुळणी, भुरळ पाडणाऱ्या बेटांगत दृष्टीपथात येतात.' काही वेळेला, तिच्या आवडत्या फुलांमध्ये त्याला तिचं दर्शन होतं.

There was always beside her chair an immense bowl of crystal filled to the brim with Parma violets or with long white daisypetals scattered upon the water, which seemed to be testifying, in the eyes of the arriving guest, to some favorite and interrupted occupation, such as the cup of tea which



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

madame Swann would, for her own amusement, have been drinking there by herself; an occupation more intimate still and more mysterious, so much so that one felt oneself impelled to apologize on seeing the flowers exposed there by her side as one would have apologized for looking at the title of the still open book which would have revealed to one what had just been read by - and so, perhaps, what was still in the mind of Odette.

परंतु, तिच्याबाबतील महत्त्वाची गोष्ट म्हणजे 'तिचा पेहराव.' कारण, उत्कृष्ट पोषाख परिधान करणारी स्त्री म्हणूनच ती मुख्यत्वे ओळखली जात असते. चिनी सिल्कचा मोहक आणि लक्ष्यवेधी भर्जरी पेषाख गुलाबी, पांढरा शुभ्र, जांभळा, हिरवा किंवा पिवळा क्वचित अंगावर असायचे किंमती गाऊन. पुरातन काळाचं सूचन करणारे, ऑडेट्ट अद्याप विसरलेली नाही त्या काळाचं ओझरतं. दर्शन घडवणारे :

As in a fine literary style which overlays with its different forms and so strengthens a tradition which lies concealed among them so in Madame Swann's attire those half-hinted memories of waistcoars or ringlets, sometimes a tendency, at once repressed, towards the "all aboard", or even a distant and vague allusion to the "chase me" Kept alive beneath the concrete form the unfinished likeness of other, older forms which you would not have succeeded, now, in making a tailor or a dressmaker reproduce, but about which your thoughts incessantly hovered, and enwrapped Madame Swann in a cloak of nobility – perhaps because the sheer uselessness of these fripperies made them seem meant to serve some more than utilitarian purpose, perhaps because there was a sort of personality permeating this lady's wardrobe, which gave to the most dissimilar of her costumes a distinct family likeness. One felt that she did not dress simply for the comfort or the adornment of her body; she was surrounded by her garments as by the delicate and spiritualized machinery of a whole form of civilization.

अखेरीस, 'अव्हेन्यू द्यू बॉई'वर सकाळचा फेरफटका मारण्यासाठी ती येते तेव्हा मार्सेलनं केलेलं तिचं वर्णन बहारदार आहे. ती आता पूर्णपणे तिच्या झोकात. माथ्यावर छत्री. तिच्यासमोर माथा लवत आहेत, तीही माथा झुकवून त्यांची मानवंदना स्वीकारत आहे.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

घोड्यावरून रपेट करायला निघालेला प्रिन्स द सागाँ त्याच्या डोक्यावरील हॅट काढून तिला मानवंदना देत आहे, स्त्रीदाक्षिण्याचं उमरावी प्रदर्शन.

'Noms de pay : Le pays' (नॉम द पे-लपेझ) या दुसऱ्या प्रकरणात घटना बाल्बेककडे वळतात. अर्थात् हे अनपेक्षित नाही. कादंबरीच्या सुरुवातीपासून नायकाच्या मनात नॉर्मंडीला भेट देण्याचा आणि प्रसिद्ध बाल्बेक चर्च पाहाण्याचा विचार घोळत असतो. हे चर्च म्हणजे नॉर्मन शैलीचा एक अपूर्व नमुना, पर्शियन वाटावा असा : ज्याच्याभोवती समुद्रपक्षी घिरट्या घालत असतात त्या प्रस्तरावरून ते चर्च त्यानं कल्पनेच्या कुंचल्यानं रंगवलेलं असतं. वस्तुस्थिती मात्र पूर्ण वेगळी, नित्याप्रमाणं अपेक्षाभंग करणारी चर्च बाल्केबमध्ये नसतंच मुळी. ते असतं Balbee - en-Terre (बाल्वी-ऑ-टेर) वर, समुद्रापासून मैलभर आत. जिथून ट्रॅमचे दोन फाटे फुटतात अशा एका चौकात चर्चसमोर एक कॅफे. त्यावर 'बिलिअर्ड्स' ही सोनेरी अक्षरं लिहिलेली.

परंतु, अपेक्षाभंग क्षणिक ठरतो. कारण खुद्द बाल्बेक – जिथं मार्सेल आणि त्याची आजी राहातात ते समुद्रालगतचं विश्रांतीस्थळ – हे एक नवीन आणि उत्साहवर्धक असं जग आहे आणि कॉम्ब्रे (पॅरीस) हून वेगळं स्वत:चं वैशिष्ट्य असलेलं. या जगाच्या क्रेंदस्थानी आहे 'ग्रां हॉटेल' या हॉटेलची वास्तू प्रशस्त. त्यात नोकरवर्गाचा मोठा ताफा आणि पाव्हण्यांची चित्रविचित्र भेसळ. मार्सेल या साऱ्याचं निरीक्षण करतो, त्यांचा अभ्यास करतो. हॉटेलचंही तो निरीक्षण करतो – स्वत:ची खोली, लिफ्ट, डायनिंग रुम – आणि हॉटेलपल्याडचा समुद्र, झगमगता आणि विशाल, दर दिवशी स्वत:चं रुप पालटणारा, प्रकाश आणि भरती यांच्यासवे बदलत जाणारा. वस्तुत:, बाल्बेकला स्वत:चं असं स्वारस्थपूर्ण वैशिष्ट्य आहे, कॉम्ब्रेएवढंच ते दिलचस्प आहे. हे असं एक घटनास्थळ आहे जिथं एथवर ओझरती उल्लेखलेली बरीच पात्रं महत्त्व पावतात. ती आलटून पालटून अवतरतात. त्यापैकी मार्क्विस द व्हिलपारिसिस, मार्क्विस द साँ-लू-अन-ब्रे आणि बाराँ द चार्लस. हे तिघं उच्च खानदानी सदस्य आहेत. आणि डचेस्स द गॅर्मांतचे ते जवळचे नातलग आहेत हे विशेष. खानदानी वारस असल्याचे परिणाम त्यांच्यावरून अभ्यासणं मार्सेलला प्रथमच शक्य झालं आहे.

मार्क्विस द व्हिलपरिसिस ही एक धनाढ्य म्हातारी लेडी आहे. जुन्या फॅशनच्या बॉनेट्स वापरणारी आणि बराचसा, अन्य प्रकारचा तऱ्हेवाईकपणा करणारी. आपल्या नोकरांचा संपूर्ण ताफा बरोबर घेऊनच ती हॉटेलमध्ये अवतरते. येताना संगे तिचे स्वत:चे पडदे आणि पार्टिशनंही आणते. मार्सेल आणि त्याची आजी यांच्यावर तिची खास मर्जी आहे. ती त्यांना भेटवस्तू पाठवते. तिची जवळीक घण होते तेव्हा जाणवतं की ही बाई शंभरटक्के शिष्टमन्य



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

आहे. अशा तऱ्हेच्या शिष्टमन्यतेशी मार्सेलची आतापावेतो गाठ पडलेली नसते. वस्तुस्थिती लपवण्याचा तिनं कितीही प्रयत्न केला तरी तिच्या वर्गाची ती एक खास निर्मिती आहे ही बाब लपून राहात नाही. ती जेव्हा वास्तुकलेविषयी बोलते तेव्हा जिथं ती लहानाची मोठी झाली. त्या घराचा उल्लेख करते, रनेसाँ शैलीचा तो एक देखणा नमुना असल्याचं आवर्जुन सांगते. आधीच्या पिढीतील लेखकांविषयी ती बोलते तेव्हा सँत-बव्ह वा तिच्या वडलांच्या ड्रॉईंगरुममध्ये नेहमी येणारे प्रसिद्ध सद्‌गृहस्थ यांनी त्या लेखकाचं मूल्यमापन केलं असेल त्यावरच तिचं मूल्यमापन आधारित असतं. तिची मैत्रीदेखील अंती त्या वर्गाचीच असल्याचं दृष्टीस पडते. वस्तुत: 'एका थोर बाईनं सामान्य जनांना दाखवायचं असतं की त्यांना भेटण्यानं तिला आनंद झाला आहे, ती मुळीच आखडू नाही, ही तिला दिलेली प्रारंभीची शिकवण, खानदानी रितीरिवाज यांच्याशी विसंगत आहे.

मादम द व्हिलपारिसिसचा पुतण्या साँ-लू याच्यामध्ये वर्ग- वारसा वेगवेगळया काळा एवढा वेगवेगळा दिसतो की दोन किंवा तीन व्यक्ती म्हणून त्याचं वर्णन करता येणं शक्य आहे. सुरुवातीला तो एक 'टिपिकल' गुलछबू आहे. खानदानी उर्मटपणाचा एक आदर्श. छानछोकीचा पोषाख, नाकावर मॉनकल, एकसारखा घरंगळणारा, एखाद्या फुलपाखरागत त्याच्यासमोर गिरक्या घेणारा. मार्सेलशी त्याची ओळख करून देण्यात येते तेव्हा त्याच्या चेहऱ्यावरची एकही रेषा ढिम्म हाललेली नसते.' ज्यात मानवी सहानुभूतीच्या अस्पष्ट झाकही नव्हती असे त्याचे डोळे केवळ संवेदनाशून्यता दर्शवत होते, त्यांच्या कटाक्षाच्या रिक्ततेत, अतिशयोक्ती जाऊ द्या. जीवरहित आरशाहून त्यांना वेगळं करण्याजोगं त्यात काहीही नव्हतं. नंतर, जणू काही माझ्या नमस्काराची परतफेड करण्याआधी त्याला खात्री करून घ्यावीशी वाटली असणार कोरडे डोळे त्यानं माझ्यावर रोखले होते, नैसर्गिक मोकळेपणानं नव्हे, ती त्याच्या इच्छेनुसार न झालेली त्याच्या स्नायूंची प्रतिक्षिप्त क्रिया होती. तो आणि मी यांच्यामध्ये शक्य तेवढं अंतर राखून त्यानं त्याचा हात लांब करून माझ्यासमोर केला होता, तेव्हा मला वाटलं होतं, की याचा अर्थ दुसऱ्या दिवशी द्वंद्व आणि त्या निमित्तानं त्याचं कार्ड तो पाठवून देईल.' पुढं त्या दोघांचा परिचय वाढत जातो आणि मार्सेलला आढळून येतं की त्याच्या वर्गाविरुद्ध दंड थोपटून उभा राहाणारा तो एक बंडखोर आहे, समानतेसाठी क्विक्झोटी भावना असलेला काहीसा अतिशय कडवा बुद्धीवादी आहे. सांप्रत, तो आहे सोहार्द्रपूर्ण, कनवाळू, मागचा पुढचा विचार न करता मनाच्या उर्मीनुसार वागणारा आणि वागण आत्यंतिक स्वाभाविक. त्याचा वारसा अद्याप खानदानी आहे, त्याचं प्रदर्शन तेवढं होत नाही एवढंच ('झाँ सान्तेय' मधील बर्ट्रांड रेव्हइलाँबद्दलच्या एका उताऱ्यावर तो आधारित आहे) त्यानंतर त्याचं प्रेमप्रकरण वर्णिलं जातं तेव्हा एका स्त्रीनं सुसंस्कारित



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

केलेला तो एक खास रासवट तरुण उमराव भासतो. त्याच्या मिस्ट्रेसनं 'त्याच्या मनाला अगोचराचं दर्शन घडवलं आहे' आणि 'त्याच्या ह्रदयात नाजूकपणा' आणलेला आहे. अन्य गोष्टींबरोबरच त्याच्या मित्रांकडे लक्ष देण्याचं तिनं त्याला पढवलेलं आहे. उतार्‍यांच्या संक्रमणावस्थेत भिन्न भिन्न सॉं लू नजरेसमोर येतात. हे व्यक्तिचित्र प्रूस्तनं त्याच्या तरुण मित्रांच्या, बहुधा, प्रामुख्यानं कास्तूला, फेनलॉं आणि आल्बुफेरा यांच्या आठवणींच्या आधारे रेखाटलेलं आहे. या आठवणींची भर एवढ्या प्रमाणावर पडलेली आहे की सातत्य उरत नाही. परंतु, वाचक तिथं दुर्लक्ष करतो, नाहीतरी सातत्य हा काही ललितकृतीमधील एकमात्र गुण नव्हे.

बारॉं द चार्लस हे तिसरं पात्र या सर्वात नखशिखांत खानदानी आहे. त्याचे रितीरिवाज उर्मट आहेत. उर्मटपणा त्याच्या रोमारोमात आहे. त्याच्या संस्कृतीनं त्याचे दृष्टीकोण नि:संशय सुसंस्कारित केलेले आहेत. असं असूनही, त्याच्या वर्गातील व्यक्तींसारखेच ते आजही जुन्यांना चिकटून आहेत. जन्म आणि सामाजिक प्रतिष्ठा यांना तो आत्यंतिक महत्त्व देत असल्यानं, तो अशाच थोर स्त्रियांशी सख्य जोडण्याचा प्रयत्न करतो 'ज्याच्या पूर्वजांचा, दोन शतकांपूर्वी, जुन्या राजपद्धतीच्या ऐश्वर्यात आणि दिमाखात सहभाग होता.' चार्लस खानदानी आहे तसाच समलिंगरती आहे. नायकाला या वस्तुस्थितीची जाणीव नाही असं प्रूस्त दर्शवत असला तरी तो तसा आहे हे सिद्ध करण्याजोगा पुरावा पुढं भराभर एकट्ठा होत जातो. हा पुरावा एवढा तपशीलवार आणि लक्ष्यवेधी आहे. चार्ल्‌स प्रूस्तच्या सर्व पात्रांमधील सर्वात यशस्वीरित्या रेखाटला गेलं असल्याचं तत्काळ नजरेला पडतं.

चार्ल्‌सविषयीचं नायकाचं प्रथम इम्प्रेशन विशेषत्वानं अर्थगर्भ आहे. एक दिवस तो कॅसिनोवरून जात असताना आपल्यावर नजर रोखली गेली असल्याचं त्याला जाणवतं तो सांगतो : 'I turned my head and saw a man of about forty, very tall and rather stout, with a very dark moustache, who, nervously slapping th leg of his trousers with a switch, kept fastened upon me a pair of eyes dilated with observation. Every now and then those eyes were shot through by a look of intense activity such as the sight of a person whom they do not know excites only in men to whom, for whatever reason, it suggests thoughts that would not occur to anyone else – madmen, for instance, or spies. He trained upon me a superme stare at once bold, prudent, rapid and profound.

चार्ल्‌सनं त्याच्यावर असा जबरदस्त कटाक्ष रोखला होता जो एकाच वेळी धीट, सुजाण,



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

चंचल आणि गाढ होता. त्याच्यावर उमटलेल्या ठश्यांमधील प्रमुख घटक आहेत डोळे, किंवा अधिक नेमकेपणानं, डोळ्यांवाटे उदभवलेला प्रखर, चोरटा कटाक्ष. पुढं चार्ल्सशी जेव्हा त्याचा परिचय होतो तेव्हा त्यांचा उल्लेख नायक वारंवार करतो आणि त्यांचं वर्णन करतो ते 'अंडरवर्ल्ड'मधील प्रतिमांमधून. चार्ल्स हा चोरून पाळत ठेवताना गेलेला हॉटेलमधील एक 'क्रूक' आहे. आपल्या मित्रांकडे दुर्लक्ष करून अनोळख्यांवर लक्ष्य केंद्रित करणारा, खास कामगिरीवरील एक डिटेक्टिव्ह, जो त्याचं मस्तक न वळवता, जिथून एखादा पोलिस अचानक अवतीर्ण होईल अशा क्षितिजाच्या वेगवेगळ्या बिंदूवर 'तीक्ष्ण नजर ठेवून असतो असा बेकायदेशीर माल जवळ बाळगणारा एक फेरीवाला.'

चार्ल्स समलिंगरती आहे ही बाब त्याचा कटाक्ष लपवून ठेवू शकत नाही. तद्वतच त्याद्वारे अन्य गोष्टीही उघड केल्या जात. विवक्षित नाजूक भावना जेव्हा तो व्यक्त करतो तेव्हा त्याचा आवाज चिटका आणि बायकी होतो, तो वरच्या पट्टीत चढतो तेव्हा त्याला 'अनपेक्षित माधुर्य' लाभतं आणि तो 'आपल्या प्रेमाचा खजिना ओतणाऱ्या वागदत्त कुमारिकांच्या, भगिनींच्या गानवृंदात मूर्त झाल्यासारखा वाटतो. त्याचा पेहराव हेतुपुरस्सर नखरेल नसतो. एकदा त्याच्या लक्षात येतं की त्याच्या खिशामधून कशिदा काढलेला त्याचा रुमाल बाहेर डोकावत आहे तेव्हा तो त्याचा रुमाल चटकन आत कोंबतो, लाजाळूपण निरागस म्हणता येणार नाही अशा घरंदाज बाईच्या दिखाऊ सोज्वळ अविर्भावानं. असभ्य वर्तन ठरलं असतं ना ते ? तो मार्सेलच्या दिशेनं सावधगिरीनं पावलं टाकत असतो आणि नंतर, बचावाचा पवित्रा म्हणून उद्धटपणाचा आसरा घेतो. मार्सेलविषयी त्याला वाटत असलेली शारीरिक ओढ एका उताऱ्यात खुल्लमखुल्ला व्यक्त झालेली आहे. समुद्रस्नानासाठी निघालेल्या मार्सेलची गाठ पडल्यावर, त्याच्याकडे पोचण्याची त्याची इच्छा अनावर होते आणि न राहवून त्या तरुण पुरुषाच्या मानेला तो एक हलकेच चिमटा घेतो.

प्रूस्तच्या लेखी, समुद्रकिनारा हे असं ठिकाण आहे जिथं सर्व थरातील लोक मोकळे-पणानं एकमेकात मिसळतात आणि तिथं एखादा मध्यमवर्गीय तरुण खानदानी घराण्यातील सदस्यांना अगदी सहजगत्या भेटू शकतो. हे असंही एक ठिकाण आहे. जिथं स्त्रीपुरुषही दिलखुलासपणे मिसळतात, जिथं सहजगत्या भेट होण्याजोग्या पोरी बहुसंख्य असतात. मार्सेल बऱ्याचशा पोरींना पाहातो आणि त्यांच्याबद्दल त्याला कौतुकही वाटतं. अखेर 'लिट्ल बॅण्ड' या नावानं ओळखल्या जाणाऱ्या पोरींच्या आटोपशीर घोळक्याशी त्याचा परिचय होतो. या 'लिट्ल बॅण्ड'मुळेच 'आ लॉम्ब्र दे जन फील आं फ्लर' असं कादंबरीचं नामकरण करण्यात आलं आहे. कथेच्या या भागात पोरी बव्हंशी पोरांसारख्याच वागतात या वस्तुस्थितीची जाणीव वाचकाला वरचेवर करून दिली जाते.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

बाकसदेवतेच्या सन्मानार्थ निघालेल्या मिरवणुकीत 'लिट्ल बॅण्ड' रांग करून हॉटेलसमोरून जातो तेव्हा त्या समूहातील सदस्या मार्सेलचा प्रथमच दृष्टीला पडतात. बाल्बेकमधील अन्य लोकांहून त्या वेगळ्या असतात, समुद्रपक्ष्यांच्या झेपेसारख्या. पावलं मोजूनमापून टाकली जातात. इतरांना मागं टाकण्यासाठी आपल्या पंखाचा वापर करणाऱ्या समुद्रपक्ष्यांगत रमतगमत, आपल्याच मिजाशीत. त्यांच्या हालचालींचा मतलब जलविहार करणाऱ्यांना अनाकलनीय वाटतो. मार्सेलची खात्री पटते की या खास 'ॲथलेटिक' पोरी आहेत, कारण त्यांच्या हातात सायकली तरी असतात नाहीतर गोल्फच्या वाकड्या काठ्या त्यांचा स्वभाव 'धीट, उथळ आणि कठोर' आहे, आणि मानव वंशातील इतर सदस्यांविषयीचा तिरस्कार निर्दयतेची पराकोटी गाठू शकतो याचीही खातरजमा त्यांना झालेली असते. तो कल्पनाचित्र रंगवतो की जर का तो त्यांच्याशी खरोखरीच ओळख करून घेऊ शकला, तो भेद करील – 'एखाद्या सुसंस्कृत पॅगनसारखा किंवा रानटी लोकांमध्ये जाणाऱ्या एखाद्या काटेकोर ख्रिश्चनांसारखा – कायाकल्प करणाऱ्या सोसायटीचा, जिथं तबियत, इतरांबद्दलची बेफिकिरी, इंद्रिय सुखं, क्रौर्य, बिनडोकपणा आणि मौजमजा यांचं वर्चस्व असतं.'

त्याचा परिचय करून घेतल्यानंतर, मार्सेलला आढळून येतं की तो समजत होता तेवढ्या काही त्या रासवट, असंस्कृत खचितच नाहीत. त्या अतिशय प्रतिष्ठित – वस्तुत: अतिशय सधन – मध्यमवर्गीय कुटुंबामधून आलेल्या आहेत. आणि त्यांचे विचार पूर्णपणे पारंपारिक आहेत. चांगली आणि वाईट पद्धती यामधील भेद त्या अचूक ओळखतात. सरकार आणि ज्यू यांचा त्यांना तिटकारा आहे. उलटपक्षी, नायकाला वाटत नसल्या तरी वाचकांना त्या विचित्र वाटतात. कुठल्याही प्रकारचा घरबंध त्यांना नाही, कुठल्याही देखरेखीपासून त्या मुक्त आहेत. त्या वरचेवर गोल्फ आणि रेस यांच्या मैदानांना भेटी देत असतात. कॅसिनोमध्ये नृत्यशिक्षकाची त्या फिरकी घेतात, तक्तपोशीवर त्या बिनदिक्कत घसरगुंडी करतात, खुर्च्यांची मोडतोड करतात. त्यांचं वागणं बिनधास्त, वर्तन आक्षेपार्ह. मॅनेजर सतत त्यांना कानपिचक्या देतो, पुरुषांमध्ये त्यांना फारच थोडं स्वारस्य असूनही त्यांच्या छोट्या गटात मार्सेलला नियमित सदस्य म्हणून प्रवेश देतात. त्याला त्यांच्याबद्दल जसं आकर्षण आहे तसं त्यांना त्याच्याबद्दल.

मार्सेल त्या सर्वांच्या प्रेमात पडतो, एकापाठोपाठ, किंवा एकाच वेळी, कारण सामूहिक मोहिनीचा प्रकार संपूर्ण गटाला व्यापून राहिलेला दिसतो. त्यांच्यापाशी गुलाबांचा टवटवीतपणा आहे, 'ग्रेसिअन समुद्रकिनाऱ्यावरील सूर्यप्रकाशातील शिल्पांचं लवचिक सौंदर्य त्यांच्यामध्ये आहे.' तरीही इतरांपासून स्वत:ला अलग ठेवणारी आल्बेरटिन सिमोने नामकएक



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मुलगी सुरवातीपासून त्याला विशेष भावते. इतरांपेक्षा तो तिला जास्त वेळा भेटतो, इतरांपेक्षा त्याला तिच्याविषयी अधिक माहिती असते, असं असूनही तिला त्यानं ओळखलं असेल असं म्हणता येत नाही. तिनं त्याच्यावर उमटवलेल्या अगदी वेगवेगळ्या इम्प्रेशनांच्या मालिकांमधूनच केवळ ती त्याच्यासाठी आणि वाचकांसाठीही अस्तित्वात असते. प्रूस्तच्या लेखी, हा प्रश्न तात्त्विक आहे. तो इथं विशद करतेसमयी सांगतो की आयुष्यामध्ये 'मिस्ट्रेसीस' या कधीच सुस्पष्ट व्यक्तिमत्वाच्या नसतात म्हणून ललितकृतीमध्येही त्या सुस्पष्ट असता कामा नयेत.

'ज्याच्याविषयी आपल्याला स्वारस्य नसतं त्या लोकांची व्यक्तिमत्वं आपण जाणतो, जी आपल्या अस्तित्वाचा घनिष्ट भाग असते, जिला कुठल्याही प्रकारे आपण कदापि भिन्न समजत नाही, जिचे हेतू कधीच न संपुष्टात येणारा साठा पुरवतात, ज्यांची आपण पुनर्मांडणी करतो अशा हुरहूर लावणाऱ्या अनुमानांची जिच्यावर प्रेम करतो त्या स्त्रीविषयीची आपल्या जाणिवेच्या पल्याड कुठूनही उसळून येणारी आपली जिज्ञासा त्या स्त्रीच्या व्यक्तिमत्त्वाच्या मर्यादांचा अतिक्रम करते.' प्रूस्त म्हणतो, तिच्या वक्तित्वाचं, ठरवलं तर, निरीक्षण आपण करू शकतो, पण आपण तसं ठरवत नाही.

आल्बेरटिनसंबंधीच्या मार्सेलच्या जिज्ञासेची जातकुळी या प्रकारची आहे. तो तिला पाहातो आणि प्रत्येक वेळी एक वेगळं व्यक्तिमत्त्व त्याला जाणवतं – पहिल्यांदा सायकल घेऊन जाणारी वकान्ते (बॅकसची सेविका), गोल्फ मैदानाची बेभान स्फूर्तिदेवता, नंतर प्रतिष्ठितरित्या संगोपन करण्यात आलेली आणि काहीशी भयभीत तरुण स्त्री, नंतर ग्राम्य भाषा वापरणारी नाचरी बडबडी मुलगी आणि हेल काढून अनुनासिक बोलणारी, गिल्बेरप्रमाणं तिचं दर्शनही सतत बदलणार. तिचं आरक्त कपोल प्रथम पाहावत नाही पण ते नंतर असुखकारक वाटेनासे होते. तिला एक तीळ आहे. जो तिच्या चेहऱ्यावर भरकत असतो, क्षणात तिच्या गालावर तर क्षणात तिच्या हनुवटीवर, परंतु सरतेशेवटी तिच्या ओठावर मुक्काम करतो. तिची कांती सरड्यागत बदलणारी, कधी सावळी, कधी गुलाबी आणि कधी जांभळीही.

आल्बेरटिनच्या कहाणीमधून एलस्टिर नामक चित्रकाराशी संबंधित असलेले प्रसंग अधूनमधून पेरलेले आहेत, तद्वतच त्याच्या सिद्धांतांचंही बऱ्यापैकी तपशीलवार विवरण करण्यात आलं आहे. कलावंताला सामग्री पुरवणारी संवेदनशीलता आणि ती न पुरवणारी बुद्धिमत्ता यामधील भेद त्यानं स्पष्ट केला आहे. चित्रकार जेव्हा चित्र रंगवतो तेव्हा तो जे पाहातो. ते, तो जे पाहातो त्यासंबंधी त्याची बुद्धी त्याला सांगते ते नव्हे, कॅनव्हासवर चितारतो, आणि 'हरएक बौद्धिक संकल्पनेपासून.... स्वत:ला मोकळा करण्याचा' हेतुपुरस्सर प्रयत्न करतो. अश्या उताऱ्यांवरुन जाणवतं की प्रूस्त निश्चितच स्वत:विषयी विचार करत आहे आणि त्याची कादंबरी लिहिण्यासाठी जी तत्त्वं स्वत: आचरण्याची त्याची इच्छा असते,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

त्याचं सर्वसाधारणपणे तो विवरण करत आहे. तरीही नजरेस पडतं ते विचित्रच : ही तत्वं विशद करत असतानाच तो ती बाजूला सारत असतो, कारण त्याच्या संवेदनेशीलतेवर पूर्णपणे विसंबून राहाण्यावर तो संतुष्ट नाही. प्रूस्तत कादंबरीमधील बरेचसे उतारे, ऑडेट्ट आणि बाल्बेक, सॉं-लू आणि 'लिट्ल बॅण्ड'मधील तरुण पोरी यांनी नायकावर जे ठसे उमटवले आहेत त्या संबंधीचे आहेत आणि यात संवेदनशीलतेचा प्रभाव अधिक आहे. परंतु हे उतारे, ज्यांमध्ये इम्प्रेशनांचं विश्लेषण करण्यात आलं आहे अशा बौद्धिक उताऱ्यांपाठोपाठ पाठोपाठ जवळजवळ नेहमीच येतात आणि ते परस्परपूरक आहेत. डोळ्यांवर एखाद्या फुलपाखरागत बागडणारा मोनकल असलेला गुलछबू तरुण सॉं-लू याचं इम्प्रेशन आणि त्यानंतर खानदानी वारसाचं एक उदाहरण : व्यक्तिचित्र 'इम्प्रेशनिस्टिक' आहे आणि 'ॲनॅलिटिकल'. गिल्बेर आणि आल्बेरटिन ही कथेमधील पात्रं आहेत तद्वतच प्रेमविषयक तत्वज्ञानांची उदाहरणंही आहेत. लेखकाची पद्धत आलटून पालटून निवेदनात्मक आणि विवरणात्मक अशी आहे.

थोडक्यात, 'आ लॉम्ब्र दे जन फिल आँ फ्लर' तिच्या आधीच्या 'द्यु कोते द शे स्वान' हून अधिक बुद्धिगम्य आहे. प्रूस्तच्या आधीच्या कृतीच्या पद्धतीच्या थेट उलट दिशेनं जाणारी असं तिचं वर्णन करता येईल. त्याच्या कादंबरीच्या पहिल्या भागात, त्याच्या प्रतिभेची चतुराई ठळकपणे प्रत्ययास येते. काही उताऱ्यांमध्ये, खास करून ऑडेट्टसंबंधीच्या, टवटवीत काव्यात्म गुण आहेत आणि 'कॉम्ब्रे'चा समृद्ध 'इम्प्रेशनिझम' आहे. अन्यत्र ती अधिक वैचारिक, अधिक विश्लेषणात्मक आणि हेतू आणि मानसशास्त्रीय सिद्धान्त यांच्याशी अधिक निगडीत आहे. 'कॉम्ब्रे'मध्ये जाणवलं नव्हतं पण आता जाणवतं की लेखकाच लक्ष्य आहे, सत्य **(क्रमश :)**

---

मला जी 'भाषा' ज्ञात आहे आणि समजते, तिचा एक धर्मकार्य (Ritualistic) म्हणून खिमा होत असताना, मी त्याची साक्षीदार होते. एक लेखक म्हणून भाषेच्या हृदयात प्रवेश करण्यासाठी सर्व आयुष्य खर्ची घातले आहे. विचार आणि भाषा यात जे अंतर असते, ते सर्वस्वी नाहीसे करता आले नाही तरी ते निदान कमीत कमी करण्याचा प्रयत्न मी लेखक म्हणून करीत असते.... परंतु हॉलंड देशातील World Water Forum (जागतिक पाणी मंच) हेग या शहरात होता. त्या ठिकाणी एका धार्मिक स्वरूपी पंथाची, एका खालच्या पातळीवरच्या जगाची ठेच मला लागली. आपले हेतू लपविणे, हेच त्यांच्या जीवनाचे अथक प्रयत्न होते. त्यांना जे काही सांगायचे आहे आणि त्यांना जे काही विकायचे आहे, या मध्ये जो पैस असतो, त्यात त्यांची पिल्लावळ जन्माला येते आणि वाढते.

**– अरुंधती रॉय**



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




# तपशील

अंक १७/१८ खंड ३ २००३

## अनुक्रमणिका




**संपादक**
श्री. नाना जोशी
डॉ. मंगला सरदेशपांडे

**रचना**
हर्मिष देव्हारे

**अक्षरजुळणी**
अभिजित पंडित

**मुखपृष्ठावरील चित्र**
प्रख्यात लेखक डोरिस लेसिंग

**मुद्रण**
संतोष राणे, शारदा ऑफसेट,
ठाणे. फोन ५४३०८३८

**मालक, मुद्रक, प्रकाशक आणि पत्रव्यवहार**

श्री. नाना जोशी
४ अ, सोमणनगर,
क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग,
मुंबई – ४०० ०१२.


**'तपशील'चा तपशील**

* सुट्या अंकाची किंमत रुपये १००/-
* (६ अकांची) वार्षिक वर्गणी रुपये २०१/-
* प्रत्येक अंकाची पृष्ठसंख्या सुमारे १२० ते १२५
* वर्गणी मधल्या अंकापासून स्वीकारली जाणार नाही. थोडक्यात पंधराव्या अंकापासून वर्गणी पाठवली तरी तेराव्या अंकापासूनच अंक देण्यात येतील.




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

## संपादकीय

तपशीलच्या या अंकात प्रख्यात ब्रिटिश लेखक डोरिस लेसिंग यांचा परिचय सौ. सुमती जोशी यांनी करून दिला आहे. हा परिचय डोरिस लेसिंग यांच्या शब्दातच करून देण्यात आलेला आहे. हे ज्या ठिकाणी शक्य नव्हते त्या ठिकाणी त्यांच्या साहित्याचा आधार घेतलेला आहे. डोरिस लेसिंग यांच्या साहित्याचा अनुवाद अनेक भाषात झाला. अर्थात भारतीय भाषा त्याला सन्माननीय अपवाद. त्यांना देशोदेशीचे साहित्याशी संबंधित असे पुरस्कारही देण्यात आले आहेत. लेसिंग यांच्या पुस्तकांचा खप वाढावा म्हणून जर्मनी, फ्रान्स, इटाली, स्पेन-ब्राझिल अशा अनेक देशातून त्यांनी प्रकाशकांच्या विनंतीवरून दौरे काढले. अफगाण निर्वासित स्त्रियांच्या दु:खाना वाचा फोडण्यासाठी त्यांनी अफगाणिस्तान आणि पाकिस्तानात दौरे केले. डोरिस लेसिंग यांना Space fiction (Science fiction) पैस ललित साहित्य अथवा विज्ञान कथांसाठीही पुरस्कार प्राप्त झाले आहेत. अशा लेखकांच्या एका परिषदेचे अध्यक्षस्थान त्यांनी भूषविलेले आहे. या सगळ्यात महत्त्वाचा भाग म्हणजे या महान लेखकाचे पाय भारताला मात्र लागेल नाहीत– असे भारताला 'आत्मगौरवाने' म्हणता येईल. आपण या बाबत स्वदेशीच्या व्रताचा भंग होऊ दिलेला नाही. योगायोगाचा भाग असा आहे. की, डोरिस लेसिंग यांचा अत्यंत आवडता लेखक प्रूस्त. त्याच्याबद्दलची लेखमाला अखेरच्या चरणात असताना डोरिस लेसिंग यांचा परिचय 'तपशील' मध्ये प्रसिद्ध होत आहे. सौ. सुमती जोशी यांनी परिश्रम घेऊन अत्यंत वाचनीय असा प्रदीर्घ लेख डोरिस लेसिंग यांच्याबद्दल तयार केलेला आहे. तो तपशीलच्या सर्व वाचकांच्या पंसतीस उतरेल याबद्दल मला अजिबात शंका नाही.

याशिवाय प्रूस्तच्या लेखमालेतील प्रकरण १३ ते १८ वाचावयास मिळेल. प्रूस्त ज्या महान कादंबरीसाठी अजरामर झाला, त्यासाठी या सदैव आजारी असणाऱ्या लेखकाने किती अपार कष्ट घेतले होते, याची कल्पना वाचकाला येईल. पण माहिती जमा करणे एवढ्याच साठी ते उन्मेखून लक्षात घ्यावे असे नाही. डोरिस लेसिंग यानी म्हटल्याप्रमाणे प्रूस्त कालीन फ्रेंच समाजाचे तपशीलवार वर्णन लेखकाने अत्यंत लालित्यपूर्ण भाषेत केलेल आहे. वाचक या लेखमालेतील पुढचा लेख वाचावयास उत्सुक असणारच.

या दोन लेखांची पृष्ठसंख्या २४० झाल्या कारणाने हा जोड अंक काढणे भाग पडले. **तपशीलचा हा १७ व १८ वा अंक.** या अंकाबरोबर 'तपशील'च्या तिसऱ्या खंडाची वर्गणी संपलेली आहे याची नोंद कृपा करून घेतली जावी. डॉ. मीना वैशंपायन यांचा 'क्लिओपात्रा' हा लेख व सौ. प्रतिभा टिल्लू यांचा 'एका महान कोशकाराचा निर्माता' हे दोन लेख हाती असूनही ते मागे ठेवावे लागते याची खंत संपादकाला आहे.

सौ. सुमती जोशी, डॉ: मीना वैशंपायन, सौ. प्रतिभा टिल्लू, सौ. जयश्री जुन्नरकर, श्री. विष्णू सदाशिव ब्रम्हे, श्री. अ. ना. महाशब्दे या सर्व लेखकांनी आवर्जून लिहिले.

सौ. सुमती जोशी, श्री. सांगलीकर, श्री. ए. एस. ठाकूर, श्री. रायकर यांनी वर्गणीदार नोंदवून तपशीलला आर्थिक सहाय्य केले.

Moores Town, New Jersey येथील (Eleanor Keleman) एलनॉर केलमेन यांनी तपशीलसाठी अनेक पुस्तके पाठविली. या सर्वांचे मनस्वी आभार.

**– नाना जोशी**

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

# लेखक आणि त्याची साहित्य निर्मिती

## डोरिस लेसिंग

## यांच्या शब्दात 'डोरिस लेसिंग' (DORIS LESSING)

- सौ. सुमती जोशी

बोस्टन विद्यापीठातर्फे प्रकाशित होणारा पार्टिझन रिव्ह्यूचा २००१ सालचा विंटर इश्यू (अमेरिकेतील शिशिर ऋतुचा अंक) मी चाळत होते. डोरिस लेसिंग यांच्याबद्दलचे माझे लेखन याच सुमारास चालू असल्यामुळे या अंकातील पहिल्या पानावरील संपादकांच्या नोंदीने माझे लक्ष वेधून घेतले. "**डोरिस लेसिंग**" यांना साहित्याचे नोबेल मिळालेले नाही. साहित्याचा दर्जा आणि विपुलता या दोन्ही बाबतीत त्या बाल्झॅक, ट्रोलॉप यांची आठवण करून देतात. त्यांनी चाळीसहून अधिक पुस्तके लिहिली आहेत. कथा, कादंबऱ्या, नाटक, आत्मचरित्र, संगीतिका, कविता असे अनेक साहित्यप्रकार उत्तम तऱ्हेने हाताळले आहेत. **डोरिस लेसिंग** यांची योग्यता जाणण्याचे नोबेल कमिटीचे अपयश हे वैयक्तिक किंवा राजकीय अथवा दोन्ही प्रकारचे असण्याचा संभव आहे. नोबेल कमिटी याची दखल घेऊन योग्य ती कारवाई करेल." अशी आशा पार्टीझन रिव्ह्यूचे संपादक विल्यम फिलीप्स यांनी प्रदर्शित केली आहे. लेखकाचा मोठेपणा हा काही फक्त नोबेल पारितोषिक मिळण्यावर अवलंबून असतो असे नाही. पण 'तपशीलने' या लेखिकेच्या लेखनाचे मूल्य जाणले आहे. म्हणूनच त्यांच्या साहित्याची ओळख करून देणारा प्रदीर्घ लेख मी लिहिला आहे.

**डोरिस लेसिंग** या एक बहुप्रसवा ब्रिटिश लेखिका. चाळीसाहून अधिक पुस्तके त्यांनी लिहिली. त्यात 'दि ग्रास इज सिंगिंग', 'दि गोल्डन नोटबुक', ' दि समर बिफोर दि डार्क', 'दि मेमॉयर्स ऑफ अ सर्व्हायव्हर', 'दि फिफ्थ चाइल्ड', 'बेन इन दि वर्ल्ड', यांसारख्या कादंबऱ्या आहेत. 'दि हॅबिट ऑफ लव्हिंग', 'ए मॅन अँड टू विमेन' यांसारखे कथासंग्रह आहेत. आफ्रिकन पार्श्वभूमीवरील कथा 'आफ्रिकन स्टोरीज' या कथासंग्रहात समाविष्ट केल्या आहेत. 'चिल्ड्रन ऑफ व्हायोलन्स' आणि 'कॅनॉपस इन अरगॉस' या दोन्ही मालिकांतर्गत प्रत्येकी पाच पुस्तके त्यांनी लिहिली आहेत. 'इन परस्युट ऑफ इंग्लिश', 'गोइंग होम', 'अ स्मॉल पर्सनल व्हॉइस', 'प्रिझन्स वी चूझ टू लिव्ह इन' यासारखी वैचारिक ग्रंथसंपदा त्यांनी निर्माण केली आहे. फोर्टीन पोअेम्स हा कवितांचा संग्रह आणि 'प्ले विथ अ टायगर' हे नाटक त्यांनी लिहिले आहे. थोडक्यात कथा-कादंबऱ्यांपासून कवितांपर्यंतचे साहित्याचे अनेक



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

प्रकार हाताळण्याची ताकद त्यांच्या लेखणीत आहे. वाचकांना खिळवून ठेवण्याचे सामर्थ्य असलेल्या या यशस्वी लेखिकेने पंचाऐंशीव्या वर्षात पदार्पण केले आहे.

कोणताही लेखक आपल्या लेखनमाध्यमातून वाचकांशी सुसंवाद साधत असतो. आपले विचार समाजापर्यंत पोचवण्याचा प्रयत्न करत असतो. परंतु तेवढ्याने साहित्यिक जाण असलेल्या व्यक्तींचे समाधान होत नाही. लेखकाची निर्मितीप्रक्रिया जाणून घेण्याची उत्सुकता वाचकांच्या मनात असते. तसेच लेखकाच्या साहित्यकृतीच्या संदर्भात अनेक शंका मनाच्या कप्प्यात कुठेतरी दडलेल्या असतात. अशा सुप्त इच्छाही डोके वर काढत असतात म्हणूनच अशा प्रथितयश लेखकांशी समाज प्रतिनिधी सुसंवाद साधतात. त्यांच्या मुलाखती घेतात. वाचकांच्या मनातली प्रश्नावली हसत खेळत लेखकापुढे उलगडतात. कधी कधी लेखकाला अडचणीत टाकणारे प्रश्न मोठ्या कौशल्याने लेखकापुढे उभे करतात आणि लेखकाच्या मनोगताला शब्दरूप द्यायला लावतात. अशा मुलाखतींमुळे लेखकाच्या अंतर्मनाचे दर्शन होण्याचा संभव असतो. वाचकांच्या मनातील रिकाम्या जागा भरल्या जातात. लेखकामधील 'माणूस' समजण्यास मदत होते. साहित्याची उत्तम जाण असलेल्या देशोदेशींच्या अनेक मान्यवर व्यक्तींनी डोरिस लेसिंग यांच्या शंभराहून अधिक मुलाखती घेतल्या आहेत. या मुलाखतींचा कालावधीही विस्तीर्ण आहे. १९६४ सालापासून आजपर्यंत प्रसिद्ध होत असलेल्या मुलाखतीत मुलाखतकारांनी लेखिकेचा संपूर्ण जीवनपट, लेखनपट, स्त्रीवादी भूमिका, मानसिक विश्लेषण, जातीयवाद, धर्म, राजकारण, समाजकारण, विज्ञानलेखन, सुफीझम यासारख्या अनेक विषयांना स्पर्श करणाऱ्या प्रश्नांचा भडिमार केला. डोरिस लेसिंग यांनीही या सर्व प्रश्नांना न कंटाळता, विचारपूर्वक उत्तरे दिली. त्या उत्तरातून त्यांनी केलेल्या सघन चिंतन मननाचे मनोज्ञ दर्शन वाचकांना घडते. बुद्धीच्या निकषावर तावून सुलाखून घेतलेल्या कितीतरी विचारांतून या समर्थ लेखिकेच्या वैचारिक वाटचालीचे दर्शन वाचकांना होते. त्यांच्या साहित्यनिर्मितीचे अनेक पदर उलगडतात. त्यांच्या बंडखोर व्यक्तिमत्त्वाचे दर्शन होते आणि साहित्याबद्दलची आणि जीवनाबद्दलची अंतर्दृष्टी प्राप्त होते.

मुलाखतकारांविषयी आपले सडेतोड विचार व्यक्त करताना डोरिस लेसिंग म्हणतात, "मुलाखतकार मुलाखत घ्यायला येतात तेव्हा त्यांनी मुलाखतीसाठी अगदी संकुचित चौकट तयार केलेली असते. मुलाखतकारांना जे प्रश्न विचारायचे असतात त्याची पूर्वसूचना मुलाखत देणाऱ्या व्यक्तीला नसते. काही गुंतागुंतीच्या विषयाबद्दल किंवा एखाद्या समस्येबद्दल जर विस्ताराने बोलायची मुलाखती देणाऱ्याची इच्छा असली तरी त्याला फारसा वाव मिळत नाही. मुलाखतकारांच्या प्रश्नांना तात्काळ उत्तरे द्यावी लागतात. साहजिकच "या विषयावर विचार करायला मला थोडा कालावधी द्या," किंवा 'मी आत्ता जे काही सांगितले त्याकडे दुर्लक्ष करा. कारण मी माझा मुद्दा नव्याने मांडत आहे." "माझ्या विचारांची मी पुन्हा



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

एकवार सुसूत्र मांडणी करते आहे.'' अशा तऱ्हेची विधाने मुलाखत चालू असताना करता येत नाहीत. शिवाय मुलाखतकारांच्या प्रश्नांना उत्तरे देताना अतिसुलभीकरणाचाही धोका असतो. मी आजवर अनेक मुलाखती दिल्या. कित्येक वेळेस मुलाखतकार मला तेच तेच प्रश्न पुन:पुन्हा विचारतात. पण जणु काही हे प्रश्न मला प्रथमच विचारले जात आहेत असा आविर्भाव ठेवून त्या सर्व प्रश्नांची न कंटाळता मी उत्तरे देते. मुलाखत संपत आल्यावर 'माझं समाधान झालं नसावं' अशी भावना मुलाखतकाराच्या मनात निर्माण होते आणि ते मला विचारतात, ''आम्ही उपस्थित न केलेल्या काही मुद्यांवर तुम्हाला चर्चा करायची आहे का?'' त्यावर मी जर होकार दिला तर त्यांचा त्यावर विश्वास बसत नाही आणि एक प्रकारची कंटाळल्याची भावना त्यांच्या चेहऱ्यावर दिसू लागते. कधी कधी तर मुलाखतकाराने कोणते प्रश्न विचारावेत ते मुलाखत देणाऱ्यालाच सांगावे लागते. अशा विपरीत गोष्टी घडल्या तर मात्र ती मुलाखत माझ्या दृष्टीने मृत होते. एकदा एका मुलाखत घेणाऱ्या जर्मन स्त्रीने मला सांगितले, ''तू तुझ्या वैयक्तिक जीवनाबद्दल बोलणार नसशील तर .......' तिचे म्हणणे रास्त होते. तिला आणि तिच्या वाचकवर्गाला लेखकाच्या वैयक्तिक जीवनाबद्दलच अधिक माहिती हवी होती. लेखकाला जगातील अनेक देशात मुलाखती द्याव्या लागतात. पण त्यापैकी लेखकाच्या मनात रेंगाळत राहतील अशा दर्जेदार मुलाखती जेमतेम दोन तीन असतात. 'सत्य लोकांपुढे आणणे' हे मुलाखतींचे उद्दीष्ट केव्हाच विसरले गेले आहे.'

डोरिस लेसिंग यांनी आत्मचरित्राचे दोन भाग लिहिले. 'अंडर माय स्कीन' हा पहिला भाग १९९५ साली प्रकाशित झाला आणि 'वॉकिंग इन दि शेड' हा दुसरा भाग १९९८ साली प्रकाशित झाला. इतरांच्या दृष्टीने आपण कसे आहोत हे जाणून घेणे, त्याचा शोध घेणे हा आत्मचरित्र लिहिण्यामागचा एक उद्देश आहे असे डोरिस लेसिंग यांना वाटते. आत्मचरित्राच्या या दोन्ही भागात त्यांनी आपला चरित्रपट आणि लेखनपट वाचकांपुढे ठेवला आहे. चारचौघींप्रमाणे रुळलेला मार्ग त्यांनी अनुसरला नाही. स्वतंत्र बाण्याने आपला मार्ग त्यांनी शोधला आणि ताठपणाने वाटचाल केली. ''उत्तमोत्तम कादंबऱ्यांची निर्मिती करणाऱ्या लेखकांचे जीवनही कित्येकदा चारचौघांसारखे सर्वसामान्य असते.'' या नियमाला अपवाद ठरेल असे लेसिंग यांचे जीवन आहे. ही दोन्ही आत्मचरित्रे वाचताना लेसिंग यांच्या चाणाक्षतेचे, सूक्ष्म निरीक्षणशक्तीचे, रोखठोक भाषेत लिहिलेल्या सडेतोड विचारांचे दर्शन घडते. आत्मचरित्र लिहिताना मागे वळून संपूर्ण जीवनपट नव्याने पहायचा असतो. डोंगरावर चढताना वळणावळणांच्या रस्त्यावरून खाली दृष्टी टाकली की मनोहारी दृष्य दिसते. पण प्रत्येक वळणावरून त्या दृष्यातील विविध अंगांनी रंगलेल्या सौंदर्यछटा वेगळ्या भासतात. त्याप्रमाणे जीवनाच्या भिन्नभिन्न टप्प्यांवरून मागे वळून पाहिले असता प्रत्येक टप्प्यावर आपले स्वत:चे आयुष्य आपल्याला वेगळे वाटते असे डोरिस लेसिंग यांचे मत आहे.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

म्हणूनच त्या म्हणतात, "मी जर तिसाव्या वर्षी आत्मचरित्र लिहिले असते तर तो झुंजार दस्तवेज झाला असता. चाळीसाव्या वर्षी जर या लेखनाचा मी विचार केला असता तर माझा सूर अपराधीपणाचा झाला असता. 'अरे देवा, मी हे सगळं कसं केलं असेल?' असं हताश होऊन मी म्हटलं असतं. पण आज पंचाहत्तराव्या वर्षी आत्मचरित्र लिहिताना, त्या बाळाकडे, त्या मुलीकडे, त्या तरुणीकडे त्रयस्थाच्या भूमिकेतून, कुतूहलमिश्रित आश्चर्याने मला पाहात येत आहे."

### तडफदार व्यक्तिमत्त्वाची आई : एमिली मॅकवेग Emly Mcveagh

डोरिसच्या आईने लहानपणापासून आपली हुशारी सिद्ध करण्यास सुरुवात केली. शालेय शिक्षणात तिची प्रगती लक्षणीय होती. हॉकी, टेनिस हे दोन्ही तिला उत्तम खेळता येत होते. नाट्याभिनय, संगीताच्या बैठकी यासारख्या कलाक्षेत्रातही डोरिसच्या आईला चांगलीच गती होती. आपल्या दुचाकीवर स्वार होऊन अभ्यासेतर अनेक उपक्रमात ती सहभागी होत असे. सर्व विषयावरच्या उत्तम पुस्तकांचे वाचन करण्यातही ती आघाडीवर असे. 'माँटेसारी' यांनी सांगितलेले बालमानसशास्त्राचे धडेसुद्धा तिने गिरवले होते. त्यामुळे लहान मुलांचे संगोपन कसे करावे, त्यांना सक्षम, स्वतंत्र करून सर्व अंगांनी त्यांचे व्यक्तिमत्त्व कसे घडवावे याचे पाठ्यपुस्तकी ज्ञान तिच्याजवळ होते. त्यानंतर पहिल्या महायुद्धाचा काळ आला. ब्रिटिश घरातील प्रत्येक पुरुष देशप्रेमापोटी युद्धात सामील झाला. दुखापत झालेले अनेक सैनिक रुग्णालयात दाखल होऊ लागले. डोरिसच्या आईसारख्या अनेक तरुणींनी अशा रुग्णांची सेवासुश्रुषा करण्यासाठी परिचारिकेचा पेशा स्वीकारला. कष्टमय जीवन, तुटपुंजा पगार. थंडीपासून संरक्षण करण्यासाठी पुरेसे ऊबदार कपडे घ्यायला, इतकंच नव्हे तर पोटभर जेवायलासुद्धा पैसे नसत. तरुण वय, तडफदार व्यक्तिमत्त्व, ती एका डॉक्टरच्या प्रेमात पडली. विवाहाच्या आणाभाका झाल्या. परंतु दुर्दैवाने टॉर्पेडोने एक बोट बुडवली आणि त्या बोटीबरोबरच त्या बोटीवरील तरुण डॉक्टरलाही जलसमाधी मिळाली. या धक्क्याने ती तरुण नर्स पुरती खचून गेली. त्या तरुणीवर जबरदस्त मानसिक आघात झाला.

### खेडवळ राहणीची ओढ असणारे वडील : अल्फ्रेड टेलर

डोरिसचे वडील खेड्यात राहणारे. कॉलचेस्टरमधील शेतकऱ्यांच्या मुलांबरोबर गावरान जीवन जगण्यात त्यांचं बालपण गेलं. शेतावर, आजूबाजूच्या रानावनात हिंडावं, दंगामस्ती करावी, उनाडक्या कराव्यात असा त्यांचा दिनक्रम असे. शालेय शिक्षणाची गोडी त्यांना अजिबात नव्हती. रविवारी चर्चमध्ये जाण्याचाही त्यांना मनस्वी तिरस्कार होता. शेतकरी व्हावं अशी त्यांची सुप्त इच्छा. पण आईवडिलांपासून दुरावल्यावर त्यांनी बँकेतली नोकरी स्वीकारली. बँकेच्या कामकाजाची फारशी आवड नसली तरी एकदा त्या कामाचा स्वीकार



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

केल्यावर मात्र त्यांनी कधीही अंगचुकारपणा केला नाही. बँकेच्या नोकरीत भरपूर कष्ट केले. आयुष्यातील हे दशक त्यांनी फार आनंदात घालवले. पहिलं महायुद्ध सुरू झालं तेव्हा ते अठ्ठावीस वर्षांचे होते. या युद्धात दोन वेळा त्यांना जीवदान मिळाले. एकदा ॲपेंडिसायटिसमुळे त्यांना परतावे लागले; तर दुसऱ्या वेळेस पायावर तोफेच्या गोळ्यांचा मारा झाल्यामुळे त्यांना एक पाय गमवावा लागला. आजारी पडल्यामुळे त्यांना रुग्णालयात दाखल करावे लागले. शारीरिक व्याधींबरोबरच त्यांना मानसिक अवसादानेही ग्रासले होते. "आपण एका थंडगार अंधाऱ्या खोलीत अडकून पडलो आहोत, बाहेर जायला रस्ता नाही आणि मदत करायलाही कोणी नाही" असे त्यांना वाटत असे. पूर्व लंडनमधल्या रॉयल फ्री हॉस्पिटलमध्ये जखमी अवस्थेत त्यांना दाखल करण्यात आले. डोरिसची आई तिथे नर्स म्हणून काम करीत होती. आईच्या कामातली शिस्त. वक्तशीरपणा, तडफ वाखाणण्यासारखी होती. म्हणूनच सेंट जॉर्ज या टीचिंग हॉस्पिटलमध्ये 'मेट्रन' म्हणून काम करण्यासाठी तिची निवड झाली. वास्तविक भरपूर अनुभव गाठीशी असणाऱ्या श्रेष्ठ परिचारिकेची निवड अशा पदासाठी केली जाते त्याऐवजी इतक्या लहान वयात डोरिसच्या आईची निवड होणे हा फार मोठा सन्मान होता. परंतु त्या उभयतांनी लग्न करण्याचा निर्णय घेतला होता. डोरिसच्या आईने डोरिसच्या वडिलांची वर्षभर जी सेवा केली त्याला तोड नव्हती. किंबहुना या अथक सेवेमुळेच त्यांची प्रकृति सुधारली. पत्नीचे हे ऋण कधीच विसरता येणार नाही अशी डोरिसच्या वडिलांची भावना होती. मेट्रन म्हणून आपल्याला अजोड कामगिरी करता येईल असा दुर्दम्य आत्मविश्वास आईजवळ होता. तरीसुद्धा विवाह आणि सुखी कौटुंबिक जीवनाची तिला ओढ होती. त्यामुळे तिनेही करीअर सोडून लग्न करण्याचा निर्णय घेतला. युद्धात गमावलेल्या असली पायाच्या जागी नकली लाकडी पाय असलेल्या अवस्थेतही डोरिसच्या आईने त्यांचा पती म्हणून स्वीकार केला.

### पर्शियात स्थलांतर

डोरिसच्या वडिलांना आता लंडनला रहायचा कंटाळा आला होता. त्यांनी आपली बदली 'इम्पीरिअल बँक ऑफ पर्शिया' (सध्याचे इराण) मधील कर्मनशाह येथे करून घेतली. हे दांपत्य बर्फाच्छादित डोंगरांनी वेढलेल्या कर्मनशाहमध्ये स्थायिक झाले. तिथे २३ ऑक्टोबर १९१९ साली डोरिसचा जन्म झाला. १९१९ साल हे जागतिक ऱ्हासाचे वर्ष होते. फ्लूच्या साथीने २ कोटी नव्वद लाख लोकांचा बळी घेतला होता. लाखो लोक युद्धात मारले गेले होते. आईवडिल दोघांचीही मनस्थिती ठीक नव्हती. लग्न की करिअर हा संघर्ष, प्रेमभंगाचा आघात, आर्थिक ओढाताण या साऱ्या परिस्थितीमुळे डोरिसच्या आईचे मानसिक संतुलन बिघडले होते. पहिल्या महायुद्धामुळे जागतिक स्थिती अगदी हालाखीची होती. याचे पडसाद



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

डोरिसच्या बालपणावर उमटले. 'विषारी वायुचा काळपट रंगाचा ढग माझं बालपण झाकोळून टाकत होता.' असं डोरिस लेसिंग आपल्या आत्मचरित्रात म्हणतात. २-२।। वर्षापर्यंतचे डोरिसचे बालपण कर्मनशाह येथे गेले. वडील घोड्यावर स्वार होऊन बँकेत जात असत. तेव्हा वडिलांच्या पुढ्यात घोड्यावर बसणे लहानग्या डोरिसला फार आवडत असे. डोरिसची आई विवाहापूर्वी व्यवसायाने परिचारिका असली तरी डोरिसचा जन्म झाल्यावर तिने पूर्णवेळ गृहिणीपद स्वीकारले. आईच्या कडक शिस्तीत डोरिस मोठी होत होती. स्वच्छता, नीटनेटकेपणा, सुसूत्रपणा, सुचकता, टापटीप या सर्व बाबतीत तिच्या आईचा कटाक्ष असे. पण असे संस्कार होऊनसुद्धा डोरिसचा स्वभाव वेगळा झाला. छोट्या डोरिसला या साऱ्याचा जाच होत असे. आईच्या नाटकी बोलण्याचा डोरिसला तिटकारा होता. बाल्यावस्थेत मुलभूत गरज असते प्रेमाची, वात्सल्याची. बालकाच्या निकोप वाढीसाठी मातेच्या दुधाबरोबरच मातृप्रेमाचे अमृतही आवश्यक असते. या प्रेमाचा अर्थ समजण्यासाठी त्या प्रेमाचा प्रत्यक्ष अनुभव घेतला पाहिजे. तो अनुभव आपल्याला मुळीच मिळाला नाही असे डोरिस लेसिंग यांचे प्रांजळ मत आहे. या मातृप्रेमाची महती आईला ठाऊक नव्हती असे नाही. तरीसुद्धा इतरांशी बोलताना, "मला मुलगी नको होती. मुलगा व्हायला हवा होता" हे वाक्य आई अनेकदा उच्चारित असे. 'मुलगा हा वंशाचा दिवा किंवा म्हातारपणातील आधार' अशी भावना तत्कालिन ब्रिटिश स्त्रियांच्या मनात असावी, पण त्यामुळे डोरिसचे कोवळे बालमन कलुषित न झाले तरच नवल ! "माझ्या आईला माझा धाकटा भाऊच अधिक आवडत असे. माझ्यावर तिचे फारसे प्रेम नव्हते." असा आरोप डोरिसने आपल्या आईवर केला आहे. तसेच त्या आरोपाला पुष्टी देणाऱ्या अनेक लहानमोठ्या घटना डोरिस यांनी 'अंडर माय स्कीन' या आत्मचरित्राच्या पहिल्या भागात लिहिल्या आहेत. बालपणातील या मानसिक आघातामुळे आलेल्या पांगळेपणाची भावना कितीतरी वर्षे टिकून राहिली असे डोरिस यांना वाटते. मनाने हळवी, सूक्ष्म निरीक्षणशक्ती असलेली, अन्यायाविरुद्ध लढा देणारी, न्यायनिवाडा करून स्वत:चे मत बनवणारी आणि प्रेमाची भुकेली डोरिस आईपेक्षा अगदी वेगळी होती आणि तेच त्यांच्यातील तणावाचे प्रमुख कारण होते.

भारतीय स्त्रीची वास्तवातील आणि विशेषत: वाङ्मयात चित्रित केलेली प्रतिमा पाश्चात्य स्त्रियांपेक्षा वेगळी आहे. भारतीय स्त्री स्वत:पेक्षा आपल्या कुटुंबाकरिता जगते. पतीच्या उन्नतीसाठी वेळ पडल्यास ती स्वत:च्या महत्त्वाकांक्षेला मुरड घालण्यास तयार असते. मुलांच्या उत्कर्षात स्वत:च्या आयुष्याची सार्थकता आहे असे तिला वाटते. अर्थात या भारतीय स्त्रीच्या रूपात आता बदल होत आहे. पाश्चात्य विचारांचे वारे येथे वाहू लागले आहेत. स्त्रीमुक्ती संघटना स्त्रियांना 'स्व'ची जाणीव करून देऊ लागल्या आहेत. पण विसाव्या शतकात मात्र भारतीय स्त्रियांचे रूप 'त्यागाचे मूर्तिमंत प्रतीक' असेच होते. डोरिस यांच्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

आईबद्दलच्या स्मृती या प्रतिमेच्या विरुद्ध आहेत. त्या म्हणतात, "मी आणि माझा भाऊ यांच्यादेखत माझी आई मुलांकरता आपल्याला किती कष्ट घ्यावे लागतात, मुले वाढवणे किती त्रासदायक आहे, स्वत:चा अंश मुलांकरता कसा खर्ची पडतो, आपले अभिजात गुण मुलांचे संगोपन करताना कसे फुकट जातात हे वारंवार सांगत असे. मुले तिथे हजर नाहीत, असलीच तर बहिरी आहेत किंवा त्यांना काही समजत नाही अशा थाटात आईच्या तोंडाचा पट्टा चालू असे. वास्तविक लहान मुलांच्या पंचज्ञानेंद्रियांची ग्रहणशीलता मोठ्यांच्या कितीतरी पटीने जास्त असते. मोठ्या माणसांचे कित्येक आवाजांकडे दुर्लक्ष होत असले तरी लहान मुले मात्र प्रत्येक बारीकसारीक आवाज लक्ष देऊन ऐकतात आणि स्मृतीत जतन करून ठेवतात. "आईच्या कठोर वक्तव्याचे व्रण मी आयुष्यभर उरी बाळगले. माझ्या मनातील आई विषयीचा तिरस्कार इतका वाढला की कदाचित मी आईला ठार मारले असते. माझं आत्मचरित्र प्रसिद्ध झालं तेव्हा माझी आई हयात नव्हती. पण ती हयात असती तरी मी माझं आत्मचरित्र नक्कीच प्रसिद्ध केलं असतं. माझ्या कोणत्याच गोष्टीला आई कधीच मान्यता देत नसे. ती हयात असली तरी आमच्यामधील विसंवाद उघड करून दाखविल्यामुळे फारसा फरक पडला नसता."

कर्मनशाह हे शहर मोठ्या बाजाराचे ठिकाण होते. शहरात सुंदर इमारती होत्या. त्यांचे राहण्याचे घर प्रशस्त खोल्यांचे आणि मोठे होते. पण त्यानंतर डोरिसच्या वडिलांची बदली तेहरानला झाली. तेहरान हे मात्र घाणेरडं शहर होतं. १९२४ साल उजाडलं आणि कंटाळून डोरिसच्या आईवडिलांनी लंडनला परतायचं ठरवलं. लंडनमध्ये 'अेंपायर प्रदर्शन' भरलं होतं. या प्रदर्शनाचा उल्लेख तत्कालिन साहित्यात अनेकदा येतो. या प्रदर्शनाचा विलक्षण प्रभाव होता. त्यातल्या दक्षिण ऱ्होडेशियाच्या विभागात मक्याच्या कणसांच्या राशी ठेवल्या होत्या आणि "फक्त पाच वर्षात श्रीमंत व्हा" अशा तऱ्हेच्या घोषणा तिथे ऐकू येत होत्या. डोरिसच्या वडिलांवर या साऱ्याची जबरदस्त मोहिनी पडली. त्यांच्या रोमँटिक प्रवृत्तींनुसार त्यांनी सर्व सामानाची बांधाबांध केली आणि अगदी अनोळखी प्रदेशात शेतकरी बनण्याच्या इराद्याने स्थलांतर केले. कॉलचेस्टरमध्ये खेडवळ वातावरणात बालपण घालवलेला हा शेतकऱ्याचा मुलगा, दक्षिण आफ्रिकेतल्या गवताळ प्रदेशात पोचला. ऱ्होडेशियात (आताचे झिंबाब्वे) त्यांनी पुन्हा आपल्या संसाराची मांडामांड केली. ही काही आगळी वेगळी घटना नव्हती. दुखापत झालेले, पूर्वी सैन्यात नोकरी केलेले कितीतरी इंग्लिश, जर्मन सैनिक तिथे येऊन राहिले होते. अन्य सहकाऱ्यांप्रमाणे युद्धात आपल्याला प्राण गमवावे लागले नाहीत, त्या दृष्टीने ते सर्वजण भाग्यवान होते. या सर्व घटनांचा उल्लेख डोरिस लेसिंग यांच्या 'शिकास्ता' या कादंबरीत वाचकांना आढळतो.

विसाव्या शतकाच्या पहिल्या अर्धशतकात विमानसेवा आजच्याइतकी प्रगत नव्हती म्हणूनच लंडन ते ऱ्होडेशिया हा प्रवास त्यांनी बोटीने केला. या प्रवासात डोरिसच्या आईची



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

बोटीच्या कॅप्टनशी मैत्री जमली. हास्यविनोद, थट्टामस्करी करण्यात आईचे दिवस मजेत जात असले तरी डोरिस अस्वस्थ होती. लहानग्या डोरिसची काहीशा क्रूर स्वरूपाची थट्टा करण्यात कॅप्टनचा पुढाकार होता आणि आईची त्याला साथ होती. अशा गोष्टी आई हसण्यावारी नेत असे. डोरिसच्या मनातील आईविषयीच्या रागाचा अंकुर फोफावण्यास अशा घटनांची मदत झाली. आई उत्तम पोषाख करून सायंकाळच्या मेजवान्यात सहभागी होई. त्या रम्य, धुंद वातावरणात आपणही आईबरोबर जाऊन आनंद लुटावा ही लहानग्या डोरिसची तीव्र इच्छा. पण 'या मेजवान्या फक्त मोठ्या मंडळींकरिता असतात. तिथे तुला कंटाळा येईल' अशी सबब सांगून आई डोरिसला आणि तिच्या धाकट्या भावाला केबिनमध्ये कोंडून निघून जात असे. धाकटा भाऊ कंटाळून झोपी जाई. पण डोरिसच्या रागाचा पारा मात्र चांगलाच वर जाई. अशाच एका संध्याकाळी डोरिसच्या मनात कोंडलेल्या ज्वालामुखीचा भडका उडाला. टेबलावर चढून डोरिसने नखं कापायची छोटीशी कात्री मिळवली आणि आईच्या संध्याकाळच्या पोषाखाला चक्क भोके पाडली. रागाची अभिव्यक्ती करण्याची लहानग्या डोरिसची ही पद्धत फारच विलक्षण होती !

**बालपण**

"आत्मचरित्र लिहिताना सत्याला प्राधान्य दिले पाहिजे. म्हणूनच आत्मचरित्र लिहिणे ही अवघड कामगिरी आहे. सत्याशी प्रतारणा न करता अनेक लहानमोठ्या प्रसंगांची कौशल्यपूर्ण गुंफण करून आपला भूतकाळ वाचकांपुढे जिवंत करावा लागतो." असे डोरिस यांचे मत आहे. आपल्या बालपणातील एक आठवण सांगताना त्या म्हणतात, "माझ्या बालपणातील अनेक क्षण आणि घटना स्मृतीकलशात साठवून ठेवण्यात मी बराच काळ घालवला आहे. मी अडीच तीन वर्षांची असताना आईवडिलांनी मला पोहण्यासाठी तलावात नेले. त्यावेळी काही मोठ्या माणसांनी मला शारीरिक त्रास दिला. खरोखरीच त्या घटना मला आठवतात. शारीरिक त्रासाची ती स्मृती उबग आणणारी आहे. तो छळ इतका तीव्र होता की त्याचा ओरखडा माझ्या मन:पटलावर कायमचा उमटला. आपल्या पुष्कळशा आठवणी धूसर असतात. आईवडिलांच्या किंवा आप्तेष्टांच्या सांगण्यावरून त्यातील गाळलेल्या जागा भरून आपण त्या साकार करतो. पण बालपणातील काही स्मृती आयुष्यभर जागृतावस्थेत असतात. कुत्र्याला विशिष्ट वासाची स्मृती असते त्याप्रमाणे बालपणातील या आठवणी अगदी जशा घडल्या तशा सांगता येतात. भाषेचे ज्ञान होण्यापूर्वीच्या बालपणातील घटना सुद्धा काहींना आठवतात. माझ्या एका मैत्रिणीला 'आपण बाबागाडीत बसलो आहोत आणि येणारे जाणारे अनेक लोक उत्सुकतेने डोकावून आपल्याकडे पहात आहेत' हे आठवते. अर्थात माझी ती मैत्रिणी हिस्टेरिकला नाही. माझा तिच्यावर विश्वास आहे. म्हणून ही गोष्ट खरी आहे असं मला वाटते. गर्भावस्थेतील काही गोष्टी लोकांना आठवतात असं म्हणतात. पण मी काही त्याबाबतीत भाग्यवान नाही."



अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

ग्रँटा या मासिकात डोरिसनी आपल्या बालपणीच्या काही आठवणी प्रसिद्ध केल्या होत्या. शीर्षकावरून त्या स्मृती त्यांच्या आईबद्दलच्या असाव्यात असा समज होत असला तरी प्रत्यक्षात त्या आठवणीत वडिलांबद्दलचाच भाग अधिक होता. त्याविषयी स्पष्टीकरण देताना त्या म्हणतात, "माझ्या आईचं आयुष्य माझ्या वडिलांच्या आयुष्याशी निगडित होतं. त्यामुळे त्यांच्याविषयी वेगवेगळ्या आठवणी देणे शक्यच नव्हते. माझे वडिल अव्यवहारी होते. कदाचित तो युद्धाचा परिणाम असावा. आम्ही ऱ्होडेशियात (झिंबाब्वे) म्हणजे खरोखरच सोनं असलेल्या देशात रहात होते. आमच्या अवतीभवती छोट्या छोट्या सोन्याच्या खाणी होत्या. सर्व शेतकरी आपल्या गाडीत हातोडा आणि एखादं भांडं ठेवत असत. अनेकदा त्यांना सोन्याचे कण सापडत असत. आपल्याला अत्यंत प्रगत व शास्त्रीय पद्धतीने सोने मिळवता येईल अशी वडिलांची अटकळ होती. त्या दृष्टीने ते नेहमी प्रयोग करीत असत. माझी आई कुशल संघटक होती. तीच सर्व कुटुंबाचे व्यवस्थापन पहात असे. 'एल्डोरॅडो' या माझ्या कथेत मी सोने मिळवण्याच्या वडिलांच्या प्रयोगांचा वापर केला आहे."

शालेय जीवनातील आपल्या आठवणी सांगताना डोरिस म्हणतात, "मला वयाच्या अवघ्या सहाव्या वर्षी घर सोडून कॉन्व्हेंटमध्ये जाऊन रहावे लागले. अमेरिकेतील ज्यू मंडळी आपल्या मुलांना कॉन्व्हेंटमध्ये पाठवीत नसत. पण आफ्रिकेतील गोष्ट वेगळी होती. माणसे ज्यू असोत वा नसोत, तिथे वर्णाने गोऱ्या, सर्वच उच्च वर्गातील कुटुंबातील मुलांना कॉन्व्हेंटमध्ये पाठवण्याचा रिवाज होता. माझे कॉन्व्हेंटमधील पाच वर्षाचे वास्तव्य कधी एकदा संपते याची मी वाट बघत होते. लहान मुलांच्या मनात 'काळ' या संकल्पनेचा काय अर्थ अभिप्रेत असतो त्याची आपल्याला कल्पना येत नाही. "काळ हा कधीच संपणार नाही." असं त्यावेळी मला वाटत असे. ती पाच वर्षे मी निष्क्रीयतेत घालवली. लहान वय, हातात कोणतेही अधिकार नाहीत, इवल्याशा पंखात बंड करण्याची ताकद नाही. त्यामुळे कॉन्व्हेंटमधील या पाच वर्षाच्या काळात मला कसलाही आवाज उठवता आला नाही. निर्भिडपणे मतप्रदर्शन करता आले नाही."

'अंडर माय स्कीन' या आत्मचरित्राच्या पहिल्या भागात डोरिस यांच्या जन्मापासून (२२ ऑक्टोबर १९१९) १९४९ पर्यंतचा तीस वर्षाचा जीवनपट वाचकांपुढे उलगडत जातो. (झिंबाब्वे) ऱ्होडेशियातील जंगलात धाकट्या भावाला घेऊन फिरणारी खेळणारी अल्लड बालिका, कॉन्व्हेंटमधील जाचाला कंटाळलेली आणि चौदाव्या वर्षी शालेय शिक्षणाला रामराम ठोकणारी, पौगंडावस्थेतील शारीरिक आणि मानसिक बदलांचे दर्शन घडवणारी, मतभेद झाल्यावर आईवडिलांशी हुज्जत घालणारी, घराकडे पाठ फिरवून जगाच्या शाळेत अनौपचारिक शिक्षण घेणारी तरुणी अशा बहुरुपी डोरिसचे दर्शन वाचकांना होते. चार वर्षाच्या मुलाची दाई म्हणून काम करणारी आणि ते काम करताना चिंतनाच्या धुंदीत राहून,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मनात कविता लिहिणारी, भाषा प्रभुत्वाने एका कंपनीसाठी परिणामकारक जाहिराती शब्दबद्ध करणारी, टाइपरायटर मिळाल्यावर शॉर्टहँड टायपिंग शिकणारी, परिस्थितीच्या रेट्यामुळे मिळेल ते आणि पडेल ते काम करणारी हरहुन्नरी डोरिस लेसिंग वाचकाना आत्मविश्वासाने जगण्याची उर्मी देते.

बालपणीच्या आपल्या स्मृतींना उजाळा देताना डोरिस म्हणतात, "माझी आई खूपच कार्यक्षम होती. तशीच ती वैफल्यग्रस्त संगीतज्ज्ञ होती. तिची कार्यक्षमता तिने मी आणि माझा धाकटा भाऊ यांच्यावर खर्च केली. आम्ही काहीतरी विशेष करून दाखवावं अशी तिची इच्छा होती. मी संगीतात प्राविण्य मिळवावं असं तिला वाटत असे. खरं म्हणजे मला संगीतात फारशी गती नव्हती. तरीसुद्धा आमच्या इच्छेविरुद्ध आम्हा भावंडांना रोज संगीताची शिकवणी घ्यावी लागे. ती दामटवून आम्हाला संगीताचे धडे घेण्यास भाग पाडत असे. मुलांच्या पाठीस लागावं लागतं, त्या दृष्टीने आईचा हा गुण चांगला होता, पण ती जे काही असेल त्याचा ताबा घेत असे. त्यामुळे तिच्या या जाचातून मला सुटका करून घ्यावी लागली. प्रत्येक मुलाने आपल्यात कसली क्षमता आहे ते शोधून काढणं आवश्यक आहे असं मला वाटतं. मला उत्तम डॉक्टर होता आलं असतं किंवा मी उत्तम शेतकरी झाले असते. **पण मी लेखक झाले ती वैफल्यामुळे. मला वाटतं बहुतेक लेखक हताश झाल्यामुळेच लेखनाकडे वळतात.**"

"आपल्याला नावडतं असलेलं मूल वाढवणं ही पालकांच्या दृष्टीने फार अवघड गोष्ट असते. माझ्या आईला मी अजिबात आवडत नसे. कितीतरी लोकांचं आपल्या मुलांशी जमत नाही. माझ्या बाबतीत तीच स्थिती होती. पठडीतल्याप्रमाणे विचार न करणारी, सर्वसामान्य मुलांप्रमाणे न वागणारी माझ्यासारखी मुलगी वाढवणे हे माझ्या आईच्या नशिबी आले होते. मागे वळून पाहताना मला खरोखरच आईची दया येते. माझे वडिल मात्र चिकित्सक वृत्तीचे होते. त्यामुळे माझ्या जगावेगळ्या वृत्तींचा आणि बोलण्याचा त्यांना धक्का बसत नसे. आईप्रमाणे ते हबकून जात नसत."

### समृद्ध वाचन

लेखन हेच आपल्या जीवनाचे ध्येय ठरवून डोरिस यांनी पेन हाती धरले. पण या लेखनास सुरुवात करण्यापूर्वी बालवयात डोरिसने वाचनाने आपल्या मनाची मशागत केली होती. तसेच इतरही अनेक घटक साह्यभूत झाले होते. त्यासंबंधी बोलताना डोरिस म्हणतात, "मी उत्तम शिक्षण घ्यावे, नावलौकिक मिळवावा अशी माझ्या आईवडिलांची इच्छा होती. पण मला आईवडिलांचे विचार पटत नसत. माझे मन बंड करून उठत असे. त्यामुळे मी चौदाव्या वर्षीच शाळा सोडली. साहजिकच माझ्या शिक्षणात बऱ्याच मोकळ्या जागा राहिल्या.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

पण शाळा सोडल्याचा एक फायदा मला निश्चितच झाला. दुय्यम दर्जाचे साहित्य वाचण्यात माझा वेळ फुकट गेला नाही. आमच्या घरच्या वाचनालयात भरपूर पुस्तकं होती. सुरुवातीला ती सगळीच्या सगळी पुस्तकं मी वाचून काढली. माझं बालपण खूपच एकाकी होतं, म्हणूनच मी जास्तीत जास्त वेळ वाचनात घालवला. खेळायला, गप्पागोष्टी करायला मला सवंगडी नव्हते, म्हणून मी थेट दर्जेदार लेखकांशीच संवाद साधला. "मी चार्ल्स डिकन्स, शेकसपिअर यांचे साहित्य वाचले. व्हर्जिनिया वुल्फ आणि ऑलिव्ह श्रेइनेर (Olive schreiner) यांचे साहित्य वाचल्यावर मला मार्गदर्शन करणाऱ्या दोन मोठ्या वहिणी लाभल्याचा आनंद मला झाला. टॉलस्टॉय, दोस्तोएव्हस्की, चेकॉव, टर्जिनेव्ह, ब्युनिन यासारख्या रशियन साहित्यिकांच्या कलाकृतींनी माझ्या मनात वैचारिक वादळ निर्माण केले." मालमुड, नॉर्मन मेलर, ॲलग्रेन, कार्सन मॅक्युलर्स यासारख्या अमेरिकन लेखकांच्या उत्तुंग कलाकृतींचा मी आस्वाद घेतला. युरोपियन बिनीच्या लेखकांची दर्जेदार पुस्तके मी शोधून शोधून वाचली. याच काळात मी प्रूस्तच्या कादंबऱ्या वाचल्या. प्रूस्तच्या कादंबऱ्यांचा मी इतका सखोल अभ्यास केला की प्रूस्तवर मला अधिकारवाणीने भाष्य करता येत असे. बुद्धीला झिणझिण्या आणणाऱ्या अशा कादंबऱ्या वाचताना मला विलक्षण आनंद होत असे. एक उत्तम पुस्तक वाचताना अचानक दुसऱ्या एखाद्या चांगल्या पुस्तकाच्या नावाचा उल्लेख सापडे. मग इंग्लंडमधल्या एव्हरीमन लायब्ररीतून मी ते मागवून घेत असे. मागवलेले पुस्तक पोस्टानं यायची मी आतुरतेने वाट बघत असे. कधी एखादे पुस्तक झटकन् मिळे तर कधी पाच सहा आठवड्यांच्या प्रदीर्घ प्रतिक्षेनंतरच पुस्तकाचे पार्सल हातात पडे. अर्थात तो क्षण माझ्या जीवनातील अत्युच्च आनंदाचा क्षण ठरत असे. त्या कोऱ्या पुस्तकाचा गंध घेत मी वाचनात दंग होऊन जाई. लहानपणी आणि युवावस्थेत अधाशासारखं केलेलं अभिजात आणि विविध विषयस्पर्शी वाचन हेच माझं खऱ्या अर्थानं बहि:शालेय शिक्षण ठरलं. माझी मनोभूमिका घडत गेली. विचारांना चालना मिळाली. कल्पनाशक्तीला धुमारे फुटले. हे स्वयंशिक्षणच मला लेखनाच्या दृष्टीने फलदायी ठरले. मध्य आफ्रिका, पहिल्या महायुद्धानंतरची परिस्थिती आणि साहित्य या तिन्हीचा माझ्या जडण घडणीत सिंहाचा वाटा आहे."

"आणखी एका गोष्टीचा उल्लेख मला करावासा वाटतो. माझी आई हुशार होती. ती आम्हा भावंडांना भरपूर गोष्टी सांगत असे. लहानपणातील त्या आठवणी माझ्या मनात आजही जागृत आहेत. 'मुलांना गोष्टी सांगणं' ही पालकांनी करावयाची सर्वोत्तम कृती आहे असं मला वाटतं."



अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

**दोन विवाह**

डोरिसच्या जीवनात दोनदा लग्न करण्याचे प्रसंग आले. दुर्दैवाने ते दोन्ही विवाह अयशस्वी झाले. ते दोन्ही निर्णय अविचाराने घेतले गेले. दुसरे महायुद्ध आणि तत्कालीन परिस्थिती त्याला कारणीभूत होती असं डोरिसना वाटतं. वैयक्तिक जीवनातील या कटु स्मृतींबद्दल त्या म्हणतात, "दुसरं महायुद्ध झालं नसतं तर मला वाटतं मी लग्नच केल नसतं. युद्ध चालू असताना लोकांची मानसिकता बदलते. तत्कालीन तरुण-तरुणी फारसा गंभीर विचार न करता लग्न करीत असत. युद्धकाळात प्रत्येक माणूस खूपच विक्षिप्त होतो. 'आपण काय करतो ते फारसे जमेस धरले जात नाही' असं त्यांना वाटतं. आपण एकमेकांना अनुरूप आहोत की नाही, आपल्या स्वभावाच्या तारा जुळतात की नाही याचा साधक बाधक विचार न करता तत्कालीन तरुण-तरुणी लग्नाचे निर्णय घेत असत असं मागे वळून पाहताना मला वाटतं. पहिल्या महायुद्धाच्या काळात मी मोठी झाले. या युद्धामुळे माझ्या आईवडिलांच्या आयुष्याचा विचका झाला. त्यानंतर दुसरं महायुद्ध झालं. माझ्या जीवनात ही दोन महायुद्धे फार प्रभावशाली ठरली. माझं वय जसजसं वाढत जातं तसतशी या महायुद्धांचा माझ्या जीवनावर किती प्रभाव पडला आहे याची मला जाणीव होते."

"माझा पहिला विवाह फ्रँक विस्डम यांच्याशी झाला." त्या विवाहापासून मला दोन अपत्ये झाली. फ्रँक दक्षिण ऱ्होडेशियात (आताचे झिंबाब्वे) राहात असत. पण तिथल्या वसाहती भयानक होत्या. तिथले जीवन चरकातून पिळून निघाल्यासारखे मृतवत होते. मुठभर मंडळी बहुतांश समाजावर जुलूम जबरदस्ती करीत असल्यामुळे अशा समाजात राहाणे क्लेशकारक होते. फ्रँक यांच्याशीही माझा विसंवाद होता. अशा वेळी मला गोएथेच्या वचनाची आठवण होते. गोएथे म्हणत असे, "जर तुम्ही पुरुषाला खड्ड्यातच राहू देणार असाल तर तुम्हालाही त्याच्याबरोबर खड्ड्यातच जावे लागेल." माझ्या बाबतीत तसे होऊ नये म्हणून मला तिथून निघून जाणे भाग होते. पहिला विवाह असफल झाल्यामुळे फ्रँक आणि आपल्या दोन मुलांना सोडण्याचा कठोर निर्णय डोरिसला घ्यावा लागला. वास्तविक आपल्या मुलांना सोडून जाताना डोरिसला अत्यंत कठोर व्हावे लागले असेल. हा अवघड निर्णय घेण्यापूर्वी त्यांच्या मनाची चलबिचल झाली असेल, प्रत्यक्ष पाऊल उचलताना जिवाची घालमेल झाली असेल असे वाचकांना वाटते. पण त्याबाबतीत डोरिसने आत्मचरित्रात काहीच लिहिले नाही. सत्याशी प्रतारणा न केलेल्या आत्मचरित्रात हा अनुल्लेख खटकतो. म्हणूनच समीक्षकांनी डोरिसवर टीकेची झोड उठवली. त्यावर भाष्य करताना डोरिस म्हणतात, "ती टीका वाचून मला आश्चर्याचा धक्काच बसला. अरेरे, असं क्रूर कृत्य माझ्या हातून कसं बरं घडलं?" असं म्हणत मी शोक करावा आणि त्या भावना आठदहा पानात व्यक्त कराव्यात अशी त्या समीक्षकांची माझ्याकडून अपेक्षा होती. पण मी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

तसं काहीही केलं नाही. आपण जेव्हा एखादा निर्णय घेतो तेव्हा त्याची अंमलबजावणी करून मोकळं व्हावं असं मला वाटतं. त्याच्यावर रडत बसणं मला आवडत नाही. खरोखरच मी तो कठोर निर्णय घेतला होता, पण तो माझ्या दृष्टीने चांगला ठरला. मागे वळून पाहताना 'हे मला केलंच पाहिजे' हे समजण्याइतकी बुद्धीमत्ता माझ्यासारख्या खेडवळ स्त्रीकडे होती याच्यावर माझा विश्वासच बसत नाही. माझी बाजू घ्यायला, माझ्या पाठीशी उभं रहायला कोणीही नव्हतं, तरीसुद्धा स्वतंत्रपणे मी तो निर्णय घेतला.''

''माझा दुसरा विवाह झाला १९४३ साली गॉटफ्रेड लेसिंग या कम्युनिस्ट बुद्धीवंताशी हा विवाह सुद्धा जमेत धरण्यासारखा नव्हता. गॉटफ्रेड लेसिंग जर्मन निर्वासित, हुशार. त्याचे आजोबा उपक्रमशील होते. ते झारच्या काळात रशियन लोकांना घोड्याचे नाल करून विकत असत. त्यांनी एकोणिसाव्या शतकात रशियात रेल्वेची उभारणी केली. स्वसामर्थ्याच्या जोरावर कोट्याधीश झाले. त्यांची मुले वडिलांचा तिरस्कार करीत आणि वडिलांनी कमावलेले पैसे उधळीत. गॉटफ्रेड हा त्यांचा नातू. गॉटफ्रेडचे वडील आपला सारा वेळ वाचनालयात घालवीत आणि वडिलांच्या पैशावर चरितार्थ चालवीत बर्लीनच्या उतरत्या काळात १९२० ते ३० या दशकात गॉटफ्रेड अत्यंत श्रीमंतीत लहानाचा मोठा झाला. राजकीय घडामोडींशी त्याचा काही संबंध नव्हता. परंतु तो प्रेमात पडला ती मुलगी होती स्वतःच्या हिमतीवर कोट्याधीश झालेल्या वेल्श माणसाची. ती मुलगी कम्युनिस्ट झाली आणि प्रेमाखातर तिने गॉटफ्रेडला कम्युनिस्ट होण्यास भाग पाडले. गॉटफ्रेड कट्टर कम्युनिस्ट झाला. आम्ही ऱ्होडेशियात (झिंबाब्वे) राहणारी साधी माणसं. या सुसभ्यं. नागर संस्कृतीच्या झगमगाटाने त्यावेळी आमचे डोळेच दीपले. आता या झगमगाटाचे काहीही वाटत नसले तरी मी गॉटफ्रेडला भेटले तेव्हा चांगलीच प्रभावित झाले होते. या महाकाव्याची अनेक प्रकरणे मी गाळून टाकतेय. युद्धानंतर गॉटफ्रेड पूर्व बर्लिनला परतला. तो खूप हुशार तर होताच, पण त्याच्याजवळ विलक्षण संघटन कौशल्य होते. त्यामुळे कम्युनिस्ट पक्षातील महत्त्वाची शक्ती म्हणून जर्मनीमध्ये त्याचे स्थान निश्चित झाले. त्यावेळी आम्ही कम्युनिस्ट पक्षात एकत्र काम करत होतो. पुढील पाच वर्षांच्या काळात सारं जग कम्युनिस्ट पक्षाचा स्वीकार करेल, त्यामुळे सर्वजण कायम सुखी, आनंदी होतील, मग व्यक्तिगत आयुष्याचा फारसा विचार करण्याची गरजच नाही असा आम्हाला विश्वास वाटत होता. फक्त कम्युनिस्ट पक्षातच नव्हे, तर इतर सर्व राजकीय पक्षात अशा तऱ्हेचे वेडगळ विचारप्रवाह असतात. मी गॉटफ्रेडशी लग्न केलं, पण आमच्यात कोणताही समान धागा नव्हता. आम्ही एकमेकांना बिलकुल आवडत नसलो तरी आम्ही एकमेकांशी अत्यंत सौजन्याने वागत होतो. आमच्यात कधीही भांडणं झाली नाहीत. कारण भांडणं करण्याकरता त्या दोन व्यक्तींमध्ये काही गोष्टी तरी सामाईक असाव्या लागतात ना? या लग्नानंतर मला एक मुलगा झाला. पण या



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

लग्नानंतरचा माझ्या आयुष्यातील काळ असाच कंटाळवाणा गेला. आमचे जरासुद्धा पटत नसताना आम्ही इतके चांगले कसे काय वागत होतो या विचाराने मी थक्क होऊन जाते. मला बंड करून उठता आले असते. पण मी तसे काही केले नाही. उलट चार वर्षे वाट पाहिली. माझी तितिक्षा वाढविण्याचा तो अभ्यास होता. एखादी परिस्थिती आपल्याला आवडत नसेल तर त्यात बदल करण्यासाठी आटापिटा न करता जाणीवपूर्वक स्वस्थ राहाणे, निष्क्रीय राहणे अनेकदा सुखकारक ठरते. त्या परिस्थितीत बदल होण्याची वाट पहावी. ती परिस्थिती बदलते. तितिक्षापूर्ण वाट पहाणे हे प्रतिकूल परिस्थितीवर मात करण्याचे प्रभावी शस्त्र आहे. अशा प्रतिक्षेनंतर कधी कधी आपल्याला अपेक्षित नसलेल्या आश्चर्यकारक गोष्टी घडतात. त्या घटना आपण अनुभवाव्यात कारण काळाच्या ओघात त्या विरून जातात. अशा घटना पुन:पुन्हा घडाव्यात अशी अपेक्षा करणे ही फार मोठी चूक होईल. कारण अशा घटना पुन्हा घडत नाहीत.'' आपल्या विवाहाच्या संदर्भात डोरिस परिस्थितीवर मात करण्याचा स्थलकालातीत सल्ला वाचकांना देतात. दुसरा विवाहसुद्धा अयशस्वी झाला असला तरी या विवाहानंतर आपले 'डोरिस लेसिंग' हे नाव त्यांनी कायम ठेवले आणि आपले सर्व लेखन याच नावाने प्रसिद्ध केले.

आपल्या वैयक्तिक जीवनातील घटनांचा वेध घेत डोरिस लेसिंग विवाहसंस्था, कुटुंबव्यवस्था, स्त्रियांची मानसिकता अशा अनेक मुद्यांवरील आपली मते व्यक्त करताना म्हणतात, ''माझ्यामध्ये सहनशीलतेचा अभाव होता, कोणत्या ना कोणत्या मुद्यावरून वादविवाद करायची मला सवय होती. त्यामुळे वैवाहिक जीवन सुखकर करण्यासाठी आवश्यक असणारे गुण माझ्या ठायी निश्चितच नव्हते. हे गुण मी फार उशीरा आत्मसात केले. पण तेव्हा विवाह, वैवाहिक जीवन याविषयीची गोडी माझ्या मनात उरली नव्हती. विवाहबंधनात पडण्याची माझी मानसिकता नाही याची मला खूप उशीरा जाणीव झाली. ही गोष्ट फार पूर्वी लक्षात आली असती तर मनस्ताप आणि दु:ख यापासून मला स्वत:ला वाचवता आले असते. 'पुरुषाच्या सोबतीशिवाय जीवन जगणे म्हणजे फार मोठा अनर्थ ओढवून घेणे' अशी खात्री मला तरुणपणी वाटत असे. परंतु हा भ्रम आहे याची जाणीव मला हळूहळू होऊ लागली. मला कोणत्याही आधाराशिवाय स्वतंत्रपणे जीवन जगता येऊ लागले. त्यामुळे जीवनात एकाकीपणा आला. पण स्त्रिया या पद्धतीने विचार करू लागल्या की पुरुषांची गरज संपते. साहजिकच पुरुषांना ही वृत्ती अजिबात आवडत नाही. दांपत्यजीवन जगण्यासाठी पुरुषांशी संबंध प्रस्थापित करायला स्त्रियांना खूप प्रयत्न करावे लागतात. एवढी धडपड करून त्यामधून फारसं काही मिळवण्यासारखे नसतं. पुरुषांची काळजी घ्यावी लागते, त्यांचा अहंकार हळुवारपणे झोंबाळावा लागतो. आपले स्थान मध्यवर्ती असलेले पुरुषांना आवडते. त्याकरिता स्त्रियांना ते परिघावर ठेवतात. विद्यमान तरुण मात्र काहीसे वेगळे



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत